प्रकाशक :
श्री. मनोहर य. जोशी
बी.ए.बी कॉम.
प्रसाद प्रकाशन,
१८९२, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ३०.



वैशाख शके १९०४

आपले वेद आपली पुराणे
ठेव योजनेतील ग्रंथ.

मुद्रक :
प्रमोद वि. बापट,
प्रमोद प्रिंटर्स,
१०१९, सदाशिव पेठ,
नागनाथ पाराजवळ,
पुणे ४११०३०.

## प्रकाशकाचे निवेदन

'आपले वेद आपली पुराणे' या योजनेंतील दुसरा पांच ग्रंथांचा संच म्हणजे यजुर्वेद, शिवपुराण, भागवतपुराण, नारदपुराण व मार्कंडेय-पुराण, एकदमच प्रकाशित होत आहेत. योजिलेल्या वेळापत्रकाप्रमाणेच काम चालू आहे हे सांगायला आनंद वाटतो.

या योजनेला मिळालेला प्रतिसाद हाच अनेकांच्या कुतूहलाचा व आनंदाचा विषय झालेला आहे. माझ्या दृष्टीने त्याची कारणमीमांसा अशी– पाश्चिमात्यांच्या वैचारिक गुलामगिरीत मागील पिढी अडकलेली होती. आजही त्यात फार मोठा फरक पडला आहे असे नव्हे, परंतु एक नवी जाग येत आहे. आपले ते सर्व त्याज्य, आपले सर्व वाङ्मय अविश्वासार्ह; पाश्चिमात्य वाङ्मय, विचार हेच बरोबर, अशी एक विचित्र मनोधारणा आपली झाली होती. खरे सुख त्यांच्यामुळेच, असे वाटत होते. स्वातंत्र्यानंतरच्या तीस-पस्तीस वर्षांत पाश्चिमात्य विचारपद्धतीनेंही खरे सुख मिळाले नाही, तेव्हा जुनी व नवीन पिढीही विचार करू लागली व भारतीय संस्कृती, प्राचीन वाङ्मय यांचा अभ्यास करावासा वाटू लागला. नेमक्या याच वेळी वेद व पुराणवाङ्मयाची योजना आली व अभूतपूर्व वाचकवर्ग या योजनेला लाभला.

पहिला संच प्रकाशित झाल्यावर तो वाचून आवडल्याचे अनेकांनी कळविले. ग्रंथपरिचयाची जी पद्धत आम्ही स्वीकारली ती वाचकांना पसंत पडल्याचे पाहून आनंद वाटला. दुसरा संचही लोकप्रिय होईल व भारतीय संस्कृतीच्या पुनर्जागरणाच्या कार्यात उत्तरोत्तर अधिक वाचक सहभागी होतील असा विश्वास वाटतो.

यानंतर अशाच योजनेत सांस्कृतिक महत्त्वाचे आणखी काही ग्रंथ प्रकाशित करण्याचा मानस आहे. त्यालाही वाचकांचा प्रतिसाद मिळेल असा विश्वास आहे.

मनोहर य. जोशी

## लेखकाचे निवेदन

'आपले वेद, आपली पुराणे' या ग्रंथमालेतील चार पुराणांचा हा दुसरा संच वाचकांच्या हाती देताना मनाला विशेष आनंद होत आहे. गेल्या जुलै महिन्यात नासिक येथे पहिल्या संचाचे प्रकाशन अतिशय डौलानें व उत्साहानें झाले. वाचकांच्या प्रतिक्रियाही अतिशय सौजन्याच्या व गुणग्राहकतेच्या दिसून आल्या. आता या दुसऱ्या संचातील शिवपुराण, भागवतपुराण, नारदपुराण व मार्कंडेयपुराण हे महत्त्वाचे पुराणग्रंथ वाचकांच्या पसंतीस उतरतील अशी खात्री वाटते.

आपल्या प्राचीन परंपरेत पुराणांचा धागा वेदकालापासून मिळतो. अठरा महापुराणे, अठरा उपपुराणे यांचा प्रचंड विस्तार, त्यांत वेळोवेळी पडलेली भर, त्यांतील पाल्हाळ व पुनरुक्ती आणि मुख्यतः संस्कृत भाषा; यांमुळे पुराणांतील सांस्कृतिक धन आजपर्यंत सर्वसामान्य लोकांच्या कक्षेत आले नव्हते. मूळ संस्कृत पुराणेही सहजासहजी उपलब्ध होत नाहीत त्यांच्या अवाढव्य विस्तारामुळे ती वाचणेही अशक्य बनते. म्हणून त्यांचे रूपांतर आजच्या भाषेत करण्याची ही योजना सर्वांनाच पसंत पडली. या ग्रंथमालेतील पुराणे ही मूळ संस्कृतातील पुराणांचे अक्षरशः भाषांतरे नाहीत. निवडक विषयांची पुन्हा रचना करून, पुनरुक्ती टाळून, मूळ कथानकास वा निरूपणास धक्का लागणार नाही, अशा हेतूने या ग्रंथांची मांडणी केलेली आहे. संस्कृत विद्येचे संशोधक, प्राचीन संस्कृतीचे अभ्यासक यांच्यासाठी हा उपक्रम नाही हे स्पष्टच आहे.

संतबोध, संतचरित्रे, संतकार्य यांच्या चिंतनात व मननात निम्मे आयुष्य गेल्यावर मी संतवाङ्मयातील अनेक संदर्भ उपनिषदांत व

पुराणांत शोधू लागलो. ' अष्टादश पुराणें। तींचि मणिभूषणें ' असे पुराणांविषयी श्रीज्ञानेश्वर का म्हणतात, याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. घरी बहुतेक सर्व पुराणे होतीच. त्यांच्या अभ्यासात गेली आठ-दहा वर्षे गेली. या अभ्यासातून ही पुराणग्रंथमाला आकारास आली. ' प्रसाद ' प्रकाशनचे श्री. म. य. जोशी यांची कुशलतापूर्वक दृष्टी भक्कम पाया म्हणून या योजनेस लाभली. पुराणांचे हे नवे दर्शन वाचकांना पसंत पडले आहे असे वाटते. पुराणांतील चमत्कार, विकृत संकल्पना, अघटित प्रसंग, पाल्हाळ आणि मुख्यतः आजच्या या नव्या काळात पुराणांच्या दर्शनाचा उपयोग; यांसंबंधी एक समालोचनात्मक ग्रंथ याच मालेत वाचकांच्या हाती शेवटी देण्याचा आमचा संकल्प आहे, हे कळविण्यास विशेष आनंद होतो.

पुराणांचे हे रूपांतर करताना मी आनंदाश्रम, निर्णयसागर, गीताप्रेस गोरखपूर, मोदवृत्तप्रेस वाई, रावजी श्रीधर गोंधळेकर, मनसुखराय मोर, इत्यादींच्या संहितांचा उपयोग केला आहे, हे कृतज्ञतापूर्वक सांगावयास हवे. प्रस्तुतच्या भागवतपुराणाच्या लेखनाच्या वेळी दामोदर सावळाराम आणि मंडळींच्या ' सार्थ श्रीमद्भागवता 'च्या दहा भागांचा अतिशय उपयोग झाला आहे. हेही नमूद करावयास हवे.

' रेणुका ' लक्ष्मीपार्क, नवी पेठ
पुणे ३०.

प्र. न. जोशी
मे १९८२

# भागवतपुराणपरिचय

## त्रैलोक्यसुंदर श्रीकृष्ण

त्रिभुवनकमनं तमालवर्णं रविकरगौरवराम्बरं दधाने ।
वपुरलककुलावृताननाब्जं विजयसखे रतिरस्तु मेऽनवद्या ।।
युधि तुरगरजोविधूम्रविष्वक्कचलुलितश्रमवार्यलंकृतास्ये ।
मम निशितशरैर्विभिद्यमानत्वचि विलसत्कवचेऽस्तु कृष्ण आत्मा ।।
ललितगतिविलासवल्गुहासप्रणयनिरीक्षणकल्पितोरुमानाः ।
कृतमनुकृतवत्य उन्मदान्धाः प्रकृतिमगन्किल यस्य गोपवध्वः ।।
(१.९.३३–४०)

श्रीकृष्णा, तू त्र्यैलोक्यसुंदर आहेस. तुझी अंगकांती तमालपत्राप्रमाणे कृष्णवर्णाची आहे. सूर्यकिरणांप्रमाणे अत्यंत तेजस्वी असे श्रेष्ठ वस्त्र तू परिधान केले आहेस. तुझ्या मुखकमलावरचे कुरळे केस सर्वत्र पसरल्यामुळे ते अतिशय शोभून दिसते. तू अर्जुनाशी मित्रत्वाने वागणारा आहेस. युद्धात घोड्यांच्या टापांनी उधळलेल्या धुळीने मळलेले व वाऱ्याने हलणारे केस आड येऊन श्रमामुळे ज्याच्यावर घामाच्या धारा सुटल्या आहेत, ते कमलमुख शोभून दिसते. त्याच्या शरीराची त्वचा माझ्या बाणांनी छिन्नविच्छिन्न झाली आहे. त्याने चिलखत घातले आहे. अशा श्रीकृष्णाच्या ठिकाणी माझे मन नित्य जडो. त्याचे सुंदर चालणे, क्रीडा, मंदहास्य, प्रेमाचे कटाक्ष यांच्या साह्याने कृष्णाने ज्यांचा बहुमान केला, त्या गर्वानें अंध झालेल्या गोपस्त्रिया कृष्णाच्या कृतींचे अनुकरण करून खरोखरच कृष्ण-स्वरूपास प्राप्त झाल्या. अशा श्रीकृष्णाशी माझे मन एकरूप व्हावे.

## भागवतपुराणाची निर्मिती

भीष्माचार्यांनी श्रीकृष्णांचे हे रमणीय वर्णन भागवतपुराणात केले आहे. भागवतपुराणाच्या या श्रेष्ठ नायकाची अशी अति सुंदर, रेखीव व सुबक वर्णने या पुराणात भरपूर आहेत. वेद, भगवद्गीता यांच्या बरोबरीने भारतीय धर्मपरंपरेत या भागवतपुराणास मानाचे स्थान प्राप्त झाले आहे. बहुतेक पुराणांच्या मताने हे पाचवे पुराण असले तरी वैष्णवधर्माचे सार सांगणारा हा पुराणग्रंथ पद्मपुराणाने मात्र शेवटचा म्हणजे अठरावा मानला आहे. हे एक सर्वश्रेष्ठ असे सात्त्विक पुराण असून ते व्यासांनी रचले. त्यांनी ते आपल्या शुक नावाच्या पुत्राला सांगितले. शुकांनी ते राजा परीक्षिताला सांगितले.

या पुराणाच्या निर्मितीची कथा प्रारंभीच आली आहे. महर्षी व्यास एकदा सरस्वती नदीच्या तीरावर आपल्या आश्रमात खिन्नवदन होऊन बसले होते. एवढ्यात नारद तेथे आले. नारदांनी त्यांना खिन्नतेचे कारण विचारले, तेव्हा व्यास म्हणाले, ' नारदा, मी पुराणं रचिली. महाभारत लिहिलं. चतुर्विध पुरुषार्थांचं वर्णन व प्रतिपादन केलं. पण इतकं करूनही माझ्या चित्ताला शांती कशी ती प्राप्त झाली नाही. म्हणून माझ्या मनास खिन्नता आहे.' नारदांनी क्षणभर विचार करून व्यासांना म्हटले, ' महर्षे, तुम्ही खूप मोठं वाङ्मय निर्माण केलंत. विविध शास्त्रांचा ऊहापोह केलात, हे खरं, पण तुम्ही अद्यापि भगवंतांचं गुण-गान भक्तियुक्त अंतःकरणानं केलेलं नाही. तुम्ही ज्ञानाचा महिमा सांगितलात. पण भक्तीचं माहात्म्य गायिलेलं नाही. म्हणून एखादी भक्तिमय काव्यकृती निर्माण करा. त्यामुळं तुमचा आत्मा शांत होईल. तुमच्या मनास समाधान होईल.

भवताऽनुदितप्रायं यशो भगवतोऽमलम् ।
येनैवासौ न तुष्येत मन्ये तद्दर्शनं खिलम् ।।
यथा धर्मादयश्चार्था मुनिवर्यानुकीर्तिताः ।
न तथा वासुदेवस्य महिमा ह्यनुवर्णितः ।।

(१.५.८–९)

' आपण भगवंतांचं निर्मळ यश वर्णन केलेलं नसल्यामुळं आपल्या मनास शांती मिळालेली नाही. आपल्या ज्ञानात हाच कमीपणा आहे. व्यासा, आपण धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारही पुरुषार्थांचं जसं वर्णन केलंत तसं परमेश्वराचं नाही केलंत.'

नारदांनी इतके सांगून स्वतःच्या चरित्राचा संदर्भ दिला व स्वतः-वर भगवंतांची कृपा कशी झाली, तेही त्यांनी वर्णन केले. काम, क्रोध, लोभ इत्यादी विकारांनी त्रस्त झालेले अंतःकरण परमेश्वराच्या सेवेने जसे तृप्त होते, तसे ते यमनियमांच्या प्रत्यक्ष मार्गानेही होणार नाही, असा त्यांच्या सांगण्याचा मुख्यार्थ होता. अशा मनःस्थितीत व्यासांनी मरणोन्मुख असलेल्या परीक्षित राजाला भागवतपुराण सांगितले. गंगातीरावर राजा परीक्षित प्रायोपवेशन करीत होता. त्याला व्यासपुत्र शुकांनी हे पुराण निवेदन केले.

## एक अमोल रत्न

भारतीय धर्मपरंपरेवर व आचारपद्धतीवर फार मोठा परिणाम घडवून आणणारा एक पुराणग्रंथ म्हणून भागवतास अतिशय महत्त्व आहे. प्राकृत भाषांतील भक्तिसाहित्याचा आणि विचारधारेचा उगम गीतेपेक्षा भागवतात शोधता येतो. भक्ती हे मूल्य वैदिक की अवैदिक? आर्य की आर्येतर ? असे प्रश्न आधुनिक काळात निर्माण झाले असले तरी गीता, भागवत, त्याही आधी वेद यांच्यांत भक्तितत्त्वाचे अनेक अंकुर स्पष्टपणे दिसतात. भागवतासारख्या पुराणांतून इतर सर्व कर्मकांडात्मक व्यापापेक्षा निखळ भक्तीने भगवंतास एक पत्र, पुष्प जरी अर्पण केले तरी त्याने आयुष्याचे काम होते. प्रपंच करता करता, व्यवसाय करताना, परमात्म्याचे अनुसंधान कसे राखावे, सर्व कर्मे त्याला अर्पण कशी करावीत, जातीने कोणीही असला तरी त्याचे चित्त एकदा भगवंताकडे लागले की, त्याची जात संपते व तो भक्ताच्या एका नव्या जातीत सामील होतो. असे मोठे उदार व समर्पक तत्त्वज्ञान विविध कथांच्या माध्यमातून व श्रीकृष्णांच्या चरित्रमाध्यमातून भागवतासारख्या पुराणांनी जनतेत स्थिर केलेले दिसते. भागवतपुराणातील

रसाळ निवेदनपद्धती, चित्ताकर्षक व तत्त्वबोधक कथा, ठसठशीत व्यक्तिचित्रे, प्रत्ययकारी निसर्गवर्णनें, विलक्षण मोह पाडील असे काव्यसौंदर्य, सर्व समाजावर युगानुयुग प्रभाव पाडणाऱ्या कृष्णलीला, योगेश्वर कृष्णानें उद्धवाला केलेला तात्त्विक उपदेश, भक्ती व कर्म यांची योग्य ती सांगड; अशा विविध कारणांनी भागवतपुराण संस्कृत साहित्यातील एक अमोल रत्न ठरले. येथे कर्माला हात लावलेला नाही. नरदेहाची किळसवाणी निंदा नाही, की प्रपंचाची वा गृहस्थाश्रमाची हेटाळणी नाही. तत्त्वविचारांचा फुलोरा फुलविताना कथांच्या साह्यानें हे पुराण विविध रसांनी उमलून आले आहे.

स्वतः भागवतकारांनीच या पुराणाचे वर्णन करताना म्हटले आहे, वेदरूपी कल्पवृक्षाचे हे अमृतद्रवयुक्त असे फळ शुकमुखातून खाली गळाले आहे. भूमीवरील रसिकांनो, भाविकांनो तुम्ही याचा जीवनाच्या अखेरपर्यंत आस्वाद घ्या.

**निगमकल्पतरोर्गलितं फलं शुकमुखादमृतद्रवसंयुतम् ।**
**पिबत भागवतं रसमालयं मुहुरहो रसिका भुवि भावुकाः ।।१.१.३**

भागवतकारांनीच आपले हे पुराण म्हणजे वेदान्ताचे सार आहे, असे म्हटले आहे. त्याच्या अमृतस्वादानंतर इतरत्र कोठेही जाण्याची आवश्यकता नाही, असे म्हटले गेले आहे. वेदान्तासारखा विषय अत्यंत सुबोध करून तो भक्तीच्या मार्गानें बहुजनसमाजापर्यंत पोचविणाऱ्या या पुराणग्रंथांचे सप्ताह मोठ्या थाटानें अजूनही गावोगाव होताना दिसतात. नामदेव, एकनाथ, तुकाराम, सूरदास, मीराबाई यांच्या भक्तीच्या अनुभवांची सर्व बीजे भागवतात शोधता येतील. किंबहुना वामनपंडितांसारखे बुद्धिमान कवीही भागवती कथांत रमून गेलेले दिसतात. भक्तीचा आदर्श कोणता मानावा ? तर 'यथा व्रजगोपिका-नाम्–' असे नारदांनी भक्तिसूत्रांत म्हटले आहे. गोपींच्या या भक्ति-प्रवण मनाचे सारे धागेदोरे भागवतात प्रकट झालेले दिसतात. श्रीकृष्ण हे मोठे तत्त्ववेत्ते व योद्धे खरें, ते अर्जुनाला गीतेचा उपदेश करतात, उद्धवास ज्ञानाचा उपदेश करतात, हेही खरे; पण श्रीकृष्ण हा वसुदेव-

देवकीचा, नंद-यशोदेचा पुत्र असून त्यानें केलेल्या गोकुळातील क्रीडा भागवतकारांनी इतक्या तन्मयतेनें रंगविल्या आहेत की, भारतातील लाखो घरी अशा कृष्णाच्या लीला दिसू लागल्या. त्याच्या सौंदर्याचा, मुरलीचा वेध गोपींसारख्यांना इतका लागला की, त्या स्वतःच कृष्णमय बनून गेल्या. युद्धभूमीवरील कृष्ण, योगेश्वर कृष्ण, राज्यकर्ता श्रीकृष्ण, शिष्टाई करणारा मुत्सद्दी कृष्ण गोकुळात गायी राखतो, घरात खोड्या करतो, गोप-गोपींत रमतो; हे दृश्यच मोठे विलोभनीय व आकर्षक आहे.

म्हणूनच मोक्ष साधणारे, मोक्ष इहलोकी आणून उभे करणारे हे भागवतपुराण इतर पुराणांनाही महत्त्वाचे वाटले. पद्मपुराणात गौतमानें अंबरीषाला म्हटले आहे, ' अंबरीषा, शुकाचार्यांनी सांगितलेलं भागवत-पुराण तू नित्य श्रवण कर. तुला भवबंधनातून मुक्त व्हायचं असेल तर तू स्वमुखानं त्याचा पाठ कर. स्वतः भागवतकारही म्हणतात,

अनर्थोपशमं साक्षाद्भक्तियोगमधोक्षजे ।
लोकस्याजानतो विद्वांश्चक्रे सात्वतसंहिताम् ॥
यस्यां वै श्रूयमाणायां कृष्णे परमपूरुषे ।
भक्तिरुत्पद्यते पुंसः शोकमोहभयापहा ॥ ( १.७.६-७)

प्रपंचाच्या पाशातून आपली सुटका करून घ्यावी, श्रीहरींची भक्ती कशी प्राप्त करून घ्यावी, हे अज्ञानी लोकांना कळत नाही. म्हणून ते समजावून देण्यासाठी विद्वान व्यासांनी ही सात्वतसंहिता, भागवतपुराण-संहिता निर्माण केली. या संहितेच्या श्रवणानें श्रीहरींच्या ठिकाणी भक्ती उत्पन्न होते. संसारातील शोक, मोह, भय नाहीसे होतात.

## भागवतातील भागवतधर्म

अद्वैत वेदान्ताचे शास्त्र व तत्त्वज्ञान भागवतपुराणानें कथांच्या व श्रीकृष्णांच्या चरित्राच्या माध्यमातून सर्वसामान्य लोकांच्या आटोक्यात आणले. ते नित्य आचारात सामावून टाकले. हे अद्वैत तत्त्वज्ञान प्रामुख्यानें सांख्यशास्त्राच्या आधारानें स्पष्ट झाले आहे. ब्रह्मदेवांनी

नारदांना सांगितलेली जगाच्या उत्पत्तीची प्रक्रिया, कपिलमुनींनी आपल्या मातेला, देवहूतीला केलेला उपदेश यांतून सांख्यशास्त्राचा ऊहापोह आहे. प्रकृती ही माया, पुरुष हा आत्मा, पंच इंद्रिये, पांच तन्मात्रा, महत्, अहंकार; अशी परिभाषा सांख्यशास्त्राची आहे. हे अद्वैताचे प्रतिपादन भागवतात विविध प्रकारांनी केलेले आहे. चतुःश्लोकी भागवतातही अद्वैताचे तत्त्व असून 'सर्वं विष्णुमयं जगत्' हे त्याचे मुख्य सूत्र आहे.

या अद्वैताच्या सूत्रावर आधारलेला व जीवाच्या रागात्मक आविष्कारावर पोसलेला एक काहीसा नवा वाटणारा भागवतधर्म या पुराणानें जोपासला व त्याची वाढ केली. भक्तिप्रधान अशा या धर्मानें भगवंतांच्या प्राप्तीसाठी भक्ती हे प्रमुख साधन मानले आहे. आणि ही भक्तीही प्रपंच करीत असताना, व्यवहार सांभाळीत असताना, गृहस्थ-धर्माची सर्व कर्तव्ये करीत असताना असल्यामुळे तिला अंतिम साध्या-चीही प्रतिष्ठा मिळालेली दिसते. भक्तितत्त्वाचे सर्व अंगांनी निरूपण हे भागवतकारांचे मुख्य उद्दिष्ट दिसते. स्वतः भगवंतच म्हणतात,

न साधयति मां योगो न साङ्ख्यं धर्म एव च ।
न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता ।।

(११.१४.२०)

माझी ऊर्जस्वल भक्ती जशी माझी प्राप्ती करून देते, तशी ती योग, सांख्य, स्वाध्याय, तप, त्याग, धर्म, इत्यादी गोष्टीही मला प्राप्त करून देणाऱ्या नाहीत. आणखी एका ठिकाणी म्हटले आहे, 'भगवंतांना संतुष्ट करण्यासाठी शील, बहुज्ञता, दान, तप, यज्ञ, शौच, व्रत इत्यादी गोष्टी उपयोगी पडत नाहीत. निर्मल भक्तीनंच भगवंत संतुष्ट होतात. अन्य सारं विडंबन होय. 'प्रीयतेऽमलया भक्त्या हरिरन्यद् विडम्बनम्–' (७ ७.५१-५२) अशी या भागवतधर्माची एकमेव धारणा आहे.

भागवताच्या एकादशस्कंधात या भक्तिप्रधान भागवतधर्माची विविध अंगांनी चर्चा आलेली आहे. या भागवतधर्माच्या आचरणात संसारात असूनही कर्माचे बंध जडत नाहीत. जन्म, वर्ण, जात इत्यादींचा

अहंकार येथे उपयोगी नसतो. जीवाला भक्ती, विरक्ती व भगवद्प्राप्ती यांचा लाभ एकाच वेळी होतो. मृत्युलोकांत त्याला भय उरत नाही. त्याचे पतन कधी होत नाही. तो सर्वांशी समभावानें वागतो. कर्मकांडाचे व्याप न मांडता केवळ स्मरणानें, चिंतनानें, सेवेनें, कीर्तनानें जीवास भगवंतांची प्राप्ती होऊ शकते, हे तत्त्व या भागवतधर्माने प्रधान म्हणून स्वीकारले आहे. झाडाच्या मुळांना पाणी घातले की ते त्याच्या शाखोपशाखांना पोचते. त्याचप्रमाणे भूतमात्रांच्या तापहरणानें परमेश्वराचेच पूजन होते, असा आणखी एक भागवतकारांचा सिद्धांत आहे. परमेश्वरांचे प्रेम व भूतमात्रांचे प्रेम हे भागवतकार एकरूपच मानतात. प्रल्हाद हाच उपदेश करताना म्हणतो, 'तस्मात् सर्वेषु दयां कुरुत सौहृदम्' (७.६.२४) भूतमात्रांवर दया हे या धर्माचे एक मुख्य अंग आहे.

## भागवताचे नायक श्रीकृष्ण

भगवान श्रीकृष्ण हे भागवतपुराणातील नायक आहेत. षड्गुणैश्वर्यसंपन्न, अखिल ब्रह्माण्डनायक, अघटित घटनापटू अशा या लोकोत्तर अवतारी पुरुषाचा जन्मच कंसासारख्याच्या कारागृहातील आहे. पुढे त्यास गोकुळात पोचविले जाते. तेथील त्याच्या लीला व बालक्रीडा हा भागवतपुराणाचा एक खास विशेष आहे. एखाद्या सर्वसामान्य मुलाप्रमाणे त्याच्या खोड्या भागवतकार रंगवितातच. पण स्तनपान करताना कृष्णास जांभई आली तेव्हा यशोदा मातेस त्याच्या मुखात साऱ्या विश्वाचे दर्शन स्वतःसह झाले असेही सांगण्यास भागवतकार चुकत नाहीत पूतनाप्राणहरण, तृणावर्तवध, उलूखलबंधन, कुबेरपुत्रमोक्ष, वत्सासुर-बकासुर यांचा वध, धेनुकासुराचा वध, कालियासर्पास शासन, दावाग्निपान, गोवर्धनोद्धारण, केशी, कंस यांचा वध; अशी अनेक अद्भुत कृत्ये जशी वाचकांच्या मनास थक्क करतात, तशाच कृष्णाच्या वृंदावनक्रीडाही मन मोहून टाकणाऱ्या आहेत. वर्षा ऋतूचे वर्णन, मुरलीनादाचे वर्णन. वनक्रीडेचे वर्णन यांच्यांतही रसिकांचे व भाविकांचे चित्त रमून जाते. श्रीकृष्णाची अत्यंत रोचक व प्रत्ययकारी वर्णने भागवतकारांनीच करावीत. त्याची कमनीय मुखश्री, त्याचा सावळा

रंग, त्याचा पीतांबर, त्याचा मोरमुकुट, त्याची विश्वमोहिनी मुरली, त्याचा कौस्तुभमणी, त्याची आयुधे, त्याचे श्रीवत्सलांच्छन; यांचे मोठे हृद्य वर्णन भागवतात जागजागी आढळते. कृष्णांचे हे अवतारी स्वरूप गोकुळातील गोपांना, गोपींना, गोपबालकांना अत्यंत आवडते. कारण हा बालकृष्ण त्यांच्यांतच रमतो, खेळतो, त्यांच्याबरोबर भोजन करतो. बालकृष्णांच्या या अलौकिक क्रीडा पुढे प्राकृत कवींनी मोठ्या आवडीनें वर्णन केल्या त्या भागवतपुराणाच्या आधारानेच.

बाणांच्या शय्येवर अखेरचे दिवस मोजणाऱ्या भीष्माचार्यांनाही श्रीकृष्णांचे बालरूप आठवते. त्यांच्या दिव्य सौंदर्याची ते स्तुती करतात. गोपगोपींना कृष्णांविषयी वाटणारे अद्भुत प्रेम पाहून अद्वैतज्ञानात सुखावणारा उद्धवही गोकुळातील धूळ आपल्या मस्तकी लावताना दिसतो. भागवताचा संपूर्ण दहावा स्कंध कृष्णांची कथा जन्मापासून अखेरपर्यंत सांगणारा आहे. द्वारकेचा निर्माता,पांडवांचा रक्षणकर्ता, रुक्मिणी, सत्यभामा यांचा पती, दुर्जनांचा संहारकर्ता, सुदाम्याचा मित्र, भक्तांचा साह्यकर्ता, धर्माचा प्रतिपालक; अशी श्रीकृष्णांची अनेक रूपे भागवतकारांनी उभी केली आहेत. यमुनेच्या तीरावर वाळवंटात खेळ मांडणाऱ्या कृष्णांच्या द्वारकेचे वैभव केवढे होते ? भागवतकारांनी म्हटले आहे, द्वारकेत रत्नांचा प्रकाश इतका विपुल होता की, तेथे दिवे लावण्याची गरजच नव्हती. केवळ शोभेसाठी दिवे असत. तेथे गवाक्षाच्या जवळ असलेल्या महालावर मोर येऊन बसत. महालातील अगरू चंदनाचा धूर बाहेर आला की, त्यांना तो कृष्णमेघ वाटे. मग ते नाचू लागत (१०.६९.१२)

कृष्णांच्या ऐश्वर्याची, समृद्धीची, मुत्सद्देगिरीचो, बोधाची, प्रेमळपणाची अशी अनेक शब्दचित्रे भागवतात आहेत. कृष्णांबद्दलचा लोभ विविध प्रकारांनी नाना जीवांना वाटे. भागवतकारांनी त्याचे वर्णन मन लावून रसदार शब्दांनी केले आहे. कृष्ण मथुरेस आल्यावर त्यांना पाहाण्यासाठी मथुरानिवासी स्त्रियांची धांदल कशी झाली, याचे मोठे चित्तवेधक वर्णन भागवतकारांनी केले आहे. गोपीकृष्णांच्या प्रेमाला तर तुलनाच नाही. सर्व जीवनच गोपींनी कृष्णांना सर्मपित केले होते. दशमस्कंधातील वेणुगीत, गोपीगीत, युगुलगीत, महिषीगीत इत्यादी

प्रसंगांची वर्णनें या दृष्टीनें वाचण्यासारखी आहेत. कृष्णांच्या मुरलीचा प्रभाव सचेतनांवरच नव्हे, तर अचेतनांवरही पडून तेही कृष्णांशी जवळीक साधतात.

## भागवतपुराणाचे स्वरूप

भागवतात कोणते विषय आले आहेत, याचे वर्णन आढाव्याच्या स्वरूपात भागवताच्या बाराव्या स्कंधातील बाराव्या अध्यायात आले आहे. सर्ग, विसर्ग, स्थान, पोषण, ऊती, मन्वन्तरे, ईशकथा, निरोध मुक्ती, आश्रय इत्यादींचे पारिभाषिक अर्थही एके ठिकाणी दिले आहेत. (२.१०.१) भागवतपुराणाचे एकूण स्कंध बारा असून श्लोकसंख्या अठरा हजारांपर्यंत आहे. दहावा स्कंध श्रीकृष्णचरित्रमय असून त्याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. हा स्कंध सर्वांत मोठा असून सर्वांत लहान बारावा स्कंध आहे.

पहिल्या स्कंधात व्यास व नारद यांची भेट, नारदांकडून व्यासांना कृष्णकथारूप भागवत सांगण्याचा आदेश, अश्वत्थाम्याच्या अस्त्रापासून परीक्षिताचे रक्षण, श्रीकृष्णांची द्वारका, परीक्षितास अभिषेक, कृष्णांचे निर्याण, पांडवांचे महाप्रस्थान, परीक्षितास शाप, गंगातीरावर त्याचे तप, शुकाचार्यांची व त्याची भेट, इत्यादी विषय आले आहेत. विश्वाची उत्पत्ती, पुराणलक्षण, योग, सृष्टिनिर्मिती, अवतारकथन, चतुःश्लोकी भागवताचा उपदेश, इत्यादी विषय दुसऱ्या स्कंधात आले आहेत. उद्धवाचा कृष्णविरह, विदुरमैत्रेयसंवाद, मनू व मन्वन्तरे, हिरण्याक्ष, हिरण्यकशिपू, कपिलमुनी व देवहूती इत्यादींचा कथाभाग तत्त्वचर्चेसह तिसऱ्या स्कंधात आला आहे.

दक्षयज्ञ, सतीचा देहत्याग, दक्षयज्ञविध्वंस, ध्रुवाची कथा, वेन राजाची कथा. पृथूची कथा, दहा प्रचेतसांचा जन्म, इत्यादी विषय चौथ्या स्कंधात आले आहेत. पाचव्यात प्रियवृत्ताचा वंश, ऋषभचरित्र, भरत व भरतखंड, पातालांतील लोक, नरकगती इत्यादी कथाभागांचे वर्णन आहे. सहाव्यात अजामिळाची कथा आहे. इंद्रवृत्रासुरयुद्ध, मरुत्गणांचा जन्म, असा कथाभाग असून सातव्या स्कंधात हिरण्य-

कशिपू व प्रल्हाद यांचे आख्यान विस्ताराने आले आहे. त्रिपुरवधाची कथा, अवधूताचा धर्म, सिद्धावस्था, इत्यादी विषय याच स्कंधात आहेत.

आठव्या स्कंधात चार मन्वन्तरांचे वर्णन असून गजेन्द्रमोक्षाची कथा आली आहे. समुद्रमंथनाचा कथाभागही येथेच आहे. बलीची कथा, वामनांचा अवतार, मत्स्यावतारकथा इत्यादी विषय याच स्कंधात असून नवव्यात सूर्य व चंद्रवंशांची वर्णने, पुरूरव्याचे आख्यान, अंबरीष-आख्यान, हरिश्चंद्रकथा, सगरपुत्रांचा उद्धार, रामावतारवर्णन, परशुरामानें केलेला क्षत्रियसंहार, पुरूवंशकथन, ययातीची कथा, दुष्यन्त-शकुंतलाख्यान इत्यादी विषय आले आहेत.

दहावा हा महत्त्वाचा स्कंध श्रीकृष्णचरित्रावर आहे. वसुदेव-देवकी-विवाह, कृष्णांचा कारागृहात जन्म, त्यांचे गोकुळात आगमन, गोकुळातील क्रीडा, तेथील पराक्रम, श्रीकृष्णांचे विवाह, त्यांचा संसार, त्यांचा द्वारका-निवास, त्यांनी केलेला उपदेश, इत्यादी महत्त्वाचे चरित्र– प्रसंग या स्कंधात आले आहेत. नारदांकडून वसुदेवाला भागवतधर्माचा उपदेश, कृष्णांकडून उद्धवालाही भक्तितत्त्वाचा उपदेश ; इत्यादी विषय अकराव्या अध्यायात आले आहेत. एकनाथांचा भागवतग्रंथ याच स्कंधावर असून तो चांगला परिचित असल्याने या स्कंधातील विषयांचा निर्देश या ग्रंथात संक्षेपानें केला आहे. द्वादशस्कंधात भविष्यकालीन राजवंश, प्रलय, मार्कंडेयकथा, कलियुगवर्णन, परीक्षिताचा सर्पदंश होऊन मृत्यू, जन-मेजयाचे सर्पसत्र; इत्यादी विषय आले आहेत.

## सुभाषितांचा मनोज्ञ फुलोरा

कथांच्या, आख्यानांच्या माध्यमातून भागवतपुराणाने तत्त्वचर्चा विशेषतः अकराव्या स्कंधात केली आहे, हे वर सांगितले आहेच. परंतु इतर अनेक प्रसंगीही सहज, सुंदर, चटकदार व तत्त्वस्पर्शी सुभाषितांची पखरण भागवतात जागजागी दिसते. ज्ञान, वैराग्य, भक्ती, प्रपंच, कृपा, परमात्मा, जगत, धर्म; इत्यादींचा मनोज्ञ निर्देश सुभाषितांच्या सहज प्रेरणेनें भागवतकार करताना दिसतात.

'स वै पुंसां परो धर्मो यतो भक्तिरधोक्षजे–' १.१.५ ( ज्या धर्माच्या योगाने श्रीकृष्णांच्या ठिकाणी अहैतुकी भक्ती उत्पन्न होते तोच

जीवांचा परम धर्म होय.) 'वासुदेवपरं ज्ञानं वासुदेवपरं तप:' १.२.२८ (वेदांचा प्रतिपाद्य वासुदेव आहे. तप वासुदेवाच्या प्राप्तीसाठीच करायचे असते.), 'शारीरा मानसा दिव्या वैय्यासे, ये च मानुषा:' ३.२२.३५ (व्यासपुत्रा, विदुरा, हरीचा आश्रय ज्यांनी केला आहे, अशा भक्तांना शरीराचे, मनाचे, अंतरिक्षाचे क्लेश काय बाधणार ?), 'द्विषत: परकाये मां मानिनो भिन्नदर्शन: ३.२९.२३ (दुसऱ्याचा द्वेष करणे म्हणजे त्याच्या शरीरात असलेल्या माझ्याशी, भगवंताशीच द्वेष करणें होय), 'ज्ञानं विशुद्धं परमार्थमेकमनन्तरं तत्त्वहिर्ब्रह्म सत्यम्' ५.१२.११ (ज्ञान हेच परमार्थत: सत्य आहे. हे परमार्थ सत्य आहे. हे ज्ञान अंत:-करणवृत्तीचे नाही, तर परमशुद्ध एकरूप असे आहे.), 'अहो दैन्यमहो कष्टं पारक्यै: क्षणभंगुरै:' ६.१०.१० (द्रव्य, पुत्रादी, देह ही सर्व दुसऱ्याची मालमत्ता आहे. क्षणात नाहीशी होणारी आहे.), 'सा रक्षिता रक्षति यो हि गर्भे' ७.२.३८ (ज्यानें गर्भात आमचे रक्षण केले तोच भगवान सर्व संकटांतून आम्हांस पार पाडील.), 'मोदेत साधुरपि वृश्चिक सर्पहत्या' ७.९.१४ (विंचू अथवा सर्प मारला की साधूलासुद्धा आनंद होतो), 'नैतान्विहाय कृपणान् विमुमुक्ष एक:' ७.९.४४ (दीन लोकांना टाकून मला एकटयालाच मोक्ष नको आहे– प्रल्हाद), 'तपो दानं व्रतं यज्ञो येन तुष्यत्यधोक्षज:' ८.१६.६१ (तपे, दानें, व्रते आणि यज्ञ यांनी परमात्मा प्रसन्न होतो.) 'साधवो दीनवत्सला:' १८.४.२३ (साधू दीनवत्सल असतात.), 'हरये नम' हत्युच्चैर्मुच्यते सर्वपातकात्' १२.१२.४६ (मनुष्याने केवळ 'हरये नम:' असे मोठ्याने उच्चारले की, तो सर्व पातकांपासून त्वरित मुक्त होतो.); अशा अनेक सुभाषित-वजा वाक्यांचा आढळ भागवतपुराणात होतो.

## सर्व पुराणांत भागवत श्रेष्ठ

अशा रीतीने भागवतपुराण हा एक मोठा सांस्कृतिक महत्त्वाचा ग्रंथ आहे. वेद व राजा आज्ञा देतात, पुराणे व मित्र उपदेश देतात, कविता व प्रिया मुग्ध बनवितात. पण या तीनही गोष्टी भागवतपुराण देते, म्हणून याचे महत्त्व तिपटीनें आहे, असे जीवगोस्वामी यांनी तत्त्व-संदर्भ या ग्रंथात म्हटले आहे. त्रिगुणसंपन्न भागवतपुराण ऐकून कसा,

कोणाचा उद्धार झाला यांसंबंधीच्या कथाही भागवतमाहात्म्यात आल्या आहेत.

तुंगभद्रेच्या तीरावर एक मोठे नगर होते. त्या नगरात एक वेदपारंगत व कर्मनिपुण असा तेजस्वी ब्राह्मण आत्मदेव नावाचा होता. तो भिक्षावृत्तीनें राही. त्याच्याजवळ द्रव्यही खूप होते. त्याची पत्नी धुंधुली असून त्या सुंदरीवर आत्मदेवाचे फार प्रेम होते. पण ती मात्र तापट होती. स्वभाव भांडखोर व कृपण होता. त्यांना संतती नव्हती. अपत्यप्राप्तीसाठी ब्राह्मणाने खूप तपश्चर्या केली. यतीनें त्याला समजावून एक फळ दिले. व्रतस्थ राहून हे फळ खाल्ले तर पत्नीस संतती होणार होती. पण त्या स्त्रीनें ते फळ खाल्ले नाही. ते एका गायीला खायला दिले. गुप्तपणानें धुंधलीनें बहिणीचे मूल स्वतःचे म्हणून मानले व आपल्या पतीला तसे सांगितले. आत्मदेवानें त्या मुलाचे सर्व संस्कार थाटाने केले. त्या बालकाचे नाव धुंधुकारी. आत्मदेवाच्या गायीलाही मुलगा झाला. या मनुष्यदेहधारी मुलाचे कानच तेवढे गायीचे असल्यामुळे त्याचे नाव गोकर्ण ठेवण्यात आले. गोकर्ण पवित्र आचरणाचा, विचाराचा व धुंधुकारी भ्रष्ट वर्तनाचा, अमंगल निघाला. आत्मदेवास याचे फार दुःख झाले. त्याला उपदेश गोकर्णानें केला. गोकर्णाच्या उपदेशानें आत्मदेवानें भागवतपुराणाच्या दशमस्कंधाचा पाठ केला व तो कृष्णस्वरूपाला जाऊन मिळाला.

अशा अनेक कथा भागवतमाहात्म्याच्या संदर्भात सांगण्यात येतात. म्हणून सर्व भारतात ही भागवतपुराणसंहिता श्रीकृष्णांप्रमाणे पूज्य मानली गेली आहे. तिच्या श्रवणानें श्रीहरी चित्तात वास करतात. सर्व पुराणांत भागवत श्रेष्ठ. कारण प्रत्येक पदात कृष्णस्तुती आहे. ब्रह्मसूत्रांचा अर्थ आहे, वेदांचा विस्तार म्हणजे भागवतपुराण आहे, असे पद्मपुराणानेही सांगितले आहे. म्हणूनच या पुराणग्रंथावर अनेक संस्कृत-प्राकृत भाषांत टीकाही झाल्या आहेत. मराठीत कृष्णदयार्णव, एकनाथ यांनी काही स्कंधांवर टीका लिहिली आहे. सर्वांनाच जिव्हाळा वाटेल असे हे भागवतपुराण. या संहितेचे अध्ययन केले तर ब्राह्मणाला ज्ञान होते, क्षत्रियाला राज्य मिळते. वैश्य भांडाराचा अधिपती होतो व शूद्र शुद्ध होऊन जातो; असे याचे माहात्म्य सांगितले गेले आहे.

# अनुक्रमणिका

## १. प्रास्ताविक


वेदरूपी कल्पवृक्षाचे रसाळ फळ १७
भागवतपुराणरूपी सूर्य १८
'भगवंतांचं यश तुम्ही गावं' २२
नारदांचे गुह्य जीवनचरित्र २४
शुकाचार्यांचे भागवत्‌चिंतन २७


## २. कथा–उपकथा


अश्वत्थाम्यास भयंकर शासन २८
उत्तरेचे संरक्षण, कुंतीची प्रार्थना ३२
इच्छामरणी भीष्मांचे देहावसान ३४
श्रीकृष्ण द्वारकेस निघाले ३६
श्रीकृष्णांचे द्वारकेत स्वागत ३७
परीक्षिताचा जन्म, धर्मराजाचा अश्वमेधयज्ञ ३९
विदुरांचे हस्तिनापुरात आगमन ४०
यादवांचा, श्रीकृष्णांचा, पांडवांचा शेवट ४३
वृषभरूपी धर्मास, गोरूपी पृथ्वीस परीक्षिताचे आश्वासन ४७
राजा परीक्षिताला शाप ५२
परीक्षितास पश्चात्ताप, शुकांकडून ज्ञानोपदेश ५४
मैत्रेयांच्या आश्रमात विदुर ५७
पातकी अजामिळ वैकुंठधामात ६०
इंद्रादिकांचा गुरू विश्वरूप ६६
विश्वरूपाचा वध, वृत्रासुराला मारण्याचा प्रयत्न ६८
वज्राची निर्मिती, इंद्र-वृत्रयुद्ध ७१
इंद्राकडून वृत्रासुराचा वध ७५
नहुषाला इंद्रपदप्राप्ती ७७
चित्रकेतू व कृतद्युती यांचा पुत्रशोक ७९
चित्रकेतूला अंगिरा व नारद यांचा उपदेश ८२
चित्रकेतूला भगवंतांचे दर्शन ८३
चित्रकेतूस वृत्रासुराचा जन्म ८७
जयविजय द्वारपालांना शाप ८९
राजा सुयज्ञाची कथा ९१
हिरण्यकशिपूस अनेक वरांची प्राप्ती ९४
हिरण्यकशिपूस ऐश्वर्य, प्रल्हादाचे माहात्म्य ९७

प्रल्हादाचे शिक्षण ९९
दैत्यपुत्रांना प्रल्हादाचा ब्रह्मोपदेश १०३
प्रल्हादाचे आत्मचरित्र १०४
हिरण्यकशिपूचा वध १०६
प्रल्हादकृत नृसिंहस्तुती १०९
प्रल्हादाला वरप्राप्ती ११२
त्रिपुरांचे दहन ११४
नक्राच्या मिठीत गजेंद्र ११५
श्रीविष्णूंकडून गजेंद्रास मुक्ती ११८
गजेंद्राची पूर्वजन्मकथा १२०
तुम्ही समुद्राचं मंथन करा १२२
समुद्रमंथनातून हालाहल विष १२४
समुद्रमंथनातून चौदा रत्नें १२७
मोहिनीरूपधारी श्रीविष्णू १२९
दैत्यांचे देवांबरोबर युद्ध १३२
दैत्यसेनापतींशी इंद्राचे युद्ध १३५
महादेवांना विष्णूंचे मोहिनीदर्शन १३७
बली राजाचा वाढता प्रभाव १४०
अदितीला पयोव्रताचा विधी १४३
'आपणच सर्वोत्कृष्ट आधार आहात' १४५
बलीच्या यज्ञात वामनांचे आगमन १४७
त्रिपादभूमीची वामनांकडून याचना १४९
वामनांची विश्वरूप वाढ १५१
बलिराज वरुणपाशात १५२
बलिराजाचे सुतलात प्रयाण १५५
मत्स्यावताराची कथा १५७
च्यवनमुनी व सुकन्या १६०
राजा अंबरीषांचे रक्षण १६१
परशुरामाचे आख्यान १६४
राजा ययातीचे आख्यान १६९
राजा दुष्यन्त आणि भरत १७४
आणि हा रन्तिदेव १७६
वसुदेव व देवकी बंदिवासात १७८

देवकीच्या उदरात श्रीहरी १८०
श्रीकृष्ण कारागृहातून गोकुळात १८२
आदिमायेची आकाशवाणी १८४
कृष्णाचा जातकर्मसंस्कार, गोकुळात आनंदोत्सव १८५
पूतनेला सद्गती १८७
तृणावर्तवध, विश्वदर्शन १८९
श्रीकृष्णाच्या बाललीला १९१
उलूखलबंधन व कुबेरपुत्रमोक्ष १९४
वत्सासुर, बकासुर यांचा वध १९७
वनलीला, अघासुराचा वध २००
ब्रह्मदेवांच्या मोहाचे निरसन २०१
धेनुकासुर, कालियासर्प २०४
कालियासर्पाचे दमन, नागपत्नींनी कृष्णाची केलेली स्तुती २०७
कालियाचा पूर्ववृत्तान्त, गोपांचे वणव्यापासून रक्षण २११
वृंदावनवर्णन, प्रलंबासुराचा वध २१३
दावाग्निपान २१५
वृंदावनातील वर्षाऋतू २१६
वेणुनादवर्णन २१९
गोपींचे कात्यायनीव्रत २१९
ऋषिपत्नींवर अनुग्रह २२२
इंद्रयागाऐवजी गोवर्धनाचा आश्रय २२४
वृंदावनातील रासक्रीडा २२६
सुदर्शनाचा उद्धार, शंखचूडाचा वध २३०
अरिष्टासुराचा वध २३१
केशी दैत्याचा, व्योमासुराचा वध २३३
गोकुळात अक्रूराचे आगमन, गोपींचा विलाप २३४
अक्रूरास भगवंतदर्शन, मथुरेस आगमन २३६
रजकाचा वध, सुदामा माळयास वर २३७
कुब्जेस कृपाप्रसाद, यागधनुष्याचा भंग २३९
उद्धव व गोकुळाच्या गोपी २४१

| | |
|---|---|
| कुब्जेस वरदान, अक्रूर हस्तिनापुरात | २४४ |
| श्रीकृष्णांचे उत्तरचरित्र | २४६ |
| श्रीकृष्णांचा संसार | २४७ |
| श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा प्रीतिकलह | २४९ |
| सोळा हजार स्त्रियांशी संसार | २५२ |
| नृगराजाची शापातून मुक्तता | २५४ |
| सुदाम्याला कांचनपुरी | २५७ |
| सूर्यग्रहणास श्रीकृष्ण कुरुक्षेत्री | २६३ |
| द्रौपदी व कृष्णस्त्रिया | २६५ |
| वसुदेवाचा यज्ञसमारंभ | २६७ |
| वसुदेवाची कृष्णस्तुती, देवकीस मृतपुत्रांची भेट | २६९ |
| सुभद्राहरण | २७१ |
| श्रुतदेव, बहुलाश्व यांच्या घरी स्वागत | २७३ |
| वृकासुराचा नाश | २७५ |
| कृष्णास व अर्जुनास भूमदर्शन | २७६ |
| कृष्णक्रीडा व यदुवंशविस्तार | २७८ |
| यदुकुलाची अखेर | २८० |
| बलराम व कृष्ण यांचे निर्याण | २८४ |
| परीक्षितास मोक्षाची प्राप्ती | २८६ |
| जन्मेजयाचे सर्पसत्र | २८७ |
| मार्कंडेयांना बालमुकुंदाचे दर्शन | २८८ |

## ३. सृष्टिरचना

| | |
|---|---|
| सर्ग, विसर्ग, विराट पुरुषाची वाढ | २९२ |
| विराट पुरुषात चौदा लोक | २९४ |
| विराट पुरुषातील यज्ञसामग्री | २९७ |
| सृष्टिनिर्मितीचे गुह्य | २९९ |
| हिरण्यगर्भाची शरीररचना | ३०० |
| ब्रह्मदेवकृत दहा सर्ग | ३०२ |
| परमेश्वराची कालशक्ती | ३०३ |

ब्रह्मदेवांची सृष्टिनिर्मिती ३०६
स्वायंभुव मनूचा वंश ३०९
चौदा मन्वन्तरांतील मनू, देव, सप्तर्षी इत्यादी ३१६
प्रियव्रताच्या वंशाचा विस्तार ३१८
भरताचा वंशविस्तार ३२१
भरतखंडातील नद्या व पर्वत ३२३

## ४. सदाचारदर्शन

धारणा कशी असावी ? ध्यान कसे असावे ? ३२५
सकाम उपासनेचे प्रकार ३२७
सदाचार आणि आश्रमधर्म ३२८
ब्रह्मचारीधर्म, वानप्रस्थधर्म ३३०
संन्यासधर्म, अजगरमुनीचा बोध ३३१
गृहस्थधर्मांचे महत्त्व ३३३
अवधूताचे चोवीस गुरू ३३५
विषयासक्तीचे दुष्परिणाम, ऐल राजाची कथा ३३७
भगवंताचा पूजाविधी ३३९
कलियुगातील लोकस्थिती ३४४
भागवतश्रवणविधी ३४७
महापुराणांची श्लोकसंख्या ३४९

## ५. तत्त्वज्ञानदर्शन

चतुःश्लोक भागवत ३५०
देवहूतीला कपिलांचा उपदेश ३५१
कपिलमुनींचे सांख्यतत्त्वज्ञान ३५३
भिक्षूचा सुख-दुःखविवेक ३५५
भागवतधर्माचे अंतरंग ३५८
वेदस्तुती आणि अकरावा स्कंध ३६१
६. उपसंहार व ग्रंथमहिमा ३६२ ते ३६७
७. स्तोत्रमंजूषा ३६९ ते ४००

# भागवतपुराण

## १ प्रास्ताविक

जन्माद्यस्य यतोऽन्वयादितरतश्चार्थेष्वभिज्ञः स्वराट् ।
तेने ब्रह्म हृदा य आदिकवये मुह्यन्ति यत्सूरयः ॥
तेजोवारिमृदां यथा विनिमयो यत्र त्रिसर्गोऽमृषा ।
धाम्ना स्वेन सदा निरस्तकुहकं सत्यं परं धीमहि ॥

### वेदरूपी कल्पवृक्षाचे रसाळ फळ

या जगताचे उत्पत्ती, स्थिती, संहार ज्याच्यापासून होतात, आकाशादी कार्यांच्या ठिकाणी जो अन्वयरूपानें म्हणजे मण्यांतून जसे सूत्र असते तसा व आकाशपुष्प, शशशृंग इत्यादी ठिकाणी व्यतिरेकानें म्हणजे मण्यांहून सूत्र भिन्न असते तसा आहे. मृत्तिका, सुवर्ण, इत्यादी-प्रमाणे जो कारणरूप व घट, कुंडल इत्यादीप्रमाणे जो कार्यरूप आहे, जो सर्वज्ञ म्हणजे स्वतः सिद्ध ज्ञानरूप आहे, ज्या वेदाच्या ठिकाणी ज्ञानी लोकांनाही मोह होतो, तो वेद ज्यानें ब्रह्मदेवांना मनानेंच प्रकाशित केला, सूर्यकिरणरूप तेजाच्या ठिकाणी जशी मृगजलबुद्धी, काचेच्याप्रमाणे

असलेल्या मृत्तिकेच्या ठिकाणी जशी जलबुद्धी व नितळ जलाच्या ठिकाणी जशी काचबुद्धी, या गोष्टी असत्य असूनही अधिष्ठानाच्या सत्यत्वामुळे सत्य वाटतात, त्याचप्रमाणे ज्या सत्यरूप परमेश्वराच्या ठिकाणी देहेंद्रिय देवस्वरूप, तसेच सत्त्व-रज-तमगुणात्मक सृष्टी सत्यवत प्रतीत होते अशा व आत्मतेजाने मायकपट निरस्त करणाऱ्या सत्यस्वरूप परमेश्वराचे आम्ही ध्यान करतो.

वैष्णवांना अतिशय प्रिय असणाऱ्या एका थोर महापुराणाच्या आरंभीच्या श्लोकातील हे मंगलाचरणात्मक नमन आहे. या भागवत नावाच्या पुराणात निर्मत्सर अशा सत्पुरुषांचा अत्युकृष्ट असा धर्म सांगितला आहे. याच्या अभ्यासाने कल्याणदायक व तापत्रयांचे निर्मूलन करणारी सत्यवस्तू कोणती, याचे ज्ञान होते. इतर कोणत्याही साधनांनी परमेश्वर तत्काळ अंत:करणास आकलन होत नाही. परंतु या भागवत-धर्माच्या सेवनाने, श्रवणाने कित्येक पुण्यवान पुरुषांनी आपल्या अंत:-करणात परमेश्वर स्थिर करून ठेवला आहे. त्याला आपलासा केला आहे. कारण हा भागवतधर्म म्हणजे वेदरूप कल्पतरूचे फळच या मृत्यु-लोकावर गळून पडले आहे. ते प्रत्यक्ष शुकाचार्यांच्या मुखातून बाहेर पडले आहे. भागवतरूपी फळ अमृतमय असून रसाळ आहे. म्हणून भाविक व रसिक लोकांनी याचा आस्वाद पुन्हा पुन्हा घेत राहावा.

**निगमकल्पतरोर्गलितं फलं शुकमुखादमृतद्रवसंयुतम् ।**
**पिबत भागवतं रसमालयं मुहुरहो रसिका भुवि भावुकाः**

**भागवतपुराणरूपी सूर्य**

श्रीविष्णूंच्या विजयाने पुनीत झालेल्या नैमिषारण्यात विष्णु-लोकाच्या प्राप्तीसाठी शौनकादी ऋषींनी एक हजार वर्षे चालणारा एक यज्ञ सुरू केला होता. त्याच्या सांगतेस अनेक ऋषी उपस्थित झाले. प्रात:काळी होम वगैरे झाल्यावर मोठ्या उत्कंठेने त्यांनी सूतास प्रश्न केला,

'सूता, आपण इतिहासादी शास्त्रांत, पुराणांत निपुण आहात.

त्यांचं चांगलं अध्ययन आपण केलं आहे. इतरांनाही आपण शिकविलं आहे. व्यासांच्या व ऋषिवर्यांच्या कृपेनं आपण त्यांतील सर्व रहस्य पूर्णपणानं समजावून घेतलेलं आहे. म्हणून आयुष्मन् या ग्रंथात कल्याण-कारक काय आहे ते आम्हांला सांगा. साधुपुरुषा, या कलियुगात बहुतेक सर्व लोक आळशी, मंदबुद्धीचे, अल्पायुषी, हतभागी, दरिद्री व रोगग्रस्त बनले आहेत. म्हणून पवित्र ग्रंथांतील सारभूत तत्त्व आपण आम्हांस सांगावं. सूता, तुझं कल्याण असो. भक्तांचा पालनकर्ता, भगवान श्रीकृष्ण यानं पिता वसुदेव व माता देवकी यांच्या उदरी अवतार घेतला हे तुला माहीत आहेच. या अवतारी पुरुषाविषयीच तुम्ही आम्हांला सांगावं. बुद्धिमान सूता, आपल्याच मायेच्या कौतुकानं मनसोक्त क्रीडा करणाऱ्या श्रीकृष्णांच्या मंगल अवतारकथा आम्हांस सांगा. आम्हां सर्वांना त्या अधिकच गोड वाटतील.

'त्या भगवंताचं चरित्र किती गूढ ! त्यांनी आपल्या मायेच्या योगानं मनुष्यदेह धारण केला व बलरामासह अनेक प्रकारची अमानुष कृत्यं केली. सूता, आम्ही येथील ब्राह्मण. आता आम्हांस इथं काहीच काम नाही. कृष्णांचं चरित्र ऐकण्यास या कलियुगात खूप वेळ आहे. या कलीतून तरून जाण्यासाठी तू एक नावाडीच आम्हांस भेटलास. आणि सूता, तो योगिश्रेष्ठ, धर्मरक्षणकर्ता श्रीकृष्ण परमात्मा निज-धामास गेल्यावर मग धर्माचं काय झालं ? त्यानं स्वतःचं संरक्षण कसं केलं ? '

ऋषींचे हे प्रश्न ऐकून रोमहर्षणाचा पुत्र उग्रश्रवा फार आनंदित झाला. ऋषींचे अभिनंदन करून तो म्हणाला, 'ठीक आहे.' त्यानें प्रथम आपल्या गुरूंचे, म्हणजे व्यासपुत्र शुकाचार्यांचे स्मरण केले. हे शुकाचार्य जन्मापासूनच योगसंपन्न असून अत्यंत निग्रही होते. त्यांनी सारा कर्म-मार्ग सोडून दिला होता, सर्वस्वाचा त्याग करून हा शुक उत्तरेकडे पळून निघाला तेव्हा व्यासांनी वात्सल्याने 'अरे बाळा,' म्हणून हाक मारली, पण त्या शुकांनी पित्यांना वृक्षाकरवीच उत्तर दिले, अशा या शुकांना सूतानें मनापासून वंदन केले, या शुकांनीच अज्ञानरूपी संसारात पडलेल्या लोकांना सर्व वेदांचे सार सांगून, पुराणांतील गूढ सांगून

त्यांच्यावर उपकार केले, त्या शुकाचार्यांना सूताने नमस्कार केला, त्यांनी पुरुषोत्तम नारायणाला, देवी सरस्वतीला वंदन करताना म्हटले,

**नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।**
**देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ।।**

सूत ऋषींना म्हणाले, ' मुनींनो, आपण मला जो प्रश्न केला तो फारच उत्कृष्ट आहे, श्रीकृष्णांचं चरित्र श्रवण केलं की सर्वांच्याच अंतःकरणाचं समाधान होतं. श्रीकृष्णांच्या ठिकाणी भक्ती उत्पन्न होणं हाच खरा धर्म होय. जर ही भक्ती निर्हेतुक, निष्काम असेल तर त्यासारखा मोठा धर्म नाही. अंतःकरणाचं खरं समाधान या भक्तीनंच होतं. मुनींनो, वेदांपासून धर्माचं ज्ञान होतं हे खरं आहे, पण ते त्वरित होत नाही. पण भक्तिमार्गानं अंतःकरणात वैराग्य निर्माण होतं आणि खऱ्या ज्ञानाची प्राप्ती होते. धर्माचाराचं फल मोक्ष आहे. द्रव्यप्राप्ती हे त्याचं क्षुद्र फल होऊ शकत नाही. द्रव्यानंही धर्म घडावा. जन्मास आल्यावर तत्त्वज्ञानाची इच्छा करावी. नाना प्रकारची कर्मं करून स्वर्ग प्राप्त करून घ्यावा, हा काही धर्मकार्याचा एकमेव उपयोग नाही. अंतःकरणातील तत्त्वस्वरूपास जाणावं. सर्वांनी वर्णाश्रमाच्या धर्माचं आचरण करून ईश्वराचा संतोष प्राप्त करून घ्यावा. म्हणून नित्य एकाग्रचित्तानं प्रभूचे गुण श्रवण करावेत. त्याचं कीर्तन करावं. त्याचं भजन करावं. त्याचं ध्यान करावं. त्याचंच पूजन करावं. प्रथम पुण्यपावन तीर्थांचं सेवन करावं. साधुसंतांची सेवा करावी. मग धर्माबद्दलची श्रद्धा वाढते. त्यानंतर परमेश्वराच्या कथा ऐकाव्यात. त्याचे गुणानुवाद ऐकले, त्याचं वर्णन ऐकलं, नित्य त्याची कथा श्रवण केली, म्हणजे हृदयात श्रीकृष्ण प्रकट होतात. कामक्रोधादी पातकं नष्ट होतात. भक्ती अविचल होते. मग त्या पुरुषाच्या मनातील आसक्ती नाहीशी होते, त्याला भगवत्तत्त्वाचं खरं ज्ञान होतं. भक्तीनं अंतःकरणही शुद्ध होतं. हा जगत्कर्ता परमेश्वर सर्व देवांत इंद्र, ब्रह्मा, शंकर, मत्स्य, कच्छ, वराह, राम, कृष्ण इत्यादींच्या अवतारांच्या रूपानं तो प्रकट होतो. '

त्यानंतर सूताने परमेश्वराच्या विविध अवतारांच्या कथा निवेदन

केल्या. लोक अल्पबुद्धी झाले, वेदांचे पठण त्यांच्याकडून होईना. म्हणून परमेश्वरांनी सत्यवतीच्या उदरी पराशर ऋषीपासून व्यास या नावानें अवतार धारण केला. त्यांनी वेदरूपी वृक्षाच्या लहान लहान शाखा तयार केल्या. त्यानंतर रामचंद्रांचा अवतार झाला. भगवंतांचे एकोणिसावे व विसावे अवतार म्हणजे यादवकुळातील बलराम व कृष्ण होत. यानंतर कलियुग सुरू झाले. दैत्य प्रबल होतील. त्यांच्या नाशासाठी गयेजवळ बुद्ध नावाचा भगवान अवतीर्ण होईल. त्यानंतर कल्की नावाचा अवतार प्रजेंचे रक्षण करील. असे हे भगवंतांचे अनेक अवतार सूताने वर्णन केले. ब्रह्मर्षी वसिष्ठ, देवर्षी नारद, राजर्षी विश्वामित्र, स्वायंभुवप्रभृती मनू, ब्रह्मादिक देव, मनूचे पुत्र, मरीचादी प्रजापती; हेही त्या परमात्म्याचे, विष्णूचेच अंश होत. हे सर्व परमात्म्याचे अंशभूत अवतार, पण श्रीकृष्णांचा अवतार मात्र पूर्णावतार म्हणून प्रसिद्ध आहे. असे सांगून सूत म्हणाला,

'मुनींनो, तुम्ही त्या परमात्म्याच्या ठिकाणी भाव ठेविला आहे. याच भगवंतांचं चरित्र महामुनी व्यासांनी भागवतपुराण रचून सांगितलं आहे. सर्व प्राणिमात्रांच्या कल्याणासाठी हे भागवतपुराण व्यासांनी आपल्या आत्मज्ञानसंपन्न अशा मुलास म्हणजे शुकाचार्यांना सांगितलं. सर्व वेद व सर्व इतिहास यांचं सारभूत असं हे पुराण शुकाचार्यांनी राजा परीक्षिताला सांगितलं. परीक्षित राजाला सर्व ऋषींसह हे पुराण व्यासांनी गंगेच्या तीरावर तो मरणासाठी तत्पर झाला असताना सांगितलं. शुकाचार्यांच्या कृपेनं मी ते भागवत ऐकलं. तेच आता मी तुम्हांला सांगणार आहे. कलियुगात सर्वत्र अज्ञान व अधर्म यांचा अंधार पसरला होता. तो दूर करण्यासाठी श्रीमद्भागवत्‌रूपी हा सूर्य प्रकाशित झाला.'

सूताचे हे वचन ऐकून सर्वांत वृद्ध ऋषी शौनक नावाचे होते ते म्हणाले, 'सुता, अहो सूता, आपण फार मोठे भाग्यवंत आहात. आपण खरंच जी भागवतकथा शुकाचार्यांकडून ऐकली ती आम्हांस ऐकवावी. व्यासांनी ही भागवतकथा कशी तयार केली ? ही त्यांनी का तयार केली ? शुकांनी राजा परीक्षिताला ही भागवतकथा का सांगितली ? शुकाचार्य मोठे योगसाधनसंपन्न, समदृष्टी ठेवणारे, सर्वत्र ब्रह्मरूप

पाहाणारे. वरवर सर्वांना वेडसर वाटणारे परीक्षिताला भागवत का व कशासाठी सांगतात ? एकदा तर गंमतच झाली. नग्न अशा अवस्थेत व्यासपुत्र शुकाचार्य पुढें चालले होते. त्यांच्या मागून व्यास निघाले. वाटेतील एका सरोवरात देवांगना नग्न होऊन स्नान करीत होत्या. व्यासांना पाहताच त्या लाजल्या. पण पुढं गेलेल्या नग्न शुकदेवांची मात्र अडचण वाटली नाही. म्हणून सूता, अशा या शुकांबरोबर पांडव-कुळातील परीक्षितानं कशा प्रकारचे प्रश्न केले ? ही भागवतपुराणकथा कशी आकारास आली ? सूता, तो परीक्षित राजा म्हणजे अभिमन्यूचा मुलगा. तो मोठा भगवद्भक्त व कट्टर वैष्णव होता. त्याचंही चरित्र आम्हाला सांगा ना. एवढं मोठं सार्वभौम राज्य झिडकारून गंगेच्या काठी तो परीक्षित कशासाठी मरणाची वाट पाहू लागला ? राजा परीक्षित एवढा विरक्त तरी का झाला ?'

## 'भगवंतांचं यश तुम्ही गावं'

ऋषिमुनींची जिज्ञासा पाहून सूतांनी व्यासांची चरित्रकथा त्यांना ऐकविली. द्वापर युगात भगवंतांच्या अंशापासून पराशर व सत्यवती यांना व्यास नावाचा एक पुत्र झाला. हे व्यास एके दिवशी सूर्योदयानंतर सरस्वती नदीच्या तीरी एकान्तस्थानी एकटेच बसले होते. त्यांनी या पृथ्वीवरील युगधर्माचा ऱ्हास पाहिला. धर्मसंकर पाहिला, चारही वर्ण व चारही आश्रम यांच्या कल्याणाचा विचार ते करीत राहिले. यज्ञाची वाढ करण्यासाठी त्यांनी एका वेदाचे चार विभाग केले. इतिहास व पुराण यांचा पाचवा वेद तयार केला. पैल नावाच्या ऋषींनी ऋग्वेदाचे व जैमिनींनी सामवेदाचे अध्ययन केले. वैशंपायन यजुर्वेदात निपुण झाले. सुमंतू नावाचे मुनी अथर्ववेदात तयार झाले. सूताचे वडील इतिहास व पुराणे यांचे अधिकारी बनले. या सर्व शाखांचा विस्तार झाला. तीन वेद शिकण्यास व ऐकण्यास ज्यांना अधिकार नाही अशा शूद्रांसाठी, भ्रष्ट ब्राह्मण- क्षत्रिय- वैश्य यांच्यासाठी व्यासांनी दयाळूपणानें श्रीमन्महाभारत नावाचा एक मोठा इतिहासग्रंथ तयार केला.

इतका व्यासंग करूनही व्यासांच्या अंतःकरणाचे समाधान झाले

नाही. तेव्हा सरस्वतीच्या तीरावर एकान्तात विचार करीत व्यासांनी खोल विचार केला. आपण वेदांचा विस्तार केला, व्रते आचरली, वेद, गुरू, अग्नी यांचे पूजन केले, स्त्रीशूद्रादिकांना धर्मादिकांचे ज्ञान उपलब्ध करून दिले. तरी आपण अपूर्ण का आहोत ? आपणांस कृतार्थता का वाटत नाही ? निष्काम भक्ती करणाऱ्यांना प्रिय अशा भागवतधर्माचे वर्णन मात्र आपल्या हातून झाले नाही. या विचाराने व्यास अतिशय खिन्न व चिंताग्रस्त झाले.

एवढ्यात व्यासांच्या त्या आश्रमात नारदमुनी आले. व्यासांनी देवर्षी नारदांची यथाविधी पूजा केली. हातात वीणा धारण करणाऱ्या नारदांनी वेदव्यासांस विचारले,

'भगवन्, तू कृतार्थ झालास का ?'

'नारदा, इतकं सर्व करूनही माझ्या आत्म्याला संतोष नाही. माझं चित्त अस्वस्थच आहे. याचं कारण काय ? आपण ज्ञानी आहात. परमेश्वराची आपण उपासना केली आहे. सूर्याप्रमाणं आपण त्रैलोक्यात हिंडता. आपण माझा कमीपणा शोधून काढावा.'

'भगवान व्यासा, आपण भगवंतांच्या निर्मळ यशाला न वर्णिल्यामुळं आपलं मन शांत झालं नाही. हाच एक कमीपणा आपल्या ज्ञानात आहे.

> भवताऽनुदितप्रायं यशो भगवतोऽमलम् ।
> येनैवासौ न तुष्येत मन्ये तद्दर्शनं खिलम् ।।

'म्हणून व्यासा, आपण धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचं जसं वर्णन केलं तसंच ते परमेश्वराचं केलं नाहीत. चित्रविचित्र पदयोजनेत जर भगवंतांच्या यशाचं थोडंही वर्णन नसेल तर त्याची काहीच किंमत नाही. भगवद्भक्त अशा चित्रविचित्र पदरचनेवर संतुष्ट होत नाहीत. परमेश्वराची सुंदर नावं आणि त्यांच्या गुणांची कीर्ती यांचं श्रवण, गायन साधुपुरुष करतात. सिद्धी प्राप्त करून देणारं ज्ञान जरी भगवद्भक्तिरहित असेल तर तेही शोभत नाही. म्हणून व्यासा, आपण जन्ममरणरूपी संसारबंधनापासून लोकांना मुक्त करण्यासाठी एकाग्रचित्तानं

भगवंतांच्या चरित्राचं स्मरण करावं. उत्तम कीर्तीच्या भगवंतांच्या गुणांचं गायन-वर्णन करून पुरुषाच्या तपाचं, यज्ञादिकांचं, अध्ययनाचं सार्थक करावं.

'व्यासमहर्षी, फार पूर्वी गेल्या जन्मात वेदविषयक विवाद करणाऱ्या कोणा एका योग्याचा मी दासीपुत्र होतो. लहान असतानाच पावसाळ्यात राहाण्याची इच्छा करणाऱ्या त्या योग्यांनी मला स्वतःस सेवा करण्याची आज्ञा दिली. लहान मुलांत दिसणारा चंचलपणा माझ्या अंगात नव्हता. मी इंद्रियं सांभाळणारा, योग्यांची आज्ञा पाळणारा, थोडं भाषण करणारा होतो. मी सेवा उत्तम करीत असे. ब्राह्मणांच्या उष्ट्या पात्रांतील अन्न एकदा खाल्ल्यामुळं मी पापरहित झालो. मला भागवतधर्माबद्दल आवड निर्माण झाली. दररोज भगवंतांच्या रसाळ कथा मी ऐकीत राहिलो. परमात्म्याविषयी माझी आवड वाढत गेली, माझी बुद्धी स्थिर झाली. मी परमेश्वराचं गुणगायन ऐकलं. माझ्यातील तमोगुण, रजोगुण नाहीसा झाला. परमेश्वराविषयी प्रेम, नम्रता, निष्पाप, श्रद्धायुक्त, इंद्रियनिग्रह, सेवेची आवड यांनी मी संपन्न झालो.

'व्यासा, षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा सर्व शक्तिमान ब्रह्माच्या ठिकाणी अर्पण केलेलं कर्मच सर्व पापांचा नाश करतं. ज्या पदार्थामुळं माणसास रोग होतो तोच पदार्थ त्यास योग्य रीतीनं सेवन करायला दिल्यास त्या रोगाचा नाश होतो. संसारातील सर्व कर्म भगवंतांच्या ठिकाणी अर्पण केली तर जन्ममरणाचा व्याप संपतो. परमेश्वराला संतोष देणारं जे कर्म, भक्ती व योग यांनी युक्त असते, तेच ज्ञान होय. हे ज्ञान कर्माधीनच असतं. म्हणून व्यासा, जे जाणलं असता, इतर काहीही जाणायचं शिल्लक राहात नाही, असं परमेश्वराचं प्रसिद्ध यश तुम्ही वर्णन करावं.'

## नारदांचे गुह्य जीवनचरित्र

नारदांची सविस्तर भाषा ऐकून व्यास त्यांना म्हणाले, 'नारदा, आपणांस ज्ञानोपदेश करणारे ते महर्षी दूर देशी गेल्यावर आपण बाल-वयात काय केलंत ? पुढील आयुष्य कसं घालविलंत ? मरणसमयी हा

देह कसा टाकलात ? आपणांस पूर्वजन्माची आठवण तरी कशी राहिली ?'

'व्यासा, ज्ञानाचा मार्ग दाखविणारे ऋषी दूरदेशी निघून गेल्यावर मी काय केलं ? मी माझ्या आईचा एकुलता एक मुलगा होतो. माझी आई तर अज्ञानी. बोलून चालून ती बाईमाणूस. त्यातून दासी म्हणजे दुसऱ्याची ताबेदार. मला तर दुसऱ्यांचा कुणाचाच आधार नव्हता. ती माझ्यावर जिवापासून प्रेम करी. माझा योगक्षेम नीट चालावा, मला काही कमी पडू नये अशी तिची इच्छा होती. पण तिच्या इच्छेचा काय उपयोग ? सर्व जगच परमेश्वराच्या स्वाधीन आहे.

'मी पाच वर्षांचा मुलगा. माझ्या हातून काय होण्यासारखं होतं ? मी कसा तरी त्या ब्राह्मणाच्या घरातच काळ कंठीत होतो. एके दिवशी माझी अनाथ माता गायीची धार काढण्यासाठी घराबाहेर पडली आणि तिचा पाय एका सर्पावर पडला. काळाच्या आज्ञेनं त्या सर्पानं तिला दंश केला. माझी माता मरण पावली. ही ईश्वराची मोठी कृपाच समजून मी त्या ब्राह्मणाच्या घरातून निघून उत्तर दिशेचा मार्ग धरला.

'जाता जाता वाटेत मला अनेक देश लागले. काही शहरं, काही खेडी, गुरांची खिल्लारं, अनेक प्रकारची अरण्यं, उद्यानं, पर्वत, धातूंच्या खाणींचे डोंगर पाहात पाहात मी चाललो होतो. जंगलात पुष्कळ हत्ती होते. त्यांनी वृक्षांच्या ढाप्या मोडून टाकल्या होत्या. तेथेच स्वच्छ पाण्याची मोठमोठी सरोवरं होती. त्यांत सुंदर कमलिनी होत्या. त्या कमलांचा उपभोग देवही घेत असत. चित्रविचित्र पक्ष्यांचे मंजुळ शब्द होत होते. भृंगे गुंजारव करीत भ्रमत होते. देवनळ, कळक, दर्भ, आपोआप वाजणारी कळकीची बेटं, यांनी जंगलं भरून गेली होती.

'मी तर एक अरण्य फार भयंकर पाहिले. त्यात सर्प, अजगर, घुबडं, वाघ, भालू इत्यादी सर्व हिंस्र व भयाण पशुपक्ष्यांचं ते जणू माहेरघरच होतं. मी एकटाच ते अरण्य ओलांडून गेलो. माझा जीव प्रवासानं अतिशय व्याकुळ झाला. हात-पाय थकून गेले. तहानेनं घशाला कोरड पडली. भुकेनं प्राण कासावीस झाले. याच वेळी मार्गातील

नदीच्या एका खोल डोहात मी स्नान केलं. आचमन घेतल्यावर, थंड पाणी प्याल्यावर मला थोडी हुशारी वाटली. पुढे त्या अरण्यातून जाताना एक पिंपळाचा वृक्ष लागला. त्याच्या घनदाट सावलीत मी बसलो. प्रत्येकाच्या हृदयात निवास करणाऱ्या आत्मरूपी परमेश्वराचं मी चिंतन व ध्यान करू लागलो.

'भक्तियुक्त अंतःकरणानं भगवंतांच्या चरणकमलांचं चिंतन करताना माझ्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. माझ्या हृदयातील परमात्मा प्रकट होऊ लागला. व्यासा, परमेश्वराचं ते रूप प्रकट होताच माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. चित्तवृत्ती स्तब्ध झाली. त्या आनंदाच्या भरात तो परमेश्वर व मी एकच आहोत, असा भाव निर्माण झाला. ते रूप मला दिसत होतं. इतक्यात ते गुप्त झालं. मनाला आल्हाद देणारं ते स्वरूप गुप्त झाल्यावर मी एकदम दुःखानं भांबावून गेलो. पुनः ते स्वरूप पाहावं म्हणून मनाला स्थिर करून मी त्याचं ध्यान करू लागलो. त्याचं दर्शन होईना म्हणून मनाची फार तळमळ झाली. मी त्याच्या दर्शनासाठी अतिशय उतावळा झालो.

'त्या निर्मळ व एकान्ताच्या स्थळी पुन्हा दर्शनाबद्दल माझी अशी खटपट चालली असतानाच मला त्या परमात्म्यानं अत्यंत मधुर व गंभीर वाणीनं सांगितलं, 'या जन्मात आता तुला माझं दर्शन होणार नाही. कामक्रोधादी विकार जळून गेले नसतील तर माझं दर्शन दुर्लभ आहे. माझ्या एकदा दर्शनामुळं तुला आवड निर्माण झालीच आहे. ज्या पुरुषाला एकदा दर्शन झालं त्या पुरुषास ऐहिक विषयांचा कंटाळा येईलच. थोड्याच दिवसांत सत्संगतीनं तुझी बुद्धी स्थिर होईल. तू या निंद्य शरीराचा त्याग करशील आणि मग माझा सेवक होशील.'

'व्यासा, इतकं बोलून परमेश्वराची ती आकाशवाणी बंद झाली. त्याची कृपा माझ्या ध्यानात आली. तो मोठ्यांहून मोठा आहे, हे मनात आणून मी आपले मस्तक वाकवून त्याला वंदन केलं. या ईश्वराच्या नादानं मी निर्लज्ज व वेडापिसाच बनलो. त्याचाच घोष, त्याचंच स्मरण करीत मी निरिच्छ मनानं, गर्वरहित व निर्मत्सर अंतःकरणानं पृथ्वीवर भटकत राहून मृत्यूची वाट पाहिली.

'आणि अशात व्यासा, एकदा सर्वसंग परित्याग करून मी श्रीकृष्णाचं ध्यान करीत असताना एकाएकी मेघपंक्तीतून विद्युत्पात व्हावा तसा एक तडाखा काळानं मजवर गाजविला. माझ्या पूर्व-संचिताची समाप्ती झाली. हा माझा पंचमहाभूतात्मक देह पतन पावला. नंतर कल्पांताच्या वेळी सर्व त्रैलोक्याचा संहार करून समुद्राच्या उदकात शिरण्याची इच्छा करणाऱ्या परमेश्वराच्या श्वासोच्छ्वासाबरोबर मी त्याच्या उदरात शिरलो. अशा स्थितीत एक हजार महायुगांचा काल लोटल्यावर परमेश्वर जागा झाला. त्यानं सृष्टी निर्माण करण्याची इच्छा केली. त्याच्या इंद्रियांपासून मी व मरीचादी ऋषी निर्माण झाले.

'आता महाविष्णूंच्या कृपाप्रसादानं मी कुठंही हिंडू शकतो. मी अखंड ब्रह्मचर्य पाळून सर्वत्र भटकत असतो. त्या परमेश्वरांनी मला ही नादब्रह्मानं शोभणारी वीणा दिली आहे. मी ती वाजवितो व परमेश्वराच्या गुणांचं गायन करीत फिरत असतो. या यशाचं गायन ऐकून तो परमात्मा मला तत्काळ दर्शन देतो. काम, क्रोध, लोभ इत्यादी विकारांनी त्रस्त झालेलं अंतःकरण परमेश्वराच्या सेवेनंच शांत होतं. यमनियमादी योगाच्या प्रत्यक्ष मार्गानं ते शांत होणार नाही.

**यमादिभिर्योगपथैः कामलोभहतो मुहुः ।**
**मुकुन्दसेवया यद्वत्तथाऽऽत्माऽद्धा न शाम्यति ॥**

'म्हणून निष्पाप व्यासा, तुम्ही मला विचारलंत, म्हणून हे माझं गुह्य जीवनचरित्र मी तुम्हांस सांगितलं.'

## शुकाचार्यांचे भागवत्चिंतन

इतके म्हणून भगवान नारद आपली वीणा वाजवीत निघून गेल्यानंतरचा वृत्तान्तही सूताने शौनकादिकांना सांगितला. ब्रह्मदेवांच्या सरस्वतीनदीच्या पश्चिमतीरावर ऋषींचा एक आश्रम शम्याश्रम नावाचा आहे. त्याभोवती बोरीची अनेक झाडे असून त्या बदरिका-श्रमात भगवान व्यास डोळ्यांना पाणी लावून बसले. आचमन करून

ते स्वस्थपणाने आसनावर स्थिर झाले. नारदांनी सांगितल्याप्रमाणे त्यांचे चिंतन सुरू झाले. अनन्यभक्तीनें त्यांनी चिंतन केल्यानें अंतःकरणातील परमेश्वराचे दर्शन त्यांना झाले. समाधिस्थितीत त्यांना जीव हा सत्त्व, रज व तम यांहून निराळा असूनही तो मायेच्या मोहात गुंतून त्रिगुणात्मक होतो हे कळले. त्यामुळे अनर्थ होतो, हे त्यांनी जाणले. श्रीकृष्णाच्या ठिकाणी जर खरी भक्ती असेल तर सर्व अनर्थ नष्ट होतो. म्हणून अज्ञानी लोकांच्या हृदयात भक्तियोगाची वाढ होण्यासाठी व्यासांनी भागवतसंहिता निर्माण केली.

त्यांचे हे भागवत श्रवण केल्यानें परमपूज्य अशा श्रीकृष्णांच्या ठिकाणी भक्ती जडते. शोक, मोह यांची भीती मग मुळीच उरत नाही. त्या मुनिवर्य व्यासांनी हा भागवत ग्रंथ रचून तो वैराग्यसंपन्न अशा शुक नावाच्या आपल्या पुत्रास शिकविला. नित्य मोक्षमार्गातच रमणाऱ्या, उदासीन असणाऱ्या, स्वस्वरूपातच रमणाऱ्या त्या शुकाचार्यांनी तरी भागवतासारख्या मोठ्या ग्रंथाचा अभ्यास कशासाठी केला ? आत्मस्वरूपात रमणारे मुनी अनेक असतात. त्यांचा सहजस्वभावच आनंदमय असतो. तरी ते मुनी परमेश्वराची निष्काम भक्ती करतातच. कारण श्रीहरींचे अद्भुत गुण शुकाचार्यांनाही लोभनीय वाटले. त्यांना भगवद्भक्त नेंहमीच प्रिय वाटत. म्हणून भगवान व्यासपुत्र शुकांनी एवढ्या मोठ्या भागवतग्रंथाचे अध्ययन केले.

# २ कथाउपकथा

## अश्वत्थाम्यास भयंकर शासन

भागवत श्रवण करणारा हा परीक्षित राजा कोण होता ? तो केवळ चक्रवर्ती राजाच नव्हता. तर राजर्षीही होता. त्याच्या चरित्राचा

कथाभागही सूतानें ऋषींना सांगितला. कौरव-पांडवांचे घनघोर युद्ध चालले होते, उभय पक्षांतील मोठमोठे योद्धे धारातीर्थी पतन पावले. दुर्योधन भीमसेनाच्या गदाघातानें मांड्या मोडून व्यथित झाला होता. द्रोणाचार्यांचा पुत्र अश्वत्थामा. त्यानें स्वतःच्या अन्नदात्याचे, म्हणजे दुर्योधनाचे हित करण्यासाठी द्रौपदीच्या निद्रित पुत्रांची मस्तके कापून टाकली ! यामुळे दुर्योधनही प्रसन्न झाला नाही. लहान अर्भकांस अश्वत्थाम्याने मारलेसे पाहून त्यानेही या कर्माचा निषेध केला.

आपल्या लहान मुलांचा असा विनाश झालेला पाहून द्रौपदी अत्यंत क्रोधित झाली. तिचे डोळे पाण्यानें भरून आले. रडूनरडून तिने आकांत केला. तिचे सांत्वन करताना अर्जुन तिला म्हणाला, 'कल्याणी, मी अत्याचार करणाऱ्या चांडाळ अश्वत्थाम्याचं मस्तकच माझ्या गांडीव धनुष्यानं छेदून आणतो. त्यावर तुला बसवून तुझ्या पुत्राच्या मरणाचं स्नान मी घालीन. तुझे हे दुःखाश्रू पुसून टाकीन.'

प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णच अर्जुनाचा मित्र व सारथी होता. अर्जुन आपल्या गुरुपुत्रावर म्हणजे अश्वत्थाम्यावर चाल करून गेला. त्याला पाहून अश्वत्थामा घाबरला. त्याचे पाय लटपटू लागले. आपले प्राण आता कसे वाचवावेत या चिंतेत तो पडला. अतिशय वेगाने रथ टाकून तो पळत सुटला. शेवटी आता आपला निभाव लागणार नाही हे पाहून प्राणाच्या बचावासाठी ब्रह्मास्त्र वापरण्याचा त्यानें विचार केला. त्याने आपल्या डोळ्यांना पाणी लावले. आचमन केले. प्राणावरील संकट जाणून त्याने ब्रह्मास्त्र कसे आवरावे हे माहीत नसताही ते सोडून दिले. त्याचे ते भयंकर अस्त्र सुटताच सर्व दिशांना प्रखर तेज प्रकटले. हा प्रकार पाहून अर्जुनही गडबडून गेला. तो आपल्या सारथ्यास, श्रीकृष्णांना म्हणाला,

'कृष्णा, सर्व भक्तांची भीती दूर करणाऱ्या श्रीकृष्णा, संसार-तापानं दग्ध झालेल्यांना मुक्ती देणारा तूच एकटा आहेस. तूच प्रत्यक्ष परमेश्वर आहेस. दुर्जनांचा नाश करण्यासाठी तुझा अवतार आहे. अनन्यभक्तांचं तू रक्षण करतोस. प्रकाशमान देवा, चोहोंकडे पसरत चाललेलं हे तेज कसलं आहे ? हे आहे तरी काय ? कुठून येतं आहे ?'

'अर्जुना, द्रोणाचार्यांचा पुत्र अश्वत्थाम्यानं आपल्या प्राणसंकटास भिऊन हे या वेळी सोडलेलं ब्रह्मास्त्र आहे. आता हे ब्रह्मास्त्र परत कसं घ्यायचं हे त्याला माहीत नाही. पण तुला ते माहीत आहे. अर्जुना, अश्वत्थाम्यानं सोडलेल्या या तेजाचा नाश आता कोणत्याही अस्त्रानं व्हायचा नाही. तूच आता ब्रह्मास्त्र सोडून अश्वत्थाम्याच्या अस्त्राचा नाश कर.'

श्रीकृष्णांचे बोलणे संपताच अर्जुनाने त्यांचे स्मरण करून नेत्रांना पाणी लावले. त्याने आचमन केले आणि श्रीकृष्णांना प्रदक्षिणा घातली. शत्रूच्या अस्त्रास नाहीसे करण्यासाठी अर्जुनानेही ब्रह्मास्त्र सोडले. त्या दोनही अस्त्रांच्या तेजांनी सारे ब्रह्मांड भरून गेले. पृथ्वी, स्वर्ग, आकाश प्रलयाग्नीप्रमाणे होरपळून निघू लागले. सारे लोक हवालदिल झाले. अनेकांचा नाश झाला. हे पाहून श्रीकृष्णांनी सांगितल्यावरून अर्जुनाने दोनही अस्त्रांचा उपसंहार केला.

क्रोधाने लाल झालेले डोळे वटारून अर्जुनाने धावत जाऊन अश्वत्थाम्यास गाठले. एखाद्या पशूप्रमाणे त्याने त्याला दोरीने घट्ट बांधून ठेवले. त्याला दोरीने बांधून अर्जुन शिबिराकडे नेणार असे दिसताच श्रीकृष्ण रागावून म्हणाले,

'अर्जुना, या शत्रूला तू सोडू नकोस. याला क्षमा करणं योग्य नाही. या ब्राह्मणाधमाचा तू वधच करावास. रात्री निजलेल्या निरपराधी बालकांचा यानं वध केला आहे. याला कसली क्षमा करतोस ? धर्मज्ञ लोक मद्य प्यालेल्या, बेसावध असलेल्या, वेड लागलेल्या, निद्रित, बाल्यावस्थेतील, स्त्री, मूर्ख, शरण आलेल्या, विरथ झालेल्या, भेदरलेल्या शत्रूसही कधी मारीत नाहीत. पण जो निर्दय व दुष्ट दुसऱ्यांच्या प्राणांनी आपले प्राण पुष्ट करतो त्याचा वध करणं ही गोष्ट त्याच्याच कल्याणाची असते. नाहीतर तो अधोगतीला जाईल.

**स्वप्राणान्यः परप्राणैः प्रपुष्णात्यघृणाः खलाः ।**
**तद्वधस्तस्य हि श्रेयो यद्दोषाद्यात्यधः पुमान् ॥**

'अर्जुना, हे मानवती द्रौपदी, ज्यानं तुझ्या पुत्रांचा वध केला

त्याचं मस्तक छेदून मी आणीन, असं तू वचन द्रौपदीला दिलेलं मी समक्ष ऐकलं आहे. वीरा अर्जुना, हा अश्वत्थामा सामान्य पातकी नाही. हा तर घातकी आहे. हा ब्राह्मणाधम आहे. वंशछेदक आहे. म्हणून याचा वध करणं हेच इष्ट. याच्या धन्याला म्हणजे दुर्योधनालाही याचं हे कृत्य आवडलेलं नाही.'

श्रीकृष्णांचा हा उपदेश थोर मनाच्या अर्जुनास मानवला नाही. स्वतःचे पुत्र मारले गेले, तरी गुरुपुत्रास, अश्वत्थाम्यास मारण्यास त्याचे मन तयार होईना. अर्जुनाने आपल्या शिबिरात जाऊन पुत्रशोकाने व्याकुळ झालेल्या आपल्या प्रियपत्नीपुढे अश्वत्थाम्याला आणून उभे केले. परंतु द्रौपदीही फार थोर मनाची होती. यज्ञात बळी देण्यासाठी एखाद्या अजापुत्राला दोरी बांधून आणतात तसे अश्वत्थाम्याला अर्जुनाने बांधून आणलेले तिने पाहिले. तो लज्जेने मान खाली घालून उभा होता. अशा दीन व अपमानित झालेल्या अश्वत्थाम्यास पाहून सरळ मनाच्या द्रौपदीला त्याची दया आली. आपल्या गुरूंचा, म्हणजे द्रोणाचार्यांचा हा पुत्र आहे, असे समजून तिने त्याला दयाळू अंतःकरणाने नमस्कार केला. असे एखाद्या पशूप्रमाणे अश्वत्थाम्याला बांधून आणलेले पाहून ती म्हणाली,

'सोडा. सोडा त्याला. कितीही झालं तरी हा ब्राह्मण आहे. एवढंच नव्हे तर हा आपला गुरू आहे. अत्यंत गूढ रहस्यासह यांनी सारा धनुर्वेद तुम्हांस शिकविला. हा गुरुपुत्र नव्हे. तर महासमर्थ व भाग्यशाली द्रोणाचार्यच पुत्ररूपानं या जगात राहिले आहेत. त्यांची अर्धांगी प्रियपत्नी कृपी हीसुद्धा अद्याप जिवंत आहे. ती वीरमाता असल्यामुळं तिनं त्यांच्याबरोबर सहगमन केलं नाही. धर्मज्ञा, भाग्यशीला, अर्जुना, आपण ज्यांना वंदन करावं, ज्यांची नित्य पूजा करावी, असे हे आपल्या गुरूंचं कुल. त्यास आपण दुःख देणं हे युक्त नाही. माझी मुलं मृत झाल्यानं मी दुःखात होरपळते, डोळ्यांत पाणी आणून रडते. असंच दुःख या अश्वत्थाम्याच्या मातेस, पतिव्रता गौतमीस होऊ नये, अशी माझी इच्छा आहे. अर्जुना, जे राजे ब्राह्मणांच्या कुलांचा उपमर्द करतात, त्यांचं सारं कुल त्यांच्या शापानं व शोकानं व्याप्त होऊन

जळून नष्ट होतं.'

द्रौपदीच्या या भाषणास जवळच बसलेल्या धर्मराजानें अनुमोदन दिले. नकुल, सहदेव, सात्यकी, श्रीकृष्ण व इतर स्त्रियाही होत्या. पण हे सर्व ऐकून भीमसेन मात्र रागानें लाल झाला. अश्वत्थाम्याचा वध करणे हेच इष्ट असे त्याला वाटले. तेव्हा भगवान श्रीकृष्ण म्हणाले, 'अर्जुना, ब्राह्मणाला मारू नये असा मीच धर्म सांगितला आहे हे खरं आहे. पण एखादा पुरुष महाविद्वान आहे, पण तो जर आततायी असेल तर त्याच्या वधापासून ब्रह्महत्त्येचा दोष लागत नाही, असंही मीच म्हटलं आहे. पण आता तुला जे योग्य दिसेल ते तू कर. अर्जुना, तुझी प्रियपत्नी द्रौपदी, तिच्यासमोर तू जी प्रतिज्ञा केलीस ती खरी कर. भीमाला, द्रौपदीला व मलाही बरं वाटेल असं तू कर.'

श्रीकृष्णांचं वचन ऐकून अर्जुनाने आपल्या तलवारीने त्या ब्राह्मणाच्या मस्तकात असलेला एक मणी काढून घेतला. अश्वत्थाम्यास बंधनातून मोकळे केले. बालहत्त्या घडलेली असल्यानें तो आधीच निस्तेज झाला होता. त्यात आता मस्तकावरील मणी गेल्यामुळे तो काळाठिक्कर पडला. त्याला अशा अवस्थेत शिबिरातून हाकलून दिले. क्षौर करणे, द्रव्याचा दंड करणे, राज्यातून हाकलून देणे, हा त्या ब्राह्मणाधमाचा वधच होय. त्याला इतर देहान्तशासनाची गरजच नाही. अश्वत्थामा निघून जाताच पुत्रशोकाने विव्हळ झालेल्या पांडवांनी युद्धात मरण पावलेल्यांची और्ध्वदेहिक कर्मे केली.

## उत्तरेचे संरक्षण, कुंतीची प्रार्थना

अश्वत्थामा निघन गेल्यानंतर श्रीकृष्णासह पाच पांडव द्रौपदी आदी स्त्रियांना पुढे करून युद्धात मेलेल्यांना पाणी देण्यासाठी गंगेच्या किनाऱ्यावर आले. पांडवांनी स्त्रियांसह यथाविधी सर्व बंधुबांधवांना तर्पण द्वारे पाणी दिले. शोक करून सर्वांनी गंगेच्या पाण्यात स्नाने केली. युधिष्ठिरादी पांच पांडवांना, धृतराष्ट्राला, गांधारीला, कुंतीला व द्रौपदीला चार समाधानाच्या गोष्टी श्रीकृष्णांनी सांगितल्या.

त्यानंतर श्रीकृष्णांनी उत्तम यज्ञसामग्री संपादन करून युधिष्ठिरा-

कडून तीन अश्वमेधयज्ञ करविले. युधिष्ठिराच्या पवित्र यशाने सारी पृथ्वी दुमदुमून गेली. त्यानंतर श्रीकृष्णांनी सात्यकी व उद्धव यांच्यासह द्वारकेस परत जाण्याबद्दल पांडवांची आज्ञा घेतली. श्रीकृष्ण, सात्यकी, उद्धव द्वारकेस जाण्यासाठी रथात बसले तेव्हा भीतीने व्याकुळ झालेली उत्तरा धावत धावत श्रीकृष्णांकडे गेली. भ्यालेली उत्तरा श्रीकृष्णांनी पाहिली. उत्तरा त्या वेळी श्रीकृष्णांना म्हणाली,

'योगिश्रेष्ठा, देवा, जगाच्या रक्षका, परमेश्वरा, आपण माझं रक्षण करावं. रक्षण करावं. माझं रक्षण करणारा तुमच्याशिवाय कुणीच नाही. सर्वव्यापी परमेश्वरा, तापलेल्या लोखंडाप्रमाणं ज्याचा अग्रभाग आहे असा एक बाण माझ्या अंगावर धावत येत आहे. श्रीकृष्णा, या बाणानं माझा खुशाल नाश होवो. पण माझ्या गर्भाचा नाश मात्र न व्हावा.'

'उत्तरे, निष्पांडवी पृथ्वी करण्यासाठी, पांडवांचा वंशच्छेद करण्यासाठी, तुला ठार मारण्यासाठी अश्वत्थाम्यानं सोडलेलं हे ब्रह्मास्त्र आहे.'

श्रीकृष्ण असे म्हणत आहेत तेव्हा आपल्याही अंगावर पेटलेले पाच बाण येत असल्याचे पांडवांनी पाहिले. त्यांचा नाश करण्यासाठी पांचही पांडवांनी आपापली अस्त्रे हातांत घेतली. त्यांची असमर्थता जाणून श्रीकृष्णांनी आपले सुदर्शन अस्त्र सोडून अश्वत्थाम्याच्या बाणांचा नाश केला. पांडवांचे व उत्तरेचे संरक्षण केले. उत्तरेच्या गर्भाला त्या अस्त्रापासून बिलकुल त्रास झाला नाही. श्रीविष्णूंच्या तेजापुढे अश्वत्थाम्याचे ब्रह्मास्त्र शांत झाले. श्रीकृष्णांच्या या कृत्याचे मनापासून कौतुक पांडवांनी केले. द्वारकेला जाणाऱ्या कृष्णांची कुंतीनें मनापासून स्तुती केली. याच वेळी ती म्हणाली, 'कृष्णा, आम्हांला प्रत्येक ठिकाणी आपत्तीच प्राप्त व्हावी. आम्हांवर नेहमी संकटेच यावीत. कारण प्रत्येक समयी तुझं दर्शन होऊन आम्हांस पुनर्जन्मादिकांची यातायात घडणार नाही.

विपदः सन्तु नः शश्वत्तत्रदत्र जगद्गुरो ।
भवतो दर्शनं यत्स्यादपुनर्भवदर्शनम् ।।

कुंतीने मनापासून श्रीकृष्णांचे स्मरण केले व त्यांनी केलेल्या उपकारांची आठवण केली. श्रीकृष्णांनीही कुंतीचे व इतर पांडवांचे सांत्वन केले.

## इच्छामरणी भीष्मांचे देहावसान

आपण प्रजेशी वैर करून आप्तेष्टांचा वध केला, हे फारच मोठे पाप घडले. अशा भीतीनें युधिष्ठिर धर्मजिज्ञासेच्या हेतूनें शरपंजरी पडलेल्या भीष्मांपाशी कुरुक्षेत्रास गेला. भीम, अर्जुन, व्यास, धौम्य, ब्राह्मण, अशी सर्व मंडळी, श्रीकृष्णांसह धर्मराज यांनी शरपंजरी पडलेल्या भीष्माचार्यांना नमस्कार केला. व्यासवसिष्ठादी सर्व ब्रह्मर्षी, नारदादी देवर्षी, बृहदाश्वादी राजर्षी, अनेक पर्वत, नारद, धौम्य, षड्गुणैश्वर्यसंपन्न व्यास, बृहदश्व, भारद्वाज, शिष्यांसह रेणुकापुत्र परशुराम, वसिष्ठ, इंद्रप्रमद, त्रित, गृत्समद, असित, कक्षीवान्, गौतम, अत्री, विश्वामित्र, सुदर्शन, शुकाचार्य, कश्यप, अंगिरस इत्यादी अनेक ऋषिमुनी तेथे जमा झाले भीष्मांनी अशा थोर ऋषींचा सत्कार केला. भीष्मांनी श्रीकृष्णास मनापासून नमस्कार केला. नम्रता, प्रेम, आपुलकी यांनी युक्त असलेल्या पांडवांकडे पाहून भीष्मांचे डोळे पाण्यानें भरून आले. ते म्हणाले,

'पांडवांनो, ब्राह्मणांना पूज्य मानणारे, धर्मानं आचरण करणारे, श्रीकृष्णांच्या आश्रयानं वाढणारे तुम्ही. तुमच्यावर अशी दुःखं कोसळावीत ही केवढी अन्यायाची गोष्ट ! अतिरथी पंडू मरण पावल्यावर लहान बालकांना या आमच्या लेकुरवाळ्या सुनेनं, कुंतीनं खूप दुःख सहन करून तुम्हांस वाढविलं. युधिष्ठिरासारखा धार्मिक राजा, हातात गदा धारण करणारा हा भीम, सर्व शास्त्रं व अस्त्रं जाणणारा हा अर्जुन, श्रीकृष्णासारखा मित्र, असा योग असूनही इथं आपत्ती यावी ? या श्रीकृष्णाच्या मनात काय काय आहे हे कोण जाणणार ? युधिष्ठिरा, सर्व काही दैवाधीन आहे. श्रीकृष्णाच्या आज्ञेप्रमाणं तू दुर्बल व तुझ्यावर

अवलंबून असणाऱ्यांचं रक्षण कर. हा श्रीकृष्ण षड्गुणैश्वर्यानं संपन्न असून तोच सर्वांचा आदी आहे. हाच यादवकुळात मनुष्यरूपानं वावरतो आहे. शंकर, देवर्षी नारद, प्रत्यक्ष भगवान कपिल मुनी, याचा पराक्रम जाणतात. अशा या कृष्णाला तुम्ही 'माझा मामेभाऊ, माझा मित्र, सज्जन' असे मानलेत. त्याला प्रधान केलंत, दूत केलंत तुम्ही. तुमच्या प्रेमापोटी त्यानं सारथ्यही केलं. धर्मराजा, एकनिष्ठ भक्तावर परमेश्वराचं प्रेम किती असतं हे तुम्ही पाहा. मी प्राणांचा त्याग करायला सिद्ध झालो असताना प्रत्यक्ष श्रीकृष्णच स्वत: मला दर्शन देण्यासाठी इथं आला आहे. या चतुर्भुज भगवान श्रीकृष्णानं माझ्याकडं माझा प्राण जाईपर्यंत पाहावं.'

शरपंजरी पडलेल्या भीष्मांना धर्मराजानें अनेक प्रकारचे धर्मविषयक प्रश्न केले. दानधर्म, राजधर्म, मोक्षधर्म, स्त्रीधर्म, वैष्णवधर्म, इत्यादींचे विस्तारानें वर्णन भीष्मांनी युधिष्ठिरासाठी केले. त्यांनी अनेक आख्याने, अनेक इतिहास सांगून धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांचे विवेचन शास्त्रीय पद्धतीने केले. हे सर्व निवेदन होत असतानाच इच्छामरणी भीष्मांना इष्ट वाटणारा असा उत्तरायणाचा काळ प्राप्त झाला. तेव्हा भीष्माचार्यांनी बोलणे बंद केले. दृष्टी एकाग्र करून ती त्यांनी चतुर्भुज श्रीकृष्णांच्या ठायी समर्पित केली. देहपातापर्यंत त्यांनी श्रीकृष्णांची मनोमन प्रार्थना केली.

अशी स्तुती केल्यावर भीष्माचार्यांनी श्रीकृष्णाच्या ठिकाणी आपल्या मनाच्या सर्व क्रिया, वाणीच्या, इंद्रियांच्या सर्व क्रिया अर्पण करून आपला देह ठेवला. भीष्माचार्य लीन झालेले पाहून संध्याकाळी पक्षी जसे शांतपणाने आपल्या घरट्यांत येऊन बसतात, तशी सर्व मंडळी शांतपणे बसली. भीष्माचार्यांनी जेथे देह ठेविला तेथे देवांनी व मनुष्यांनी दुंदुभींचा गजर केला. सर्वांनी भीष्मांची स्तुती केली. आकाशातून फुलांची वृष्टी झाली. भीष्माचार्य निजधामाला गेल्यावर युधिष्ठिरानें त्यांची दहनादी उत्तरकृत्ये केली. त्यांच्या निधनाने सर्वांनाच फार शोक झाला. त्यानंतर श्रीकृष्णांसह सर्वांना बरोबर घेऊन युधिष्ठिर हस्तिनापुरात गेला व त्याने पित्यासमान धृतराष्ट्राचे व गांधारीचे सांत्वन

केले. धर्मराजाने धृतराष्ट्राच्या अनुज्ञेने, श्रीकृष्णांच्या संमतीने वडिलोपार्जित राज्य धर्मानुसार पालन करण्याचा निश्चय केला.

## श्रीकृष्ण द्वारकेस निघाले

धर्मराज युधिष्ठिराच्या काळात राज्यात योग्य वेळी पाऊस पडू लागला. पृथ्वीवर धनधान्यांची समृद्धी झाली. गायी पुष्कळ दूध देऊ लागल्या. राज्यातील सर्व नद्या स्वच्छ पाण्याने खळाळून वाहू लागल्या. प्रजेला कसलीच काळजी नव्हती. रोगराई नव्हती. शरीरजन्य क्लेश नव्हते. कुलक्षयजन्य शोक दूर करण्यासाठी व सुभद्रेच्या आग्रहावरून श्रीकृष्ण कित्येक महिने हस्तिनापुरातच राहिले. त्यानंतर सर्वांचा निरोप घेऊन श्रीकृष्ण द्वारकेस जाण्यासाठी निघाले. सुभद्रा, द्रौपदी, कुंती, उत्तरा, गांधारी, धृतराष्ट्र, युयुत्सू, कृपाचार्य, नकुल, सहदेव, भीम, धौम्य इत्यादींना कृष्णांचा वियोग सहन झाला नाही. हस्तिनापुरातील सर्वांचीच मने कृष्णांच्या मागोमाग धावू लागली. डोळ्यांच्या पापण्या मिटू न देता ते त्यांच्याकडेच पाहात होते.

श्रीकृष्ण द्वारकेस निघाले तेव्हा जिकडे तिकडे मृदंग, शंख, नगारे, ढोल, वीणा, कर्णे, तुताऱ्या, शिंगे, धुंधरी, आनक, घंटा इत्यादी वाद्ये वाजू लागली. श्रीकृष्णांना पाहाण्यासाठी कुरुस्त्रिया वाड्यांच्या गच्चीवरून प्रेमानें व लज्जेनें जमून त्यांच्यावर पुष्पांची वृष्टी करू लागल्या. रत्नजडित मुठीचे व मोत्यांच्या हारानें शोभणारे एक छत्र अर्जुनाने श्रीकृष्णांवर धरले होते. उद्धव व सात्यकी त्यांच्यावर चवऱ्या ढाळीत होते. ब्राह्मणांनी दिलेले आशीर्वाद काही ठिकाणी ऐकू येऊ लागले. कौरवस्त्रियांनी श्रीकृष्णांच्या गुणरूपाचे अतोनात कौतुक केले. त्या सर्व हस्तिनापूरनिवासी स्त्री-पुरुषांचे अभिनंदन करून श्रीकृष्ण द्वारकेस जाण्यासाठी निघाले. त्यांना वाटेत शत्रूकडून त्रास होऊ नये म्हणून धर्मराजाने चार प्रकारचे सैन्य त्यांच्याबरोबर पाठविले. बरोबर आलेल्या लोकांना प्रेमाने परत पाठवून श्रीकृष्णांनी सात्यकी आदी मित्रांसह द्वारकेकडे प्रयाण केले. कुरुदेश, जांगलदेश, पांचालदेश, यमुनेच्या काठावरील देश, शूरसेन, ब्रह्मावर्त, कुरुक्षेत्र, मत्स्यदेश, सारस्वतदेश, मारवाड,

सौवीर व आभारी या देशांना ओलांडून श्रीकृष्ण द्वारकेस पोचले. जेथे जेथे श्रीकृष्ण पोचले तेथे तेथे त्यांचा लोकांनी नजराणे देऊन सत्कार केला.

## श्रीकृष्णांचें द्वारकेत स्वागत

नगरात प्रवेश करताच श्रीकृष्णांनी आपला पांचजन्य नावाचा शंख वाजविला. जगाचे भय नष्ट करणाऱ्या त्या शंखाचा आवाज ऐकून द्वारकेतील आबालवृद्ध श्रीकृष्णांना पाहाण्यासाठी सामोरे आले. नगर-वासियांनी नजराणे आणले. लहान मुलांनी त्यांचे मोठ्या प्रेमानें स्वागत केले. ह्यात्र आपला स्वामी, पिता, गुरू, देव असेच सर्वांनी मानले. त्यांच्याविना द्वारकानिवासी लोकांना एक क्षण कोटयवधी वर्षांप्रमाणे गेला होता. सर्व लोकांवर अनुग्रह करीत श्रीकृष्णांनी द्वारकेत प्रवेश केला. महाबलाढ्य अशा मधू, भोज, दशार्ह, अर्ह, कुकुर, अंधक, वृष्णी या कुळांतील पुरुषांनी द्वारकेचे संरक्षण केले होते.

या द्वारकेत अनेक प्रकारची सरोवरे आहेत. त्या सरोवरांभोवती फळबागा, फुलबागा, उद्यानें, क्रीडामंदिरे आहेत. सभोवार आश्रम आहेत. आश्रमाजवळ पुष्पवृक्ष व वेली सतत सहाही ऋतूंत फुलाफळांनी समृद्ध आहेत. द्वारकेच्या प्रवेशद्वारावर मंगलकारक तोरणे लाविली होती. प्रत्येक प्रासादाच्या व मंदिराच्या दरवाज्यावरही तोरणे झळकत होती. रस्त्यांवरही दुतर्फा तोरणे लावून शोभा वाढविली होती. सर्व द्वारका-नगरी चित्रविचित्र अबदागिरी व गुढ्या उभारून सूर्याच्या उन्हास नाहीसे करीत होती. सर्व नगरीतील रस्ते, राजमार्ग, पेठा, अंगणे, झाडून स्वच्छ केली असून रस्त्यांवर चंदनाचे सडे घातले होते. जिकडे तिकडे फळे, फुले, अक्षता, वृक्षांची कोवळी पानें, यांनी शोभा आलेली होती.

द्वारकेतील प्रत्येक घरावर, दरवाज्यावर दही, अक्षता, फळे, ऊस, पूर्णकुंभ, पूजासाहित्य, धूप, दीप यांनी शोभा आलेली होती. थोर मनाचा वसुदेव, अक्रूर, उग्रसेन व बलराम यांनी अत्यंत प्रिय अशा श्रीकृष्णांना द्वारकेत आल्यावर स्वागतानें स्वीकारले. प्रद्युम्न, चारुदेष्ण, सांब यांनी खाणे-पिणे सोडून मोठ्या आनंदाने श्रीकृष्णांना ते सामोरे

गेले. नाना शंख, वाद्ये, यांच्या गजरात सर्वजण आपापल्या रथांत बसून श्रीकृष्णांच्या स्वागतास निघाले. श्रीकृष्णाच्या दर्शनासाठी उत्कंठित झालेल्या व चकचकीत कुंडलांचे तेज ज्यांच्या गालांवर पडले आहे अशा शेकडो वेश्याही आपल्या वाहनांत बसून श्रीकृष्णांना सामोऱ्या गेल्या. द्वारकेतील नाटकी लोक, नाचणारे, गंधर्व, स्तुतिपाठक, सूत इत्यादींनी श्रीकृष्णाची स्तुति-स्तोत्रे गायला सुरुवात केली.

वयानें जे फारच वृद्ध होते त्या वसुदेवादिकांना श्रीकृष्णांनी साष्टांग नमस्कार घातले. त्यांनी कित्येकांना आलिंगन दिले. कित्येकांना हस्तस्पर्श केला. योग्यतेने कमी असणाऱ्यांना केवळ हसून अनुमोदन दिले. श्रीकृष्णांनी सर्व आबालवृद्धांचे समाधान केले. वडील, गुरू, ब्राह्मण, वृद्धलोक, स्तुतिपाठक यांच्या स्तुतिपूर्वक आशीर्वादांचा त्यांनी स्वीकार केला. श्रीकृष्ण द्वारकेच्या रस्त्यावरून चालत होते तेव्हा त्यांना पाहण्यासाठी उत्कंठित झालेल्या कुलीन स्त्रिया वाड्यांच्या गच्च्यांवर चढल्या. त्यांना श्रीकृष्णाच्या दर्शनाची लालसा फारच होती. त्या श्रीकृष्णांचे उरःस्थल म्हणजे लक्ष्मीचे निवासस्थान. त्यांचे दंड म्हणजे लोकपालांच्या राहाण्याचे स्थान, त्यांचे चरणकमल म्हणजे भक्तरूपी चक्रवाक पक्ष्यांचे वसतिस्थान होय.

श्रीकृष्णांच्या मस्तकावर पांढरे छत्र होते. चवऱ्या ढळत होत्या. रस्त्यातून नागरिक त्यांच्यावर पुष्पवृष्टी करीत होते. श्रीकृष्णांनी पिंगट वर्णाचे वस्त्र नेसले होते. त्यांच्या गळ्यात पायांपर्यंत लोंबणारी वनमाळ होती. श्रीकृष्ण प्रथम माता-पित्यांच्या मंदिरात गेले. त्यांना श्रीकृष्णांनी आनंदानें मस्तक लववून साष्टांग नमस्कार घातला. प्रेमानें दूध बाहेर आल्यामुळे ज्यांचे स्तन भिजून गेले आहेत व ज्यांना पुत्रदर्शनाने आनंद झाला आहे, अशा श्रीकृष्णांच्या सात मातांनी त्यांना मांडीवर घेऊन आनंदाश्रूंनी न्हाऊ घातले. त्यानंतर सर्व वस्तूंनी परिपूर्ण भरलेल्या व सर्व इच्छा तृप्त करणाऱ्या अशा आपल्या निरुपम मंदिरात श्रीकृष्ण गेले. त्या मंदिरात त्यांच्या सोळा हजार स्त्रियांसाठी सोळा हजार महाल बांधले होते. पुष्कळ दिवस प्रवास करून आलेल्या आपल्या पतीला पाहाताच त्या स्त्रियांना फारच आनंद झाला. त्यांची मुखे लाजेनें खाली

झाली. श्रीकृष्ण लौकर परत यावेत म्हणून व्रताचरण करणाऱ्या त्या स्त्रियांनी व्रतांचे साहित्य घेऊन आपल्या आसनावरून उठून श्रीकृष्णांचे स्वागत केले. त्या स्त्रियांनी श्रीकृष्णांना मनानें, नेत्रांनी, शरीरांनी आलिंगन दिले. त्यानंतर त्या फारच लज्जित झाल्या. डोळ्यांत जमलेले अश्रू आवरणे त्यांना कठीण झाले. त्या स्त्रियांना श्रीकृष्णांची चरण-कमळे नेहमीच नवीन वाटत. लक्ष्मी एवढी चंचल, पण तीसुद्धा श्रीकृष्णांच्या चरणकमलांना सोडीत नाही. श्रीकृष्णांनी त्या स्त्रियांच्या समवेत अनेक प्रकारच्या क्रीडा केल्या.

## परीक्षिताचा जन्म, धर्मराजाचा अश्वमेध यज्ञ

अश्वत्थाम्याच्या तेजस्वी ब्रह्मास्त्रानें उत्तरेचा गर्भ नष्ट झालेला असताही तो पुन्हा श्रीकृष्णांनी पांडवांची वंशवृद्धी व्हावी म्हणून जिवंत केला. संपत्ती, यज्ञ, लोक, पत्नी द्रौपदी, भीमादी भाऊ, जंबुद्वीपाचे राज्य, सर्वत्र पसरलेले यश; अशा सर्व गोष्टी युधिष्ठिरास अनुकूल होत्या. उत्तरेचा पराक्रमी गर्भ मातेच्या उदरात पीडित झाला होता. तेथे त्याला आंगठ्याएवढ्या सूक्ष्मधारी पुरुषाचे दर्शन झाले. त्याचे रूप निर्मळ होते. सोन्याचा देदीप्यमान मुकुट त्यानें धारण केला होता. तो निळसर वर्णाचा असून त्यानें विजेप्रमाणे चमकणारे वस्त्र नेसले होते. या सुंदर रूपाच्या श्रीकृष्णांना चार हात होते. कानांत सुवर्णाची कुंडले चमकत होती, त्यांचे डोळे लाल असून हातातील गदा शोभत होती. हा श्रेष्ठ पुरुष कोण असावा ? असा विचार उत्तरेच्या त्या गर्भस्थ बालकाच्या समोर आला. अश्वत्थाम्यानें सोडलेल्या ब्रह्मास्त्राचा डाग नष्ट करून श्रीकृष्ण गुप्त झाले.

त्यानंतर पंडुराजाच्या वंशाला धारण करणारा सर्वगुणसंपन्न असा हा मुलगा शुभ मुहूर्तावर जन्मास आला. उत्तरेस मुलगा झाल्याचे समजून धर्मराजाला मोठाच आनंद झाला. त्याने धौम्य, कृप आदी ब्राह्मणांना बोलावून पुण्याहवाचन आदी मंगलकृत्ये केली. त्यांच्याकडून शुभाशीर्वाद घेतले. मुलाचे जातक वर्तविले. त्यानें मोठाच पुत्रोत्सव साजरा केला. विद्वान ब्राह्मणांना बोलावून सोने, गायी, पृथ्वी, गावे,

हत्ती, घोडे इत्यादींची दानें दिली.

उत्तरेचा हा मुलगा म्हणजे निष्पाप असा पुरुवंशाचा अंकुरच होय. हा पुरुवंशांकुर अनिवार्य दैत्याच्या ब्रह्मास्त्रानें नष्ट झाला असता. पण परमेश्वराने त्याचे रक्षण केले. विष्णूंनी याचे रक्षण केले म्हणून उत्तरेच्या मुलाचे नाव विष्णुरात ठेवण्यात आले. या नवजात पुत्राचे अभीष्ट चिंतन करून ब्राह्मणांनी त्याचे भविष्य वर्तविले. हा विष्णुरात पुत्र इकडेतिकडे सूक्ष्मदृष्टीनें पाहू लागला. त्यामुळे त्याचे नाव परीक्षित असे झाले. शुक्लपक्षातील चंद्राप्रमाणे तो सर्व कलांनी युक्त होऊन दररोज वाढू लागला.

आपण आपल्या बंधुबांधवांना मारले, या दोषाचा परिहार करण्यासाठी एक अश्वमेधयज्ञ करावा, असे युधिष्ठिराच्या मनात आले. यज्ञाला लागणारे पुरेसे द्रव्य मात्र त्याच्या जवळ नव्हते. प्रजेवर कर बसवून ते उभे करावे हे त्याला बरे वाटेना. धर्मराजाच्या मनातील विचार ओळखून भीमादी चार बंधूंनी श्रीकृष्णांच्या आज्ञेवरून उत्तर दिशेला द्रव्य आणण्यासाठी प्रयाण केले. पुरून ठेवलेले द्रव्य ते घेऊन आले. ज्ञातिवधामुळे भेदरलेल्या धर्मराजाने सर्व प्रकारची यज्ञसामग्री सिद्ध केली. अश्वमेधयज्ञ करून त्यानें श्रीविष्णूंची पूजा केली. श्रीकृष्णांनी ब्राह्मणांकडून यज्ञ करविला. मित्रांच्या कल्याणासाठी ते हस्तिनापुरातच काही महिनें राहिले. त्यानंतर द्रौपदी व भीमादी बंधू यांनी संमती दिल्यावर श्रीकृष्ण अर्जुनाला बरोबर घेऊन द्वारकेस जाण्यासाठी निघाले.

## विदुरांचे हस्तिनापुरात आगमन

कौरव-पांडवांचे युद्ध चालू असताना विदुर तीर्थयात्रेस गेले होते. या तीर्थयात्रेच्या प्रसंगानें त्यांना मैत्रेयांचे दर्शन झाले. मैत्रेयांनी त्यांना आत्मज्ञानाचा उपदेश केला. आपण कृतकृत्य झालो असे विदुरांना वाटले. ज्ञानविषयक इच्छा तृप्त झाल्याने ते संतुष्ट वृत्तीनें हस्तिनापुरात आले. विदुरांची श्रीकृष्णांवरही फार चांगली भक्ती होती. या विदुरांचे सर्वांनी चांगले स्वागत केले. भीमादी चार भाऊ, धर्मराज, धृतराष्ट्र, सात्यकी, संजय, कृपाचार्य, कुंती, गांधारी, द्रौपदी, सुभद्रा, उत्तरा, कृपी

इत्यादींनी विदुरांचा सत्कार केला. त्यांना आलिंगन देऊन, नमस्कार करून स्वागत केले. पुष्कळ दिवसांनी विदुर दिसताच अनेकांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रू ओघळले. धर्मराजाने विदुरांना आसनावर बसवून त्यांची पूजा केली. त्यानें प्रथम त्यांना भोजन इत्यादी दिले. विसावा घेतल्यावर त्याने विदुरांजवळ अनेक प्रकारची चर्चा केली. धर्मराज विदुरांना म्हणाला,

'विदुरा, आपण आम्हांस आईसह पूर्वी विषापासून, अग्नीपासून आणि इतरही अनेक आपत्तींतून वाचविलं. आम्ही आपल्याच मायेच्या पंखाखाली वाढलो. आमचं स्मरण आपणांस होतं का? आपणांसारखे थोर भगवद्भक्तच हृदयातील विष्णूंच्या वास्तव्यामुळं तीर्थक्षेत्रांना पावित्र्य आणून देतात. विदुरा, आमचे मित्र, बंधुवर्ग, श्रीकृष्ण, यादव इत्यादींचं दर्शन झालं काय? हे सर्व द्वारकेत खुशाल आहेत ना?'

धर्मराजाच्या या प्रश्नास उत्तर देताना विदुरांनी यादववंशाचा नाश झाला हे तेवढे सांगितले नाही. बाकी ज्या गोष्टी त्यांनी पाहिल्या, अनुभविल्या त्या सर्व निवेदन केल्या. यदुवंशाच्या नाशाची हकीगत या पांडवांना सहन होणार नाही, त्यांचे दुःख पाहाण्याचा प्रसंग आपणांवर येऊ नये, या विचारानें दयाळू विदुर यासंबंधी काहीच बोलले नाहीत.

धर्मराजानें विदुरांचा देवाप्रमाणे सत्कार केला. विदुरांनीही वडील भावास-धृतराष्ट्रास काही कल्याणदायक मार्गांचा उपदेश केला. सर्वांची प्रीती संपादन करून ते काही काळ तेथे राहिले. त्यांना कुरु-वंशाचा इतिहास आठवला. मांडव्य ऋषींच्या शापामुळे यमधर्माला शंभर वर्षे शूद्रयोनीत जन्म घ्यावा लागला. एवढ्या अवधीत पापी लोकांना शिक्षा देण्याचे काम सूर्यानें केले. कुरुवंशाची वाढ करणारा नातू धर्मराजाला झाला. गृहस्थाश्रमाच्या विविध सुखांत निमग्न असलेल्या धर्मादिकांचा काळ सहजपणे निघून गेला. पुढील सर्व परिस्थितीचा अंदाज घेऊन विदुरांनी म्हटले,

'धृतराष्ट्रा, तू आता इथं राहू नकोस. इथून लौकरच बाहेर जा. लौकरच येणाऱ्या भयाकडं तू लक्ष दे. ज्याचा प्रतिकार होणार नाही असा अपरिहार्य काल आता येत आहे. कालाच्या तावडीत सापडून हे

प्राणी प्रिय अशा प्राणाला सोडून तत्काळ नाश पावतात. द्रव्यादी पदार्थंही नाश पावतील यात काय संशय ? युद्धात तुझे भीष्मादी पितर, भाऊ मित्र, दुर्योधनादी पुत्र मृत झाले. तुझं तारुण्य जाऊन तुला म्हातारपण आलं. तुझं शरीरही जरेनं ग्रासलं गेलं आहे. अशा स्थितीत तू दुसऱ्यांच्या घरी राहून उपजीविका करावीस ? प्रत्येकास जगण्याची इच्छा असतेच. पण भीमानं दिलेल्या अन्नाच्या गोळ्याचा तू एखाद्या कुत्र्याप्रमाणं स्वीकार करीत आहेस. ज्यांना तू अग्नी लावून मारण्याचा प्रयत्न केलास, ज्यांना तू विष घातलंस, ज्यांच्या पत्नीचा तू अपमान केलास, ज्यांच्या राज्याचा अपहार केलास, ज्याचं द्रव्य तू लुबाडलंस, त्यांनी दिलेल्या अन्नावर तू जगतोस तरी कसा ? धृतराष्ट्रा, अशा शोचनीय स्थितीत जगणारा तुझा देह जुन्या वस्त्राप्रमाणं क्षीण होत चालला आहे. तू आता बांधवांना न कळेल अशा रीतीनं उत्तर दिशेला निघून जावंस. या पुढच्या काळात पुरुषांच्या गुणांचा ऱ्हासच होणार आहे.'

विदुरांच्या या उपदेशाने प्रेरित होऊन आंधळा धृतराष्ट्र आपल्या बांधवांच्या प्रेमपाशाला सोडून एकदम घरातून बाहेर पडला. महापतिव्रता गांधारीही धृतराष्ट्राबरोबर हिमालयात जाण्यासाठी तत्पर झाली. युधिष्ठिराने सूर्योपासना उरकून अग्नीला हविर्भाग अर्पण केला. ब्राह्मणांना तीळ, गायी, पृथ्वी, सुवर्ण यांचे दान केले. त्यानंतर वडिलांना नमस्कार करण्यासाठी तो धृतराष्ट्राच्या घरी गेला. तेथे त्याला विदुर, धृतराष्ट्र, गांधारी ही दिसली नाहीत. त्याला फारच दुःख झाले. तेथे असलेल्या संजयास त्याने विचारले,

'संजया, म्हातारा, आंधळा आमचा धृतराष्ट्र कुठं गेला रे ? पुत्रवधामुळं दुःखी झालेली आई गांधारी कुठं गेली ? त्यानं गांधारीसह गंगेत देहत्याग तर केला नाही ? आमचा काका धृतराष्ट्र व काकू गांधारी ही गेली तरी कुठं ?'

'कुरुकुलश्रेष्ठा धर्मराजा', व्यथित चित्ताने संजय म्हणाला, 'धृतराष्ट्र, गांधारी व विदुर यांच्या मनातील अभिप्राय मला माहीत नाही. धर्मराजा, थोर मनाच्या या तिघांनी मलाही फसविलं.'

इतक्यात तुंबुरूसह नारदऋषी धर्मराजाजवळ आले. धर्मराजानें

त्यांना नमस्कार केला. त्यांचे पूजन करून विचारले, 'सर्वैश्वर्यसंपन्न नारदा, वडील धृतराष्ट्र, विदुर कुठं गेले ? दु:खित अशी पुण्यशीला गांधारी कुठं आहे ?'

'धर्मराजा, तू कुणाबद्दलच शोक करू नकोस. कारण हे सर्व जग परमेश्वराच्या अधीन आहे. अज्ञानजन्य प्रेम कुणाबद्दलच तू धारण करू नकोस. श्रीकृष्णानंही दैत्यांचा नाश करण्याचं कार्य संपविलं आहे. जे काही उरलं आहे ते संपण्याची ते वाट पाहात आहेत. ते आहेत तोपर्यंत तुम्हीही वाट पाहावी. विदुर, गांधारी यांच्यासह धृतराष्ट्र हिमालय-पर्वताच्या दक्षिण बाजूच्या रस्त्यानं पुढं असणाऱ्या ऋषींच्या आश्रमाकडं गेला. तो शांत अंत:करणाचा धृतराष्ट्र सकाळ-संध्याकाळ सप्तस्रोता गंगा नदीत स्नान करून, यथाविधि अग्निपूजा करून केवळ पाण्यावर राहिला आहे. आसनविधी करून, प्राणायाम करून त्यानं सर्व इंद्रियं आवरून धरली आहेत. त्यानं स्वत:च्या अंत:करणाला बुद्धीत, बुद्धीला जीवात्म्यात व जीवात्म्यास ब्रह्मात लीन केलं आहे. त्यानं सत्त्व, रज, तम या तीन गुणांचा, लोभमोहादी फलांचा, भक्ष्यभोज्यादी सर्व आहारांचा त्याग करून तो एखाद्या स्तंभाप्रमाणे निश्चल बनून राहिला आहे. धर्मराजा, आता तू त्याच्या या सत्कृत्यात विघ्न उत्पन्न करू नकोस. आजपासून पाचव्या दिवशी तो स्वत:च्या शरीराचा त्याग करील. त्याचं शरीर भस्म होईल. धृतराष्ट्राची पत्नी गांधारीही पतीला अनुसरून अग्नीत प्रवेश करील. हा सर्व प्रकार पाहून विदुर तीर्थांचं सेवन करण्यासाठी दुसरीकडं निघून जाईल.'

हा सर्व वृत्तान्त सांगून तुंबुरूसह नारद स्वर्गात निघून गेले.

## यादवांचा, श्रीकृष्णांचा, पांडवांचा शेवट

आपल्या बांधवांची भेट घ्यावी, श्रीकृष्णांचे चरित्र पाहावे म्हणून अर्जुन द्वारकेस जाण्यासाठी निघाला. त्याला कित्येक महिने झाले तरी तो काही परत आला नाही. युधिष्ठिराला भयंकर दुश्चिन्हे दिसू लागली. ऋतूंचे धर्म बदलले. काळाचे रूप भयंकर झाले. माणसे रागीट, लोभी, असत्यप्रिय, पापी वर्तनाची झाली. त्यांचे व्यवहार कपटी झाले. मित्र

मित्रांना फसवू लागले. आईबाप, स्नेहीस्नेही, भाऊभाऊ, पतिपत्नी यांच्यांत कलह होऊ लागले. अशा अवस्थेत धर्मराजाने एकदा भीमाला विचारले,

'बांधवाची भेट घेण्यासाठी, श्रीकृष्णांचं कुशल विचारण्यासाठी आपण अर्जुनाला द्वारकेस पाठविलं, पण भीमा, आज सात महिने झाले. तो तुझा धाकटा बंधू का बरं परत आला नाही ? त्याचं कारण काही मला समजत नाही. अथवा हे शरीर सोडून द्यावं असा तर विचार श्रीकृष्णांच्या मनात आला नसेल ? नारद तसं म्हणत होते. या श्रीकृष्णांच्या साह्यानंच आपणास संपत्ती, राज्य, स्त्रिया, प्राण, कुल व संतती यांची प्राप्ती झाली. त्यांच्याच कृपेनं आम्ही शत्रूवर विजय मिळविला. पण भीमा, ही दुश्चिन्हं पाहा. यांनी मी गांगरून गेलो आहे. लौकरच काहीतरी अनर्थ ओढवणार आहे. भीमा, माझ्या मांड्या, माझे डोळे व दंड यांना स्फुरण येत आहे. माझ्या हृदयाला कंप सुटला आहे. ही कोल्ही, ही कुत्री पाहा कशी रडत आहेत. गायी वगैरे पवित्र पशू मला डावे घालून जात आहेत. गर्दभादी अपवित्र पशू मला उजवे घालून जातात. हे माझे घोडे रडत असताना मला दिसतात. यमाचा दूतच असा हा पारवा, हे घुबड, हा कावळा, यांनी माझ्या हृदयाचा थरकाप उडविला आहे. भीमा, साऱ्या दिशा धुरानं भरल्या आहेत. चंद्र-सूर्यांना खळी पडली आहेत. पृथ्वी तर पर्वतांसह कंपित होत आहे. मेघांचा गडगडाट होत आहे. मोठा विद्युत्पातही झाला आहे.

'तीव्र असा वारा अंगाला झोंबत आहे. सर्वत्र धूळ उडाल्यामुळं अंधार पसरला आहे. मेघ तर सर्वत्र अमंगल अशा रक्ताचाच वर्षाव करीत आहेत. सूर्य निस्तेज दिसतो आहे. आकाशात ग्रहांचे परस्पर युद्ध सुरू आहे. सारं अंतराळच पेटल्यासारखं वाटत आहे. नद्या, नद, सरोवर खवळली आहेत. अग्नी तुपानंही पेटत नाही. काळाच्या मनात काय आहे कुणास माहीत ? वासरं आपल्या मातांच्या स्तनांतील दूध पीत नाहीत. गायी दूध देईनाशा झाल्यात. त्यांची मुखं अश्रूंनी भरली आहेत. बैलही कष्टी दिसतात. देश, गावं, नगरं, उद्यानं, खाणी, आश्रम; सारं काही शोभाहीन झालं आहे. कोणत्या संकटांची ही सूचना आहे ? —मला तर

असं वाटतंय की श्रीकृष्णांच्या पायांना अंतरून ही पृथ्वी सौभाग्यहीन बनली आहे.'

इतका शोक धर्मराज करीत असतानाच अर्जुन द्वारकेहून आला. त्यानें धर्मराजांच्या चरणांना वंदन केले. त्याचे मुख पूर्वीसारखे निर्भय दिसले नाही. मान खाली खालून तो आपल्या नेत्रकमलांतून अश्रू गाळू लागला. ते पाहून धर्मराजाच्या मनास चरका बसला. त्यानें अर्जुनास विचारले,

'अर्जुना, मधू, भोज, दशार्ह, अर्ह, सात्वत, अंधक, वृष्णी इत्यादी कुळांतील आपले सर्व बांधव द्वारकेत कुशल आहेत ना ? आपले आजोबा शूरसेन सुखरूप आहेत ना ? वसुदेवमामा, त्यांचे कनिष्ठ बंधू खुशाल आहेत ना ? देवकी आदी करून वसुदेवांच्या सात स्त्रिया, त्यांचे पुत्र, त्यांच्या सुना, सर्व ठीक आहेत ना ? उग्रसेन जिवंत आहे ना ? अक्रूर, जयन्त, गद, सारण, शत्रुजित इत्यादी सुखरूप आहेत ना ? यादवांचा पती भगवान बलराम याचं कुशल आहे ना ? प्रद्युम्न ठीक आहे ना ? अनिरुद्ध आनंदात असेल. सुषेण, चारुदेष्ण, सांब इत्यादी श्रीकृष्णपुत्र खुशाल आहेत ना ? आमच्या खुशालीचं स्मरण त्यांना दिलंस ना ? आणि अर्जुना, ब्राह्मणांचं कल्याण करणारा, भक्तांवर प्रेम करणारा, षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण आपल्या सुधर्मा नावाच्या सभेत सुखरूप आहेत ना ? अर्जुना, तुझी प्रकृती ठीक आहे ना? तुझ्या मुखावरचं तेज नष्ट झालेलं आहे. तिथं तू फार दिवस राहिलास. कुणी तुझा अपमान तर केला नाही ? तुला कुणी अशुभ आणि कठोर बोललं नाही ना ? अर्जुना, गमन करण्यास अयोग्य अशा स्त्रीशी तू गमन केलं नाहीस ना? नीचांनी वाटेत तुझा पराभव तर केला नाही ? कोणतं अनुचित असं कर्म तुझ्याकडून घडलं ?'

अर्जुन कृष्णांच्या वियोगानें फारच कृश झाला होता. कृष्णांना तो अत्यंत जिवलग मानीत होता. कृष्णविरहानें त्याची मूर्ती सुकून गेली होती. धर्मराजाने अनेक प्रश्न विचारले, पण त्याच्या मुखातून काहीच उत्तर निघाले नाही. मोठ्या प्रयत्नानें त्याने शोक आवरला व आपले डोळे पुसले. अत्यंत व्याकुळलेल्या अवस्थेत तो म्हणाला,

'धर्मराजा, बंधूप्रमाणे असणाऱ्या श्रीकृष्णांनी मला चांगलंच फसविलं. त्यांनी माझ्या पराक्रमाचं हरण केलं. श्रीकृष्ण निघून गेल्यामुळे मला हे सर्व जग आता मेल्यासारखं दिसू लागलं आहे. त्यांच्याच कृपेनं मी स्वयंवरात सर्व गर्विष्ट राजांचं तेज हरण केलं. धनुष्य सज्ज करून मत्स्याचा वेध घेतला. द्रौपदीची प्राप्ती करून घेतली. श्रीकृष्णांच्याच सान्निध्यामुळं मी इंद्रादी देवांना जिकलं. अग्नीला खांडव वन दिलं. त्यांच्याच कृपेनं राजसूययज्ञात मयासुरानं निर्माण केलेली सभा मला प्राप्त झाली. त्यांच्याच कृपेनं भीमानं जरासंधाला मारलं, त्यांच्याच कृपेनं द्रौपदीची अब्रू वाचली. दुष्टांच्या स्त्रिया पतिवधामुळं विमुक्तकेशा झाल्या. त्यांच्या कृपेनं आपली शेकडो संकटं टळली. पण त्या श्रीकृष्णांनी मला आज फसविलं. मी त्यांच्याच बळावर अश्वत्थाम्याच्या मस्तकातून तेजस्वी मणी काढून घेतला. त्यांच्या बळानं भीष्म, कर्ण, अश्वत्थामा, सुशर्मा, शल्य, जयद्रथ, बल्हीक इत्यादी वीरांची अमोघ अस्त्रं क्षीण ठरली. धर्मराजा, श्रीकृष्ण थट्टेनं मला 'कुंतीपुत्रा अर्जुना, मित्रा, सख्या कुरुनंदना' असं म्हणून भाषण करायचा. त्यांचं आज स्मरण होऊन अंतःकरण दुःखानं क्षुब्ध होत आहे. निजताना, बसताना, बोलताना, भोजन करताना त्यांनीच माझे सर्व अपराध पोटात घातले.

'धर्मराजा, माझा परमप्रिय पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्ण यांच्या वियोगात असताना मी त्यांच्या स्त्रियांचं रक्षण करीत असता त्या दुष्ट गोपांनी माझा एखाद्या निर्बल स्त्रीप्रमाणं पाडाव केला. माझं धनुष्य, माझे बाण, तोच रथ, तेच घोडे, त्याच रथातील अर्जुन तोच; पण श्रीकृष्णांच्या अभावामुळं ते सर्व एका क्षणात व्यर्थ झालं. धर्मराज, आपण द्वारकेतील आप्तेष्टांच्या खुशालीबद्दल विचारलंत. पण ते सर्व यादव ब्राह्मणाच्या शापानं मोहित झाले व वारुणी नावाच्या मद्यानं धुंद बनून, एकमेकांची ओळख न ठेवता एकमेकांवर मुष्टिप्रहार करून त्यांनी एकमेकांचा वध केला. अवघे चारपाचच जिवंत राहिले. ही त्या भगवंतांचीच लीला. श्रीकृष्णांनीच प्रथम बलाढ्य अशा मोठ्या यादवांकडून इतर दुष्टांचा नाश केला. व नंतर यादवांकडून यादवांचाच नाश करून पृथ्वीचा भार उतरविला.'

श्रीकृष्णांचे प्रयाण व यादवांचा नाश ऐकून धर्मराजाने आपले मन स्थिर केले व तो स्वर्गाच्या वाटेस लागला. कुंतीने ही वार्ता ऐकून आपले मन श्रीकृष्णांपाशी स्थिर केले व ती संसारातून विरक्त झाली. आपल्या राज्यात कलीचा प्रभाव वाढत आहे, लोभ, असत्य, कपट, हिंसा यांनी सर्व पृथ्वी व्यापून गेली आहे असे पाहून धर्मराजाने स्वर्गात निघून जाण्याचा विचार केला. त्याने आपल्या नातवास, परीक्षितास समुद्रवलयांकित पृथ्वीचा राजा म्हणून हस्तिनापुरात अभिषेक केला. अनिरुद्धाच्या वज्रनामक पुत्राला त्याने मथुरेचा राजा केले. त्याने स्वतः प्राजापात्य नावाची इष्टी केली. रेशमी वस्त्रे, सुवर्णाचे अलंकार इत्यादी वस्तूंचा त्याने त्याग केला. सर्व सांसारिक पाश सोडून दिले. एखाद्या मुनीप्रमाणे त्याने मौनव्रत धारण केले. त्याने चिंध्या पांघरून खाण्यापिण्याचा त्याग केला. केस मोकळे सोडून तो एखाद्या निर्जीव, उन्मत्त पिसाटाप्रमाणे वागू लागला,

इकडे तिकडे न पाहता तो आपले पूर्वज ज्या दिशेने गेले त्या उत्तर दिशेकडे हस्तिनापुराहून निघाला. भीमादी चार भाऊही त्याच्या पाठोपाठ गेले. श्रीकृष्णांचे चरणकमल त्यांनी आपल्या हृदयात साठवले. पांडवांनी नारायणांच्या पदकमली आपली बुद्धी स्थिर केली. त्यांनी निष्कलंक अशा पदाची प्राप्ती करून घेतली. विदुरांनीही आपला देह प्रभासक्षेत्री विसर्जित केला. द्रौपदीही भगवत्पदाला गेली.

## वृषभरूपी धर्मास, गोरूपी पृथ्वीस परीक्षिताचे आश्वासन

पांडवांच्या स्वर्गावरोहणानंतर सर्वगुणसंपन्न परीक्षित राजाने ब्राह्मणांच्या उपदेशानुसार राज्य केले. त्याने आपला मामा उत्तर याच्या इरावती नावाच्या मुलीशी विवाह केला. तिच्यापासून त्याला जनमेजय आदी चार पुत्र झाले. परीक्षिताने कृपाचार्यांना गुरू करून गंगेच्या काठी तीन अश्वमेधयज्ञ केले. ब्राह्मणांना खूप दक्षिणा दिली. कलीचा प्रभाव वाढत आहे असे पाहून युद्धकुशल परीक्षिताने हातात धनुष्य धारण केले. श्यामवर्णाच्या घोड्यांनी सज्ज झालेल्या रथात तो बसला. हत्ती, घोडे, रथ व पायदळ अशा चतुरंग सेनेसह तो नगराच्या बाहेर पडला.

भद्राश्व, केतुमाल, भारत, उत्तरकुरू, किंपुरुष आदी खंडांना जिंकून त्यानें कर वसूल केला. श्रीकृष्णांनी आपल्या कुलांवर केलेले प्रेम आठवून त्याने त्यांच्या चरणकमलांच्या भक्तीस सुरुवात केली.

त्यांच्या अगदी जवळच्या प्रवासात एकदा एक आश्चर्यकारक गोष्ट घडली. एका पायावर लंगडत चालणारा धर्म, निस्तेज व डोळ्यांतून आसवे गाळणारी गाय पाहून तिला तो म्हणाला,

'कल्याणी, तू खुशाल आहेस ना ? तुझं मुख असं म्लान व निस्तेज का ? गोमाते, तुला कोणती चिंता वाटते ? तू कशाचा शोक करतेस ? माझे तीन पाय नष्ट झाले. मी एकाच पायानं चालतो आहे, म्हणून तर तुला दुःख होत नाही ना ? शूद्रलोक आपला उपभोग वाटेल तसा घेतील अशा धास्तीनं तू शोक करीत नाहीस ना ? यज्ञयागादी कर्मं बंद पडतील. देवांना हविर्भाग मिळणार नाही. ते उपाशी राहातील, असं समजून तू चिंतेत नाहीस ना ? आता इथून पुढं इंद्र पाऊस पाडणार नाही, प्रजेचे हाल होतील म्हणून का तू कष्टी आहेस ?

'भूमाते, स्त्रियांचं नीट रक्षण होणार नाही. लहान मुलांना राक्षसादिकांकडून त्रास होईल. ब्राह्मण वेदवाणीची दुर्दशा करतील. म्हणून का तू दुःखी आहेस ? क्षत्रिय राजे अधम होतील. राज्यांचा नाश होईल, लोक खाणं-पिणं, उत्तम वस्त्रं वापरणं, सुगंधी उटचा लावणं, स्नान करणं, स्त्रीसंभोग इत्यादींत दंग होतील, याचं दुःख तुला होतं ? तुला दुष्ट राजांचा भार सहन होत नाही का ? मोक्षसुखालाही तुच्छ लेखणाऱ्या कृष्णगुणांचं तू स्मरण करून त्यांच्या विरहानं कष्टी आहेस ? बलाढ्य काळानं तुझं वैभव हरण केलं, म्हणून तू अशी कृश झालीस काय ?'

'धर्मा, तू मला जे विचारलंस ते सर्व तुला माहीत आहेच. धर्मा, काय रे तुझी ही अवस्था ? सत्य, शुद्धी, कृपा, सहनशीलता, सर्वसंगपरित्याग, आनंद, सरलता, शांती, इंद्रियनिग्रह, तपश्चर्या, समबुद्धी, क्रोधराहित्य, उदासीनपणा, शास्त्रश्रवण, आत्मज्ञान, वैराग्य, विपुलता, पराक्रम, तेज, सामर्थ्य, आठवण, स्वतंत्रता, नैपुण्य, सौंदर्य, धैर्य, मृदुता, प्रौढत्व, नम्रता, स्वभाव, मानसिक शक्ती, बौद्धिक शक्ती, गंभीरपणा,

स्थिरत्व, श्रद्धा, कीर्ती, पूज्यता, अहंकाररहित्य; अशा गुणांचे वसतिस्थान जे कृष्ण त्यांनी या लोकांचा त्याग केला, दुष्ट कलीची दृष्टी या जगतावर वळली म्हणून मी सांप्रत शोक करीत आहे. मी स्वत:बद्दल, तुझ्याबद्दल, देवराज इंद्राबद्दल, पितर, ऋषी, साधू, ब्राह्मणादी चारही वर्ण, ब्रह्मचर्यादी चारही आश्रम, या सर्वांबद्दल शोक करीत आहे.

'धर्मा, प्रेमकटाक्ष, रमणीय हास्य, मधुर भाषण, यांच्या योगानं श्रीकृष्णांनी मधुकुलातील स्त्रियांचा अभिमान नाहीसा केला होता, इतर विषयांच्या ठिकाणी त्यांचं चित्त अस्थिर करून टाकलं, त्यांच्या चरणांचे ठसे माझ्या अंगावर उमटताच, रोमांच उभे राहतात अशा त्या पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्णांचा वियोग कोणत्या स्त्रीला सहन होईल ?'

असा हा संवाद भूमाता व धर्म यांचा चालला असताना राजर्षी परीक्षित पूर्ववाहिनी सरस्वतीच्या काठी येऊन पोचला. तेथे एक राजचिन्हे धारण केलेला शूद्र हातात दांडके घेऊन अनाथासारख्या असलेल्या गाय-बैलांच्या जोडीस मारीत आहे असे परीक्षिताने पाहिले. तो बैल भीतीने कापत कापत मुतत होता, तशा स्थितीत तो शूद्र त्याला लाथा मारीत होता. ती कामधेनू वत्सरहित व कृश असून दीनपणाने डोळ्यांतून अश्रू गाळीत, खायला कुठे गवत मिळेल काय म्हणून पाहात होती. तो शूद्र तिलाही आपल्या पायाने एकसारखा मारीत होता.

अशा वेळी परीक्षित राजा सुवर्णाच्या रथात बसला होता. त्याने हा प्रकार पाहून आपल्या धनुष्यास दोरी चढवली व मेघासारख्या गंभीर शब्दांनी त्याने शूद्रास विचारले,

'मी या लोकांचं रक्षण करीत असताना तू दुर्बलांना असं ताडन करतोस ? तू आहेस तरी कोण ? नाटकी माणसाप्रमाणं तुझा वेश तर राजाचा आहे. पण कृती तर शूद्राची दिसते, तू कोण आहेस ? श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनासह निजधामाला गेले हे पाहून तू निरपराध्यांना असं छळीत आहेस. या अपराधानं तू खचितच वधास पात्र झाला आहेस.'

त्यानंतर परीक्षिताने धर्माकडे पाहून म्हटले, 'तू कमलतंतूप्रमाणे शुभ्रवर्णाचा आहेस. तुझे तीन पाय नष्ट होऊन तू एकाच पायानं

भा...४

चालतोस. अशा स्थितीत तू बैलाच्या रूपानं वावरतोस हे पाहून मला मोठा खेद झाला. पण कामधेनुपुत्रा, तू शोक करू नकोस. शूद्रापासून प्राप्त झालेलं तुझं भय मी आताच दूर करतो. गोमाते, तूही रडू नकोस. मी दुष्टांचं पारिपत्य करीन. तुझं कल्याण असो. गोमाते, ज्या राजाच्या देशात दुष्टांकडून सर्व प्रजेस उपद्रव पोचतो, त्या उन्मत्त राजाचं यश, आयुष्य, ऐश्वर्य, मोक्षसाधन; यांचा नाश होतो. गांजलेल्यांचं दुःख निवारण करणं हाच राजाचा श्रेष्ठ धर्म आहे. प्राण्यांना पीडा देणाऱ्या या दुष्ट व पाप्याचा मी वध करतो.

यस्य राष्ट्रे प्रजाः सर्वास्त्रस्यन्ते साध्व्यसाधुभिः ।
तस्य मत्तस्य नश्यन्ति कीर्तिरायुर्भगो गतिः ।
एष राज्ञां परो धर्मो ह्यार्तानामार्तिनिग्रहः ।
अत एनं वधिष्यामि भूतद्रुहमसत्तमम् ।।

'कामधेनुपुत्रा, वास्तविक तुला चार पाय होते. तुझे तीन पाय कुणी तोडले ? वृषभा, निरपराधी व सदाचरणी अशा तुझं कल्याण असो. तुझ्या अंगास असं विरूप करून पांडवांच्या कीर्तीला कलंक लावणारा आहे तरी कोण ?'

'राजा, पांडवकुलात उत्पन्न झालेल्या तुम्ही पीडितांना असं अभय द्यावं हे उचित आहे. अशा गुणांनीच भगवान श्रीकृष्णही पांडवांची कामं दूताप्रमाणं करायचे. पुरुषश्रेष्ठा, आम्हांला कोण पीडा देतात हेच कळत नाही. सुख-दुःखांच्या कल्पना, दैव, कर्म, निसर्ग, परमेश्वर; अशांपैकी कोण दुःख देणारा आहे याचा राजा, तूच विचार कर.'

'धर्म जाणणाऱ्या वृषभा, वृषभाचं रूप घेतलेला तू धर्मच आहेस. तपश्चर्या, शुद्धता, दया, सत्यभाषण हे तुझे पाय होत. गर्व, विषयासक्ती, उन्मत्तपणा या दुर्गुणांनी तुझे तीन पाय मोडून टाकलेले दिसतात. धर्मा, आता उरलेला हा तुझा चौथा पाय सत्य आहे. त्याच्याच बळावर तू अजून जिवंत आहेस. त्यालाही हा कली मोडू पाहात आहे. श्रीकृष्णांनी या भूमीचा त्याग केल्यामुळं ती आता एखाद्या विधवेप्रमाणं दिसते. ब्राह्मणांचा नाश करू पाहाणारे शूद्र आता आपला उपभोग घेतील या

भयानं ही पृथ्वी डोळ्यांतून अश्रू गाळीत आहे.'

धर्म व पृथ्वी यांचे असे सांत्वन करून परीक्षितानें आपली तलवार उपसली व कलीला मारण्यासाठी तो प्रवृत्त झाला. तेव्हा कलीनें राज-चिन्हे टाकून दिली व भीतीनें घाबरून त्यानें परीक्षिताच्या पायांना वंदन केले. तेव्हा राजा त्याला हसत म्हणाला,

'आम्ही अर्जुनाची कीर्ती गातो. तुला आता भिण्याचं कारण नाही. पण यापुढं तू आता माझ्या राज्यात राहू नकोस. कारण तू अधर्माचा मोठा भोक्ता आहेस. राजांच्या शरीरांत तू राहिल्यामुळंच लोभ, खोटेपणा, चोरी, क्षूद्रपणा, पाप, अवदशा, कपट, भांडण, दंभ या सर्व अधार्मिक गोष्टी उत्पन्न झाल्या. म्हणून अधर्माला उत्तेजन देणाऱ्या कली, तू सत्यप्रेमी अशा या ब्रह्मावर्तक्षेत्रात मुळीच राहू नकोस. कारण इथं याज्ञिक नाना प्रकारचे यज्ञ करून श्रीकृष्णाचं पूजन करीत असतात.'

परीक्षित राजाचे बोलणे ऐकून कली भीतीने कापू लागला. दंडधारी यमाप्रमाणे शिक्षा करू पाहाणाऱ्या राजाला तो म्हणाला, 'सार्वभौम परीक्षित राजा, तुझ्या आज्ञेनं मी कुठंही राहिलो तरी तिथं तू मला हातांत धनुष्यबाण धारण केलेला दिसणार. राजा, धार्मिक पुरुषांत तू श्रेष्ठ आहेस. तुझ्या आज्ञेनं मला राहाता येईल असं एखादं स्थान सांग.'

'जुगार खेळणं, दारू पिणं, स्त्रियांशी क्षूद्र व्यवहार करणं, हिंसा; ही चार दुष्ट कृत्यं जिथं असतील तिथं तू राहा.' कलीनें प्रार्थना केल्यानंतर राजाने त्याला सोने, मिथ्या भाषण, उन्माद, इच्छा, हिंसादी दोष, शत्रुत्व इत्यादी गोष्टीही दिल्या. अधर्माचा उगम असा तो कली, या पाच ठिकाणी राहू लागला.

परीक्षित राजाने वृषभरूपी धर्मास तपश्चर्या, शुद्धता व दया हे तीन पाय प्राप्त करून दिले. गोरूपी पृथ्वीसही त्यानें आश्वासन देऊन तिचा उत्कर्ष केला.

## राजा परीक्षिताला शाप

अश्वत्थाम्याने आपल्या अस्त्राने परीक्षिताला त्रास दिला तरी श्रीकृष्णांच्या अद्‌भुत सामर्थ्याने तो जिवंत राहिला. ब्राह्मणाच्या कोपाने प्रेरित झालेल्या तक्षकनागाने त्याच्यावर महासंकट आणले तरी त्याचे चित्त व्याकुळ झाले नाही. व्यासपुत्र शुकाचार्य यांचा तो शिष्य झाला अभिमन्युपुत्र महापराक्रमी परीक्षित पृथ्वीचा सार्वभौम राजा होता तोपर्यंत कलीचा प्रवेश सर्वत्र झाला तरी त्याच्या राज्यात मात्र तो शिरला नाही.

ज्या दिवशी, ज्या क्षणी भगवान श्रीकृष्णांनी या पृथ्वीचा त्याग केला त्याच दिवशी त्याच क्षणी तेथे अधर्माचा उगम होऊन कलीची सुरुवात झाली. परीक्षित राजा हा फार थोर बुद्धीचा, मोठा भगवद्‌भक्त होता. या राजाचे चरित्र अतिशय पवित्र असून शेवट मात्र अद्‌भुत आहे.

हा परीक्षित राजा एके दिवशी धनुष्यबाण सज्ज करून मृगया करीत असताना हरिणांच्या मागे लागून अतिशय थकला. त्याला फार तहान लागली. जवळपास पाणी कोठेच नव्हते. म्हणून तो एका आश्रमात शिरला. तेथे शांतपणाने डोळे मिटून एक ऋषी ध्यानस्थ बसले होते. इंद्रियांचे दमन करून त्यांनी प्राणांचा अवरोध केला होता. मन व बुद्धी यांचे नियमन केले होते. त्यांचे शरीर विस्कळित झालेल्या जटांनी आच्छादून गेले होते. त्यांनी रूरूनामक हरिणाचे कातडे पांघरले होते. असे हे ऋषी पाहून परीक्षितराजाने त्यांना पाणी प्यायला मागितले.

परीक्षिताला गवताचे, भूमीचे, आसन मिळाले नाही. त्याचा कोणत्याही प्रकारचा सत्कार झाला नाही. गोड भाषण ऐकायला मिळाले नाही. तेव्हा त्याला आपला अपमान झाला असे वाटले. त्याला राग आला. भूक व तहान यांनी व्याकुळ झालेल्या त्या राजाला ऋषीसंबंधी मोठा मत्सर वाटला. क्रोधाच्या भरात त्याने आश्रमातून बाहेर येता येता एक मेलेला सर्प त्या ऋषींच्या गळयात आपल्या धनुष्याच्या टोकाने घातला. व तो आपल्या नगरास निघून गेला. त्याला त्या ऋषींचे सर्व ढोंग

वाटले. राजा निघून गेल्यावर त्या ऋषींच्या पुत्राने राजाने केलेली खोडी पाहिली. ती त्याच्या ध्यानात येताच तो म्हणाला, 'राजा, हा केवढा अधर्म ! श्रीकृष्ण निजधामास गेल्यामुळं हा राजा एवढा उद्दाम झाला. याला मीच आता शासन करीन.' त्याचे डोळे रागाने लाल झाले होते. त्याने इतर ऋषिबालकांना हाताशी घेऊन कौशिकी नदीचे उदक हातात घेतले व वज्राप्रमाणे तीक्ष्ण अशा अपशब्दांचा वापर केला. तो म्हणाला, 'धर्ममर्यादेचं उल्लंघन करून स्वतःच्या कुळाला कलंक लावणाऱ्या व माझ्या पित्याचा द्रोह करणाऱ्या त्या राजास आजपासून सातव्या दिवशी मी प्रेरणा केलेला तक्षक नावाचा नाग दंश करील.'

त्यानंतर तो मुनिपुत्र आश्रमात गेला. आपल्या पित्याच्या गळ्यात मृत सर्प लोंबकळत असलेला पाहून त्यास अतिशय दुःख होऊन तो मोठ्याने रडू लागला. त्याचा विलाप ऐकून अंगिरसकुलोत्पन्न ऋषींनी आपल्या डोळ्यांची उघडझाप केली. त्यांना आपल्या खांद्यावर मृत सर्प दिसला. तो त्यांनी काढून टाकला व आपल्या पुत्रास म्हटले,

'बाळा, तू का रडतोस ? तुला कुणी मारलं ? कठोर शब्द बोललं कुणी ?'

मुलाने सर्व वृत्तांत आपल्या पित्यास सांगितला. परीक्षित राजाला आपल्या मुलाने शाप दिला हे ऐकून मुनींना अतिशय वाईट वाटले. ते त्याला म्हणाले,

'अरे, किती वेडा तू ! तुझ्या हातून केवढं पाप घडलं ! एवढ्याशा लहान अपराधासाठी केवढा मोठा दंड केलास तू ! पुत्रा, तुझी बुद्धी फारच अपक्व आहे. श्रेष्ठ प्रकारच्या राजाला तू सामान्य मानलंस. शत्रूंना असह्य असं त्याचं तेज आहे. त्यानंच प्रजेचं रक्षण होतं. ती निर्भय बनते. सर्व सुखं प्राप्त होतात. पुत्रा, राजा म्हणजे चक्रपाणी विष्णूच होत. तो जर पृथ्वीवरून नाहीसा होईल तर लोकांचं रक्षण कसं होणार ? सर्वत्र चोरांचा सुळसुळाट होईल ना. रक्षक नसलेल्या मेंढ्यांच्या कळपाप्रमाणं समाजाचा नाश होईल. आता सर्वत्र चोरांचा उपद्रव होईल. लोक एकमेकांत मारामारी करतील. अपशब्द बोलतील. स्त्रिया व द्रव्य यांचं अपहरण होईल. चार वर्ण, चार आश्रम

तीन वेद यांवर आधारलेला धर्म नष्ट होईल. मनुष्यांचं मन द्रव्यप्राप्ती, विषयभोग यांतच दंग होईल. कुत्र्यां-वानरांप्रमाणे मनुष्यांतही वर्णांचं मिश्रण होईल.

'अरे मुला, तो सार्वभौम राजा धर्माचं रक्षण करणारा आहे. तो मोठा कीर्तिमान व श्रीकृष्णांचा भक्त आहे. त्यानें कित्येक अश्वमेधयज्ञ केले आहेत. क्षुधा, तृषा, श्रम यांनी व्याकुळ बनून तो बिचारा इथं आला होता. आपल्या शापाला तो मुळीच पात्र नाही. या अल्प बुद्धीच्या बालकाकडून निष्पाप अशा भक्ताचा अपराध घडला. तो परमेश्वर आम्हांस क्षमा करील.'

मुलानें केलेल्या अपराधाचा मोठाच पश्चात्ताप ऋषींना झाला. स्वत:चा अवमान राजानें केला तरी त्याने तो मनातही आणला नाही. सत्पुरुष इतरांच्या त्रासानें कधीच दुःखी होत नाहीत. सुख झाले तरी आनंदित होत नाहीत.

## परीक्षितास पश्चात्ताप, शुकांकडून ज्ञानोपदेश

राजा परीक्षितासही आपल्या हातून घडलेल्या कृत्यानें पश्चात्ताप झाला. त्याचे अंत:करण खिन्न झाले. तो वारंवार मनाशी म्हणू लागला, 'अहो, ज्याच्यात गूढ असं ब्रह्मतेज निवास करतं त्या निरपराधी ब्राह्मणाचा मी एखाद्या नीच माणसासारखा अपराध केला. आता माझ्यावर फारच मोठं अरिष्ट ओढवणार. आता अशी गोष्ट मी पुन्हा करणार नाही. पण झालेल्या पापामुळं एखादं संकट येणारच. त्या क्रोधाविष्ट ब्राह्मणरूपी अग्नीनं माझं अधमाचं राज्य, सैन्य, द्रव्यभांडार आज दग्ध करून टाकावं. ब्राह्मण, देव व गायी यांचा अपराध करण्याची दुष्ट बुद्धी मला यापुढं होऊ नये.'

परीक्षित असा विचार करीत असतानाच त्याला शमीक ऋषींच्या पुत्रानें 'तक्षकापासून मृत्यू येईल' असा शाप दिल्याचे वर्तमान समजले. तेव्हा आपणांला आता लौकरच तो तक्षकरूपी अग्नी डसणार व आपल्या संसारासक्त अंत:करणात वैराग्याची ज्योत निर्माण करणार, असे समजून राजा परीक्षित गंगानदीच्या तटाकी मृत्यू येईपर्यंत उपोषण

करीत बसला. त्यानें मौनव्रत धारण केले. सर्व विषयांचा त्याग करून तो केवळ श्रीकृष्णचरणांचे ध्यान करीत राहिला.

अनेक ऋषि-मुनी आपल्या शिष्यांसह तेथे आले. अत्री, वसिष्ठ, च्यवन, शरद्वान, अरिष्टनेमी, भृगू, अंगिरा, पराशर, विश्वामित्र, परशुराम, उतथ्य, इंद्रप्रमद, इध्मवाह, मेधातिथी, देवल, आर्ष्टिषेण, भारद्वाज, गौतम, पिप्पलाद, मैत्रेय, और्व, कवष, अगस्त्य, व्यास, भगवान नारद; असे अनेक ऋषी तेथें जमा झाले. परीक्षितानें त्या सर्वांचा सन्मान केला. राजाचे मन वैराग्यानें अतिशय शुद्ध बनले होते. त्यांना तो म्हणाला,

' ऋषींनो, आपल्यासारख्यांच्या कृपेला मी पात्र झालो, मी सर्व राजांत धन्य आहे. माझं चित्त घरादारावर, भोग्य वस्तूंवर आसक्त झालं होतं. मला वैराग्य उत्पन्न करणारा असा शाप त्या ब्राह्मणानं दिला. तो खरोखर परमेश्वरच भेटला. मी आता त्या परमेश्वरालाच शरण गेलो आहे. आता तो तक्षक कोणत्याही रूपानं येवो व मला दंश करो. तुम्ही सर्वांनी परमेश्वराचं स्तवन करावं. ज्या योनीत माझा जन्म होईल तिथं सर्वत्र परमेश्वरावर माझं मन जडावं. थोर पुरुषांशी माझी मैत्री व्हावी. ब्राह्मणांचा मजकडून सत्कार व्हावा.'

असे म्हणून त्या ज्ञानी परीक्षितानें राज्याचा भार आपल्या पुत्रावर सोपविला. गंगा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर पूर्वेस दर्भ पसरून तो उत्तराभिमुख होऊन बसला. तो उपवास करू लागला. त्याचे धैर्य पाहून स्वर्गातून देवांनी त्याची स्तुती केली. पृथ्वीवर आनंदाने फुलांचा वर्षाव केला. नगारे वाजू लागले. त्यांनी परीक्षिताच्या निश्चयाची प्रशंसा केली. ते म्हणाले,

' राजा, श्रीकृष्णांचं व्रत एकनिष्ठेनं आचरणाऱ्या तुझ्या कुळातील पुरुषानं असा निश्चय करावा यात आश्चर्य कसलं ? श्रीकृष्णांच्या समीपतेचा लाभ व्हावा म्हणून त्यांनी खरोखर राजमुकुट व सिंहासन यांचाही त्याग केला. भक्तांत श्रेष्ठ असा हा परीक्षित राजा. शरीराचा त्याग करून तो उत्तम लोकाला जाईल तोपर्यंत आम्ही सर्वजण इथंच राहू.'

राजा परीक्षिताला श्रीकृष्णांचे चरित्र ऐकण्याची इच्छा होती. तो त्या ऋषींना म्हणाला,

'मृत्यू जवळ आला असताना मनुष्यानं आपलं कर्तव्य कसं पाळावं ? ते कृपा करून आपण मला विचारपूर्वक सांगावं.'

याच वेळी ज्याच्या मागे बायकामुलांचा घोळका लागला आहे, आत्मप्राप्तीच्या आनंदानें जो वैराग्यशील आहे, जो कोणत्याच वर्णाचा, आश्रमाचा नाही, असा व्यासांचा पुत्र शुकाचार्य तेथे सहज फिरत फिरत येऊन पोचला. यांचे वय सोळा वर्षांचे होते. त्यांचे हात, पाय, मांड्या, दंड, स्कंध, गाल इत्यादी अवयव फारच कोमल होते. त्यांचे डोळे सुंदर व विस्तृत, नाक उंच, कान प्रमाणबद्ध, भुवया रेखीव व मुख रमणीय होते. त्यांच्या कंठावर शंखाप्रमाणे तीन सुंदर रेषा होत्या. मांसल स्कंधांमुळे त्यांची मान झाकली गेली होती. त्यांचे वक्ष:स्थल विशाल व ताठ होते. नाभी पाण्यातील भोवऱ्याप्रमाणे वर्तुळाकृती असून त्रिवळी उदरास विशेष शोभा देत होती. त्यांच्या अंगावर वस्त्र नव्हते. त्यांचे केस अस्ताव्यस्त होते. ते देवश्रेष्ठ विष्णूंप्रमाणे आजानबाहू व श्यामल वर्णाचे असून अक्षय यौवन व तेजस्वी अंगकांती यांकडे पाहाताच त्यांच्या सुंदर हास्यामुळे स्त्रियांचं मन हरण होई. ते येताच त्यांचे महत्त्व ओळखून सर्व ऋषी आपापल्या आसनांवरून उठून उभे राहिले.

राजा परीक्षिताने त्यांच्या पायांना वंदन केले. त्या सर्वांनी शुकाचार्यांना महान आसनावर बसविले. शांत स्वभावाच्या, अकुंठित बुद्धीच्या शुकमुनींना पाहाताच राजा परीक्षित त्यांच्याजवळ गेला. त्याने मस्तक लववून त्यांना नमस्कार केला. हात जोडून, नम्रवृत्तीने, स्वस्थचित्तानें व मधुर शब्दांनी त्यांनी विचारले,

'ऋषिवर्या, आपण कृपा करून इथं अतिथिरूपानं आलात. आम्ही पावन झालो आहोत. आपल्यासारख्या सत्पुरुषांच्या केवळ स्मरणानंच गृहस्थाश्रमी पुरुषांची घरं शुद्ध होतात. ते प्रत्यक्ष घरी आले तर ती पवित्र होतात, हे काय सांगायला हवंय ? भगवन्, आपण योगीजनांतही श्रेष्ठ गुरू आहात. मी आपणांस विचारतो. पुरुष मरणोन्मुख झाला असताना त्याचं निश्चित कर्तव्य कोणतं ? त्याला सिद्धी कोणत्या मार्गानं

होईल ? प्रभो शुकाचार्या, मनुष्यानं श्रवण करण्यास, जप करण्यास, आचरण्यास, स्मरण करण्यास, भजन करण्यास योग्य असेल ते मला आपण सांगावं.'

परीक्षित राजाने धर्मवेत्त्या व्यासपुत्रांना, शुकाचार्यांना अशी विनंती केली तेव्हा त्यांनी त्याला उत्तरे देण्यास प्रारंभ केला. शुकाचार्य म्हणाले,

'राजा परीक्षिता, ज्ञानोत्पत्तीची श्रवण मननादी जी साधनं आहेत त्यांत तू विचारलेला प्रश्न अतिशय महत्त्वाचा व लोकांचं कल्याण करणारा आहे.' असे म्हणून शुकाचार्यांनी राजाचे अभिनंदन केले. भगवच्चरणी लक्ष कसे लावावे, धारणा कशी असते, भगवंतांचे स्वरूप कसे असते, वैराग्य केव्हा येते, परमेश्वराचे ध्यान कसे करावे, ध्यान-योग व हठयोग करून ब्रह्मांडी प्राण कसा न्यावा, सकाम उपासनेचे प्रकार किती, मोक्षार्थींना भक्तियोगच का उपयुक्त; इत्यादी प्रश्नांच्या अनुरोधाने शुकाचार्यांनी सर्व तत्त्वज्ञान राजा परीक्षितास समजावून दिले. परमेश्वराचे स्वरूप, ब्रह्मांडाची उत्पत्ती, ब्रह्मदेवांची उत्पत्ती, परमेश्वराची कार्यपरत्वे तीन रूपे, परमेश्वराच्या सर्व विभूती, वराहादी अवतारांचे संक्षिप्त वर्णन, ईश्वरविभूतीचे सविस्तर वर्णन, सृष्टीची उत्पत्ती, ब्रह्मदेवांची तपश्चर्या, परमेश्वराचे त्यांना झालेले दर्शन, ब्रह्म-देवांची सृष्टिनिर्मिती, नारदांना भागवतकथन, पुराणांची दशलक्षणे, भगवंतांची स्थूल व सूक्ष्म अशी दोन रूपे, निष्क्रिय परमेश्वराची माया-रूपात अनेक रूपे; असा विविध प्रकारचा ज्ञानोपदेश शुकाचार्यांनी परीक्षिताला केला. तोच सूतानें ऋषींना विस्ताराने निवेदन केला.

## मैत्रेयांच्या आश्रमात विदुर

शुकाचार्यांनी परीक्षिताला विदुरांची हकीगत सांगितली. राजा विदुर आपल्या ऐश्वर्यशाली अशा गृहाचा त्याग करून वनात गेला. त्यांनीही भगवान मैत्रेय मुनींना असाच एक प्रश्न विचारला होता. आंधळा व अविचारी राजा धृतराष्ट्र आपल्या दुष्ट मुलांचे पोषण अन्यायाने करीत होता. त्याने आपल्या कनिष्ठ बंधूस, पांडूस व त्याच्या निराश्रित पुत्रांना वनात पाठविले. तेथे त्यांना लाखेच्या घरात जाळून

टाकण्याचा प्रयत्न त्याने केला. पांडवांच्या राणीस, आपल्या सुनेस म्हणजे द्रौपदीस वेणी धरून भरसभेत आणले गेले. अशी निंद्य कृत्ये धृतराष्ट्राच्या पुत्रांनी केली. त्यावेळी तिच्या डोळ्यांतून दुःखाश्रूंचे लोट वाहू लागले व त्यामुळे तिच्या स्तनांवरील केशराची उटी पुसून गेली. पण त्या धृतराष्ट्राने मुलांना आवरले नाही. धर्मराजाला त्याने कपटाने द्यूतात जिंकले. धर्मराज वनात गेला. तेरा वर्षांचा वनवास संपवून त्याने आपला वडिलोपार्जित राज्याचा वाटा मागितला. मोहाने व्याप्त झालेल्या धृतराष्ट्राने तो दिला नाही. श्रीकृष्णांची शिष्टाईही उपयोगी पडली नाही. शेवटी या प्रश्नाचा विचार करण्यासाठी धृतराष्ट्राने विदुरांना घरी बोलावून घेतले. त्यांनी धृतराष्ट्राला युधिष्टिराचा राज्य-भाग देण्याबद्दल सांगितले. पण त्यांचा उपदेश कर्ण, दुःशासन, शकुनी यांनी ऐकला नाही. त्यांनी रागाच्या भरात विदुरांचा अपमानच केला. 'या दासीपुत्र कपटी विदुराला इथं बोलावलं कुणी ? याला आता या नगरातून हाकलून द्यावं.' असा दुर्योधनाने त्यांच्या वर्मावर घाव घातला. आपले धनुष्य तेथेच टाकून विदुर तेथून निघून गेले.

विदुरांनी पृथ्वीवरील अनेक तीर्थांची भेट घेतली. एकटेच ते तीर्थयात्रा करीत राहिले. अनेक नगरे, पुण्यक्षेत्रे, रमणीय उद्याने, गिरि-कंदरे, लताकुंज, स्वच्छ पाण्याची सरोवरे, नद्या इत्यादींचे त्यांनी दर्शन घेतले. त्यांनी परमेश्वरालाही संतुष्ट करून घेतले. शेवटी विदुर प्रभास-क्षेत्री आले. यादवांनी परस्परांचा नाश करून घेतला हे त्यांना समजले. तेथून ते सरस्वतीनदीच्या उगमापाशी आले. त्या नदीच्या पात्रात त्रित, उशना, मनू, पृथू, अग्नी, असित, वायू, सुदास, गायी, कार्तिकेय, श्राद्धदेव इत्यादी ऋषींची व देवतांची पवित्र तीर्थे आहेत. त्यांचे त्यांनी मनापासून सेवन केले.

तेथून ते सौराष्ट्र देशात गेले. सौवीर व मत्स्य देशांचाही प्रवास त्यांनी केला. कुरू व जांगल ओलांडून ते यमुनेच्या तीरावर येऊन पोचले. तेथे त्यांना भगवद्भक्त उद्धव भेटला. उद्धवाने बृहस्पतीपासून नीतिशास्त्राचे शिक्षण घेतले होते. तो श्रीकृष्णांचा अत्यंत शांतवृत्तीचा भक्त होता. तो भेटताच विदुरांनी त्याला गाढ आलिंगन दिले. विदुरांनी

श्रीकृष्ण व इतर बांधव यांची चौकशी केली. तेव्हा श्रीकृष्णांचे स्मरण येऊन उद्धवाचा गळा दाटून आला. त्याच्या सर्व अंगांवर रोमांच उभे राहिले. त्याने आपले डोळे मिटून घेतले. कृष्णप्रेमाचा पूर त्या डोळ्यां-तून वाहू लागला. शेवटी तो विदुरांना म्हणाला,

' विदुरा, श्रीकृष्णरूपी सूर्य अस्तास गेला. आमची घरं सौभाग्यहीन झाली. ' उद्धवाने सारे कृष्णचरित्रच विदुरांसमोर उभे केले. हा उद्धव श्रीकृष्णांच्या मागोमागच होता. श्रीकृष्ण सरस्वतीनदीच्या काठी एकटेच बसले आहेत असे त्यानें पाहिले. त्यांची कांती श्याम वर्णाची होती. त्यांचे नेत्र अत्यंत शांत व आरक्त वर्णाचे होते. त्यांना चार हात असून त्यांनी रेशमी पीतांबर नेसला होता. आपल्या डाव्या मांडीवर उजवा पाय ठेवून ते एका पिंपळाच्या झाडास टेकून बसले होते. याच वेळी व्यासांचा प्रिय मित्र मैत्रेयमुनी हे फिरत फिरत सहज तेथे आले. या मैत्रेयांचे श्रीकृष्णांवर अतिशय प्रेम होते. त्यांनी भक्तिभावानें श्रीकृष्णास मस्तक वाकवून वंदन केले. त्या वेळी श्रीकृष्णांनी उद्धवाला ज्ञानाचा उपदेश केला. पण आता त्यांच्या वियोगामुळे उद्धव दु:खी झाला होता.

त्याच्याकडून विदुरांना श्रीकृष्णांचा वृत्तान्त समजला तेव्हा तेही कष्टी झाले. त्याच्या सांगण्यावरून विदुरांनी मैत्रेयांना प्रसन्न करून घ्यायचे ठरविले. उद्धवही बदरिकाश्रमात गेला व तेथे त्यानें समाधी लावून श्रीहरींचे पूजन केले. श्रेष्ठ पुरुष विदुरांनी गंगातीरावरील हरिद्वार येथील मैत्रेयमुनींच्या आश्रमाकडे प्रयाण केले. त्यांनी मैत्रेयांना आत्मज्ञान-विषयक प्रश्न करून श्रीकृष्णचरित्राचे कथन करण्याची विनंती केली. मैत्रेयांनी त्यांना जगाच्या उत्पत्तीचा वृत्तान्त सांगितला. विदुरांच्या अनेक संशयांचे त्यांनी निराकरण केले. तत्त्वज्ञानाचा सारांश सांगितला. सृष्टीच्या विकासाची रूपरेखा त्यांनी समजावून दिली. देवहूती व कपिल यांचा तत्त्वप्रचुर संवाद त्यांनी विदुरांना ऐकविला. योगाची स्थिती समजावून दिली.

## पातकी अजामिळ वैकुंठधामात

कान्यकुब्ज नगरात अजामिळ नावाचा एक दासीपती द्विज राहात होता. त्याची कथा शुकाचार्यांनी परीक्षित राजास सांगितली. तो सदाचारसंपन्न असून दासीच्या संसर्गानें दूषित झाल्यामुळे त्याचा आचार नष्ट झाला होता. वाटसरू प्रवाश्यांना लुटणे, द्यूत खेळणे, फसविणे, चोऱ्या करणे, अशा निंद्य कर्मांत तो अजामिळ रमलेला असून कुटुंब-पोषणासाठी प्राण्यांना पीडा द्यायचा. अशा दुराचारांत व दासीच्या पुत्रांच्या पालनपोषणात त्याच्या आयुष्याचा अठ्ठ्याऐंशी वर्षांचा काळ निघून गेला. त्या वृद्ध पुरुषास दासीपासून दहा पुत्र झाले. त्यांतील नारायण नावाचा एक अत्यंत अल्पवयी असा कनिष्ठ पुत्र होता. त्यामुळे तो आईबापांना अत्यंत प्रिय होता. अस्पष्ट व मधुर भाषण करणाऱ्या त्या बालकाच्या ठिकाणी वृद्ध अजामिळाचे मन अगदी गुंतून गेले होते. त्याच्या खेळांनी त्याला आनंद होई. तो त्या मुलाच्या लीलांत अगदी रमून गेला. जवळ आलेला मृत्यूही त्याला समजला नाही.

त्या अज्ञानी अजामिळानें मृत्युकाळ आल्यावरही त्या बाल नारायणावरच आपले लक्ष सतत केंद्रित केले. एवढ्यात हातात पाश घेतलेले, अत्यंत भयंकर, वाकड्या तोंडांचे, उभ्या केसांचे तीन पुरुष आपणांस नेण्यासाठी आलेले त्यानें पाहिले. मरणोन्मुख अजामिळ हरि-कीर्तन करीत आहे असे समजून विष्णुदूत आले होते. कारण तो मरताना आपल्या नारायण नावाच्या पुत्रास हाका मारीत होता. पण विष्णुदूतांना ते नाव त्यांच्या स्वामींचे वाटले. त्या विष्णुदूतांनी यम-दूतांचे निवारण केले. यमदूत विष्णुदूतांना म्हणाले,

‘धर्मराजाला अडथळा करणारे तुम्ही कोण ? तुम्ही कुणाचे दूत ? कोठून आलात ? तुम्ही याला का नेऊ देत नाही ? तुम्ही काय देव आहात ? उपदेव आहात ? उत्तम सिद्धजन आहात ? तुमचे नेत्र कमलपत्रांप्रमाणे आहेत. तुमची ही वस्त्रं पिवळी असून रेशमी आहेत. किरीट, कुंडल, कमळांच्या माळा धारण करून तुम्ही तरुण व सुंदर दिसता. तुम्हांस सुंदर असे चार हात आहेत. धनुष्य, भाता, खड्ग,

गदा, शंख, चक्र कमळ यांनी तुम्ही सुशोभित आहात. पण तुम्ही धर्मपालाच्या दासांचा निषेध का करता ?' त्यावर विष्णुदूत यमदूतांना म्हणाले,

'तुम्ही धर्मराजाचे दूत आहात ? मग आम्हांस धर्माचं लक्षण सांगावं. कोणत्या प्रकारानं कुणास दंड करावा ? कर्म करणारे सर्व प्राणी दंडास पात्र आहेत का ?'

'विष्णुदूतांनो, धर्म हा वेदविहित आहे. व अधर्म हा वेदानं निषिद्ध आहे. वेद हे स्वतःच नारायणांच्या श्वासापासून निर्माण झाले. म्हणून ते साक्षात नारायणच आहेत. आता हे नारायण तरी कोण ? तर स्वस्वरूपाच्या ठिकाणी रज, सत्त्व, तम यांनी बनलेले प्राणी गुण, नाम, रूप, कर्म यांनी ज्यामुळं निरनिराळे दिसतात तो नारायण होय. एखाद्या मनुष्यानं अधर्म केला हे कोठून समजतं ? तर सूर्य, अग्नी, आकाश, वायू, इंद्रियाभिमानी देवता, चंद्र, संध्या, अहोरात्र, दिशा, उदक, पृथ्वी, काळ व धर्म हे जीवाचे साक्षी आहेत. सूर्यादिकांच्या योगानं अधर्म समजतो. व दंडाची योजनाही करता येते. सर्व प्राणी आपापल्या कर्मानुसार दंडास पात्र होतात. कर्म न करणारा असा एकही देहधारी प्राणी नाही. म्हणून कर्म करणारे पातके करतातच. म्हणून दंडास पात्र होतात. त्यांच्या पातकांच्या हिशेबानं त्याला फळ भोगावं लागतं. जीव पांच कर्मेंद्रियं व पांच ज्ञानेंद्रियं यांच्या साह्यानं पाच विषयांचा भोग भोगतो. देहाचं पोषण करतो. ज्ञानेंद्रियं, कर्मेंद्रियं व मन यांच्या विषयांचा भोग तो घेतो. षोडशकलांनी युक्त असलेले, गुणत्रयापासून झालेले अनादी असे लिंग शरीर, यात बद्ध झालेल्या जीवास हर्ष, शोक, भय व पीडा देणाऱ्या या संसारामध्ये वारंवार भ्रमण करायला लावतं.

'पूर्वी हा अजामिळ विद्यासंपन्न, सुस्वभावी, सदाचारी, क्षमादिक गुणांचा निवासस्थान, पूजादी नियम धारण करणारा, सौम्य, इंद्रियदमन करणारा, सत्यवादी, मंत्रवेत्ता, पवित्र, गुरू, अग्नी, अतिथी, वृद्ध यांची शुश्रूषा करणारा, निरभिमानी, सर्व प्राण्यांचा मित्र, साधू, मितभाषी, मत्सररहित होता. पण पित्याच्या आज्ञेप्रमाणे वागणारा हा ब्राह्मण एकदा वनात गेला. तिथं फळं, पुष्पं, समिधा, दर्भ गोळा करून घरी

येण्यासाठी माघारी फिरला. मार्गातच येताना त्याला कुणी एक कामुक व निर्लज्ज शूद्र दिसला. मद्य प्राशन केल्यामुळं जिचे डोळे लाल झाले आहेत, फिरून गेले आहेत, जिचं वस्त्र अतिशय सैल झालं आहे. अशा एका वेश्येंबरोबर तो हास्य, गायन, क्रीडा करीत असलेला त्यानं पाहिला. कामोद्दीपन करणाऱ्या उटचा लावलेल्या आपल्या बाहूंनी तो शूद्र तिला आलिंगन देत होता. हे पाहून अजामिळ एकाएकी मोहित होऊन कामवश झाला. धैर्यानं व ज्ञानानं आपलं मन आवरलं. पण मदनकंपित मनावर त्याला नियंत्रण ठेवता आलं नाही. त्या स्त्रीच्या दर्शनानं उत्पन्न झालेल्या त्या कामरूप ग्रहानं अजामिळास ग्रासून टाकलं. त्याची स्मृती नष्ट झाली. नेहमी मनात तो तिचंच चिंतन करू लागला. स्वधर्मापासून तो भ्रष्ट झाला.

'त्यानंतर अत्यंत मनोहर अशा ग्राम्य विषयांनी तिला प्रसन्न करून घेण्यासाठी त्यानं आपल्या पित्याचं सर्व द्रव्य देऊन टाकलं. लौकरच तो जारिणी स्त्रीच्या नेत्रकटाक्षांनी विद्ध झाल्यामुळं त्या पातकी अजामिळानं आपल्या विहित आणि तरुण अशा ब्राह्मणकुलोत्पन्न भार्येचा त्याग केला. बापानं मिळविलेलं द्रव्य संपल्यावर हा मंदमती अजामिळ न्यायानं वा अन्यायानं, कुठून तरी द्रव्य आणायचा व वेश्येच्या परिवाराचं भरणपोषण करायचा. शास्त्रांचं उल्लंघन करून हा अजामिळ वागला आहे. सज्जनांनी याची निंदा केली आहे. वेश्येकडील अपवित्र पदार्थ भक्षण करून यानं आपलं जीवन दीर्घकालपर्यंत पापात घालविलं आहे. एवढं पातक करूनही यानं प्रायश्चित्त घेतलेलं नाही. आम्ही आता याला यमराजाकडं घेऊन जातो. त्या ठिकाणच्या दंडानं याची शुद्धी होईल.

यमदूतांचे हे भाषण ऐकून त्या न्यायनिपुण विष्णुदूतांनी उत्तर दिले, 'हर हर, धर्मज्ञ पुरुषाच्या सभेला अधर्म स्पर्श करीत आहे. ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. या सभेत धर्मवेत्ते पुरुष दंडास अयोग्य व निष्पाप अशा पुरुषांना उगीचच दंड करीत आहेत. समदृष्टी साधुलोक प्रजाजनांचं आई-बापांप्रमाणं परिपालन करून त्यांना शिक्षण देतात, त्यांच्याच ठिकाणी असा विपरीतपणा होऊ लागला तर प्रजाजनांनी

शरण कुणाला जायचं ? यमदूतांनो, मोक्षसाधनभूत अशा श्रीहरींच्या नामाचा ज्याअर्थी यानं अगदी अगतिक असतानाही उच्चार केला, त्याच्या कोटी जन्मांतीलही पातकांचं त्यानं प्रायश्चित्त घेतलं आहे. यमदूतांनो,'नारायणा, इकडे ये' असा आक्रोश यानं पुत्राला हाका मारण्यासाठी केला. चार अक्षरांच्या नावाच्या उच्चाराबरोबरच त्याच्या पातकाचं प्रायश्चित्त झालं आहे. यमदूतांनो, चोर, मद्यपी, मित्रद्रोही, ब्रह्मघातकी, गुरुस्त्रीगामी, त्याचप्रमाणं स्त्री, राजा, माता-पिता, गायी यांची हत्या करणारा, असे पातकी जे आहेत त्यांना भगवंतांचं नामोच्चारण हेच एक श्रेष्ठ प्रायश्चित्त आहे. कारण नामाचा उच्चार करणाऱ्यांविषयी 'हा माझा आहे. मी याचं रक्षण केलं पाहिजे' अशी विष्णूंना बुद्धी होते. श्रीविष्णूंच्या नामाचा उच्चार केला की पातकी मनुष्य शुद्ध होतोच, पण तो मन्वादिक वेदवेत्त्यांनी सांगितलेल्या प्रायश्चित्तांनी शुद्ध होत नाही. आणखी असं की, कृच्छ्रचांद्रायणादी प्रायश्चित्तं केवळ या अशा पातक निवृत्तीनंच क्षीण होतात. पण नामाचा उच्चार क्षीण नाही होत. तो श्रेष्ठकीर्ती परमेश्वराच्या गुणांचं ज्ञान करून देतो. जे केलं असता मन पुन्हा पापाकडं जात असेल तर प्रायश्चित्त पापाची शुद्धी करणारं नसतंच. पापांचा समूळ नाश करण्यासाठी पुरुषांनी वारंवार श्रीहरींचं गुणवर्णन करणं हेच खरं प्रायश्चित्त आहे. हा गुणानुवादच खरोखर चित्तशोधक म्हणजे चित्तास शुद्ध करणारा आहे.

'ज्याअर्थी मरतामरता यानं भगवन्नामाचा उच्चार करून सर्व पातकांना नाश केलं आहे त्या अर्थी यमदूतांनो, तुम्ही याला वाईट मार्गानं नेऊ नका. पुत्रादिकांना संकेतानं ठेवलेलं, थट्टेनं किंवा गाताना आलाप करण्यासाठी घेतलेलं, किंवा 'विष्णूंचा काय उपयोग आहे ?' अशा अवज्ञेनं उच्चारलेलं त्याचं नाव सर्व पातकांचा नाश करतं, असे वेदवेत्ते मानतात. घरावरून पडलेला, मार्गात अडखळून पडलेला, अवयव भग्न झालेला, सर्पादिकांनी दंश केलेला, ज्वरानं तप्त झालेला, दंडादिकांनी तडित झालेला, अशा पराधीन अवस्थेत जरी पुरुषानं 'हरि हरि' म्हटलं तरी तो यातना भोगण्यास योग्य होत नाही.

'यमदूतांनो, लहानमोठ्या पातकांना, लहानमोठी प्रायश्चित्तं

मन्वादी महर्षींनी सांगितली आहेत. तप, दान, जप इत्यादी प्रायश्चित्तांनी ती नष्ट होतात. पण अधर्माचरणानं मलिन झालेलं त्या पातक्याचं अंतःकरण मात्र शुद्ध होत नाही. पण ईश्वराच्या चरणसेवेनं मात्र ते शुद्ध होतं. यमदूतांनो, समजून अथवा न समजून टाकलेला अग्नी काष्ठांना दग्ध करतो. त्याप्रमाणं अज्ञानानं जरी पवित्रकीर्ती परमेश्वराचं नाव उच्चारलं तरी पुरुषाची पातकं दग्ध होतात. अतिशय शक्तिमान औषध यदृच्छेनं भक्षण केलं तरी त्याचे गुण न जाणणाऱ्या रोग्यालासुद्धा ते आपला गुण दाखविते, उच्चारलेला भगवन्नामाचा मंत्रही आपला गुण दाखवील यात संशय नाही.'

याप्रमाणे विष्णुदूतांनी यमदूतांना भागवतधर्माचा निर्णय चांगला समजावून दिला. त्यांनी त्या ब्राह्मणाला पाशापासून व मृत्यूपासून सोडविले. विष्णुदूतांनी अडथळा आणल्याचा वृत्तान्त यमदूतांनी यमास जाऊन सांगितला. यमपाशातून मुक्त झालेला तो ब्राह्मण शुद्धीवर आला व त्यानें विष्णुदूतांना मनोभावे वंदन केले. तो काहीतरी बोलणार एवढयात ते विष्णुदूत गुप्त झाले.

विष्णुदूतांच्या मुखातून प्रकट झालेले भक्तिमाहात्म्य ऐकून अजामिळाची भक्ती भगवंतावर तत्काळ जडली. आपल्या पातकांचे स्मरण झाल्याने तो पश्चात्ताप करू लागला. तो म्हणाला, 'अहो, इंद्रियदमन न केल्यामुळं माझी फार मोठी हानी झाली. त्या शूद्रीच्या ठिकाणी पुत्राच्या रूपानं मीच उत्पन्न झाल्यामुळं मी स्वतःचं ब्राह्मणत्व नाहीसं केलं. अरेरे, पतिव्रता तरुण स्त्रीचा त्याग करून मद्यपान करणाऱ्या जारिणी वेश्येची संगत मी धरली. कुळाला मी कलंक लावला. माझा धिक्कार असो. मला माझ्या माता-पित्यांखेरीज दुसरा आप्त नव्हता. ती वृद्ध व अनाथ आहेत. संसारतापानं संतप्त झाली आहेत. वेदाध्ययन करणाऱ्या त्यांच्या या पुत्रानं, मी कृतघ्नपणानं एकाएकी त्याग केला. धर्म बुडवून टाकणाऱ्यांना होणाऱ्या यमयातना मला होणार. अतिभयंकर नरकात मी पडणार ! आणि काय आश्चर्य हो ! पाश घालून ते पुरुष मला ओढीत होते. ते यमदूत मला बांधून भूमीच्या खाली नेत होते. ते सुंदर दिसणारे चार सिद्ध पुरुष गेले कुठे ? मी या जन्मी पातकी

आहे. पण जन्मांतरीच्या पुण्याईनं मला त्या सुरश्रेष्ठांचं दर्शन झालं. त्या पुण्यामुळंच माझं मन प्रसन्न आहे. नाही तर अपवित्र अशा शूद्र-स्त्रीच्या नादी लागलेल्या माझी जिव्हा भगवन्नामाचा उच्चार करण्या-साठी मरणसमयी कशी योग्य झाली असती ? कपटी, पापी, ब्राह्मण्य-नाश, निर्लज्ज असा मी कुणीकडे व 'नारायण' हे मंगलकारक नाव कुणीकडं ?' महापातकी असलेला मी आता अंधतम नरकात जाणार नाही. चित्त, दहा इंद्रियं, प्राणवायू यांचा आता निग्रह करून मी योग-साधना करीन. मी त्या सर्व भूतांचा सुहृद, त्यांचा हितकर्ता, शांत, दयाळू व इंद्रियदमन करणारा होईन. जिनं मज अधमाला वानराप्रमाणं खेळविलं त्या स्त्रीमायेपासून मी स्वतःला मुक्त करून घेईन. मी आता माझी सर्व बुद्धी परमार्थाकडे लावून 'हा मी व हे माझे' असा देहा-दिकांचा अभिमान मी सोडून देईन. भगवंताच्या कीर्तनादिकांनी शुद्ध झालेलं माझं हे मन आता मी त्यांच्याच पायांशी एकनिष्ठ करीन.'

साधूंची संगत एक क्षणभर घडल्यामुळे त्या अजामिळाच्या अंतः-करणात वैराग्य उत्पन्न झाले. पुत्रादिकांचा सर्व स्नेह सोडून तो दासीच्या घरातून बाहेर पडला व घरातून हरिद्वारास निघून गेला. देवाचा साक्षात्कार व्हावा म्हणून योगमार्गाचा आश्रय करून तो आसनावर स्थिर झाला. सर्व इंद्रिये विषयांपासून परावृत्त करून त्यानें आपले मन आत्मस्वरूपावर केंद्रित केले. चित्ताच्या एकाग्रतेनें त्याला अनुभवात्मक अशा भगवत्स्वरूपी ब्रह्मतत्त्वावर लाविले. भगवत्स्वरूपावर त्याची बुद्धी निश्चल झाली. त्याने आपल्यापुढे विष्णुदूतांना पाहिले. त्यांची ओळख पटून त्याने त्यांना साष्टांग नमस्कार घातला. त्यानें त्वरित आपला देह गंगेत समर्पण करून भगवंताच्या पार्षदगणाचे रूप धारण केले. त्यानंतर तो अजामिळ विष्णुदूतांसह सुवर्णाच्या विमानात बसून आकाशमार्गानें वैकुंठात विष्णुपाशी गेला. असा हा अजामिळ, दासीपती होऊन पतित झालेला, पण अंतकाळी भगवन्नाम मुखात आल्यामुळे यमपाशातून मुक्त झाला व विष्णुलोकात येऊन पोचला. भगवंताच्या नामसंकीर्तनाने मन कर्मांवर कधी आसक्तच होत नाही. अजामिळाचा हा परमगुह्य इतिहास

जे श्रद्धेनें श्रवण करतील, त्याचे कथन भक्तीने करतील, ते नरकास जाणार नाहीत. यमदूत त्यांच्याकडे पाहाणारही नाहीत. तो पातकी असला तरी विष्णुलोकातच विराजमान होईल. श्रद्धापूर्वक हरिनामाचा उच्चार करणारा पुरुष वैकुंठातील स्थान मिळवितो, यात संशय नाही.

## इंद्रादिकांचा गुरू विश्वरूप

एकदा परीक्षितानें शुकाचार्यांना विचारले, ' भगवन्, आचार्य बृहस्पतीनं आपल्या देवशिष्यांचा त्याग का केला ? शिष्यांनी गुरूचा काय अपराध केला ?' त्यावर शुकाचार्य म्हणाले, ' राजा, त्रिभुवनाच्या ऐश्वर्यानं मत्त होऊन एकदा इंद्रानं सन्मार्गाचं उल्लंघन केलं. एकदा मरुद्गण, अष्टवसू, एकादश रुद्र, द्वादशादित्य, ऋभुगण, विश्वेदेव, साध्य, अश्विनीकुमार हे त्यांच्याभोवती बसले होते. सिद्ध, चारण, गंधर्व, ब्रह्मवेत्ते मुनी, विद्याधर, अप्सरा, किन्नर, पक्षी, नाग हेही त्याची सेवा उत्तम रीतीनें करीत होते. त्याची स्तुती गात होते. इंद्राणीसह इंद्र आसनावर शोभून दिसत होता.

एवढ्यात देव व दैत्य यांनी पूजित, मुनींत श्रेष्ठ, स्वत:चा व देवांचा परमगुरू बृहस्पती तेथे सभेत आला. त्याला पाहूनही इंद्रानें त्याचा आदर केला नाही. आपल्या आसनावरून तो थोडाही हालला नाही. ऐश्वर्याचा अहंकार इंद्राला उत्पन्न झाला असे पाहून तो अंगिरा-ऋषीचा पुत्र ज्ञानसंपन्न बृहस्पती मुकाट्यानें घरी निघून गेला. आपल्या गुरूची अवहेलना झाली हे इंद्राला जाणवले. स्वत:च्या सभेत तो स्वत:चीच निंदा करू लागला. तो मनाशी म्हणाला, ' अरेरे, मी हे काय केलं ? मी ऐश्वर्यानं मत्त होऊन सभेत माझ्या गुरूंचा तिरस्कार केला. मी सार्वभौम राज्याच्या सिंहासनावर बसलो. पण आपण कुणासही उत्थापन देऊ नये असं जर कुणी म्हणेल तर त्याला धर्म समजलाच नाही. कुणीही कुलसंपन्न ब्राह्मण वा सर्वव्यापी विष्णूंचा भक्त येत आहे, आणि यावेळी जो आपल्या आसनावरून उठत नाही तो दु:खांनी पीडित होतो, असं शास्त्र आहे. मी आता देवगुरूंच्या चरणी मस्तक ठेवून त्यांना प्रसन्न करून घेईन. '

आपला गुरू कोठे आहे, याचा शोध इंद्रानें घेतला. देवाधिपती इंद्राला त्यांचा शोध लागला नाही. आता असुरांपासून आपले रक्षण कसे होईल, याचा विचार इंद्रदेव करू लागला. त्याचे मन अस्वस्थ झाले. इतक्यात दुर्मद नावाचा एक असुर शुक्राचार्यांच्या संमतीनें शस्त्रास्त्रे घेऊन देवांबरोबर युद्ध करण्यास तत्पर झाला. त्याच्या तीक्ष्ण बाणांनी देवांची मस्तके, त्यांच्या मांड्या, त्यांचे हात तुटून पडले. इंद्रासह सर्वजण माना खाली घालून ब्रह्मदेवांना शरण गेले. त्या पीडित झालेल्या देवांना ब्रह्मदेव म्हणाले,

'देवांनो, खरोखरच तुम्ही ऐश्वर्याच्या मदानं इंद्रियदमन केलेल्या त्या ब्रह्मज्ञानी ब्राह्मणाचा अनादर केलात, ही फार वाईट गोष्ट झाली. देवांनो, तुम्ही समर्थ असूनही तुमचा पराभव झाला, हे त्या अपराधाचंच फळ होय. इंद्रा, तू गुरूंचा तिरस्कार केलास. तू फारच क्षीण झाला आहेस. उलट शुक्राचार्यांची भक्ती करून तुझे शत्रू पाहा कसे समृद्ध झाले आहेत. आणखी काय सांगू ? शुक्रगुरूंना देवाप्रमाणे मानणारे हे असुर प्रसंगी माझंही स्थान हिरावून घेतील. अभेद्य मंत्रानं युक्त असलेले ते शुक्राचार्यांचे शिष्य असुर आता स्वर्गाची तरी चिंता कशासाठी करतील ? देवांनो, जितेंद्रिय, तपस्वी आणि आत्मज्ञानसंपन्न असा त्वष्टयाचा पुत्र विश्वरूप नावाचा एक ब्राह्मण आहे. त्याचा तुम्ही सत्कार करा व त्यालाच गुरू करून घ्या. तो तुमचे मनोरथ पूर्ण करील.'

ब्रह्मदेवांच्या आज्ञेनुसार ते देव विश्वरूप ऋषीजवळ गेले. त्यांना आलिंगन देऊन ते देव म्हणाले, 'विश्वरूपा, तुझं कल्याण असो. आज आम्ही अतिथी म्हणून तुझ्या आश्रयास आलो आहोत. तू आमचे मनोरथ पूर्ण कर. ब्रह्मनिष्ठा, सत्पुत्र पुत्रवंत असले तरी त्यांनी आपल्या पितरांची शुश्रूषा करावी, हाच त्यांचा धर्म आहे. तुमच्यासारख्या ब्रह्मचारी पुत्राचा हाच धर्म आहे. आचार्य ही वेदांची मूर्ती आहे. पिता ब्रह्मदेवांची व भ्राता इंद्राची मूर्ती आहे. माता साक्षात पृथ्वीची मूर्ती असून भगिनी दयेची मूर्ती आहे. अतिथी धर्माची, अभ्यागत अग्नीची, सर्व भूते ही ईश्वराची मूर्ती आहे. म्हणून विश्वरूपा, पीडित झालेल्या आम्हा पितरांचा पराभव शत्रूंनी केला आहे. तुम्ही ही पीडा दूर करून आमच्या विनंतीचा स्वीकार

करावा. विश्वरूपा, तुम्ही ब्रह्मज्ञानी आहात. ब्राह्मण आहात. आम्ही तुम्हांला गुरुस्थानी मानून उपाध्याय करतो. तुमच्या तेजाच्या योगानं आम्ही आमच्या शत्रूंना सहज जिंकू. आम्हांस मंत्र सांगणारे आमचे वडीलच आहात तुम्ही.'

प्रसन्न होऊन विश्वरूपानें उत्तर दिले, 'देवांनो, उपाध्यायपण हे ब्रह्मतेजाचा व्यय करणारं असल्यानं धर्मज्ञांनी निंद्य मानलं आहे. पण आपणांसारख्यांनी मागणी केल्यावर माझ्यासारखा आपला शिष्य नकार कसा देणार ? मी तुमचं म्हणणं अमान्य नाही करीत. कारण तुम्ही माझे गुरूच आहात. मी माझं सारं द्रव्य व प्राणही खर्च करून तुमचं सर्व मागणं पूर्ण करीन.'

याप्रमाणे महातपस्वी विश्वरूपानें देवांना वचन दिले. देवांनी मग त्याला आचार्यत्व दिले. विश्वरूपानें शुक्राचार्यांच्या विद्येनें संरक्षित असलेली असुरांची संपत्ती नारायणकवच नामक वैष्णवविद्येच्या साह्यानें आणून देवांना, इंद्राला समर्पण केली. तिच्या योगाने इंद्रानें दैत्याचा पराभव केला. ही नारायणकवचरूपी वैष्णवी विद्या इंद्राला विश्वरूपानें सांगितली.

## विश्वरूपाचा वध, वृत्रासुराला मारण्याचा प्रयत्न

या विश्वरूपाला सोमपीथ नावाचा सोम पिण्याचे, सुरापीथ नावाचे एक सुरापान करण्याचे व अन्नाद नावाचे एक अन्न भक्षण करण्याचे; अशी तीन शिरे होती. तो विश्वरूप यज्ञात उघडपणे विनयानें देवांना हाक मारून हविर्भाग देत असे. कारण देव त्याचे पितरच होते. पण त्याची माता असुरकन्या होती. तिच्या प्रेमानें तो असुरांनाही अनुकूल असे. देवांचा यज्ञ सुरू झाला की तो असुरांनाही गुप्त रूपानें हविर्भाग पोचवी. विश्वरूपाचा हा कपटभाग व अपराध इंद्राला समजला. हा विश्वरूप असुरांना वाढवील व आपला कधीतरी घात करील, असे मनात येऊन तो इंद्र भयभीत झाला. त्याने क्रोधात येऊन विश्वरूपाची तीन शिरे तोडून टाकली. त्याच्या सोमपीथ नावाच्या शिराचा कवडा नावाचा पक्षी झाला. सुरापीथ नावाच्या शिराचा चिमणी नावाचा पक्षी

झाला व अन्नाद नावाच्या मस्तकाचा तित्तिर म्हणजे लावा पक्षी झाला.

इंद्र आपल्या ब्रह्महत्येचे पातक निवारण करण्यास समर्थ असला तरी त्याने ती शिरे आपल्या ओंजळीत एक संवत्सरपर्यंत धरली. इतर त्याला ब्रह्मघातक्या म्हणून चिडवू लागले. लोकापवाद दूर करण्यासाठी त्याने ती ब्रह्महत्या भूमी, उदक, वृक्ष व स्त्रिया या चारांना वाटून दिली. माझ्यावर खणलेला खळगा आपोआप भरून येईल तर मी ब्रह्महत्येचा चौथा भाग ग्रहण करीन असे भूमीने म्हटले. भूमीचे हे स्वरूप खाऱ्या मातीत कोठे कोठे दृष्टीस पडते. छेदन केल्यावर अंकुर उत्पन्न व्हावेत, अशा बोलीने वृक्षांनी ब्रह्महत्येचा चौथा भाग मागून घेतला, हे रूप वृक्षांवर डिंकाच्या रूपाने दिसते. गर्भाला पीडा न होता प्रसूतिकाळापर्यंत पुरुषाशी निरंतर संभोग व्हावा, हा वर स्त्रियांनी मागून घेतला व तो त्यांच्या प्रत्येक महिन्याच्या रजोरूपाने प्रत्ययास येतो. दुग्धादी पदार्थांत आपले मिश्रण केले तर त्या पदार्थांची वृद्धी व्हावी, असा वर जलानें मागून घेतला. पाण्यावरील फेस व बुडबुडे यांच्या रूपानें हे पातक दृष्टीस पडते.

आपल्या पुत्राचा असा वध झाला हे त्वष्टयाला समजले. त्याने, 'इंद्राशत्रो, त्वरित आपण वृद्धिंगत व्हावं व शत्रूचा वध करावा.' अशी प्रार्थना इंद्राच्या शत्रूच्या निर्मितीसाठी करून अग्नीत हवन केले. तेव्हा दक्षिणाग्नीपासून फार भयंकर रूप धारण करणारा वृत्रासुर प्रकट झाला. हा वृत्रासुर दर दिवशी बाणाच्या फेकीइतका वाढत असे. तो अग्नीनें जळालेल्या पर्वतासारखा उंच होता. त्याचे तेज सायंकाळच्या मेघसमुदायासारखे काळे होते. त्याची शिखा, त्याची श्मश्रू तापलेल्या तांब्याप्रमाणे लाल रंगाची होती. तो उंच स्वरात गर्जना करी. पायांनी पृथ्वी कंप पावेल असे नृत्य करीत असल्याचा भास होई. तो जणू आकाशाचेच प्राशन करीत राही. आपल्या जिभेने तो जणू नक्षत्रांना चाटीत आहे, त्रैलोक्याला गिळीत आहे असे वाटे. आपल्या भयंकर मोठ्या दाढांनी व पर्वताच्या गुहेप्रमाणे असलेल्या खोल मुखाने तो वारंवार जांभया देई. या वृत्रासुराला पाहून सर्व लोक भयभीत होऊन दहाही दिशांना पळून जाऊ लागले. त्वष्टयाच्या या तमोगुणी पुत्राने

साऱ्या विश्वास व्यापून टाकले. या अतिभयंकर व पापी असुरास वृत्र असे नाव पडले.

वृत्राने आपल्या अंगावर आलेल्या देवगणांची सर्व शस्त्रास्त्रे गिळून टाकली. सर्व देवांचे तेज नाहीसे झाले. वृत्ताने सर्व विश्व व्यापलेले असल्यामुळे त्यांना कोठेच जाता येईना. ते खिन्न झाले व त्यांनी मनातल्या मनात आदिपुरुषाची स्तुती करायला प्रारंभ केला. देवांनी म्हटले, ' वायू, आकाश, अग्नी, उदक, पृथ्वी ही पंचमहाभूतं व त्यांपासून निर्माण झालेलं हे विश्व, त्याचे अधिपती ब्रह्मदेवादी देव ज्यांची पूजा करतात त्या परमेश्वराकडून आमचं रक्षण व्हावं. तो परमेश्वर वस्तुतः निर्विकार असून देव, ऋषी, पशू, मानव इत्यादी ठिकाणी आपल्या मायेनं उपेन्द्र, परशुराम, मत्स्य, राम इत्यादी रूपांनी अवतार घेतो, शत्रुपीडित अशा आमचं रक्षण करतो. तो विश्वाहून भिन्न असूनही विश्वरूपी आहे. तोच सर्वांचा आत्मा व परमदैवत आहे. शरण जाण्यास तोच एक योग्य आहे. त्या देवाला आम्ही शरण जातो. तोच महात्मा आमचं रक्षण करील.'

देवांची अशी स्तुती ऐकून शंख, चक्र, गदा धारण करणारे भगवान प्रथम देवांच्या पश्चिम दिशेला प्रकट झाले. श्रीवत्सलांच्छन व कौस्तुभमणी या दोन चिन्हांशिवाय इतर सर्व लक्षणांनी शोभणारे सोळा पार्षदगण त्यांच्या भोवती त्यांची सेवा करीत होते. परमेश्वराचे डोळे उमललेल्या कमलांप्रमाणे होते. त्याच्या दर्शनानें आनंदित झालेल्या देवांनी त्याला भूमीवर साष्टांग नमस्कार घातला. देवांनी त्याची स्तुती करायला प्रारंभ केला. देव त्या परमात्म्यास म्हणाले,

' प्रभो, स्वर्गादी फळं देण्यासाठी आपण यज्ञरूपी सामर्थ्यानं युक्त आहात. यज्ञांचा घात करणाऱ्यावर आपणच चक्र फेकता. तुमचा पराक्रम दर्शविणारी पुष्कळ नावं आहेत. आपणांस नमस्कार असो, भगवंता, नारायणा, वासुदेवा, आदिपुरुषा, महापुरुषा, महानुभावा, शुद्धधर्मा, परमकल्याणा, परमदयाळो, केवला, जगदाधारा लोकैकनाथा, सर्वेश्वरा, लक्ष्मीनाथा, परमेश्वरा, तूच सर्वांच्या अंतर्यामात राहून आनंदरूपाचा अनुभव घेतोस. तू अचिंत्य ऐश्वर्यानं संपन्न आहेस, सर्वांचा गुरू आहेस.

तुझ्या चरणकमलांची छाया संसारातील परिश्रम दूर करतात. सच्चिदानंदरूप परमेश्वरा, ज्यानं आमची तेजं, आमची अस्त्रं, आयुधं गिळून टाकली आहेत, त्या त्रैलोक्याला ग्रासून टाकणाऱ्या वृत्रासुराचा तू त्वरित वध कर.'

अशा आदरपूर्वक स्तुतीने संतुष्ट झालेले श्रीहरी देवांना म्हणाले, 'सुरश्रेष्ठांनो, तुमच्या या स्तुतीनं मी प्रसन्न झालो आहे. आता तुम्हांला दुर्लभ असं काय आहे ? इंद्रा, तुझं कल्याण असो. आता तुम्ही दधीची नावाच्या ऋषींजवळ जावं, विद्या, तप, व्रत यांनी दृढ झालेल्या त्यांच्या शरीराची याचना तुम्ही करा. इंद्रा, अश्वशिरस नावानं प्रसिद्ध असलेलं शुद्ध ब्रह्म ते दधीची ऋषी जाणतात. त्यांनी ते अश्विनीकुमारांना उपदेशिले, त्यामुळं त्यांना जीवन्मुक्तत्व प्राप्त झालं. त्या अथर्वणवेदी दधीची ऋषींना माझं नारायणकवचही माहीत आहे. तुम्ही त्या दधीचींच्या शरीराची मागणी करा. देवेन्द्रा, ते धर्मज्ञ असल्यामुळं तुम्ही याचना केल्यावर, तुम्हाला विशेषत: अश्विनीकुमारांना आपल्या शरीराच्या अस्थी देतील. त्यांच्यापासून विश्वकर्म्याकडून एक वज्र नावाचं श्रेष्ठ आयुध तयार करा. इंद्रा, तू त्या वज्रानं त्या वृत्रासुराचं शिर कापून टाक. त्याचा वध झाला की तुम्हांस तुमचं तेज, तुमची अस्त्रं, आयुधं संपत्ती, इत्यादी सर्व काही मिळेल. हा वृत्रासुर आपला वध करील असं मनातसुद्धा आणू नका. तुमचं कल्याण असो.'

## वज्राची निर्मिती, इंद्र-वृत्रयुद्ध

इंद्रादी देवांना असे मार्गदर्शन करून, आशीर्वाद देऊन श्रीहरी एकदम गुप्त झाले. ठरल्याप्रमाणे सर्व देव त्या अथर्ववेदी महर्षी दधीचींजवळ गेले व त्यांना त्यांनी वंदन केले. त्यांची याचना ऐकून दधीची म्हणाले, 'देवांनो, तुमच्या मुखांतून धर्म श्रवण करण्यासाठी मी खरोखर नाही म्हटलं. पण आता मी कधीतरी मला सोडून जाणाऱ्या या प्रिय देहाचा मी त्याग करतो. ज्याचा आपल्या स्वत:करता उपयोग नाही, ज्याला कोल्हीकुत्री खाऊन टाकणार, ज्याचा क्षणभरही भरवसा नाही, अशा देहानं कुणावरही उपकार न करावा, ही किती दैन्याची व दुःखाची

गोष्ट आहे.'

अशा निश्चयाने त्या अथर्ववेदी दधीचींनी परब्रह्मरूप भगवंतांच्या ठिकाणी आपल्या जीवास एकवटून आपल्या देहाचा त्याग केला. प्रथम त्यांनी इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी यांचे संयमन केले व बंधने तोडून टाकली. नंतर त्यांनी उत्तम समाधीचा स्वीकार केला. त्यांचा देह पडला हे त्यांना समजलेसुद्धा नाही. त्यानंतर इंद्र महाबलाढ्य विश्वकर्म्यानें दधीची ऋषींच्या अस्थींनी निर्माण केलेले वज्र धारण करून ऐरावतावर शोभू लागला. असुरसेनापतींनी वेष्टिलेल्या वृत्रासुराचा वध करण्यासाठी इंद्र मोठ्या वेगानें वृत्रासुराच्या अंगावर धावून गेला. वैवस्वत मन्वंतराच्या प्रारंभीच्या पहिल्याच महायुगात त्रेतायुगाच्या प्रारंभी नर्मदेच्या तीरी देवांचा व असुरांचा फार मोठा संग्राम झाला. रुद्र, अष्टवसू, द्वादश-आदित्य, अश्विनीकुमार, अर्यमादी पितर, अग्नी, मरुद्‌गण, ऋभुसंज्ञक व साध्यसंज्ञकदेव, विश्वेदेव, व स्वतः इंद्र यांना पाहून वृत्रासुरप्रभृती दैत्यांना त्यांचा उत्कर्ष सहन झाला नाही.

नमुची, शंबर, अनर्वा, ऋषभ, अंबर, हयग्रीव, शंकुशिरा, विप्रचित्ती, अयोमुख, पुलोमा, वृषपर्वा, प्रहेती, हेती, उत्कल इत्यादी दैत्य, दानव, यक्ष, हजारो राक्षस, सुमाली व माली हे दैत्य, दुर्मद व निर्भय हे दैत्य, यांनी इंद्रसैन्याला मोठीच पीडा दिली. गदा, परिघ, बाण, प्रास, मुद्‌गर, तोमर, शूल, परशू, खड्‌ग, शतघ्नी, भुशुंडी इत्यादी शस्त्रांनी व अस्त्रांनी ते असुर इंद्रावर चोहोंबाजूंनी वृष्टी करू लागले. अनेक बाणांच्या जाळ्यात आच्छादित झालेले देव आकाशातील मेघाच्छादित नक्षत्रां-प्रमाणे दिसेनासे झाले. शस्त्रास्त्रांचे ते वेध देवांनी अंतरीक्षातच छेदून टाकले. शस्त्रे व अस्त्रे संपत आल्यावर असुर पर्वतशिखरे, वृक्ष व पाषाण यांच्या साह्यानें देवांशी युद्ध करू लागले. पण त्या गिरिशिखरा-दिकांचेही देवांनी तुकडे करून टाकले.

देव सुरक्षित आहेत असे पाहून ते सर्व असुर भयभीत झाले. आपल्या अधिपतीचा त्याग करून काही असुर रणांगणावरून पळून जाऊ लागले. हे पाहून धैर्यवान वृत्रासुरानें म्हटले, 'विप्रचित्ते, नमुचे, पुलोमन, मया, अनर्वन, शंबरा, तुम्ही माझं थोडं बोलणं ऐका ना. शूर पुरुषांनो,

जो प्राणी जन्माला आला त्याच्या ठिकाणी मृत्यू हा आहेच. योगमार्गात प्रवृत्त होऊन, दमन करून ब्रह्मचिंतनात देहत्याग करणं आणि रणभूमीवर शत्रूला पाठ न दाखविता देहत्याग करणं; हे दोन प्रकारचे मृत्यूच शास्त्रसंमत आहेत.' पण वृत्रासुराचा हा धर्मोपदेश असुरांनी ऐकला नाही. ते पळत सुटले. आपली सेना अस्ताव्यस्त झाली असे पाहून इंद्रशत्रू असुरश्रेष्ठ वृत्रासुर अत्यंत क्रुद्ध झाला व त्यानें बलात्कारानें देवांचे निवारण करण्याचे ठरविले. त्याने देवांची अत्यंत कटू शब्दात निर्भर्त्सना केली. तो म्हणाला,

'अहो, मातेच्या उदरातून विष्ठेप्रमाणे बाहेर निघालेल्या आणि संग्रामातून परत सुटलेल्या दैत्यांना पृष्ठभागी ताडण करून तुम्हांस काय मिळणार ? भयभीत झालेल्या पुरुषांचा वध करून काय मिळणार ? क्षुद्र देवांनो, तुम्हांस संग्रामाची हिंमत असेल तर क्षणभर माझ्यापुढं उभं राहावं.' एवढे म्हणून वृत्राने मोठी गर्जना केली. त्याच्या या भयाण गर्जनेने व दंड थोपटण्याच्या आवाजानें सर्व देव वज्रप्रहार झाल्याप्रमाणे मूर्च्छित झाले. वृत्रासुर हातात शूळ घेऊन सर्व पृथ्वीला थरथर कापवीत होता. भयभीत झालेल्या देवसैन्यास तो पायांनी तुडवू लागला.

देवसैन्याचे हे मर्दन पाहून इंद्र रागाने अतिशय लाल झाला. त्यानें समोर धावत येणाऱ्या आपल्या शत्रूवर हातातील मोठी गदा फेकली. वृत्रासुरानें ती भव्य गदा आपल्या डाव्या हातात सहज झेलली. त्या वृत्रासुरानें त्याच गदेने इंद्राच्या ऐरावताच्या गंडस्थलावर जोराचा प्रहार केला. त्या ऐरावताचे गंडस्थल चूर्ण झाले. त्याच्या मुखातून रक्त येऊ लागले. भ्रमिष्ट होऊन तो इंद्रापासून सात धनुष्यांच्या अंतरावर मागे सरकला. वाहन मूर्च्छित झालेले पाहून इंद्र खिन्न झाला. त्याच्यावर वृत्रासुराने पुन्हा गदेचा प्रहार केला नाही. इंद्र पुन्हा युद्धास तयार झाला. वज्र हातात घेऊन प्रहार करणाऱ्या इंद्राला वृत्रासुर म्हणाला,

'अतिदुष्टा, ब्रह्मघातकी, गुरुघातकी आहेस तू, तू माझा शत्रू आहेस. आज मी या शूलानं तुझं पाषाणासारखं हृदय तत्काल विदीर्ण करून टाकतो. स्वर्गाची प्राप्ती करणारा निर्दय याज्ञिक जसा पशूचा शिरच्छेद करतो, त्याप्रमाणं तू आत्मज्ञानी, ब्राह्मण, स्वतःचा गुरू,

निष्पाप, यज्ञार्थ दीक्षा घेतलेल्या माझ्या ज्येष्ठ बंधूचा विश्वास दाखवून वध केलास. त्यामुळं लज्जा, संपत्ती, दया, कीर्ती यांनी तुझा त्याग केला आहे. पुरुषभक्षक राक्षसही तुझी निंदा करतील, आता या माझ्या शूलानं तुझा देह त्वरित विदीर्ण होऊन तू मरण पावशील. तुझ्या शरीरास अग्नीचा स्पर्श न होताच तुला गिधाडं यथेष्ट भक्षण करतील. दुष्टा, तुला मदत करणाऱ्या इतर देवांचे कंठही या तीक्ष्ण धारेच्या शूलानं मी तोडून टाकीन. त्यांनी मी भैरवादी भूतनाथांचं पूजन करीन. आणि वीरा, इंद्रा, या संग्रामात जर तू माझं शिर वज्रानं तोडलंस तर मी कर्मबंधांपासून मुक्त होईन व मी धीर सत्पुरुषांच्या पदास प्राप्त होईन. सुरेश्वरा, हा तुझा शत्रू आता तुझ्यापुढं उभा आहे. तू तुझं अमोघ अस्त्र माझ्यावर का टाकीत नाहीस ? तुझं हे वज्र खरोखर श्रीहरींच्या तेजानं व दधीची ऋषींच्या तपानं तळपत आहे. विष्णूंनी तुला प्रेरणा दिली आहे. तू आता याच वज्रानं माझा वध कर. जिकडे हरी तिकडं विजय, तिकडंच लक्ष्मी, तिकडंच दया इत्यादी गुण असतात. इंद्रा, माझा स्वामी संकर्षण तो माझं दुःख दूर करील.'

इतके म्हणून वृत्रासुराने भगवान श्रीहरींना म्हटले, 'श्रीहरी, तुझे पायच ज्यांचा मुख्य आश्रय आहे त्या दासांचा अनुदास होण्याची मी इच्छा करतो. माझे मन तुझ्या गुणांचं स्मरण करो. माझी वाणीही त्यांचं कीर्तन करो. माझ्या देहानंही तुझीच सेवा घडो. सर्व सौभाग्यनिधे, मी स्वतःपासून तुला निराळा कल्पून ध्रुवपद, ब्रह्मपद, सार्वभौमपद, पाताळाचं आधिपत्य, योगसिद्धी अथवा मोक्षही इच्छीत नाही. कमलनयना, पंख न फुटलेले पक्ष्याचे बालक, दिवाभीतादी पक्ष्यांपासून त्रस्त होऊन आपल्या मातेला पाहाण्याची इच्छा करतं, अथवा दाव्याला बांधलेलं वासरू ज्याप्रमाणं मातेच्या स्तनपानाची इच्छा करतं, त्याप्रमाणं तापत्रयानं पीडलेलं, कर्मांनी बांधलेलं, कामदांनी खिन्न झालेले हे माझं मन तुलाच अवलोकन करण्याची इच्छा करतं. नाथा, तुझ्या मायेमुळं पुत्र, दारा, गृह यांच्या ठिकाणी माझं पूर्ण आसक्त झालेलं मन यापुढं संसारचक्रात गुंतू नये.'

## इंद्राकडून वृत्रासुराचा वध

याप्रमाणे विजयापेक्षा मृत्यू श्रेष्ठ मानून युद्धात देहत्याग करणारा तो वृत्रासुर हातात सूळ घेऊन इंद्रावर धावून आला. त्यानें अग्नीप्रमाणे कठोर ज्वालांनी युक्त असा तो शूळ गरगर फिरवून इंद्रावर मारण्यासाठी फेकला. 'पापी इंद्रा, पाहा तू आता मरणारच', असेही तो क्रोधानें म्हणाला. त्याचा वेग ग्रह व उल्का यांच्याप्रमाणे प्रखर असल्यामुळे तो पाहाणेही अशक्य झाले. भ्रमण करीत तो शूळ आकाशातून येत आहे, असे पाहाताच वज्रधारी इंद्रानें शंभर टोकांनी युक्त असलेल्या आपल्या वज्रानें त्या शूळाचे व वृत्राच्या वासुकीसर्पासारख्या बाहूचे छेदन केले. एक बाहू तुटल्यामुळे खवळलेल्या वृत्रासुरानें आपल्या परिघानें इंद्राच्या हनुवटीवर व ऐरावताच्या अंगावर प्रहार केला.

इंद्राच्या हातून वज्र खाली पडले. देवांनी, असुरांनी, सिद्धचारणांनी त्या वेळी वृत्रासुराच्या या महान कर्माची प्रशंसा केली. इंद्रावरील ते संकट पाहून सर्वांनी हाहाकार केला. लज्जित झालेला इंद्र शत्रू समीप असताना वज्र हातात घेईना. वृत्रासुर त्याला म्हणाला,

'इंद्रा, ही वेळ खेद करण्याची नाही. आता तू या वज्रानं माझा वध कर. परमात्म्यावाचून नुसती युद्धाची इच्छा करणाऱ्यांना, शस्त्र धारण करणाऱ्यांना, देहालाच सर्वस्व समजणाऱ्यांना, सदोदित जय कधीच मिळत नाही. इंद्रा, इंद्रियशक्ती, मानसशक्ती, शरीरशक्ती, प्राण, जीवन, मृत्यू ही ज्याची रूपं तो भगवानच सर्वांना कारण आहे. हे न जाणता लोक मोहानं जड देहच सर्वांचं कारण मानतात. देवराज, ज्याप्रमाणं लाकडाची बाहुली, यांत्रिक मृग पराधीन असतात, तशीच सर्वं भूतं ईश्वराधीन आहेत. इंद्रा, पुरुष, प्रकृती, महत्तत्त्व, अहंकार, पंचमहाभूतं, इंद्रियं, मन, ही ईश्वराच्या अनुग्रहाशिवाय या विश्वाची निर्मिती करण्यास समर्थ होत नाहीत. ईश्वरच स्वतंत्र व सर्वनियंता आहे. हे न जाणता पुरुष स्वतःच्या पराधीन जीवालाच स्वतंत्र मानतो.

'इंद्रा, ज्या अर्थी हे सर्वं ईश्वराधीन आहे त्याअर्थी पुरुषानं अपकीर्ती व जय, जय अथवा पराजय, सुख अथवा दुःख, मृत्यू व जीवित

यांबद्दल हर्ष वा विषाद न मानता समदृष्टीनं राहावं. सत्त्व, रज, तम हे गुण प्रकृतीचे आहेत. आत्म्याचे नाहीत. म्हणून गुण कार्यरूपी देहाच्या ठिकाणी आपण साक्षी आहोत असं समजून हर्षादिकांनी व्याप्त होऊ नये. इंद्रा, माझं आयुध, माझा हात यांचा छेद झाल्यामुळं तू माझा पराजय केलास. तथापि तुझे प्राण हरण करण्यासाठी मी युद्धात यथा-शक्ति प्रयत्न करीत आहेच. हे युद्ध म्हणजे एक प्रकारचं द्यूतच आहे. प्राण ही पणाला लावायची वस्तू, बाण हे फासे, वाहनं ही सोंगटयांप्रमाणं आहेत. युद्धाचं असंच आहे. जय-पराजय कुणाचा हे सांगता यायचं नाही.'

वृत्रासुराचे हे निर्मळ व निष्कपट भाषण ऐकून इंद्राने त्याची प्रशंसा केली. हातात वज्र धारण करून तो म्हणाला, 'दानवा, तू जन्मतः निकृष्ट असूनही कृतार्थ झाला आहेस. अशा संकटप्रसंगीही ज्याअर्थी तुझी बुद्धी अशी आहे त्या अर्थी तू पूर्वी अनन्य भावानं त्या जगदीश्वर परमात्म्याची सेवा केली आहेस असं वाटतं. तू आपल्या असुरस्वभावाचा त्याग केला आहेस. तू आता सत्पुरुषस्वभावाचा झाला आहेस. तू खरोखरच वैष्णवी माया तरून गेला आहेस. वृत्रासुरा, तू रजोगुणी असूनही सत्त्वमूर्ती भगवान वासुदेवांच्या ठिकाणी तुझी बुद्धी दृढ झाली आहे, याचं मला आश्चर्य वाटतं. म्हणूनच स्वर्गादी सुखांची तुला अपेक्षा नाही. मोक्षाधिपती भगवान श्रीहरींच्या ठिकाणी तुझी भक्ती दृढ झाली आहे. आनंदरूपी अमृतसागरात तू क्रीडा करीत असताना तुला अत्यंत क्षुद्र अशा स्वर्गादी सुखांची काय किंमत वाटणार ?'

अशा रीतीने धर्मजिज्ञासा जागृत झालेले ते महापराक्रमी इंद्र व वृत्रासुर एकमेकांशी युद्ध करू लागले. वृत्रासुराने आपला लोखंडाचा भयंकर परिघ डाव्या हाताने फिरवून इंद्रावर फेकला. देवेंद्राने तो परिघ व हत्तीच्या सोंडेसारखा हात यांचा आपल्या वज्राने नाश केला. तो वृत्र समूळ छेदून टाकलेल्या बाहूंच्या रक्तस्रावामुळे पंख तुटून आकाशातून खाली पडलेल्या पर्वताप्रमाणे शोभू लागला. त्या असुराने आपला अधरोष्ठ भूमीला लावला. वरचा ओठ स्वर्गाला लावून वृत्रा-सुराने आकाशासारख्या गंभीर मुखाने सर्पासारख्या जिभेने, मृत्यूसारख्या उग्र दाढांनी त्रैलोक्यास गिळायला प्रारंभ केला असे वाटले. त्याने

अतिशय विशाल असा देह धारण केला. वेगाने पर्वतांना हालवीत, पायांनी पृथ्वीचे चूर्ण करीत तो वृत्रासुर इंद्राजवळ आला आणि त्याने ऐरावतासह इंद्राला गिळून टाकले.

महाबलाढ्य, महापराक्रमी अजगर जसा हत्तीला गिळून टाकतो त्याप्रमाणे वृत्राने इंद्राला ग्रासून टाकले. हे पाहून प्रजापती व महर्षी यांसह सर्व देव खिन्न झाले. अरेरे, म्हणून मोठा आक्रोश करू लागले. वृत्राच्या पोटात गेलेला इंद्र नारायणकवचाने, योगबलाने तेथे मरण पावला नाही. त्याने आपल्या वज्राने वृत्राचे पोट फोडून बाहेर प्रवेश केला. त्याने शत्रूचे शिर आपल्या बलाने कापून टाकले. स्वर्गात दुंदुभी वाजू लागल्या, सिद्ध व गंधर्व यांनी इंद्राची स्तुती करून त्याच्यावर पुष्पांचा वर्षाव केला. वृत्रासुराची हत्या होण्याचा समय होताच ते मस्तक पृथ्वीवर गळून पडले. वृत्रासुराच्या देहातून जे तेज निघाले ते भगवंतांच्या स्वरूपात जाऊन मिळाले.

## नहुषाला इंद्रपदप्राप्ती

वृत्रासुराचा वध होताच सर्वांना मनापासून आनंद झाला. देव, ऋषी, पितर, इतर प्राणी, गंधर्वादी, दैत्य, महादेव, ब्रह्मदेव, लोकपाल हे अस्वस्थचित्त झालेल्या इंद्रास न विचारताच आपापल्या स्थानी निघून गेले. ब्राह्मणवधापासून भयभीत झालेल्या इंद्राला त्या वृत्राचा वध करावा असे वाटले नाही. तो देवांना म्हणाला, 'देवांनो, स्त्रिया, भमी, उदक व वृक्ष यांनी माझं विश्वरूप वधाचं पातक वाटून घेतलं. मी त्या पातकापासून कसातरी मुक्त झालो, पण आता वृत्राची हत्या कुणाला देऊ ? आता या पातकापासून कसा मुक्त होऊ ?'

तेव्हा ऋषी इंद्राला म्हणाले, 'इंद्रा, आम्ही तुझ्याकडून अश्वमेध-यज्ञ करवून श्रीहरींना संतुष्ट करू. मग तुझं कल्याण होईल. तू कशासाठी भितोस ? ब्रह्महत्येच्या पातकाचं काय एवढं मोठं ? देवाधिदेव नारायणाचे अश्वमेधयज्ञ रूपानं पूजन करून साऱ्या जगाच्या वधापासून तू मुक्त होशील. इंद्रा, ब्राह्मण, पिता, गाय, माता, गुरू यांचा घात करणारे, श्वानभक्षक व चांडाळ हे सुद्धा नामसंकीर्तनानं शुद्ध होतात. तू

तर अश्वमेध यज्ञानं परमात्म्याचं पूजन करशील. त्या दुष्टाच्या वधानं तुला पातक लागणारच नाही.'

ब्राह्मणांनी प्रेरणा दिली म्हणून इंद्रानें वृत्राचा वध केला. पण त्याचा वध होताच मूर्तिमंत ब्रह्महत्या इंद्राच्या मागे लागली. तिचा ताप इंद्राला सहन करावा लागला. त्याला आता कशातच सुख वाटेनासे झाले. ती वृत्रहत्या स्वरूपानें चांडाल स्त्रीसारखी असून तिच्या शरीरास वृद्धत्वाची अवकळा आली होती. क्षयरोगानें ती व्याप्त असून तिचे वस्त्र रक्तानें भरले होते. मस्तकावरील शुभ्र केस पिंजारून ती इंद्राला 'उभा राहा, राहा उभा' असे म्हणत होती. तिच्या श्वासवायूने सर्व मार्ग दूषित करीत ती चालली होती. आपल्याच मागे ती धावत येत आहे असे पाहून इंद्र प्रथम आकाशात गला. पण तेथेही ती आलीच. तो सर्व दिशांना हिंडला. जिकडे तो तिकडे ती होतीच. तेव्हा तो ईशान्य दिशेस जाऊन त्वरित मानससरोवरात त्यानें प्रवेश केला.

तेथे कमलाच्या तंतूंत कोणास दिसणार नाही अशा अवस्थेत ब्रह्महत्येपासून आपली सुटका होईल अशा आशेनें तो एक हजार वर्षे-पर्यंत राहिला. तेव्हा त्याला तेथे तो बंदिस्त असल्यामुळे भोगप्राप्ती झाली नाही. हविर्भाग नेणाऱ्या अग्निरूपी दूताचा तेथे प्रवेशच झाला नाही. इंद्र त्या ठिकाणी जोपर्यंत गुप्तरूपाने होता तोपर्यंत विद्या, तप. विचार, सामर्थ्यं, शरीरबल यांनी समर्थ असलेल्या नहुषाने स्वर्गाचे राज्य केले. सत्ता, संपत्ती, ऐश्वर्यं यांनी त्याला मदाची बाधा होऊन त्याची बुद्धी विवेकशून्य झाली, तेव्हा इंद्रपत्नी शचीनें काही तरी उपाय करून त्याला सर्पयोनीत पोचविले. त्यानंतर ब्राह्मणांनी त्याला बोलविले तेव्हा तो इंद्र स्वर्गलोकी गेला. ब्रह्मवेत्त्या ऋषींनी केलेल्या अश्वमेध-यज्ञामुळे इंद्रास भगवंतांच्या पूजेची संधी मिळाली. सूर्यामुळे जसे धुके नाहीसे होते तसे वृत्रासुरवधामुळे लागलेले इंद्राचे पाप परमात्म्याने नष्ट केले. तो इंद्र पूर्वीसारखा निष्पाप बनून सर्वांना पूज्य झाला. हे इंद्र-वृत्राचे आख्यान सर्व पातकांचे क्षालन करणारे आहे. यात श्रीहरींचे कीर्तन, भक्तीची वृद्धी, भक्तांचा महिमा, ब्रह्महत्येपासून इंद्राची मुक्तता; इत्यादी विषय आले आहेत. धनदायक, यशकारक, सर्वपापनिवर्तक,

शत्रुनाशक, कल्याणकारक आणि आयुर्वर्धक असे हे आख्यान सर्वांनी ऐकवावे, ऐकावे.

## चित्रकेतू व कृतद्युती यांचा पुत्रशोक

एकदा राजा परीक्षिताने शुकाचार्यांना विचारले, 'रजोगुणी, तमोगुणी स्वभावाच्या त्या पातकी वृत्रासुरास भगवान नारायणाविषयी एवढी श्रद्धा का वाटली ? शुद्ध व सत्त्वगुणी ऋषींनाही एवढी भगवद्-भक्ती उत्पन्न होत नाही. पण सर्वांना ताप देणारा तो पापी वृत्रासुर भयंकर युद्धातही आनंदरूप परमात्म्याच्या ठिकाणी कसा रमला ? ब्रह्मन्, वृत्रासुराच्या भक्तिभावाबद्दल आम्हांस थोडं सांगावं.' शुका-चार्यांनी त्याला पूर्वीचा सर्व इतिहास सांगितला.

शूरसेन नावाच्या देशाचा एक चित्रकेतू नावाचा प्रसिद्ध राजा होता. त्याचे सर्व मनोरथ पृथ्वी पूर्ण करी. त्याला एक कोटी भार्या होत्या. तो पुत्र निर्माण करण्यास समर्थ असूनही त्याच्या सर्व भार्या वंध्या निघाल्या. त्यामुळे त्याला पुत्रप्राप्ती झाली नाही. रूप, सौंदर्य, औदार्य, वय, जन्म, विद्या, ऐश्वर्य, संपत्ती असून राजा चित्रकेतू चिंतामग्न झाला. एकदा अंगिरा ऋषी फिरत फिरत सहज त्याच्या घरी आले. चित्रकेतूनें त्यांचे मनापासून स्वागत केले. विधिवत पूजन करून तो अंगिरांच्या आसनाजवळ बसला. अंगिरा ऋषींनी त्याला तत्त्वबोध करताना म्हटले,

' राजन्, महत्तत्त्व, अहंकार इत्यादी सात प्रकृतींनी जसा जीव सुरक्षित असतो, तसाच राजासुद्धा गुरू, अमात्य, देश, किल्ले, द्रव्यसंचय दंड आणि मित्र या सात प्रकृतींनी नेहमी सुरक्षित असतो. तो राज्य-सुखाचा अनुभव घेतो. राजा, तुझं आरोग्य ठीक आहे ना ? तुझं सर्व क्षेम आहे ना ? भार्या, प्रजा, अमात्य, सेवक, व्यापारी, मंत्री, नगर-वासी, मांडलिक, पुत्र हे सर्व तुझ्या आज्ञेत आहेत ना ? तुझं मन तुझ्या स्वाधीन आहे ना ? ज्याचं मन स्वाधीन आहे त्याला भार्याही अनुकूल असतात. राजा, तू मनातून संतुष्ट दिसत नाहीस. तुझं मुख असं चिंता-ग्रस्त का दिसतंय ? तुझा कोणता मनोरथ पूर्ण झाला नाही ?'

ऋषींनी एवढ्या ममत्वाने विचारल्यानंतर राजा म्हणाला, 'भगवन्, तप, ज्ञान, समाधी यांच्या योगानं आपणांसारख्या योगिजनांना देहधारी प्राण्यांच्या मनात काय आहे हे माहीत असतं. ब्रह्मनिष्ठा, क्षुधा व तृषा यांनी व्याकुळ झालेल्या पुरुषाला जसे चंदनादी पदार्थ सुख देत नाहीत, तसेच सार्वभौम ऐश्वर्य असून ही संपत्ती मला निपुत्रिकाला सुख देत नाही. महाभाग्यशाली मुने, या निपुत्रिकपणापासून आपण माझं रक्षण करावं.'

राजाचे हे दुःख ओळखून त्या महर्षींनी राजाला पुत्र व्हावा म्हणून त्वष्टा नावाच्या आदित्याला अर्पण करण्याच्या उद्देशाने चरू सिद्ध केला व त्वष्टयाचे यजन केले. राजाच्या त्या कोटी राण्यांतील वडील व गुणांनी श्रेष्ठ अशा कृतद्युती नावाच्या राणीला यज्ञशेष असा चरू अर्पण केला. 'राजा, तुला हर्ष व शोक देणारा असा एक पुत्र होईल.' असा आशीर्वाद देऊन ऋषी निघून गेले. कृतद्युतीने तो चरू भक्षण केल्यावर चित्रकेतूपासून तिला गर्भ राहिला. शुक्लपक्षातील चंद्राप्रमाणे तो गर्भ तिच्या उदरात वाढत होता. योग्य समय येताच कृतद्युतीला पुत्र झाला. तेव्हा सर्वांना अतिशय आनंद झाला. राजाने स्नान करून, अलंकार धारण करून, ब्राह्मणांकडून पुण्याहवाचन करवून आशीर्वाद घेऊन पुत्राचे जातकर्म केले. त्याने ब्राह्मणांना सुवर्ण, रुपे, वस्त्रे, भूषणे, गाव, अश्व, गज व साठ कोटी गायी यांची दानें करून सर्व लोकांचे मनोरथ पूर्ण केले.

त्या राजाची प्रीती त्या पुत्राविषयी दिवसेंदिवस वाढू लागली. कृतद्युती मातेचेही प्रेम विलक्षण रीतीने वाढले. मात्र तिच्या सवतींना पुत्र नसल्यामुळे त्या कष्टी झाल्या. राजाचे प्रेमही पुत्रवती राणीवर जसे होते तसे इतर राण्यांवर राहिले नाही, म्हणून त्या मनांतून संतप्त झाल्या व सवतीबद्दल मत्सर करून आपलीच निंदा करू लागल्या. द्वेषानें त्या राण्यांची बुद्धी नष्ट झाली. त्यांची मनें क्रूर झाली व त्यांनी राजाच्या पुत्राला विषप्रयोग केला. सवतींचे हे घातक कृत्य राणीला माहीत नव्हते. आपला बालक झोपला आहे, अशीच तिची समजूत होती. फार वेळ झाला तेव्हा तिने दासीला पुत्रास उठविण्यास सांगितले. दासीने पुत्रा-

जवळ येऊन पाहिले, तो त्याच्या नेत्रांतील बुबुळे बाहेर आलेली तिला दिसली. त्याचा प्राण निघून गेला आहे असे तिनें पाहिले. ' अरेरे, फार मोठा घात झाला. ' असा आक्रोश तिनें सुरू केला. दासीचे रडणे ऐकून राणी धावतच तिच्याजवळ आली. आपला अल्पवयी पुत्र मरण पावल्याचे तिलाही समजले. अतिशय शोकानें ती मूर्च्छित झाली. तिचे केस व तिची वस्त्रे अगदी अस्ताव्यस्त होऊन गेली. त्यानंतर इतर पुरुष व स्त्रिया यांनीही तेथे येऊन शोक प्रकट केला. अपराध करणाऱ्या सवतीही तेथे आल्या व ढोंग करून रडू लागल्या.

राजाला हा सर्व वृत्तान्त समजताच त्याच्या डोळ्यांपुढे अंधेरी आली. त्याचा शोक अनावर होऊन तो रडत, ठेचाळत मृत बालकाजवळ येऊन पडला. प्रधान आला. ब्राह्मणही जमा झाले. राजा दीर्घ श्वास सोडीत होता. त्याचे वस्त्र व केस विसकटून गेले होते. त्याच्या डोळ्यांत अश्रू दाटले होते. त्याला एक शब्दही बोलवत नव्हता. कृतद्युती राणी अतिशोकाने मोठ्यानें विलाप करू लागली. सर्वांचे हृदय दुःखानें भरून आले. केशर व चंदन यांनी सुगंधित झालेल्या आपल्या दोनही स्तनांवर काजळयुक्त अश्रुबिंदूंचे सिंचन करणारी कृतद्युती फुले गळून पडणारे आपले केस अस्ताव्यस्त करू लागली. विचित्र अशा टिटवीप्रमाणे पुत्राचे गुण आठवून ती शोक करू लागली. मुलाकडे पाहून ती सारखी रडतच होती. ' बाळा, मज अनाथेचा असा त्याग तू का केलास ? तुझ्या शोकानं संतप्त झालेल्या पित्याकडं तू का पाहात नाहीस ? बाळा, तू त्या निर्दय यमाबरोबर जाऊ नकोस. ऊठ आता. तुला निजून खूप वेळ झाला आहे. राजपुत्रा, तुझे खेळगडी लहान बालक तुला खेळण्यासाठी उठवीत आहेत. लवकर ऊठ आता. तुला फार भूक लागली असेल. भोजन कर. स्तनपान कर. बाळा, आमचं दुःख दूर कर. '

पत्नीनें केलेला हा शोक ऐकून राजा चित्रकेतू अत्यंत दुःखानें मोठ्यानें रडू लागला. सर्व नगरवासी दुःखाच्या सागरात बुडून गेले. याच वेळी अंगिरा नावाचे मुनी नारदांसह तेथे येऊन पोचले.

## चित्रकेतूला अंगिरा व नारद यांचा उपदेश

शोकानं व्याप्त झालेला राजा आपल्या पुत्राच्या प्रेताजवळ बसला होता. नारद व अंगिरा ऋषी त्याला म्हणाले, 'राजा, तू कुणासाठी शोक करीत आहेस? ज्याच्यासाठी शोक करतोस तो भूत, वर्तमान व भविष्य काळांतील जन्मांत तुझा कोण होता? नदीच्या प्रवाहात वेगानं वाळूचे कण एकत्र येतात, वियोग पावतात. त्याप्रमाणे जीवही काळाच्या प्रवाहात संयुक्त होतात, वियुक्त होतात. राजा, काही बीजांपासून बीजं निर्माण होतात. काहींपासून होत नाहीत. काहींपासून झाली तरी ती नाश पावतात. त्याप्रमाणे ईश्वरी मायेनं प्रेरित झालेले पुत्रादी प्राणी निर्माण होतात. नाश पावतात. राजा, आता अस्तित्वात असणारे आम्ही, तू, हे सर्व लोक, चराचर प्राणी; हे जन्माच्या पूर्वी जसे नव्हते तसे ते मरणानंतरही राहाणार नाहीत. राजा, जसं बीजापासून बीज निर्माण होतं, त्याप्रमाणे पित्याच्या बीजापासून, मातेच्या रजापासून पुत्राचा देह निर्माण होतो. त्यात पृथ्वी आदी भूते निर्विकार असतात. देहधारी जीवात्माही जन्मादी विकारांपासून अलिप्त असतो. देह व जीव यांचा संबंध अनादी कालापासून अज्ञानामुळं कल्पिण्यात आला आहे.'

नारद व अंगिरा यांच्या या बोलण्यानं राजाचा शोक थोडा कमी झाला. म्लान वदन आपल्या हातानं पुसून तो म्हणाला, 'अवधूतवेष धारण करणारे, ज्ञानसंपन्न असे तुम्ही दोघे कोण आहात? सनत्कुमार, नारद, ऋभू, अंगिरा, देवल, असित, अपांतरतम, व्यास, मार्कंडेय, गौतम, वसिष्ठ, परशुराम, कपिल, शुकाचार्य, दुर्वास, याज्ञवल्क्य, जातुकर्ण्य, उद्दालक, रोमश, च्यवन, दत्त, पतंजली, आसुरी, वेदशिरा, बोध्य, पंचशिरा, हिरण्यनाभ, कौशल्य, श्रुतदेव, ऋतध्वज; असे अनेक ऋषी व सिद्ध ज्ञानाचा उपदेश करीत पृथ्वीवर हिंडत असतात. तुम्ही माझा उद्धार करण्यासाठी आला आहात. मला आता ज्ञानरूप दीप दाखवावा.'

'राजा, तुला पुत्रेच्छूला पुत्र देणारा अंगिराऋषी तो मीच आहे. हे ब्रह्मदेवपुत्र नारद आहेत. राजा, तू पुत्रशोकानं व्याप्त आहेस. पण तू भगवद्भक्त असल्यामुळं दुःख भोगण्यास तू योग्य नाहीस. तुजवर अनुग्रह

करण्यासाठी आम्ही इथं आलो आहोत. राजा, मी पूर्वी तुझ्या घरी आलो होतो तेव्हाच तुला ज्ञानाचा उपदेश करणार होतो. पण त्या वेळी तुला पुत्र हवा होता. मी तुला त्यावेळी पुत्र दिला. आता पुत्रवंताला काय दुःख असते याचा अनुभव तुला येत आहेच. पुत्रच केवळ दुःख-कारक आहे असं नाही. स्त्री, गृह, द्रव्य, ऐश्वर्य, संपत्ती, शब्दादी विषय, भूमी, राज्य, सैन्य, जामदारखाना, सेवक, अमात्य, मित्र हे सर्वंच शोक, मोह, भय व पीडा देणारे आहेत. एखाद्या गंधर्वनगराप्रमाणे ते भासमान होतात व लय पावतात. म्हणून ते स्वप्न, माया, मनोरथ यांच्याप्रमाणे मिथ्या आहेत.

'राजा, कर्मवासनांच्या साह्यानं अखंड विषयांचं चिंतन केल्यानं पुरुषाच्या मनापासून कर्मं निर्माण झाली. पाप-पुण्यात्मक कर्मं जर मना-पासून तयार होतात तर मग कर्मांपासून साध्य होणारे अर्थही मनःकल्पित असतात. तू आत्मतत्त्वाचा विचार कर. या नित्य वाटणाऱ्या भ्रांत विषयांचा त्याग करून शांतीचा आश्रय कर.'

नारदांनी सांगितले, 'राजा, तू इंद्रियनिग्रह करून मंत्ररूप उप-निषदाचा स्वीकार माझ्यापासून कर. मंत्रोपनिषद जपरूपानं तू धारण करीत असताना सात रात्रींतच तुला संकर्षण प्रभूचं दर्शन होईल. तू त्या प्रभूंच्या महत्पदाला जाऊन पोचशील.'

## चित्रकेतूला भगवंतांचे दर्शन

त्यानंतर देवर्षी नारदांनी मरण पावलेल्या त्या राजपुत्राला योग-सामर्थ्यानें जिवंत केले. शोक करणाऱ्या लोकांना त्याला दाखवून नारद त्याला म्हणाले, 'तुझे कल्याण असो. तू अत्यंत शोकमग्न अशा या इष्टमित्रांना, बांधवांना, मातापित्यांना नीट अवलोकन कर, तुला अप-मृत्यू आला. तुझं आयुष्य आणखी शिल्लक आहे. तू आता पित्यानं दिलेल्या भोगांचा व राज्यासनाचा उपभोग घे.'

'नारदा, कर्माच्या योगानं देव, पशू, पक्षी, मनुष्य या योनींतून मी भ्रमण करीत असताना हे लोक माझे कुठल्या जन्मात मातापिता होते? पुत्रबुद्धीनं जर यांना शोक होत असेल तर शत्रुबुद्धीनं यांना

माझ्या मरणाबद्दल हर्ष होईल का ? कारण सर्वच प्राणी क्रमाक्रमानं सर्वांचे परस्पर बंधू, सपिंड, शत्रू, मध्यस्त, मित्र, उदासीन, द्वेषी होत असतात. जीव आई-बापांच्या शोधातच असतात. जीव हा नित्य व अविनाशी, जन्मादिरहित असा आहे. तो स्वयंप्रकाशी असून जन्मादिकांनी युक्त अशा देहादिकांचा आश्रित आहे. या जीवाला अतिप्रिय, अप्रिय, स्वकीय, परकीय असं कुणीच नसतं. हा जीवात्मा स्वतंत्र, कारण, कार्य यांचा साक्षी, सर्वत्र तटस्थ असल्यामुळं सुख, दुःख, राज्यादी कर्मफळं यांचा तो स्वीकारच करीत नाही.'

याप्रमाणे त्या बालकाचा जीव बोलून निघून गेला. त्याचे चित्रकेतू आदी आप्त चकित झाले. त्यांनी शोकमुक्त होऊन त्या बालकाचे सर्व विधी केले. 'पुत्रादिकच दुःखाला कारण आहेत.' हे अंगिरांचे वचन राजाला आठवले. राजस्त्रियांनी आपल्या हातून बालहत्येचे पातक घडले, म्हणून यमुनेच्या तीरावर प्रायश्चित्त घेतले.

अंगिरा ऋषी व नारद यांनी उपदेशित झालेला तो चित्रकेतू राजा चिखलाच्या सरोवरातून बाहेर निघणाऱ्या हत्तीप्रमाणे गृहरूप अंधकूपातून बाहेर पडला. यमुनानदीत यथाविधी स्नान करून त्याने पापनाशक अशा तर्पणादी क्रिया केल्या. इंद्रियसंयम करून त्याने ब्रह्मपुत्रांना नमस्कार केला. नारदांनी त्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. ते म्हणाले, 'राजा, चित्त, बुद्धी, मन, अहंकार यांच्या ठिकाणी अनुक्रमानं वासुदेव, प्रद्युम्न, अनिरुद्ध, संकर्षण यांच्या रूपानं तूच असल्यानं आम्ही तुला नमस्कार करतो. तुझ्यापासून द्वैतदृष्टी निघून गेल्यामुळं तू आपल्याच ठिकाणी रममाण झाला आहेस. तू परमात्मानंदरूप शांत आहेस. म्हणून तुला नमस्कार असो तूच चैतन्यरूपानं प्रकाश पावतोस, तू आमचं रक्षण कर. तुझ्या ब्रह्मस्वरूपाला नमस्कार असो.'

याप्रमाणे नारदांनी शरण आलेल्या त्या चित्रकेतूला आपल्या विद्येचा उपदेश केला. व ते अंगिरा ऋषींसह ब्रह्मलोकी गेले. केवळ उदकाचे सेवन करून एकाग्रचित्ताने चित्रकेतूने नारदांनी केलेल्या उपदेशाप्रमाणे त्या विद्येचा सात दिवसपर्यंत यथाविधी जप केला. त्यामुळे त्याला अकुंठित असे विद्याधरांचे आधिपत्य प्राप्त झाले. काही दिवसां-

नंतर तो राजा शेषाच्या चरणांजवळ गेला. त्यानें कमलकंदाप्रमाणे गौरवर्णाच्या, नीलवस्त्र परिधान केलेल्या, देदीप्यमान किरीट, बाहुभूषणे, कटिसूत्र, कडीतोडे इत्यादी अलंकार धारण केलेल्या, सनत्कुमार व सिद्ध यांनी वेष्टिलेल्या प्रभूस पाहिले.

प्रभूंच्या दर्शनाने त्याचे उरलेले पाप नाहीसे झाले व तो अत्यंत स्वच्छ व निर्मळ झाला. त्यानें मौन धारण केले. त्याच्या नेत्रांत प्रेमाश्रू आले. त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. त्या राजाने अत्यंत आदरानें आदिपुरुष संकर्षणाला शरण जाऊन प्रणाम केला. त्याचा कंठ दाटून आल्यामुळे काही वेळा तो प्रभूंचे स्तवन मात्र करू शकला नाही. पण थोड्याच वेळात त्याने त्या जगद्‌गुरू परमेश्वराची स्तुती करायला प्रारंभ केला. तो म्हणाला,

'अजिता, देवादिकांनाही तू अजिंक्य आहेस. समदृष्टी भक्तांनी तुला अगदी स्वाधीन करून घेतलं आहे. निष्काम होऊन सेवा करणाऱ्या भक्तांना तू आपलं स्वरूपच देतोस. या जगताची उत्पत्ती, स्थिती, लय या सर्व तुझ्याच लीला आहेत. ब्रह्मादिक हेही तुझ्या पुरुषरूप अंशाचेही अंश आहेत. असं असतानाही ते 'आम्ही स्वतंत्र ईश्वर आहोत', अशा अभिमानानं तुझ्याशी व्यर्थ स्पर्धा करतात. तू खरोखरच अनंत आहेस. ईशा, जे विषयमग्न पुरुष तुज सर्वोत्कृष्ट परमेश्वराला न भजता तुझ्या इंद्रादी विभूतींचीच उपासना करतात ते खरोखर नरपशूच होत. राजकुलाच्या नाशाबरोबर सेवकांचे भोग नाहीसे होतात, त्याप्रमाणं उपास्य देवतेचा नाश झाला की, उपासकांचे भोग संपतात. परमेश्वरा, भाजलेल्या बीजापासून अंकुर निर्माण होत नाही, त्याप्रमाणे तुला अर्पण केलेल्या वासनाही देहाच्या उत्पत्तीस कारण होत नाहीत. तुझ्या निर्गुण स्वरूपाची सेवा कामनापूर्वक केली असता हळूहळू निर्गुणत्वच प्राप्त होतं अपराजिता, तू ज्यावेळी भागवतधर्म कथन केलास तेव्हाच तू सर्वांना जिंकलंस. इतर काम्य धर्मांप्रमाणे भागवत धर्मात पुरुषांना विषम बुद्धी होत नाही. भगवन्, शत्रुमरणादी कामनेनं सांगितलेला काम्यधर्म रागद्वेषानं युक्त असल्यामुळं अशुद्ध आहे. त्याचं फल नश्वर असल्यामुळे तो विनाशी आहे. तो हिंसेमुळे अधर्ममय झाला आहे. आपणांला व इतरांना ज्यात

पीडा होते असा धर्म दुसऱ्याचं कल्याण कसं करणार ? अतिक्लेशानं जीवास पीडा दिली की तो अधर्म होतो.

'परमेश्वरा, ज्या दृष्टीनं तू भागवतधर्म सांगितलास तो परमार्थाला सोडून कधीच असत नाही. भगवन्, तुझ्या दर्शनानं सर्वांची पातकं नाहीशी होतात. तुझं नाव एकदा जरी ऐकलं तरी चांडाळही मुक्त होतो. तुझ्या दृष्टीनं आमच्यांतील दोष दूर होतात. आम्ही कृतार्थ होतो. तुमच्या परमभक्त नारदांनी सांगितलं ते खोटं कसं होईल ? अनंता, तुला, परमगुरूला आम्ही कळविण्यासारखं काय आहे बरं ? अत्यंत शुद्ध अशा तुला भगवंताला नमस्कार असो. ज्याच्या हालचालीनं ब्रह्मादिक आपले व्यापार करू लागतात, ज्याच्यामुळं ज्ञानेंद्रियं आपापले विषय अवलोकन करतात, ज्याच्या मस्तकावर हे भूमंडळ मोहरीप्रमाणं भासत आहे, जो सहस्र मस्तकांनी युक्त आहे, त्या तुज भगवंताला नमस्कार असो.'

चित्रकेतूने भगवान अनंतांची स्तुती केल्यावर तो विद्याधरपती सांगू लागला,

'राजा, नारदांनी व अंगिरांनी केलेल्या उपदेशामुळं, विद्येच्या योगानं आणि माझ्या दर्शनानं तू कृतार्थ झाला आहेस. राजा, भूतांचा प्रकाशक, भूतांचं कारण मीच असल्यामुळं सर्व भूतं व त्यांचा आत्मा मीच आहे. राजन्, शब्दब्रह्म, परब्रह्म ही दोन्ही माझीच रूपं आहेत. आत्मस्वरूप ब्रह्म मीच आहे. मी ज्ञानरूप प्रकाश आहे. या मद्रूप ब्रह्माचं पुरुषाला विस्मरण झालं तर, तो स्वतःला आत्मस्वरूपाहून निराळा मानू लागला तर त्याला जन्ममरणांचा संसार प्राप्त होईल. मनुष्ययोनी प्राप्त होऊनही जो आत्मज्ञान करून घेत नाही, त्याला कोणत्याही योनीत मोक्ष प्राप्त होणार नाही. विवेकी पुरुषानं वासनेचा त्याग करावा. स्त्री-पुरुष जी कर्मं करतात त्यांपासून त्यांना दुःखाची निवृत्ती होत नाही की, सुखाची प्राप्ती होत नाही. उद्योगात आम्ही प्रवृत्त आहोत, असं म्हणणाऱ्या पुरुषांनाही फलप्राप्ती होत नाही. म्हणून आत्म्याचं अत्यंत सूक्ष्म रूप जाणून पुरुषानं विवेकानं ऐहिक व पारलौकिक विषयांपासून मुक्त व्हावं. माझ्या सेवेत राहून भक्त व्हावं. राजा, योग-

मार्गात ज्यांची बुद्धी तीक्ष्ण आहे अशांनी परमात्मा सर्वत्र एकरूपानं व्यापून राहिला आहे असं जाणावं. तू सावधान चित्तानं हे माझं उपदेश-रूप भाषण ऐक, म्हणजे ज्ञान व विज्ञान यांनी युक्त होऊन तू लौकरच माझ्या स्वरूपाला पावशील.'

याप्रमाणे चित्रकेतू राजाला ज्ञानाचा उपदेश करून विश्वात्मा श्रीहरी अंतर्धान पावले.

## चित्रकेतूस वृत्रासुराचा जन्म

ज्या दिशेने उपदेश करून श्रीहरी गुप्त झाले त्या दिशेस नमस्कार करून तो चित्रकेतू विद्याधर आकाशमार्गाने संचार करू लागला. कित्येक लक्ष वर्षे त्याचे बल, इंद्रियसामर्थ्य कमी झाले नाही. मुनी, सिद्ध, चारण नेहमी त्याची स्तुती करीत. तो महायोगी चित्रकेतू ईश्वराचे गायन करीत मेरुपर्वताच्या गुहेत विद्याधरांच्या स्त्रियांसह क्रीडा करू लागला.

एके दिवशी तो विमानातून संचार करीत असताना त्याने सिद्ध-चारणांनी वेष्टिलेल्या व ऋषींच्या सभेत पार्वतीला मांडीवर घेऊन, आपल्या बाहूंनी तिला आलिंगन देऊन बसलेल्या महादेवांना पाहिले. देवी पार्वतीच्या जवळ जाऊन तो हसून मोठ्याने म्हणाला,

'अहो, सर्व लोकांचा हा साक्षात गुरू, देहधारी मनुष्यांत मुख्य, सर्वांना धर्म सांगणारा हा शंकर, सभेत आपल्या भार्येशी एकरूप होऊन बसला आहे ! जटा धारण करून तपश्चर्या करणारा हा ब्रह्मवादी सभापती एखाद्या विषयासक्त पुरुषाप्रमाणं निर्लज्ज होऊन स्त्रीला मांडीवर घेऊन बसला आहे ! अतिनिकृष्ट लोकही एकांतात स्त्रीला मांडीवर घेतात. हा तर व्रतस्थ असूनही भर सभेत स्त्रीला मांडीवर धारण करून बसला आहे !'

राजाचे हे भाषण ऐकून भगवान महादेव, त्यांचे अनुयायी सर्वजण मौन धारण करून स्तब्ध झाले. मीच केवढा जितेंद्रिय आहे, असा अभिमान धारण करणाऱ्या त्या गर्विष्ठ चित्रकेतूस पार्वती रागाने म्हणाली,

'सांप्रत या लोकी दंडधारी राजा, आम्हांसारख्या निर्लज्ज

दुष्टांचा निषेध करणारा हाच एक शास्ता आहे काय ? कमलयोनी ब्रह्मदेव, भृगू, नारद, सनत्कुमार, कपिल, मनू हे सुद्धा शास्त्राचे अतिक्रमण करून महादेवांना दोष देत नाहीत. त्यांना काय धर्म समजत नाही ? ब्रह्मादिकांनी ज्यांच्या चरणकमलांचं ध्यान करावं अशा या धर्ममूर्ती महादेवांना शिकविणाऱ्या या क्षत्रियाधम चित्रकेतूस दंड करणंच उचित आहे. साधूंनी सेविलेल्या श्रीविष्णूंच्या चरणांपर्यंत जाण्यास हा योग्य नाही. मीच श्रेष्ठ आहे, असा याला गर्व झालेला आहे. हा उद्धट बनला आहे. दुर्मती, चित्रकेतू, तू महापातकी अशा असुरयोनीत जन्म घे. म्हणजे पुन्हा तू असा मोठ्या लोकांचा अपमान करणार नाहीस.'

पार्वतीची ही शापवाणी ऐकताच चित्रकेतू विमानातून खाली उतरला व मस्तक लववून पार्वतीस म्हणाला, 'अंबिके, मी आपल्या ओंजळीनं तुझ्या शापाचा स्वीकार करतो. देवांनी आम्हा मर्त्यांना जे सुखदुःख सांगितलेलं असतं ते पूर्वकर्मानंच प्राप्त होतं. हा या संसारचक्राचाच स्वभाव आहे. यात आश्चर्य असं काही नाही. अज्ञानानं मोहून प्राणी या चक्रात भ्रमण करून सुखदुःखांचा भोग भोगीत असतो. मी अयोग्य भाषण केलं. तू मला शाप दिलास; यांत माझा वा तुझा दोष नाही. या जगतात सुखाचा कर्ता आपण व दुःखाचा तेवढा दुसरा, असं कधी नसतंच. अतिमूर्ख मनुष्य सुखाचा कर्ता आपण, दुःखाचा दुसरा, असं मानतो. अंबिके, ईश्वराच्या ठिकाणी प्रिय, अप्रिय असं काही नाही. तथापि, प्राण्यांना आपल्या कर्मानुसार सुख-दुःखं भोगावी लागतात. कोपिष्ठ पतिव्रते, शापातून मुक्त होण्यासाठी मी तुझी प्रार्थना करीत नाही. माझं हे बोलणं तुला अयोग्य वाटतं: म्हणून तू क्षमा कर.'

इतके म्हणून चित्रकेतू राजा शिवपार्वतीस प्रसन्न करून विमानातून निघून गेला. देव, ऋषी, दैत्य, सिद्ध, पार्षदगण यांच्या देखत भगवान रुद्र पार्वतीला म्हणाले, 'सुंदरी, श्रीहरींच्या श्रेष्ठ व निःस्पृह दासाचं माहात्म्य तू ऐकलंस ? स्वर्ग, मोक्ष, नरक हे सारखेच मानण्याचा त्यांचा स्वभावच बनला आहे. नारायणांचे हे भक्त कोणतंच भय बाळगीत नाहीत. ज्ञान आणि वैराग्य यांनी युक्त होऊन जे भगवान वासुदेवांची

भक्ती करतात त्या पुरुषांना चांगला आश्रय असा पदार्थच नाही. शिव म्हणजे मी, ब्रह्मदेव, सनत्कुमार, नारद, मुनी, इंद्रादिक देव इत्यादींना त्यांच्या लीला ध्यानात येत नाहीत. पार्वती, समदृष्टीचा व शांतवृत्तीचा हा महाभाग्यवान चित्रकेतू राजा त्या परमेश्वराचा भक्त असल्यानं मलाही प्रिय आहे. म्हणूनच मी त्याच्यावर रागावलो नाही.'

शिवांचे भाषण ऐकून उमादेवीचा राग शांत झाला. उलट शाप देण्याचे सामर्थ्य असूनही चित्रकेतूने पार्वतीचा शाप मान्य केला. दुसऱ्यांनी उपकार केला तर आपण उलट अपकार न करणे हेच साधूंचे लक्षण आहे. पुढे तो चित्रगुप्त असुरयोनीत वृत्रासुर या नावाने प्रसिद्ध झाला. वृत्रासुर असुर का ? त्याची भगवंतांच्या ठिकाणी एवढी भक्ती का ? या प्रश्नांची उत्तरे परीक्षितास शुकाचार्यांनी दिली. प्रातःकाली उठून जो श्रीहरींचे स्मरण करून हा कथाभाग वाचील, ऐकवील त्याला उत्कृष्ट गती प्राप्त होईल.

## जयविजय द्वारपालांना शाप

एकदा परीक्षित राजाने शुकाचार्यांना विचारले, 'मुने, भगवान सर्व भूतांचं हित करतात. त्यांची सर्वत्र समदृष्टी असते. मग त्यांनी इंद्राची बाजू घेऊन शत्रूप्रमाणे दैत्यांचाच वध का केला ? साक्षात परमानंदस्वरूपी विष्णूंना देवांना प्रसन्न करून कोणता कार्यभाग साधायचा होता ? मग देवांवर त्यांची एवढी प्रीती का ? असुरांपासून त्यांना भीती नाही. मग त्यांचा एवढा द्वेष ते का करतात ? श्रीनारायणांच्या गुणांविषयीच आम्हांस संशय उत्पन्न झाला आहे.'

परीक्षिताच्या या प्रश्नांची उत्तरे देताना शुकाचार्यांनी त्याला ईश्वरभक्ती वाढविणाऱ्या भक्त प्रल्हादाच्या आख्यानाची पार्श्वभूमी समजावन दिली. भगवान हे मायातीत, निर्गुण, जन्मादी विकारविरहित असूनही आपल्या मायेच्या सत्त्वादी गुणांत प्रवेश करून दुष्टांना शिक्षा करतात. सत्त्व, रज, तम हे गुण परमात्म्याचे नसून प्रकृतीचे आहेत. सत्त्वगुणाच्या जयकाळी परमात्मा देव आणि ऋषी यांच्या देहांत प्रवेश करतो. रजोगुणाच्या जयकाळी तो असुरांच्या देहांत प्रवेश करतो. तमो-

गुणाच्या जयकाळी तो यक्ष व राक्षस यांच्या देहांत प्रवेश करतो. ईश्वर द्वेषादी विकारांनी रहित असताना त्याने दैत्यांचा वध का केला ? असा प्रश्न राजसूययज्ञाच्या प्रसंगी पूर्वी युधिष्ठिराने नारदांना केला होता. राजसूययज्ञात शिशुपालास प्राप्त झालेले सायुज्यपद पाहून पांडुपुत्र धर्मराजाला फार आश्चर्य वाटले होते. तेव्हा नारदमुनींनी त्याला सांगितले, ‘धर्मराजा, निंदा, स्तुती, सत्कार, तिरस्कार यांचं ज्ञान प्रकृतिपुरुषांचा भेद न मानताही शरीराच्या रचनेतून होतं. देहादिकांच्या अभिमानानं प्राण्याला ताडण व निंदा इत्यादी प्राप्त होतात. हा अभिमान आणखी दृढ झाला की, प्राण्याचा वध केल्याचं पाप लागतं. पण हे ईश्वरास लागत नाही. कारण त्याला प्राण्यांसारखा अभिमान नसतो. परमात्मा दैत्यांच्या हितासाठी त्यांना दंड करतो. त्याला हिंसा-दोष कसा लागणार ? म्हणून वैराग्य, भक्तियोग, भय, स्नेह, काम यांपैकी कोणत्याही कारणानं ईश्वराच्या ठिकाणी मन एकाग्र करावं. त्यानंतर ईश्वराशिवाय दुसरी वस्तूच दिसत नाही. राजा, काम, द्वेष, भय, स्नेह अथवा भक्ती यांनी ईश्वरात मन लावून पातकांचं निरसन करून अनेकांनी सायुज्यगतीची प्राप्ती करून घेतली आहे. कामाच्या योगानं गोपी, भयानं कंस, द्वेषानं शिशुपालादी राजे, संबंधानं यादव, स्नेहामुळं पांडव व धर्मराजा, भक्तीनं आम्ही त्याच्या स्वरूपाला जाऊन पोचलो आहोत.

**गोप्यः कामाद्भयात्कंसो द्वेषाच्चैद्यादयो नृपाः ।**
**संबन्धाद्वृष्णयः स्नेहाद्यूयं भक्त्या वयं विभो ॥**

तात्पर्य असं की, कोणत्याही उपायानं श्रीकृष्णांच्या ठिकाणी मन लावावं. पांडुपुत्रा, शिशुपाल, दंतवक्त्र हे तुमचे मावसभाऊ विष्णूंच्या पार्षदांपैकी असून ब्राह्मणांच्या शापामुळं ते वैकुंठापासून च्युत झाले.’

‘मुने, हरींच्या या भक्तांवर संकटं आणणारा असा तो शाप कोणता ? कुणी दिला ? हा शाप तर मला असंभवनीय वाटतो. श्रीहरींच्या एकनिष्ठ भक्तांना जन्म प्राप्त होणं हे कसं संभवतं ? आपण हा वृत्तान्त सांगावा.’

नारदांनी धर्मराजाला तो सर्व वृत्तान्त ऐकविला. एकदा सनत्कुमार, सनक, सनंदन, सनातन हे ब्रह्मदेवांचे चार पुत्र संचार करीत भगवंतांच्या इच्छेनें वैकुंठास गेले. मरीचिप्रभृती, प्रजापती इत्यादी यांच्याही आधी उत्पन्न झालेले हे मुनी पाच-सहा वर्षांच्या मुलांसारखे असून नग्न होते. द्वारपालांनी त्यांना मुले समजून प्रवेश दिला नाही. त्यांनी रागावून द्वारपालांना शाप दिला. 'तुम्ही तमोगुण व रजोगुण यांनी रहित असलेल्या या मधुसूदनांच्या पायांपाशी राहाण्यास लायक नाहीत. मूढांनो, तुम्ही असुरयोनीत जन्म घ्याल.' या शापाप्रमाणे ते आपल्या स्थानापासून भ्रष्ट होत असताना तीन जन्मांनंतर शापमुक्त व्हाल, असे मुनींनी त्यांना पुन्हा सांगितले.

त्यानंतर ते दोघे द्वारपाल दैत्य-दानव यांना पूज्य असे दितीचे पुत्र झाले. त्यांतील हिरण्यकशिपू हा ज्येष्ठ व हिरण्याक्ष हा लहान होता. श्रीहरींनी नृसिंहावतार घेऊन हिरण्यकशिपूचा वध करून पृथ्वीचा उद्धार केला. वराहावतार घेऊन श्रीहरींनी हिरण्याक्षाचाही वध केला. हिरण्यकशिपूने भक्त प्रल्हाद या आपल्या पुत्रास नाना प्रकारच्या यातना दिल्या. अनेक उपायांनीही प्रल्हादाचा वध होऊ शकला नाही.

नंतरच्या जन्मी ते दोघे विश्रवा नावाच्या ऋषींच्या व केशिनी नावाच्या स्त्रीच्या पोटी जन्मास आले. रावण व कुंभकर्ण या नावांनी प्रसिद्ध होऊन त्यांनी सर्व लोकांना अतिशय पीडा दिली. त्यांच्या वधासाठी श्रीहरींनी श्रीरामांचा अवतार धारण केला. रावण व कुंभकर्ण तिसऱ्या जन्मी क्षत्रिय बनून युधिष्ठिराचे मावसबंधू शिशुपाल व दन्तवक्त्र या नावांनी प्रसिद्धीस आले. श्रीकृष्णांच्या सुदर्शनचक्राने त्यांना उत्तमगती मिळाली.

हा सर्व वृत्तान्त ऐकून युधिष्ठिराने नारदांना विचारले, 'नारदा, भक्त पुत्राविषयी हिरण्यकशिपूचा एवढा द्वेष का वाढला? त्या प्रल्हादानं अच्युतांच्या ठिकाणी मन एकाग्र कसं केलं?'

## राजा सुयज्ञाची कथा

वरील प्रश्नाचे उत्तरही नारदांनी विस्ताराने दिले. वराहरूप

धारण करून श्रीहरींनी हिरण्याक्षाचा वध केला. त्यामुळे हिरण्यकशिपू रागाने लाल झाला. त्याच्या शरीराला कंप सुटला. तो आपलेच ओठ चावू लागला. क्रोधाने त्याचे डोळे अत्यंत प्रज्वलित झाले. सर्व आकाश त्याला धूम्रवर्णाचे वाटले. भयंकर दाढांमुळे त्याची दृष्टी उग्र झाली. वाकड्या भुवयांमुळे त्याचे मुख पाहाण्याची भीती वाटू लागली. अशा मनःस्थितीत असताना तो हिरण्यकशिपू हातातील शूळ वर उचलून सभेतील दानवांना म्हणाला,

'शकुनी, इतर दानवांनो, द्विमूर्धन्, त्र्यक्षा, शंबरा, शतबाहो, हयग्रीवा, नमुचे, पाका, इल्वला, विप्रचित्ते, पुलोम्या, आता तुम्ही मी सांगतो तसं ऐका. त्या समदृष्टीच्या श्रीहरींनी देवांकडून माझ्या भावाचा वध केला. त्या श्रीहरीचा कंठ आता मी या शूळानं विदीर्ण करून टाकीन. त्यातील रक्तानं मी भावाचं तर्पण करीन. तरच माझ्या अंत:करणाची व्यथा शांत होईल. वृक्षाचं मूळ तोडलं की शाखा आपोआप शुष्क होतात. त्याप्रमाणं तो कपटी श्रीहरी नाहीसा झाला की, देव स्वत:च नष्ट होतील. विष्णू हाच त्यांचा प्राण आहे. म्हणून आता, या क्षणी तुम्ही ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या युद्धभूमीवर जा व तिथं जे यज्ञ, तप, वेदांचं अध्ययन, व्रत, दान करीत असतील त्यांचा नाश करा. हा पुरुषोत्तम विष्णू यज्ञस्वरूप असून ब्राह्मणांचं अनुष्ठान हे त्याचं मूळ आहे. देव, ऋषी, पितर, भूते, धर्म यांचाही प्रमुख आश्रय तोच आहे. जिथं द्विज, गायी, वेद, वर्णाश्रम इत्यादी कर्मं चालली असतील ती जाळून टाका.'

हिरण्यकशिपूची आज्ञा मान्य करून हिंसाप्रिय दानव लोकांचा संहार करू लागले. नगरे, गावे, गोठे, बागा, शेते, आरामस्थाने, ऋषींचे आश्रम, खाणी, शेतकऱ्यांची घरे, डोंगरदऱ्यांतील खेडी, गौळीवाडे, राजधान्या त्या दानवांनी दग्ध करून टाकल्या. काहींनी पूल पाडले. वेशी पाडल्या. काहींनी वृक्ष तोडून टाकले. काहींनी लोकांची घरे जाळून टाकली. यज्ञयाग बंद झाल्यामुळे देवांना हविर्भाग मिळेनासा झाला. स्वर्गाचा त्याग करून देव गुप्तरूपाने पृथ्वीवर हिंडू लागले.

हिरण्यकशिपूने आपल्या भावाचे उत्तरकार्य केले व त्याच्या पुत्रांचे सांत्वन करून तो शकुनी, शंबर, धृष्ट, भूतसंतापन, वृक, कालनाभ,

महानाभ, हरिश्मश्रू, उत्कच इत्यादींना व रुषाभानू नावाच्या मातेला, दिती मातेला म्हणाला, 'आता तुम्ही हिरण्याक्षाचा शोक करणं योग्य नव्हे. शत्रूंनी केलेला वध हा शूरांना स्तुत्य असाच असतो. तुम्ही शोक आवरावा. मृतपुरुषाचे स्त्रीपुत्रादिक आप्त आणि यम यांच्या संवादरूप इतिहासाचं तुम्ही श्रवण करावं.'

हिरण्यकशिपूनें एक जुना इतिहास सर्वांना निवेदन केला. उशीनर देशात सुयज्ञ नावाचा एक प्रसिद्ध राजा होता. शत्रूंनी त्याचा रणांगणावर वध केला. त्याचे सर्व नातेवाईक त्याच्या शवाजवळ बसून शोक करू लागले. त्याच्या रत्नमय कवचाचे तुकडे झाले होते. देहावरील भूषणे, माळा गळून गेल्या होत्या. हृदय बाणांनी विद्ध झाले होते. सर्वांग रक्तानें माखून गेले होते. त्याचे केस अस्ताव्यस्त होऊन गेले होते. डोळे बाहेर आले होते. आवेशाने चावलेला त्याचा ओठ मुरडला गेला असून मुख धुळीनें भरले होते. त्याची आयुधे, त्याच्या भुजा युद्धात छिन्नविच्छिन्न झाल्या होत्या.

त्याचे सर्व संबंधित आप्त दु:खीकष्टी झाले. आपला सर्व घात झाला असे बोलून सर्व राण्या ऊर बडवून घेत होत्या. उच्च स्वरांत रडणाऱ्या त्या स्त्रियांच्या डोळ्यांतील अश्रूंनी त्यांच्या स्तनांवरील केशर धुऊन जात होते. त्यांनी केस मोकळे सोडले होते. अलंकार टाकून देऊन त्या आक्रोश करीत होत्या. त्यांच्या पतीच्या शवाला वारंवार आलिंगन देऊन त्या दहनाची इच्छाही करीत नव्हत्या. विलाप करता करता सूर्य मावळला तेव्हा प्रत्यक्ष यम स्वत:च बालरूपाने तेथे आला व तो शोक करणाऱ्यांची समजूत करू लागला. तो त्यांना म्हणाला,

'अहो, काय आश्चर्य हो ! या लोकांना केवढा हा मोह झाला आहे. प्राणी अव्यक्त रूपापासून आला. तिथंच तो परत गेला. मग हा शोक व्यर्थंच नव्हे काय ? मूढांनो, ज्याकरता तुम्ही इथं शोक करता आहात तो तुमचा पती तर इथंच शयन करीत आहे. मग तुम्ही शोक कुणासाठी करीत आहात ? बायांनो, तो आत्मा तर प्राण व देह यांच्याहून वेगळा आहे. तो सचेतन आहे. आत्म नित्य व देह अनित्य आहे. असं मानल्यानं शोक कमी व्हावा. पण ज्ञान दृढ झाल्यावाचून हा शोक कमी

होत नाही.

'बायांनो, कोणत्या तरी एका अरण्यात पक्ष्यांना मारणारा एक पारधी होता. जिथं पक्षी धान्यकणांसाठी जमत तिथं तो त्यांच्यासाठी जाळं पसरून ठेवी. एकदा तिथंच कुलिंग पक्ष्यांचं जोडपं भ्रमण करीत असताना व्याधाला दिसलं. त्यांपैकी कुलिंगीला त्यानं धान्यकण दाखवून मोहित केलं. काळानं प्रेरित होऊन ती कुलिंगी त्या जाळ्यात अडकली. पक्षीण अडकलेली पाहाताच पक्ष्यानं अत्यंत दुःख व्यक्त केलं. तिला सोडविण्यास तो अगदी असमर्थ होता. तो दीन होऊन प्रेमाच्या पोटी एका वृक्षावर बसून विलाप करू लागला. तो म्हणाला, 'अरे, निर्दय ब्रह्मदेवा, माझ्या दीन स्त्रीला नेऊन तू काय करणार रे? या विधुरावस्थेत मी दुःखानं करू तरी काय? हा यमराज आता मलाही घेऊन जावो. परमेश्वरा, माझी दुर्दैवी मुलं घरट्यात चाऱ्यासाठी मातेची वाट पाहात आहेत. त्यांना अद्यापि पंखही फुटलेले नाहीत. त्या पोरक्या पिलांचं मी आता पोषण कसं करू?' असा शोक तो कुलिंगपक्षी करीत असताना त्याच पारध्याने त्या पक्ष्यास बाण मारला. मूढ स्त्रियांनो, तुम्ही त्या पक्ष्याप्रमाणं दीर्घकाळ शोक करणार काय? तरी हा पती काही तुम्हांला प्राप्त नाही होणार.'

त्या बालकाचे हे भाषण ऐकून सुयज्ञाचे नातेवाईक मनात विस्मयचकित झाले. हे सर्व जग अनित्य असून ते मिथ्याच असे त्यांनी मानले. हे सर्व आख्यान सांगून यमधर्म तेथेच गुप्त झाला. नातेवाईकांनी सुयज्ञाचे उत्तरकार्य केले. दैत्याधिपती हिरण्यकशिपूचे हे भाषण ऐकून दितीनेही पुत्रशोक सोडून दिला. आपले मन आत्मचिंतनात रमविले.

## हिरण्यकशिपूस अनेक वरांची प्राप्ती

त्यानंतर आपण अजिंक्य व्हावे, अमर व्हावे, शत्रुशून्य व्हावे, अद्वितीय प्रभू व्हावे, असे हिरण्यकशिपूने ठरविले. त्याने मंदारपर्वताच्या दरीत राहून वर आकाशात दृष्टी ठेवून, बाहू वर करून, एका पायाच्या अंगठ्यावर उभे राहून उग्र तपश्चर्या केली. प्रलयकाळाच्या सूर्याप्रमाणे तो जटांच्या कांतीने शोभू लागला. तो या तपात गुंतला असताना गुप्त-

रीतीनें भूमीवर फिरत असलेले देव आपापल्या स्थानांवर गेले. त्या हिरण्यकशिपूच्या मस्तकातून धुरासह निघालेला अग्नी सर्वत्र पसरून सर्व लोक अतिशय संतप्त झाले. नद्या व समुद्र क्षुब्ध झाले. द्वीपे व पृथ्वी कापू लागली. ग्रहांसह अनेक नक्षत्रे निखळून पडली. दहाही दिशा प्रज्वलित झाल्या. अग्नीनें तापलेले देव स्वर्ग सोडून ब्रह्मलोकात गेले. त्यांनी ब्रह्मदेवांना विनंती केली,

'जगत्पती, देवाधिदेवा, दैत्य हिरण्यकशिपू तप करीत आहे. त्याच्या प्रखर तेजामुळं आम्ही स्वर्गात राहू शकत नाही. देवा, तुमची पूजा करणाऱ्यांचा जोपर्यंत नाश झाला नाही तोपर्यंत तुम्ही त्याचं रक्षण करावं. जगदीशा, असं दुर्धर तप करणाऱ्या हिरण्यकशिपूचा संकल्प तुम्हांस माहीत नाही ? त्यानं असा निश्चय केला आहे की, ब्रह्मदेव ज्या सर्वश्रेष्ठ स्थानावर बसले आहेत ते स्थान आपणही प्राप्त करून घ्यावं. काळ नित्य व आत्माही अमर आहे. तपोबलानं त्यानं हे जग अगदी निराळं बनवायचं ठरविलं आहे. वैष्णवांच्या स्थानांची त्याला गरजच नाही. देवा, याप्रमाणं त्यानं तुमचं स्थान घेण्यासाठी हे खडतर तप आरंभिलं आहे. ब्रह्मदेवा, आता तुम्ही काय योग्य असेल तसं करा. द्विज व गायी यांना सुख, ऐश्वर्य द्यायचं तुमचं काम.'

देवांनी ब्रह्मदेवांची अशी प्रार्थना केल्यावर ब्रह्मदेव हिरण्यकशिपूच्या आश्रमाकडे गेले. त्याला तेथे हिरण्यकशिपू दिसला नाही. वारुळे, गवत, वेळूची बेटे इत्यादींनी त्याचे शरीर आच्छादून गेले होते. त्यातील मांस, त्वचा, मेद, रक्त मुंग्यांनी खाऊन टाकले होते. थोड्या वेळाने आपल्या तपाने लोकांना त्रास देणाऱ्या हिरण्यकशिपूस ब्रह्मदेवांनी पाहिले. त्याला पाहून विस्मित झालेले ब्रह्मदेव म्हणाले,

'कश्यपपुत्रा, हिरण्यकशिपू, तुझं कल्याण असो. तपाच्या योगानं तू कृतार्थ बनला आहेस. मी तुला वर देण्यासाठी इथं आलो आहे. तू मजपासून इच्छित वर माग. हे तुझं उग्र तप मी पाहात आहे. वनमक्षिकांनी तुझा देह भक्षण केला आहे. केवळ अस्थींचा आश्रय घेऊनच तुझे प्राण शिल्लक आहेत. असं तप पूर्वी ऋषींनीही केलेलं नाही. पुढंही कुणी करतील असं नाही. दितिपुत्रा, तू असं तप करून खरोखरच

मजवर विजय मिळविला आहेस. असुरश्रेष्ठा, मी तुझे सर्व मनोरथ पूर्ण करीन.'

असे म्हणून ब्रह्मदेवांनी आपल्या अमोघ सामर्थ्याच्या कुंडलातील जलानें मुंग्यांनी खाल्लेल्या हिरण्यकशिपूच्या देहावर प्रोक्षण केले. त्याबरोबर हिरण्यकशिपूची मानसिक व शारीरिक शक्ती संपन्न झाली. त्याचे सर्व अवयव सुदृढ झाले. त्याचे शरीर वज्रासारखे संपन्न झाले. त्याच्या शरीराची कांती तापलेल्या सुवर्णासारखी होती. काष्ठातून जसा अग्नी प्रकट होतो तसा वारूळातून हिरण्यकशिपू प्रकट झाला. समोर असलेल्या ब्रह्मदेवांना पाहून त्याला अतिशय आनंद झाला. त्यानें त्यांना साष्टांग नमस्कार घातला. त्याच्या डोळ्यांत आनंदाश्रू जमा झाले होते. शरीरावर रोमांच प्रकट झाले. त्याने हात जोडून ब्रह्मदेवांची स्तुती करताना म्हटले,

'आपणच या जगतास प्रकाशित केलं. रज, तम, सत्त्व या तीन गुणांना आश्रयभूत असलेल्या आपणांस नमस्कार असो. आपणच सर्वांचं आदिभूत बीजकारण आहात. ज्ञान आणि विज्ञान ही आपलीच रूपं आहेत. प्राण, इंद्रियं, मन व बुद्धी यांच्यामुळं आपण व्यक्त होता. आपणांस नमस्कार असो. विधात्या, आपणच चित्त, चेतना, मन व इंद्रियं यांचे स्वामी आहात. आकाशादी भूतं, शब्दादी विषय, त्यांसंबंधी वासना यांचे आपण उत्पादक आहात, होता. अध्वर्यू इत्यादी ऋत्विजांनी युक्त अशा यज्ञाचं प्रतिपादन वेदांच्या रूपानं आपणच करता. आपणच प्राण्यांचा आत्मा, अनादी, अखंड व सर्वज्ञ आहात. आपणच नित्य जागृत असून लोकांचं आयुष्य क्षीण करता. देवा, स्थावर अथवा जंगम असं कोणतंच कारण वा कार्य तुमच्याशिवाय निराळं नाही. विधात्या, विद्या व कला या सर्व तुझ्याच तनू आहेत. सर्वव्यापका, हे व्यक्त ब्रह्माण्ड म्हणजेच तुमचं स्थूल शरीर आहे. आपणच उपाधिशून्य ब्रह्मरूप व पुराणपुरुष आहात. अनंता, आपल्याच अव्यक्तरूपानं हे सर्व जग व्यापलेलं आहे. आपणांस नमस्कार असो. देवा, आपण वर देणार असाल तर मला आपण उत्पन्न केलेल्या भूतांपासून मृत्यू न यावा. घराच्या आत, घराच्या बाहेर, दिवसा, रात्री, भूमीवर वा आकाशात,

मनुष्य, मृग, असुर, देव, महानाग अशा सचेतन-अचेतन वस्तूंपासून मला मृत्यू न यावा. आपल्या महिम्याप्रमाणंच माझा महिमा वाढावा व मला युद्धात कुणीच प्रतिपक्षी नसावा. सर्व प्राण्यांचा अधिपती मी एकटाच असावा. तप, योग यांनी प्राप्त झालेलं अणिमादी ऐश्वर्य मला प्राप्त व्हावं. देवा, असे वर आपण मला द्यावेत.'

हिरण्यकशिपूच्या तपानें ब्रह्मदेव संतुष्ट झाले होते. त्यांनी त्याला ते अत्यंत दुर्लभ असे वर दिले. हिरण्यकशिपूनें वरदात्या ब्रह्मदेवांची पूजा केली व तो स्वस्थानी निघून गेला.

## हिरण्यकशिपूचे ऐश्वर्य, प्रल्हादाचे माहात्म्य

वर प्राप्त झालेला हिरण्यकशिपू आपल्या मृत भावाचे स्मरण करून भगवंतांचा द्वेष करू लागला. त्या महादैत्यानें सर्व दिशा, तीनही लोक, देव, असुर, मानव, गंधर्व, गरुड, नाग, सिद्ध, चारण, विद्याधर, ऋषी, पितृगण, मनू, यक्ष, राक्षस, पिशाच, प्रेते, भूते इत्यादींना जिंकून सर्वांना आपल्या अधीन करून घेतले. त्यांची स्थानें त्यानें त्यांच्या तेजासह हरण केली. तो हिरण्यकशिपू त्यानंतर देवांच्या स्वर्गात गेला. तेथील विश्वकर्म्यानें निर्माण केलेले त्रैलोक्यलक्ष्मीचे वसतिस्थान, समृद्धीचे मंदिर यातच तो राहू लागला. इंद्राच्या या मंदिरात पोवळ्यांच्या व पाचेच्या फरसबंद्या असून स्फटिकांच्या भिंती होत्या. वैडुर्यमण्यांचे खांब होते. सर्वत्र चित्रविचित्र चांदवे लावले असून ठिकठिकाणी पद्मरागमण्यांची आसनें मांडलेली होती. सभोवती मोत्यांचे सर लोंबत असून हस्तिदंती दुधाच्या फेसासारख्या मृदू व शुभ्र शय्याही होत्या.

त्या इंद्रमंदिरात रुणझुणू वाजणाऱ्या तोरड्या पायांत घालून एकमेकींना हाक मारणाऱ्या देवांगना रत्नांच्या फरशांत प्रतिबिंबित झालेल्या आपल्या सुंदर मुखांना अवलोकन करीत होत्या. अशा या सुंदर मंदिरात दैत्यराज हिरण्यकशिपू आनंदानें रममाण झाला. ताप पावलेले देवही त्याच्या पायांना वंदन करू लागले. तो नेहमी उग्र वासाचे मद्य घेत असे. त्यामुळे त्याचे डोळे नेहमी धुंद व आरक्त दिसत.

ब्रह्मा, विष्णू, महेश यांच्याशिवाय सारे लोकपाल त्याच्या सेवेस हातांत नजराणे घेऊन नेहमी उपस्थित असत. या हिरण्यकशिपूचे गायन विश्वावसू, तुंबुरू, गंधर्व, सिद्ध, ऋषी, विद्याधर, अप्सरा वारंवार करू लागले. ब्राह्मणादी लोक बहुदक्षिणायुक्त अशा यज्ञांनी त्याचीच आराधना करू लागले. तोही मोठ्या ऐटीनें हविर्भाग ग्रहण करू लागला. त्याच्या राज्यात पृथ्वी नांगरल्याशिवायच पिकू लागली. सर्व लोक त्याचे मनोरथ पूर्ण करू लागले. अंतरिक्षात नाना प्रकारच्या आश्चर्यकारक वस्तू उत्पन्न होऊ लागल्या. खारे पाणी, मद्य, घृत, उसाचा रस, दही, दूध, गोडे पाणी यांचे समुद्र व त्यांना मिळणाऱ्या नद्या या आपल्या लाटां-बरोबर रत्नांच्या राशी आणून त्याला देऊ लागल्या. सर्व पर्वतांनी आपल्या दऱ्यांतून त्याच्यासाठी क्रीडास्थानें निर्माण केली. सर्व वृक्ष सर्व ऋतूंत फुलू लागले. फले देऊ लागले. तोच एकटा वृष्टी करणे, दहन करणे, शोषण करणे इत्यादी कामे करू लागला.

अशा रीतीनें तो हिरण्यकशिपू दिग्विजयी व निष्कंटक राज्य भोगून अनेक विषयांचा उपभोग घेऊ लागला. तो जितेन्द्रिय नसल्या-मुळे त्याची तृप्ती मात्र झाली नाही. तो ऐश्वर्यानें मत्त झाला. त्यानें शास्त्रविरुद्ध वर्तन केले. त्याच्या आग्रही तेजानें त्रासलेले लोक भगवान अच्युतांना शरण गेले. त्यांनी त्या हृषिकेशाची मनापासून स्तुती केली. त्या वेळी गंभीर मेघगर्जनेप्रमाणे आकाशवाणी झाली. 'सुरश्रेष्ठांनो, तुम्ही भय सोडावं. तुमचं सर्वांचं कल्याण असो. या दैत्याधमाचा दुष्ट-पणा मी जाणला आहे. मी त्याचा वधही करणार आहे. परंतु तुम्ही काही काळ वाट पाहावी. देव, वेद, गायी, ब्राह्मण, साधू, धर्म इत्यादींचा द्वेष करणारा लौकरच नाश पावतो. वैररहित व शांतवृत्तीच्या अशा आपल्याच प्रल्हाद नावाच्या पुत्राशी तो द्रोह करील. तेव्हा मी त्याचा वध करीन.'

जगद्‌गुरू परमात्म्यानें आकाशवाणीच्या रूपानें असे सांगितल्या-मुळे आता त्या असुराचा वध झालाच असे समजून, परमात्म्याला नमस्कार करून देव परत आपापल्या स्थानी गले. त्या दैत्याधिपतीस परमप्रतापी असे चार पुत्र होते. त्यांतील वयाने सर्वांत लहान, पण

गुणांनी मोठा असा प्रल्हाद होता. तो सत्पुरुषांचा उपासक, ब्राह्मणभक्त, शीलसंपन्न, जितेन्द्रिय व सर्व भूतांचे कल्याण चिंतणारा होता. तो दासाप्रमाणे श्रेष्ठ पुरुषांच्या चरणी नम्र, पित्याप्रमाणे दीनांवर प्रेम करणारा, आपल्या बरोबरीच्या लोकांवर भावाप्रमाणे प्रेम करणारा, गुरूंच्या ठिकाणी ईश्वरबुद्धीनें वागणारा होता. विद्या, वित्त सौंदर्य, उत्तम जन्म यांनी तो युक्त असूनही मान व गर्व यांनी रहित होता. संकटांतही त्याचे मन उद्विग्न नसे. परमात्म्याशिवाय इतर सर्व मिथ्या आहे असे त्याला वाटे. इंद्रिये, प्राण, शरीर, बुद्धी यांना त्यानें वश करून घेतले होते. असुर असूनही त्याच्या विषयवासना शांत झाल्या होत्या. असुरांचे शत्रू देवही साधुपुरुषांची चर्चा निघाली की, प्रल्हादाचीच उपमा देत असत. भगवान वासुदेवांच्या ठिकाणी त्याची स्वाभाविक अशी प्रीती होती. तो अगदी लहान बालक असून कृष्णरूप पिशाचानें त्याचे मन भारावून टाकले होते. सर्व खेळणी सोडून तो नेंहमी कृष्णाचेच चिंतन करी. बसताना, हिंडताना, भोजन करताना, शयन करताना, उदक प्राशन करीत असताना, भाषण करीत असताना तो गोविंदाशीच एकरूप झालेला असे.

आसीनः पर्यटन्नश्नन् शयानः प्रपिबन्ब्रुवन् ।
नानुसंधत्त एतानि गोविन्दपरिरम्भितः ॥

कधी त्याला भगवच्चिंतनाने रडू येई. कधी आनंदाने तो हसत असे. कधी उच्च स्वरांनी तो भगवंतांचे गुणगान करी. कधी निर्भय होऊन नृत्य करी. कधी तन्मय होऊन भगवंतांच्या लीलांचे अनुकरण करी. कधी सुखानें त्याचे अंग रोमांचित होई. कधी स्थिर प्रेमाने त्याचे नेत्र आनंदाश्रूंनी भरून येत. तो काही न बोलता स्तब्ध राही. अशा या प्रल्हादाचा द्रोह हिरण्यकशिपू करू लागला.

## प्रल्हादाचे शिक्षण

असुरांनी भगवान शुक्राचार्यांना आपला पुरोहित केले होते. शंड व अमर्क नावांचे दोन असुरपुत्र हिरण्यकशिपूच्या घराजवळ राहात होते.

राजाने आपला पुत्र नीतिशास्त्रात निपुण असतानाही त्याला अज्ञानी समजून शंडामर्कांकडे शिकण्यासाठी पाठविले. परंतु प्रल्हादाला तेथील शिक्षण पटले नाही. हा मी, हा इतर, अशा प्रकारचा अभिमान त्याला मिथ्या वाटला.

असे शिक्षण सुरू असता एकदा हिरण्यकशिपूने प्रल्हादास मांडीवर घेऊन विचारले,

'बाळा, तुला कसं वाटतंय ?'

'पिताजी, आपल्या गृहाचा त्याग करून वनात जावं, श्रीहरींना भजावं, असं मला वाटतं.'

पुत्राचे हे शब्द ऐकून हिरण्यकशिपूला हसू आले. तो म्हणाला,

'या मुलाचा बुद्धिभेद केलेला दिसतोय. शंडामर्कहो, तुम्ही गुप्तपणानं त्या विष्णंचं नाव माझ्या मुलाला शिकविलंत ? तुम्ही चांगल्या रीतीनं त्याला शिकवावं.'

स्वत: हिरण्यकशिपूने प्रल्हादाला पुरोहितांच्या घरी पोचविले. पुरोहित त्याला म्हणाले, 'बाळा प्रल्हादा, तुझं कल्याण असो. आता आम्ही विचारतो ते तू नीट सांग. खोटं सांगू नकोस. इतर मुलांहून विपरीत अशी ही बुद्धी तुला कुठून झाली ?'

'मी हा तो दुसरा, असा मिथ्या अभिमान तुमच्यासारख्यांच्या दृष्टीत आहे. पण मी मात्र त्या भगवंतांनाच नमस्कार करतो. ते भगवान अनुकूल होतील तेव्हाच ही द्वैतबुद्धी नष्ट होईल. हा परमात्माच मला ही बुद्धी देत आहे. चुंबकाजवळ जसं लोखंड भ्रमण पावतं तसं माझं चित्त त्या श्रीहरींसमीप एकाग्र होतं.'

प्रल्हादाचे हे बोलणे ऐकून राजसेवक ब्राह्मण अतिशय क्रुद्ध झाला. तो प्रल्हादाची निर्भर्त्संना करून म्हणाला, 'हे पोर आम्हांस अपयश देणारं आहे एक छडी आणा पाहू याला चांगली शिक्षा द्यायला हवी. दैत्यरूपी चंदनवृक्षात हा कंटकवृक्ष कसा उपजला ?' असे भय दाखवून त्या ब्राह्मणाने त्याला धर्म, अर्थ व काम यांचे शास्त्र पढविले. सामदामादिक चार उपाय समजावून दिले. हे त्याला सर्व समजले असे समजून गुरूने प्रल्हादास मातेकडून अभ्यंगस्नान घातले. त्याला तिलक

वगैरे लावून हिरण्यकशिपूकडे नेले. प्रल्हादाने पित्याच्या चरणांना वंदन केले. हिरण्यकशिपूनें त्याला आशीर्वाद देऊन आपल्या बाहूने पुष्कळ वेळ आलिंगन दिले. पुत्राला पाहून त्या असुरश्रेष्ठास अतिशय आनंद झाला. त्यानें त्याला आपल्या मांडीवर घेऊन, त्याच्या मस्तकास कुरवाळून प्रेमाच्या अश्रूंनी त्याच्या मस्तकास सिंचून म्हटले,

'बाळा, प्रल्हादा, तुला दीर्घ आयुष्य मिळावं. तू आतापर्यंत काय काय शिकलास ? तू जे काही ग्रहण केलंस ते सर्व म्हणून दाखीव पाहू.'

'तात, विष्णूंचं कीर्तन, श्रवण, स्मरण, पादसेवन, पूजन, वंदन, दास्य, सख्य, आत्मसमर्पण या नऊ लक्षणांनी युक्त अशी भक्ती ज्यानं निर्माण होते तेच उत्तम शिक्षण होय.'

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वादनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ।।**

पुत्राचे हे भाषण ऐकून क्रोधाने हिरण्यकशिपूचे ओठ थरथर कापू लागले. तो त्या गुरुपुत्राला म्हणाला, 'अधम ब्राह्मणा, तू हे काय केलंस ? ज्यात काही अर्थ नाही असं तू याला शिकविलंस ? मित्रत्वानं वागायचं सोडून तू असं विरुद्ध वर्तन केलंस ? तुझ्यासारखे कपटवेष धारण करणारे पातकीच होत.'

'इंद्रशत्रो, तुझ्या पुत्राला मी तो जे सांगतो आहे ते शिकविलं नाही. तर ती त्याची स्वाभाविक अशी उपजत बुद्धी आहे. राजा, आपला क्रोध शांत कर. आमच्यावर भलताच आरोप करू नकोस.'

हे ऐकून हिरण्यकशिपूनें आपल्या पुत्रास म्हटले, 'अभद्रा, तुला ही बुद्धी कुठून उत्पन्न झाली ?' हा प्रश्न ऐकून प्रल्हाद म्हणाला, 'पिताजी, ज्यांना निरंतर गृहसौख्याची चिंता असते, इंद्रियांच्या विषयांचं जे वारंवार सेवन करतात अशा पुरुषांची वृत्ती श्रीकृष्णांच्या ठिकाणी जडत नाही. ताता, ज्यांचा विषयांचा अभिमान नष्ट झाला आहे त्यांनाच ही बुद्धी निर्माण होईल.'

प्रल्हादाचे असे वचन ऐकताच हिरण्यकशिपूने रागाने त्याला आपल्या मांडीवरून ढकलून दिले. क्रोधानें त्याचे डोळे लाल झाले होते.

तो संतापानें म्हणाला, 'राक्षसांनो, याला इथून त्वरित बाहेर काढा. याचा वध करणंच योग्य आहे. आपल्या चुलत्याचा घात करणाऱ्या शत्रूच्या चरणांचं हा पूजन करतो ? पांच वर्षांचा असतानाच ज्यानं माता-पित्यांच्या स्नेहाचा त्याग केला, तो हा कृतघ्न विष्णूचं तरी हित काय करणार ? औरस पुत्र जरी अहित करणारा असेल तरी आपला शत्रू मानलं पाहिजे. आपल्या शरीराचा एखादा अवयव जरी अहित करणारा असला तर तो तोडून टाकावा. त्याच्या त्यागानं बाकीचं शरीर तरी सुखानं राहील. म्हणून तुम्ही भोजन, शयन, आसन इत्यादी ठिकाणी विषप्रयोग करून याचा वध करावा. विषयासक्त मन हे मुनीला शत्रूप्रमाणं असतं, तसाच हा पुत्रवेष धारण करणारा माझा शत्रूच आहे.'

हिरण्यकशिपूची अशी आज्ञा होताच तीक्ष्ण दाढांचे, भयानक मुखांचे, लाल केसांचे राक्षस हातांत शूळ घेऊन 'मारा, तोडा' अशी गर्जना करीत उठले. प्रल्हादाच्या मर्मस्थानी त्यांनी मारायला सुरुवात केली. पण ते प्रहार निष्फळ ठरले. कारण प्रल्हादाने आपले मन निर्विकार, निर्विषय, शस्त्रादिकांचा नियंता परमेश्वराशी निगडित केले होते. प्रल्हादाला मारण्याचा प्रयत्न अशा प्रकारे फसलेला पाहाताच हिरण्यकशिपूला फारच भीती वाटली. त्याने पुत्राच्या वधासाठी आणखी काही भयंकर उपाय योजिले. त्याने त्याला हत्तींच्या पायांखाली तुडविले. मोठमोठ्या सर्पांकडून त्याला दंश करविला. त्याच्या मागे कृत्या लाविली. त्याला पर्वत शिखरावरून लोटून दिले. खड्डयात त्याला पुरण्याचा प्रयत्न केला. त्याला विषप्रयोग करण्यात आला. त्याला उपाशी ठेविले. त्याला कडक थंडीवाऱ्यात, अग्नीत टाकण्यात आले. पाण्यात बुडविले, त्याच्या अंगावर पर्वत फेकले. पण प्रल्हाद या सर्व संकटांतून वाचला. त्यामुळे हिरण्यकशिपू चिंताभग्न झाला.

अशा वेळी शुक्राचार्यांचे पुत्र शंडामर्क त्याच्याजवळ येऊन म्हणाले, 'प्रभो, आपण असं चिंताग्रस्त होऊ नये. असुरश्रेष्ठा, शुक्राचार्यगुरू तपश्चर्या करून परत येईपर्यंत आपण याला वरुणपाशांनी बद्ध करून ठेवू.' हिरण्यकशिपूला ही योजना पसंत पडली. तो म्हणाला, 'तुम्ही

याला गृहस्थाश्रमी राजाची कर्तव्यं शिकवावीत.' त्यानंतर शंडामर्कांनी प्रल्हादाला धर्म, अर्थ व काम हे पुरुषार्थ शिकविले. गुरू एकदा काही कामासाठी दूर गेले असताना प्रल्हादानें समवयस्क मुलांना खेळण्यासाठी बोलाविले. त्या मुलांना प्रल्हादाविषयी आदर वाटत होता.

## दैत्यपुत्रांना प्रल्हादाचा ब्रह्मोपदेश

त्या दैत्यपुत्रांना प्रल्हादानें भागवतधर्म शिकविला. ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला. मनुष्यानें सकामधर्माचे आचरण करू नये. मनुष्याने विष्णूंना शरण जावे. कारण सर्व भूतांचा तोच आत्मा, ईश्वर, प्रिय आणि हितकर्ता आहे. देहाच्या योगानें इंद्रियादी सुखांची प्राप्ती दैवयोगानें होते. म्हणून त्यासाठी प्रयत्न करू नयेत. तशा प्रयत्नाने आयुष्याचा नाश होतो. त्याऐवजी मुकुंदांच्या चरणकमलांची सेवा केल्यास मनुष्याला परमानंदरूप परमात्मा प्राप्त होतो. म्हणून संसारात सापडलेल्या विवेकी पुरुषानें आपल्या शरीराचा नाश झाला नाही तोपर्यंत आत्मकल्याणाचा प्रयत्न करावा. पुरुषाचे आयुष्यच मुळी आधी शंभर वर्षांचे. त्यातील अर्धे आयुष्य अज्ञानात, इंद्रियनिग्रह न केल्याने जाते. बाल्यावस्थेत दहा वर्षे, कौमारावस्थेत दहा वर्षे, वृद्धावस्थेत वीस वर्षे, असे सारेच आयुष्य फुकट जाते. प्रबळ मोह, दुःखे यांनी हे आयुष्य व्यर्थच बनते. द्रव्य, चोर, सेवक, वाणी यांना प्राण खर्च करूनही मिळवितात. मग प्राणापेक्षा प्रिय असलेल्या द्रव्याची इच्छा कोण करणार नाही ?

विषयांची इच्छा करणारा मनुष्य तृप्त न झाल्याने स्त्रीपुत्रांच्या स्नेहपाशात बद्ध होतो. प्रिय भार्येचा एकान्त, तिच्याबरोबरची मनोहर भाषणे, मित्रांची संगत, मधुर उच्चार करणारी मुले, सासरी असलेली कन्या, भ्राते, भगिनी, वृद्ध माता-पिता, सुंदर घरे, कुलवृत्ती, पशुसमुदाय, सेवक, यांचे स्मरण करणारा त्यांचा त्याग करील कसा ? शिश्न व जिव्हा यांच्याच सुखास अधिक मानणारा विरक्त होईल कसा ? संसारी मनुष्य कुटुंबपोषणार्थ आपल्या आयुष्याचा क्षय होत आहे हे जाणीत नाही. तो कुटुंबातच रमतो. त्यात त्याला दुःख वाटतच नाही. त्याची

द्रव्याची अभिलाषा सुटत नाही. तो परवित्त हरण करतोच. असा हा केवळ कुटुंबपोषण करणारा पुरुष विद्वान असला तरी आत्मज्ञानी होत नाही. तो मूढ अज्ञानात सापडतो. हे माझे, हे दुसऱ्याचे, असा भिन्न-भाव त्याच्या ठिकाणी उत्पन्न होतो.

ज्याच्या नेत्रांत कामेच्छा आहे, असा विषयलंपट पुरुष सोडून आपण आदिदेव जो नारायण त्याला सत्वर शरण जावे. भगवान अच्युत हाच भूतमात्राचा आत्मा असून त्यानेच सर्व ब्रह्मांड व्यापून टाकले आहे. त्याला प्रसन्न करण्यास पुरुषाला फार सायास होत नाहीत. वृक्षपाषाणादिकांपासून तो ब्रह्मदेवांपर्यंत सर्व लहान-थोर जीवांत, सर्व पदार्थांत ब्रह्मस्वरूप, सर्वांतर्यामी, अचिंत्य, ऐश्वर्ययुक्त असा एकच ईश्वर भरलेला असतो. असुरवृत्तीचा त्याग करून आपण सर्व भूतां-विषयी दया व मैत्री धारण करावी. त्यामुळे परमेश्वर संतुष्ट होईल. तो संतुष्ट झाला तर दुर्लभ काय आहे ? त्या भगवंतांच्या चरणांच्या जवळ राहिल्यावर, त्याच्या महत्त्वाचे गायन केल्यावर मोक्षाची इच्छा तरी कशासाठी करायची ? परमपुरुष भगवंतांना आत्मनिवेदन करणे हेच एक सत्य आहे. असे हे निर्मळ व दुर्लभ ज्ञान ऋषींचा नरसखा नारायणाने नारदाला सांगितले होते. एकनिष्ठ भक्तांना ते प्राप्त होते.

## प्रल्हादाचे आत्मचरित्र

प्रल्हादाचा वरील उपदेश ऐकून दैत्यपुत्र म्हणाले, 'प्रल्हादा, गुरुपुत्रांहून आम्हांस दुसरा गुरूच माहीत नाही. मग तुझ्या वचनांवर आम्ही विश्वास कसा ठेवावा ?' या प्रश्नाचे उत्तर देताना प्रल्हादाने आपला वृत्तान्त त्यांना निवेदन केला. हिरण्यकशिपू मंदारपर्वतावर तप करीत असताना मुंग्यांनी त्याचा देह भक्षण केला. तेव्हा इंद्रादी देवांनी दानवांबरोबर मोठे युद्ध सुरू केले. असुरांचे पुत्र, मित्र, आप्त भोग-साधने सोडून दशदिशांना पळून जाऊ लागले. विजयेच्छू देवांनी राजवाडा लुटून सर्व द्रव्यांचा अपहार केला. इंद्राने राजाची पट्टराणी कयाधू हिलाच पकडून घेऊन तो चालला. तेव्हा तिने मार्गात टिटवी पक्षिणीप्रमाणे रडायला सुरुवात केली. तेवढ्यात नारद तेथे आले व

इंद्राला म्हणाले,

'देवेन्द्रा, या निरपराधी स्त्रीला नेणं योग्य नाही. तू हिला सोडून दे. ही परस्त्री असून पतिव्रता आहे.'

'देवर्षे, पण हिच्या गर्भात देवद्वेषी हिरण्यकशिपूचं तेज वाढत आहे. ही प्रसूत होईपर्यंत इथंच राहू दे. तिच्या पुत्राचा वध करून मग मी हिला सोडून देईन.'

'इंद्रा, हिचा गर्भ तर साक्षात भगवान अनंतांचा सेवक आहे. तो भगवद्भक्त असल्यामुळं तुझ्या हातून मरणार नाही.'

नारदांचे ऐकून इंद्राने तिला सोडून दिले. नारदांनी त्या स्त्रीला आपल्या आश्रमात नेले. तिला आश्वासन देऊन नारद म्हणाले, 'मुली, तुझा पती तपश्चर्या करून येईपर्यंत तू या आश्रमात सुखानं राहा.' कयाधू नारदांच्या आश्रमात राहिली. त्या गर्भिणी स्त्रीने नारदांची मनापासून सेवा केली. नारदांनी तिला भक्तीने तत्त्व, आत्मनिवेदनरूपी निर्मल ज्ञान यांचा उपदेश केला. कयाधू ते ज्ञान जरी विसरली तरी तिच्या गर्भातील प्रल्हादाने मात्र ते सर्व ग्रहण केले. हे सर्व ज्ञान प्रल्हादाने त्या दैत्यपुत्रांना निवेदन केले.

मण्यांच्या माळेत जसे सूत्र असते, तसाच आत्मा सर्वत्र व्यापून आहे. सूत्र प्रत्येक मण्याहून निराळे असते, तसा आत्माही सर्व वस्तूंत वेगळा असतो. गुरूची सेवा करावी, प्राप्त झालेल्या वस्तू भगवंतांना अर्पण कराव्यात, निष्कपट भक्तांचा सहवास करावा, ईश्वराचे आराधन करावे, भगवंतांच्या कथांवर श्रद्धा ठेवावी, त्यांच्या गुणांचे कीर्तन करावे, त्यांच्या चरणकमलांचे ध्यान करावे, त्यांच्या मूर्तीचे दर्शन व पूजन करावे, त्यांना मान द्यावा. कामक्रोध जिंकणारे लोक ईश्वराची अशी भक्ती करतात. यामुळे भगवान वासुदेवांविषयी मनात प्रीती निर्माण होते. त्यांचे पराक्रम ऐकत असताना हर्षाने शरीरावर रोमांच उभे राहातात. नेत्रांतून आनंदाश्रू येतात. रामस्वरूपी तन्मय होऊन जो उच्च स्वरांनी गायन करतो, रोदन करतो, नृत्य करतो, पिशाचाने झपाटल्यासारखा होऊन जो कधी हसतो, तर कधी विलाप करतो, केव्हा भगवंतांचे ध्यान करतो, तर केव्हा वंदन करतो, तर कधी तो 'हे

भगवंता, हे नारायणा, ' अशा हाका मारतो.

या अशा भक्तिभावानें पुरुषाचे अज्ञान व वासना या जळून जातात. तो भगवंतांच्या स्वरूपालाच जाऊन पोचतो. म्हणून प्रत्येकाने हृदयस्थ नारायणांना स्मरावे. स्वतःचा सखा व श्रीहरी यांची उपासना करण्यात सायास तरी कोणते आहेत? विषयसुख संपादून काय करायचे आहे? द्रव्य, कलत्र, पशू, पुत्रादी संबंधित, गृहे, भूमी, गजशाळा, भोगमय पदार्थ, सर्व प्रकारचे अर्थ व काम; हे नश्वर आहेत. क्षणभंगूर असे हे मर्त्य पुरुषाचे कितीसे प्रिय करणार? यज्ञयागादीपासून प्राप्त झालेले स्वर्गादी लोकही विनाशी व पुण्यादिकांच्या तुलनेनें श्रेष्ठ-कनिष्ठ असतात. म्हणून सर्वोत्कृष्ट ईश्वराचेच एकनिष्ठेनें सेवन करावे. तोच निर्दोष आहे. नित्यानंदाचा केवळ समुद्रच अशा आत्म्याचीच उपासना करावी. निरपेक्ष, सर्वसमर्थ, दुःखहर्त्या परमात्म्याचेच चिंतन करावे.

प्रल्हाद त्या दैत्य पुत्रांना म्हणाला, ' भगवंतांचं भजन करून मी जसा सुखी झालो तसा कुणीही होईल. या मुकुंदांना संतुष्ट करण्यासाठी द्विजत्व, देवत्व, ऋषित्व, सद्वर्तन, बहुश्रुतपणा, दान, तप, याग, शुद्ध आचरण, व्रतं; इत्यादी पुरी नसून ते श्रीहरी केवळ निष्काम भक्तीनंच संतुष्ट होतात. भक्तीवाचून इतर सर्व व्यर्थ सोंगेच होत. म्हणून आपण सर्वांनी सर्व भूतांचा आत्मा व ईश्वर असा जो भगवान श्रीहरी त्याचीच भक्ती करावी. दैत्य, राक्षस, स्त्रिया, शूद्र, गोकुलवासी लोक, मृग, पक्षी, इतर पातकी जीव अच्युतांच्या भक्तीनंच मोक्ष पावले आहेत.

## हिरण्यकशिपूचा वध

प्रल्हादाचा वरील उपदेश ऐकून दैत्यपुत्रांनी गुरूच्या शिकवणुकीचा त्याग करून सर्वस्वी प्रल्हादाचा बोध पत्करला. हा सर्व वृत्तान्त शंडामर्कांनी राजाला कळविला. आपल्या अप्रिय पुत्राचे दुर्वर्तन पाहून हिरण्यकशिपूचे शरीर रागानें कापू लागले. आपल्या पुत्राचा वध करावा असे त्याने पुन्हा ठरविले. त्यानें आपल्या पुत्राची कठोर शब्दांत निंदा केली. तो म्हणाला, ' उद्धटा, मंदबुद्धे, अधमा, आता मी तुला यमसदनास पोचवितो. तू माझ्या आज्ञेचं असं उल्लंघन कुणाच्या आश्रयानं करीत

आहेस ?'

' राजा, ब्रह्मदेवादी लहानथोर जीव ज्यांच्या स्वाधीन आहेत ते भगवान हेच माझं बळ आहे. आपलं, सर्वांचंच ते बळ आहे. तो परमात्माच कालरूपी विष्णू आहे. तोच इंद्रियशक्ती, मनःशक्ती, धैर्य, शरीरशक्ती, इंद्रियं यांचा आधार आहे. तोच गुणत्रयाचा नियंता आहे. तोच या जगताची निर्मिती, पालन, संहार करतो. आपण आपल्या आसुरी स्वभावाचा त्याग करून मनाची सर्वत्र समभावना ठेवावी. दैत्याधिपती, प्रथम इंद्रियांना जिंकावं. मनोनिग्रह करून ज्ञानी व्हावं.'

' मंदबुद्धी, तू अतिशय बडबड करतो आहेस. खरोखरच तुला मरणाची इच्छा झालेली दिसते. मंदभाग्या, तू माझ्याहून दुसरा कुणी तरी या जगाचा नियंता मानतोस. तो आहे तरी कुठं ? तो सर्व ठिकाणी असेल तर या खांबात असेल ? उगाच व्यर्थ बडबड करतोस, तर मी आताच तुझं शिर धडापासून वेगळं करतो. तुझा तो आवडता हरी तुझं रक्षण कसं करतो ते मी पाहतो.'

एवढे रागाने बोलून त्या महाबलाढ्य दैत्याने सिंहासनावरून उडी मारून त्या स्तंभावर हाताची बुक्की मारली. तोच त्या खांबातून अतिशय भयंकर असा ध्वनी निर्माण झाला. तो ध्वनी एवढा प्रचंड होता की, ब्रह्मादिक देवांनाही त्याची भीती वाटली. हा नाद कोठून येतो हे हिरण्यकशिपू पाहू लागला. इतक्यात मनुष्याच्या अथवा मृगाच्या आकाराचे नव्हे असे एक भयंकर रूप धारण करून श्रीहरी त्या स्तंभातून प्रकट झाले. स्तंभातून प्रकट होणारे ते मनुष्याचे व सिंहाचे संमिश्र रूप पाहून तो दैत्य मनात चमकला. एवढ्यात ते सिंहरूप त्याच्या समोर येऊन उभे राहिले. त्याचे रूप फार भयानक होते. त्याचे डोळे तापलेल्या सोन्याप्रमाणे लाल होते. मानेवरील आयाळीचे केस विजेप्रमाणे तळपत होते. त्याचे मुख फारच विक्राळ व विशाल दिसत होते. त्याच्या दाढा भयंकर होत्या. जीभ तलवारीसारखी चंचल व वस्तऱ्याच्या धारेसारखी तीक्ष्ण होती. मोठ्या भुवयांमुळे त्याचे मुख उग्र वाटत होते. त्याचे कान ताठ होते. तोंड व नाकपुड्या पर्वताच्या गुहेप्रमाणे होत्या. त्याने विस्तृतपणे जबडा पसरला होता. त्याचे वक्षःस्थल

विशाल व उदर कृश होते. गौरवर्णाचे केस त्याच्या अंगावर विखुरले होते. त्याची नखे त्याची आयुधे होती.

अशा या भयंकर रूपाला पाहून दैत्य म्हणाला, 'मायावी श्रीहरीनं माझ्या नाशासाठी असं हे रूप धारण केलेलं दिसतंय. पण हे रूप काय करणार ?' असे म्हणून हातातील गदा उचलून तो दैत्यराज नृसिंहाच्या दिशेनं धावत गेला. त्या नृसिंहाने दैत्याच्या गदेसह त्याला धरून पकडले. पण इतक्यात तो निसटून गेला. नृसिंहाच्या हातून दैत्य सुटला हे पाहाताच सर्व लोकपालांना वाईट वाटले. दैत्याने पुन्हा हातात ढाल व तलवार घेतली व पुन्हा नृसिंहावर चाल केली. पण नृसिंहाने तीव्र व भयानक हास्य करून सर्प जसा उंदराला पकडतो त्याप्रमाणे दैत्याला पकडले. श्रीहरींच्या हास्याने व तेजाने हिरण्यकशिपूचे डोळेच मिटून गेले. गरुड जसा सर्पाचे विदारण करतो त्याप्रमाणे नृसिंहाने दारातच संध्याकाळी त्या दैत्याला आपल्या मांडीवर घेतले व आपल्या नखांनी त्याचे हृदय विदीर्ण केले. नृसिंहाचे नेत्र क्रोधाने लाल झाले होते. तो आपल्या विशाल जिभेने आपले ओठ चाटीत होता. त्याच्या मानेवरील केस व मुख यांवर रक्ताचे बिंदू पडले होते. नृसिंहानें त्याच्या आतड्यांच्या माळा आपल्या कंठात धारण केल्या. आपल्या तीव्र नखांनी हिरण्यकशिपूचे हृदय विदीर्ण केल्यावर त्यांनी त्याला मांडीवरून दूर ढकलून दिले. शेकडो दैत्यांना, सेवकांना नृसिंहानें आपल्या नखांनी व पायांच्या टाचांनीच मारून टाकले.

नृसिंहाच्या या भयंकर कृत्याने सारे विश्व चकित झाले. त्याच्या मानेवरील केसांमुळे कंपित मेघ विखरून गेले. आदित्यादी ग्रह निस्तेज झाले. श्वासाने त्रासलेले मेघ क्षोभ पावले. त्या नृसिंहाच्या गर्जनेने भीतीने दिग्गज उंच स्वरात आक्रोश करू लागले. त्याच्या मानेवरील केसांच्या धक्क्याने विमानांतील देव स्थानभ्रष्ट झाले. त्याच्या पायांच्या दाबाने पृथ्वी दबून गेली. त्याच्या वेगाने पर्वत ढासळून पडले. त्याच्या तेजाने आकाशासह दिशा निस्तेज झाल्या. त्यानंतर तो प्रभू त्या राजसिंहासनावर बसला असताना त्याचे स्तवन करण्यास कोणीच पुढे येईना. पण अत्यंत हर्षित झालेल्या देवांगना नृसिंहावर पुष्पवृष्टी करू लागल्या.

नृसिंहाला पाहाण्यासाठी देवांच्या विमानांनी आकाशात गर्दी केली. नगारे व नौबती यांच्या ध्वनींनी दशदिशा दुमदुमल्या. अप्सरांचे नृत्य व गंधर्वांचे गायन सुरू झाले. ब्रह्मदेव, इंद्र, शिव, ऋषी, पितर, सिद्ध, विद्याधर, नाग, मनू, प्रजापती, चारण, यक्ष, किंपुरुष, वेताळ, किन्नर, सुनंद, कुमुद, इत्यादी आले व नृसिंहापुढे हात जोडून उभे राहिले. ब्रह्मदेवांनी, इंद्राने, ऋषींनी, सिद्धांनी, नागांनी, विद्याधरांनी नृसिंहाची मनापासून स्तुती केली. विष्णुपार्षद त्याला म्हणाले, 'भगवंता, मंगलकारक असं नृसिंह रूप आम्ही पाहिलं. हिरण्यकशिपू हा आपला दास. ब्राह्मणाच्या शापामुळं दैत्य झाला. त्याचा वध करून आपण त्याच्यावर अनुग्रहच केला आहे.'

## प्रल्हादकृत नृसिंहस्तुती

सर्व देव व ऋषिमुनी दुरून नृसिंहांची स्तुती करीत होते. अद्याप त्यांचा आवेश कमी झाला नव्हता. क्रोध कायमच होता. देवांनी प्रत्यक्ष लक्ष्मीला कोप शमविण्यासाठी पाठवलें, पण ती ते भयंकर रूप पाहूनच भयभीत झाली. तेव्हा ब्रह्मदेवांनी प्रल्हादास प्रभूंचा कोप शांत करण्यासाठी विनविले. बालक प्रल्हाद हळूहळू नृसिंहापाशी गेला. हात जोडून त्यानें साष्टांग नमस्कार घातला. नृसिंहांनी आपला वरदहस्त त्याच्या मस्तकावर ठेविला. तो करस्पर्श होताच प्रल्हादास यथार्थ ज्ञान झाले. परमानंदानें त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. प्रेमानें हृदय आर्द्र झाले. त्याच्या नेत्रांतून आनंदाश्रू ओघळले. शांत चित्तानें त्यानें भगवंतांचे स्तवन करताना म्हटले,

'श्रीहरी, असुरयोनीत जन्मलेला मी. आपण माझ्यावर कसे संतुष्ट झालात ? वित्त, सत्कुलात जन्म, सौंदर्य, तप, पांडित्य, इंद्रियसौष्ठव, कांती, प्रताप, शरीरशक्ती, उद्योग, बुद्धी, अष्टांगयोग इत्यादी गुणांत श्रेष्ठ असलेले परमपुरुषही भगवंतांना संतुष्ट करू शकत नाहीत. पण केवळ भक्तीनं हा भगवान गजेन्द्रावर संतुष्ट झाला. या पद्मनाभाच्या ठिकाणी मन, कर्म, द्रव्य व प्राण अर्पण करणाऱ्या चांडाळालाही मी श्रेष्ठ मानतो. हा भगवान केवळ भक्तीनंच संतुष्ट होतो. म्हणून मी नीच

असलो तरी यथामती या ईश्वराचं महत्त्व वर्णन करीत आहे. त्यामुळं मी शुद्ध होतो.

'भगवंता, आता आपण क्रोध आवरावा. हा असुर आता मरण पावला आहे. सर्व लोक सुखी झाले असून आता आपला राग शांत होण्याची वाट पाहत आहेत. नृसिंहा, अजिता, तुझ्या या भयंकर रूपाला मी भीत नाही. पण दीनवत्सला, दुःसह व उग्र असं संसारचक्रातील दुःख मात्र मला भयप्रद वाटतं. इथं पातकी लोकांत मी कर्मांनी बद्ध होऊन पडलो आहे. परमात्म्या, आपण मला आपल्या चरणकमलांपाशी आश्रय द्यावा. आपणच ज्ञानाचा मला उपदेश करावा. दुःखाच्या निवृत्तीचा उपाय शेवटी दुःखमयच होतो. देहाच्या अभिमानानं मी मोहग्रस्त आहे. प्रभो, आपणच मला सेवेचा उपाय सांगावा. नृसिंहा, माता-पिता हे या लोकी बालकाचे रक्षक खरे, पण ते कायमचे नव्हेत. कारण ते रक्षण करीत असतानाही बालक दुःखीच असते. औषध हे रक्षक असतं असं नव्हे. कारण औषध घेऊनही मनुष्य मृत्यू पावतो. कधीकधी नौकेसह लोक समुद्रात बुडतातच. म्हणून रक्षक असे आपणच आहात.

'ईश्वरा, ज्यात तमोगुण अधिक आहे अशा असुरकुळात जन्मलेला मी कुठं, आणि आपली कृपा कुठं ? पण ही कृपा आपण माझ्यावर केलीत. ब्रह्मदेव, रुद्र, लक्ष्मी यांच्याही मस्तकांवर आपण कधी हात ठेविला नाही, पंण तोच करकमल आपण आज माझ्या मस्तकावर ठेविला आहे. अनंता, पुत्रवधासारखं अयोग्य कर्म करणाऱ्या माझ्या पित्याचा वध करून आपण माझं रक्षण केलं आहे. ईश्वरा, कार्यकारण-रूपी परमात्मा आपणच आहात. जगाच्या आदी, अंती, मध्ये आपणच आहात. वैकुंठनाथा, पातकांनी दूषित, बहिर्मुख, दुर्धर, कामातुर, हर्ष-शोक-भय यांनी दुःखित असं माझं मन आपल्या कथांत रमत नाही. अशा स्थितीत मी आपला विचार करू तरी कसा ? अच्युता, अनेक भार्यांच्या पतीला स्त्रिया सवतीमत्सराने आपल्याकडे ओढीत असतात. त्याचप्रमाणं कधी तृप्त न होणारी ही जिव्हा मला मधुरादी रसांकडं ओढून नेते. शिश्न कामिनीकडं ओढून नेतं. त्वचा चंदनादी पदार्थांकडे जाते. क्षुधेनं तप्त झालेलं उदर आहाराकडं जातं, नाक सुगंधाकडं,

चंचलदृष्टी रूपाकडं ओढ घेते. ईश्वरा, अशा या मूढावर आपला अनुग्रह व्हायला हवा. आपली सेवा करणाऱ्या फक्त भक्तांचा उद्धार करून कसं भागेल ? देवा, तुझ्या चरित्राच्या नामामृतात माझं मन तल्लीन झालं आहे, पण इंद्रियनिष्ठ अशा मूढ जनांचंच मला फार वाईट वाटतं.

'देवा, केवळ स्वतःलाच मुक्ती प्राप्त व्हावी म्हणून मुनी ध्यानादिक कर्म करतात. पण या दीनजनांना सोडून आपण एकट्यानंच मुक्त व्हावं, अशी माझी इच्छा नाही. परमेश्वरा, अनेक योनींत भ्रमणाऱ्या या मूढ जनांचा उद्धार आपणांशिवाय कोण करणार ?

प्रायेण देव मुनयः स्वविमुक्तिकामा ।
मौनं चरन्ति विजनेन परार्थनिष्ठाः ॥
नैतान्विहाय कृपणान्विमुमुक्ष एको ।
नान्यं त्वदस्य शरणं भ्रमतोऽनुपश्ये ॥

'परमात्म्या, मौन, व्रतं, श्रवण, तप, वेदाध्ययन, स्वधर्म, ग्रंथव्याख्यान, एकान्तसेवन, जप, समाधी; इत्यादी मोक्षाला साधनं होतील. पण ही निर्वाहाची साधनं कशी होतील ? प्रभो, खरं पाहता, आपण रूपरहित आहात. सर्वव्यापी परमेश्वरा, वायू, अग्नी, पृथ्वी, आकाश, जल, शब्दादी विषय, प्राण, इंद्रियं, मन, चित्त, अहंकार; हे सर्व आपणच आहात. अतिपूज्य परमात्म्या, प्रणिपात, स्तुती, सर्वकर्मसमर्पण, उपासना, चरणस्मरण, कथाश्रवण अशा सेवेवाचून भक्ती कशी प्राप्त होईल ? त्यांना परमहंसपद कसं मिळेल ?'

प्रल्हादकृत स्तुती ऐकून नृसिंह प्रसन्न होऊन प्रल्हादाला म्हणाले,

'असुरश्रेष्ठा प्रल्हादा, तुझं कल्याण असो. मी तुझ्यावर प्रसन्न आहे. तू इष्ट असा एखादा वर मागावास. मी मनकामना पूर्ण करणारा आहे. ज्याला माझं दर्शन होतं तो प्राणी भयशोकापासून मुक्त असतो.'

परंतु प्रल्हादाची भगवंतावर भक्ती असल्यामुळे त्याने कशाचीच इच्छा केली नाही.

## प्रल्हादाला वरप्राप्ती

प्रल्हादानें वर देऊ इच्छिणाऱ्या भगवंतांना म्हटले, 'परमेश्वरा, असल्या वरांनी मला तुम्ही भुलवू नये. परमात्म्या, तुझ्यापासून भौतिक विषयसुखांची इच्छा करणारा भक्तच नव्हे, तो केवळ व्यापारी होय. स्वामीपासून आपले मनोरथ पूर्ण करण्याची इच्छा करणारा सेवक नव्हेच. आणि जो स्वामी आपल्या सेवकाकडून इच्छापूर्तीसाठी द्रव्य घेतो तो स्वामीही नव्हे. ते परस्पर व्यापारी समजावेत. देवा, मी तर तुझा निष्काम भक्त आहे. तुम्ही माझे निरपेक्ष स्वामी आहात. तरी वरदश्रेष्ठा, आपण जर मला वर देणार असाल तर माझ्या हृदयातील वासनांचा अंकुर नष्ट करावा. कमलनयना, कामांकुरामुळं इंद्रियं, मन, प्राण, देह, धर्म, धैर्य, विवेक, लज्जा, ऐश्वर्य, प्रताप, स्मृती, सत्य ही नाहीशी होतात. पुंडरीकाक्षा, कामवासनांचा त्याग केल्यासच तुझी प्राप्ती होईल. श्रीहरे, अद्भुत असं हे नृसिंहरूप धारण करणाऱ्या ब्रह्म-रूप परमात्म्या, आपणांस नमस्कार असो.'

'प्रल्हादा, तुझ्यासारखे माझे एकनिष्ठ भक्त माझ्याकडून इह-लोकाची वा परलोकाची अपेक्षा करीत नाहीत. तरी तू हे मन्वन्तर संपेपर्यंत दैत्यांचा राजा होऊन भलोकी विषयांचा उपभोग घे. माझ्या आवडत्या कथा श्रवण करून सर्व भूतांत राहाणाऱ्या मलाच मनात धारण करून माझी आराधना कर. सर्व कर्मं मला अर्पण करून तू त्यांच्या बंधनांपासून मुक्त हो. सर्व प्रकारची कीर्ती संपादन करून तू शेवटी मला येऊन मिळशील. तुझं व माझं स्मरण करणारा पुरुषही कर्मबंधनापासून मुक्त होईल.'

'महेश्वरा, वर देणारांचा तू अधिपती आहेस. म्हणून एक मागणं मी मागणार आहे. क्रोधानं अंतःकरण व्यापलेलं असल्यानं ईश्वराचं तेज न ओळखणाऱ्या माझ्या पित्यास तुम्ही मुक्त करावं. दीनवत्सला, तो आधीच पवित्र झाला आहे.'

'प्रल्हादा, तुझा पिता आता एकवीस पूर्वजांसह पवित्र झाला आहे. कारण त्याच्या घरी कुल पवित्र करणारा तू निपजलास. तू

खरोखरच माझ्या भक्तांत श्रेष्ठ आहेस. प्रल्हादा, माझ्या शरीराचा स्पर्श झाल्यानं तुझ्या पित्याचं केवळ शास्त्ररक्षणासाठी और्ध्वदेहिक कार्य कर. तुझ्यासारख्या सत्पुत्राच्या योगानं तो उत्तम लोकास जाईल. तू आता पित्याच्या स्थानावर आरूढ हो. माझ्या ठिकाणी मन लावून सर्व कर्म कर.'

भगवंतांच्या सांगण्याप्रमाणे प्रल्हादानें पित्याचे और्ध्वदेहिक कार्य केले. द्विजश्रेष्ठांनी त्याला अभिषेक केला. प्रल्हाद भगवत्पर होऊन सर्व कर्मे करू लागला. सौम्य झालेल्या प्रसन्न नृसिंहास ब्रह्मदेव म्हणाले, 'देवाधिदेवा, सर्व लोकांना त्रास देणारा आपण असुर मारलात, हे फार चांगलं केलंत. हा दैत्य माझ्यापासून वर मिळवून मृत्यू प्राप्त होण्यास अशक्य झाला होता. त्यानं तप, योग यांच्या बळावर सर्व वैदिक कर्म नष्ट केली होती. तू याला मारलंस ही फारच चांगली गोष्ट केलीस. हा बालक प्रल्हाद सदाचरणसंपन्न व भगवद्भक्त तुला शरण आला, हेही फार चांगलं झालं. भगवन्, आपलं हे स्वरूप तुमचं ध्यान करणाऱ्या पुरुषाला सर्व भूतांपासून, मृत्यूपासून रक्षण करणारं आहे.'

'ब्रह्मदेवा, आता अशा क्रूर स्वभावाच्या असुरांना कधीही वर देऊ नका. अशा असुरांना वर दिला की, सर्वांनाच उपद्रव होतो.'

असे ब्रह्मदेवांना सांगून नृसिंहदेव अंतर्धान पावले. त्यांचेच अंशभूत असे ब्रह्मदेव, महादेव, कश्यप, इंद्र आदींचे प्रल्हादानें उत्तम प्रकारे पूजन केले. प्रल्हाद दैत्य व दानव यांचा अधिपती झाला. सर्व देवांनी त्याला उत्तम आशीर्वाद दिले.

हा सर्व वृत्तान्त धर्मराजाला सांगून नारद म्हणाले, 'धर्मराजा, पूर्वी जय-विजय हे विष्णुपार्षद ब्राह्मणाच्या शापानं दितीचे पुत्र झाले. त्यांचाही श्रीहरींनी वध केला. त्यानंतर त्याच शापामुळं ते रावण व कुंभकर्ण झाले. त्यांचा वध रामानं केला. तेच पुन्हा शिशुपाल व दंतवक्त्र झाले. तेही श्रीहरींच्या स्वरूपात विलीन झाले. शिशुपाल इत्यादी राजे वैरभावानं श्रीहरींच्या सारूप्याला पोचले. हिरण्याक्ष व हिरण्यकशिपू या दैत्यांच्या वधाची कथाही मी तुला सांगितली आहे.

भा...८

विष्णूंच्या अशा पराक्रमांचं वर्णन जो श्रद्धेनं श्रवण करील तो पापांतून मुक्त होईल.'

## त्रिपुरांचे दहन

एकदा नारद धर्मराजाला म्हणाले, 'धर्मराजा, तुम्ही पांडव मोठे भाग्यवान आहात. कारण प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्ण मानवरूप धारण करून तुमच्यांत निवास करतात. त्यामुळं महासमर्थ असे ऋषी इथं दर्शनार्थ येतात. तो उपाधिरहित परमानंद तुमचा प्रिय सुहृद, मातुलपुत्र, आत्मा, आज्ञाधारक, गुरू आणि पूज्य असा श्रीकृष्ण आहे. तोच हा भक्तपालक परमेश्वर आम्ही पूजिला आहे. तो आमच्यावर प्रसन्न होईल. राजा, पूर्वी मयासुरानं नाहीसं केलेलं रुद्रदेवांचं यश याच भगवंतांनी विस्तृत केलं.'

'नारदा, या महादेवांची कीर्ती मयासु ानं कशासाठी नष्ट केली ? श्रीकृष्णांनी ती पुन्हा कशी वाढविली ? कृपा करून आपण मला सांगावं.'

नारदांनी सर्व वृत्तान्त निवेदन केला. पूर्वी देवांनी सर्व प्रमुख असुरांना पराजित केले. तेव्हा ते सर्व मायाकलाश्रेष्ठ आचार्य मयासुरास शरण गेले. तेव्हा त्या मयासुराने एक सुवर्णाचे, एक रुप्याचे, एक लोखंडाचे अशी तीन नगरे खड्ग व बाण यांच्यासहित उत्पन्न करून त्यांना दिली. त्यांतील चलनवलन कोणासच समजत नसे. त्या नगरात राहाणारे ते असुरसेनापती कोणालाही न दिसता पूर्वीचे वैर ओळखून तीनही लोकांचा नाश करण्यासाठी प्रवृत्त झाले. तेव्हा इंद्रादी देव रुद्रांजवळ जाऊन म्हणाले,

'रुद्रदेवा, त्या तीन नगरांतील असुरांनी आम्हांस नष्ट करीत आणलं आहे. आम्ही आपलेच ना ? आपणच आमचं रक्षण करावं.'

'तुम्ही भिऊ नका' असे रुद्रांनी म्हटले व पाशुपतबलानें अभिमंत्रित करून एक बाण त्या त्रिपुरावर सोडिला. त्या बाणापासून असंख्य बाण निर्माण झाले. त्यांमुळे तीन नगरे नष्ट झाली. पुरांतील सर्व असुर बाणांमुळे मरण पावले. तेव्हा महामायावी मयासुराने मरण

पावलेल्या सर्व असुरांना उचलून स्वतःच तयार केलेल्या अमृताच्या विहिरीत टाकले. अमृताचा स्पर्श होताच ते सर्व असुर वज्रासारखे सुदृढ व महाबलवान झाले. मेघांचे विदारण करणाऱ्या विद्युत्‌बिंदूप्रमाणे ते चमकून उठले.

आपला संकल्प व्यर्थ गेला हे पाहून श्रीरुद्र उदास झाले. तेव्हा भगवान विष्णूंनी त्यांना अमृताच्या नाशाचा एक उपाय सुचविला. ब्रह्मदेव वत्स व स्वतः विष्णू गाय झाले. मध्यान्हकाळी त्रिपुरासुरांच्या त्या अमृतमय विहिरीपाशी आले व त्यांनी ते सर्व अमृत पिऊन टाकले. भगवंतांच्या मायेनें मोहित झाल्यानें रक्षकांनी कोणताच प्रतिकार केला नाही. गायीनें अमृत प्राशन केल्याचे पाहून शोकग्रस्त झालेला तो मयासुर भगवंतांच्या अतर्क्य लीलेचे स्मरण करून शोक करणाऱ्या असुरांना म्हणाला, ‘ अहो, देव, मनुष्य, असुर कुणीही असो. दैवानं जें प्राप्त झालं असेल त्याचा परिहास कुणासच करता येणार नाही. ’

नंतर विष्णूंनीच धर्म, ज्ञान, वैराग्य, तप, विद्या, कृपा इत्यादी आपल्या शक्तींनी शंकरांना रथ, सारथी, ध्वज, अश्व, धनुष्य, कवच, बाण इत्यादी युद्धसामग्री तयार करून दिली. शंकरांनी रथावर आरूढ होऊन धनुष्य व बाण यांच्या साह्यानें ती तीन नगरे नष्ट करून टाकली. त्या वेळी स्वर्गांत दुंदुभी वाजू लागल्या. विमानांतून देवांनी जयजयकार केला. देव, ऋषी, पितर, सिद्धाधिपती यांनी फुलांची वृष्टी केली. अप्सरांचे नृत्य व गायन झाले.

## नक्राच्या मिठीत गजेंद्र

एकदा परीक्षित राजा शुकाचार्यांना म्हणाला, ‘मुनें, मकरानं ग्रासलेल्या गजेंद्राचा उद्धार भगवान श्रीहरींनी कसा केला ? ती सर्व कथा मला आपण सांगावी. धनाची प्राप्ती, अभीष्ट फळ देणारी, मोक्षकारक, पुण्यकारक अशा फळांचा लाभ या कथेनं होतो.’

प्रायोपवेशन करण्यासाठी बसलेल्या परीक्षिताला शुकाचार्यांनी गजेंद्रमोक्षाचे सर्व आख्यान ऐकविले. त्रिकूट या नावानें प्रसिद्ध असलेला एक श्रेष्ठ पर्वत, त्याच्या भोवती क्षीरसमुद्राचे वेष्टन. तो अतिशय

शोभिवंत होता. त्याची उंची दहा हजार योजनें व परीघही तितकाच असून त्याची तीन शिखरे रुप्याची, लोखंडाची व सुवर्णाची होती. या शिखरांनी त्रिकूट दशदिशांना व आकाशास प्रकाशित करी. रत्नें व मौल्यवान धातू यांनी हा पर्वत चित्रविचित्र बनला होता. नाना प्रकारच्या लता-वेलींनी व झऱ्यांच्या उदकानें त्याची शोभा अतिशय वाढली होती. भोवतीच्या क्षीरसमुद्राच्या लाटांनी त्याचा पायथा नित्य धुऊन निघत होता. पाचूच्या खड्यांनी त्या पर्वताची भूमी श्यामवर्णाची बनली होती.

या पर्वताच्या गुहांतून सिद्ध, चारण, गंधर्व, विद्याधर, मोठे नाग, किन्नर आणि अप्सरांचे समुदाय नित्य आनंदानें क्रीडा करीत. किन्नरांच्या गायनामुळे त्या गुहा नादयुक्त होतात व त्या नादांना सिंहनाद समजून खरे सिंह गर्जना करीत. येथे देवही क्रीडा करण्यासाठी येत. वनात मधुर शब्द करणारे अनेक पक्षी हिंडत. स्वच्छ नद्यांनी व सरोवरांनी वनांची शोभा वाढलेली होती. येथील वाळवंटाची वाळू रत्नांच्या कणांची असून सरोवरांतील पाणी देवांगनांच्या नित्य स्नानामुळे सुगंधित झाले होते. त्यावरून वाहणारा वाराही सुगंधित होता.

या पर्वताच्या एका प्रदेशात भगवान वरुणांचे ऋतुमत नावाचे एक उपवन होते. त्यातील दिव्य वृक्ष फुलांनी व फळांनी नित्य समृद्ध असत हे उपवन सर्व बाजूंनी शोभायमान असून देवांगनांचे क्रीडास्थान होते. या पर्वतावर मंदार, पारिजात, गुलाब, अशोक, चंपक इत्यादी वृक्ष बहरलेले होते. खिरणी, फणस, आंबा, पोफळ, नारळ, खजूर, महाळुंग, मोह, साग, तमाल, असाणा, ताड, अर्जुन, रिठे, उंबर, पिंपरी, वट, पळस, चंदन, लिंब, कांचन, सुरू, देवदार, द्राक्ष, ऊस, केळी, जांभळ, बोरी, बेहडा, हिरडा, भुईआवळी, बेल, कवठ, जंबीर, बिब्बा, इत्यादी वृक्षांनी हा प्रदेश नेहमी गजबजून गेलेला असायचा.

येथे एक विस्तीर्ण असे सरोवर असून त्यातील सुवर्णकमले नित्य उमललेली असायची. श्वेत कमळे, निळी कमळे, संध्याविकासी कमळे, आणि साधारण कमळे यांनी त्या वनाची शोभा वाढलेली होती. भ्रमरांच्या गुंजारवांनी व मधुर शब्दांच्या पक्ष्यांनी तो प्रदेश गजबजून

गेला होता हंस, कारंडव, चक्रवाक, सारस या पक्ष्यांनी व पाणकोंबडे टिटवे, पाणकावळे इत्यादींनी सर्वत्र ध्वनिमय वातावरण होई. त्या सरोवरातील मासे व कासवे इकडेतिकडे फिरू लागली की कमळे हालत व त्यांतील रजःकण पाण्यात पडले की, पाणी गढूळ होई. त्याच्याभोवती कदंब, वेत, देवनळ, नीलवर्ण, अशोक व तिवस या वृक्षांच्या रांगा होत्या. कुंद, तांबडी कोरांटी, अशोक, सिरस, कुडा, हिंगणबेट, कुब्जक, पिवळी, जाई, नागचाफा, जुई, मोगरा, शतपत्र, बटमोगर; इत्यादी फुलझाडे व वेली नित्य फलपुष्पांनी भरलेल्या असायच्या.

अशा या चित्रकूट पर्वतावरील अरण्यात हत्तींच्या कळपांचा अधिपती असलेला एक गजेंद्र एकदा त्या सरोवरापाशी आला. त्याच्या केवळ गंधामुळेच सिंह, हत्ती, व्याघ्र, सर्प, हरिण, गेंडे, पांढरे बगळे, शहामृग, वनगायी इत्यादी प्राणी भयभीत होऊन पळू लागले. पण लांडगे, डुकरे, रेडे, अस्वले, साळई, गोपुच्छ वानरे, माकडे, हरिणे, ससे इत्यादी क्षुद्र प्राणी मात्र निर्भयतेनें संचार करीत होते. त्या गजेंद्राच्या मागून दुसरे अनेक हत्ती व हत्तिणी येत होत्या. मागून मदस्रावी छावे येत होते. त्यांच्या गंडस्थलांवरील मद भक्षण करण्यासाठी भुंग्यांचे थवे घिरटया घालीत होते. त्याचे नेत्र मदाने धुंद झाले होते.

अशा रीतीनें हत्तिणींसह संचार करणारा तो गजेंद्र सूर्याच्या तापामुळे त्रस्त झाला व तहानेनें व्याकुळ झाला. कमळांच्या परागांनी युक्त अशा सरोवरावरून येणाऱ्या वायूचा सुवास घेत घेत तो इतर हत्तींसह सरोवराकडे आला. तो चालला असताना त्याच्या पावलांच्या वजनानें तो पर्वत थरकाप पावे. पोकळ वेळू, भरीव वेळू, काटेरी वृक्ष, वेलींच्या जाळचा, करवंदीची झुडपे; यांना कडाकड मोडून तो गजेंद्र त्या सरोवराच्या काठी वेगानें व त्वरेनें आला. त्याने त्या सरोवरात प्रवेश करून स्नान केले. थोडा श्रमपरिहार झाल्यावर त्यानें ते सुवर्णकमळांतील परागांनी सुगंधित झालेले पाणी आपल्या सोंडेच्या टोकानें प्राशन केले. भोग्य वस्तूंवर आसक्त झालेल्या पुरुषाप्रमाणे भगवंतांच्या मायेनें मोहित झालेल्या त्या मदोन्मत्त व दयाळू गजेन्द्राने आपल्या शुंडेनें हत्तिणींच्या व छाव्यांच्या अंगावर पाणी उडवायला सुरुवात

केली. तो त्यांना स्नान घालू लागला.

त्याचा हा प्रकार सुरू असतानाच कोण्या एका बलाढ्य नक्राने खालून त्या गजेंद्राचा पाय पकडला. अकस्मात संकटात सापडलेल्या त्या बलवान गजेंद्राने त्यातून मुक्त होण्याचा प्रयत्न यथाशक्ती सुरू केला. पण त्या महाबलाढ्य नक्राने त्याला मोठ्या शक्तीनें पाण्यात ओढायला सुरुवात केली. गजेंद्र अगदी हैराण होऊन गेला. त्याची ही अवस्था पाहून हीनदीन झालेल्या हत्तिणी आक्रोश करू लागल्या. त्याचे अनुयायी इतर हत्तींचेही या बाबतीत काही चालले नाही. तो महाबलिष्ठ नक्र व गजेंद्र एकमेकांशी भयानक झगडा करू लागले. त्यांचे हे निकराचे युद्ध हजार वर्षे चालले होते. देवांनाही मोठें आश्चर्य वाटले. नक्र एकसारखा गजेंद्राला पाण्यात ओढीत असल्यामुळे गजेंद्र खिन्न झाला. त्याचा आहार संपल्यामुळे त्याच्या मनाचा उत्साह मंदावला. शरीराचे व इंद्रियांचे सामर्थ्य कमी झाले. उलट जलचर नक्राचे बळ वाढले. त्याचा उत्साह वाढला. दैवाच्या अशा गतीत सापडलेल्या त्या गजेंद्रास स्वतःची सुटका करता आली नाही. आता या संकटातून आपणांस कोण सोडविणार? तो मनात म्हणाला, दैवाने या नक्रानें आपणांस धरले आहे, मला आता हे जातभाई सोडवील नाहीत. या हत्तिणी समर्थ नाहीत. आता ब्रह्मादिकांनाही आश्रयभूत असणाऱ्या परमेश्वराला शरण जावे. आता त्या सर्वशक्तिमान परमात्म्यासच शरण जाणे उत्तम.

## श्रीविष्णूंकडून गजेंद्रास मुक्ती

एकदा मनाचा निश्चय झाल्यावर गजेंद्राने पूर्वजन्मात केलेल्या अभ्यासावरून सर्वोत्कृष्ट स्तोत्राचा पाठ सुरू केला. तो म्हणाला, ' त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न व प्रकृतिपुरुषरूप परमात्म्यास माझा नमस्कार असो. ज्याच्यात हे विश्व स्थित आहे, ज्याच्यापासून हे उत्पन्न झालं आहे, ज्यानं हे केलं आहे, जो स्वतःच विश्व आहे, त्या स्वतःसिद्ध परमेश्वरास मी शरण जातो. तो स्वयंप्रकाशी परमात्मा माझं रक्षण करो. प्रलयकालात सर्व लोक, त्यांचे पालक नाश पावतात. अशा वेळी अंधाराच्याही पलीकडे सर्वव्यापक प्रभू विराजमान असतो. त्याचं स्वरूप देव, ऋषी

यांनाही जाणता येत नाही. ज्यांचं चरित्र असं अगम्य आहे तो परमेश्वर माझं रक्षण करो. त्याला जन्म, कर्म, नाम, रूप, गुण, दोष यांपैकी काहीच नसून तो लोकांच्यासाठी आपल्या बहुरूपीपणात आश्चर्यकारक कर्मं करतो. त्या परमेश्वरास वारंवार वंदन असो. तो सर्वसाक्षी आहे, स्वयंप्रकाशी आहे, वाणीला, मनाला, चित्ताला तो अगोचर आहे. अशा त्या परमात्म्याला नमस्कार असो.

'फलाची इच्छा सोडून शुद्धचित्तानं केलेल्या कर्मानं ज्याची प्राप्ती होते त्या आनंदानुभवरूप, मोक्षाधिपती अशा परमेश्वरास नमस्कार असो. शांत, भयंकर व मूढ अशा सत्त्वादी गुणांचं अनुसरण करणारा, भेदशून्य, सर्वत्र समत्वानं वावरणारा, ज्ञानरूप असा परमात्मा प्रसन्न व्हावा. त्याला नमस्कार असो. क्षेत्रज्ञ, सर्वाध्यक्ष, सर्वसाक्षी, सर्व जीवांना मूलकारणभूत अशा परमात्म्या, तुला नमस्कार असो. महासागरात सर्व प्रवाहांचं पर्यवसान होतं. तसंच ज्याच्या ठिकाणी सर्व शास्त्रांचं व वेदांचं पर्यवसान होतं. त्या मोक्षरूप परमात्म्यास नमस्कार असो. तो अतिशय दयाळू आहे. तो भक्तांचं संकट दूर करण्यास तत्पर असतो. तो मुक्त असल्यामुळं मजसारख्या पशूंच्या अज्ञानाचा समूळ नाश करण्यास समर्थ आहे. तो सर्व प्राण्यांच्या अंतर्यामी राहातो. त्या सर्वव्यापी व षड्‌गुणैश्वर्यमंडित भक्तवत्सलास नमस्कार असो. तो गुण-संगरहित असल्यानं अंतःकरणात असूनही देह, पुत्र, आप्त, गृह, वित्त, सेवक यांत आसक्त असलेल्यांना प्राप्त होत नाही. तो ज्ञानरूप आहे. अचिंत्य आहे. सर्वनियंता आहे. अशा त्या परमेश्वराला माझा नमस्कार असो. धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांची इच्छा करणारे पुरुष त्याची सेवा करून इच्छित फळ प्राप्त करून घेतात. तो भगवान त्यांनी न इच्छिलेलेही भोग त्यांना देतो. त्या दयाळू परमेश्वरानं माझी मुक्तता करावी. त्या अविनाशी, सर्वव्यापी, सर्वोत्कृष्ट, ब्रह्मादिकांचा नियंता, अव्यक्त, अध्यात्मयोगानं प्राप्त होणारा, इंद्रियगोचर न होणारा, सूक्ष्म, सर्वांच्या पूर्वी विद्यमान व परिपूर्ण अशा परमात्म्याचं मी स्तवन करतो.

'त्याच्याच स्वल्प अंशांनी ब्रह्मादीदेव, वेद व चराचरात्मक लोक निर्माण झाले आहेत. बुद्धी, मन, इंद्रियं, शरीरं यांचा प्रभाव त्या स्वयं-

प्रकाशी परमात्म्यापासून उत्पन्न होतो. तो देव नव्हे, असुर नव्हे, मानव नव्हे, पशुपक्षी नव्हे, नपुंसक नव्हे, पुरुष नव्हे, स्त्री नव्हे, कोणीही प्राणी नव्हे. गुण-कर्म-कार्यकारणही नव्हे. सर्वांचा नाश झाला तरी जो अवशिष्ट राहातो, त्या परमेश्वराचा मी नित्य जयजयकार करतो. नक्राच्या देहापासून मुक्तता मिळवून वाचावं अशी माझी इच्छा नाही. आत-बाहेर अविवेकानं व्यापलेल्या हत्तीच्या योनीशी मला काय काम आहे ? ज्याचा नाश होणार नाही, त्या आत्मप्रकाशाला आच्छादित करणाऱ्या अज्ञानाची निवृत्ती व्हावी, एवढीच माझी इच्छा आहे.

'केवळ मुमुक्षू मी आहे. विश्वोत्पादक, जगन्मूर्ती, जगाहून निराळा जगद्रूप, जन्मादी विकारशून्य अशा ब्रह्माला मी नम्र आहे. भक्तियोगानं ज्यांची कर्मं भाजलेल्या बीजांप्रमाणं दग्ध झाली आहेत, ते योगी पुरुषही ज्याला हृदयात पाहातात, त्या योगेश्वराला नमस्कार असो.'

गजेंद्राची ही अशी प्रार्थना ऐकून भगवान श्रीहरी तेथे प्रकट झाले. त्याचे स्तोत्र ऐकून ते प्रसन्न झाले व गरुडावर बसून हातात चक्रायुध घेऊन ते गजेंद्रापुढे उभे राहिले. तेव्हा गजेंद्राने आपल्या सोंडेने त्या श्रीहरींना कमळे अर्पण केली. 'षड्गुणैश्वर्य-संपन्न जगद्गुरो, नारायणा, तुम्हांस नमस्कार असो.' असे शब्द त्याने मोठ्या कष्टाने उच्चारिले. त्या श्रीहरींनी त्वरित त्या गजेंद्रास सरोवराच्या बाहेर काढले. आपल्या प्रभावी चक्राने त्यांनी त्या नक्राचे मुख विदारण करून टाकले. सर्व देवांच्या देखत श्रीहरींनी त्या गजेंद्रास मुक्त केले.

## गजेंद्राची पूर्वजन्मकथा

श्रीहरींनी अशा प्रकारे गजेंद्रास मुक्त केल्यावर ब्रह्मदेव, शंकर, देव, ऋषी, गंधर्व यांनी श्रीहरींच्या पराक्रमाची प्रशंसा केली. त्यांनी त्यांच्यावर पुष्पवृष्टी केली. स्वर्गात दुंदुभी वाजू लागल्या. गंधर्वांचे नृत्य व गायन सुरू झाले. ऋषी, चारण, सिद्ध यांनी त्या पुरुषोत्तमांची स्तुती केली,

तो नक्र पूर्वजन्मी हूहू नावाचा एक श्रेष्ठ गंधर्व होता. देवल-मुनींच्या शापामुळे त्याला नक्राचा जन्म प्राप्त झाला होता, तो याच वेळी

आपल्या शापातून मुक्त झाला. त्याला अत्यंत अद्भुत असे रूप प्राप्त झाले. त्याने परमात्म्यास प्रदक्षिणा घालून, नमस्कार करून आपल्या स्थानाकडे प्रयाण केले. तो गजेंद्रही भगवंतांच्या स्पर्शामुळे अज्ञानरूपी बंधनातून मुक्त झाला. भगवंताच्या रूपासारखे रूप धारण करून पीतांबर-धारी व चतुर्भुज झाला.

हा गजेंद्र पूर्वजन्मी द्रविडदेशनिवासी लोकांत श्रेष्ठ व विष्णुव्रताचे उत्तम आचरण करणारा होता. पांड्यदेशाच्या या राजाचे नाव इंद्रद्युम्न असे होते. एकदा तो मलयपर्वतावरील आपल्या आश्रमात राहात होता. जटाधारी तपोनिष्ठ राजा इंद्रद्युम्न पूजेच्या समयास स्नान करून, अंतः-करणाचा निग्रह करून, मौनव्रत धारण करून भगवान अच्युतांचे पूजन करीत होता. इतक्यात महातपस्वी अगस्त्यऋषी आपल्या शिष्यांसह तेथे फिरत फिरत आले. पण इंद्रद्युम्नराजा आपणांस सामोरा आला नाही, त्याने आपला सन्मान केला नाही, असे पाहून ते कुपित झाले. त्यांनी शाप देताना म्हटले,

' या दुरात्म्या, दुष्ट बुद्धीच्या राजाच्या बुद्धीला वळण चांगलं नाही. हा ब्राह्मणांचा अपमान करणारा आहे, म्हणून हा अज्ञानरूप अंधारात पडेल. हत्ती जसा गर्विष्ठ असतो, तसाच असल्यानं हा हत्तीच्या जन्मास येईल.'

असा शाप त्या राजास देऊन अगस्त्यमुनी शिष्यांसह निघून गेले. आपल्या प्रारब्धकर्माचे फल समजून राजा इंद्रद्युम्न आत्मविस्मृतीच्या गजयोनीत जन्मास आला. पण भगवंतांच्या कृपेने त्याला त्या गजयोनी-तही पूर्वीची स्मृती होती. भगवंतांनी त्या गजेंद्राची मुक्तता करून आपल्या वैकुंठलोकात त्याला नेले. त्या वेळी गंधर्व, सिद्ध, देव यांनी त्या गजेंद्राचे चरित्र गाऊन नृत्य व गायन केले. गजेंद्रमोक्षाचे हे आख्यान श्रवण करणाऱ्या लोकांना स्वर्गाची प्राप्ती होते. त्यांच्या यशाची वाढ होते. त्यांचे कलियुगाचे पाप संपते. त्यांना स्वप्नाचीही पीडा उरत नाही. या पुण्यकारक आख्यानाने धर्मादी पुरुषार्थांची प्राप्ती होते. भगवान एकदा त्या गजेंद्रास म्हणाले,

' वत्सा, जे पुरुष मी, तू, हे सरोवर, त्रिकूटपर्वत, त्यातील गुहा,

वनें, पोकळ कळक, भरीव कळक, त्यांची बेटें, देववृक्ष, या पर्वताची शिखरे, ब्रह्मदेव, विष्णू, शिव यांची निवासस्थानं, क्षीरसागर, श्वेतद्वीप, श्रीवत्सलांच्छन, कौस्तुभमणी, वैजयंतीमाळ, कौमोदकी गदा, सुदर्शनचक्र, पांचजन्य शंख, पक्षिराज गरुड, अंशावतार शेष, लक्ष्मीदेवी, ब्रह्मदेव, नारद ऋषी, शंकर, प्रल्हाद, मत्स्य, कूर्म, वराह इत्यादी अवतारांतील पुण्य कृत्यं, सूर्य, चंद्र, अग्नी, ॐकार, माया, गायी, ब्राह्मण, धर्म, सोम, कश्यप, दक्षकन्या, गंगा, सरस्वती, नंदा, यमुना, ऐरावत, ध्रुव, सात महर्षी, धार्मिक मनुष्ये, ईश्वराच्या विभूती, इत्यादींचं रोज प्रातःकाळी उठून व शुचिर्भूत होऊन एकाग्र चित्तानं स्मरण करतात ते सर्व पातकांपासून मुक्त पावतात. प्रभातकाळी तू केलेल्या स्तोत्राचं पठण जे करतील त्यांना अंतकाळी मी निर्मल गती देईन.'

अशा प्रकारे श्रीहरींनी गजेंद्राशी भाषण करून, आपला शंख वाजवून देवगणांना आनंद देणारे भगवान हृषिकेश वैकुंठास जाण्यासाठी सिद्ध झाले.

## 'तुम्ही समुद्राचं मंथन करा'

यानंतर शुकाचार्यांनी राजा परीक्षितास देव व दैत्य यांनी मिळून केलेल्या समुद्रमंथनाचे आख्यान सांगितले. देव व असुर यांच्या युद्धात एकदा अनेक असुरांच्या बाणांनी विद्ध होऊन देव गतप्राण झाले. दुर्वासमुनींच्या शापामुळे इंद्रासह तीनही लोक निस्तेज झाले. यज्ञयागादी कर्मे नष्ट झाली. तेव्हा इंद्र, वरुण इत्यादी देवांनी काही प्रतिकाराचा उपाय शोधला. पण त्यांना गेलेले वैभव परत प्राप्त होण्याचा योग दिसेना. ते मेरुपर्वताच्या शिखरावरील ब्रह्मदेवांच्या सभेत गेले. त्यांनी सर्व वृत्तान्त ब्रह्मदेवांना निवेदन केला. इंद्रादी निर्मळ देव निस्तेज झालेले पाहून, असुर तेजोबलानें युक्त झालेले पाहून ब्रह्मदेवांनी एकाग्रचित्तानें पुरुषोत्तमांचे चिंतन केले. ब्रह्मदेव त्या देवांना म्हणाले,

'देवांनो, मी, शंकर, तुम्ही असे सर्वजण त्या अक्षय परमात्म्याला शरण जाऊ या. त्या परमात्म्याला कुणाचा वध करायचा नाही, कुणाचं रक्षण करायचं नाही, कुणाचा आदर करायचा नाही. पण जगाची

उत्पत्ती, स्थिती, लय करण्यासाठी तो रज, सत्त्व, तम या गुणांचा स्वीकार करतो. म्हणून आपण त्या जगद्‌गुरूला शरण जाऊ या. तो प्रिय परमेश्वर आपलं सर्वांचं कल्याण करील.'

देवांना असे सांगून ब्रह्मदेव श्रीहरींचे वसतिस्थान क्षीरसमुद्राच्या तीरावर गेले. त्यांनी भगवंतांची एकाग्रचित्तानें स्तुती केली. त्यांनी केलेल्या स्तुतीने प्रसन्न होऊन ते सहस्र सूर्यांच्या उदयाप्रमाणे कांती असलेले भगवंत प्रकट झाले. त्यांच्या तेजानें सर्वांचे डोळे दिपून गेले. त्यांना आकाश, दिशा, पृथ्वी, आपला देह इत्यादी दिसेनासं झालं. मग ते सर्वव्यापी भगवान तरी कोठून दिसणार ?

ब्रह्मदेवांनी भगवान श्रीहरींच्या मूर्तीचे दर्शन घेतले. ती अत्यंत निर्मळ व पाचूच्या वर्णासारखी श्याम होती. तिचे नेत्र कमलगर्भाप्रमाणे आरक्त होते. तापलेल्या सुवर्णाप्रमाणे तिचे वस्त्र रेशमी असून तिचे सर्व अवयव प्रसन्न व मनोहर होते. ती उत्तम मुख व सुंदर भ्रुकुटी यांनी शोभत होती. तिच्या मस्तकावर उंची रत्नांचा मुकुट होता. बाहुभूषणे तिची शोभा वाढवीत होती. कानांतील कुंडलांनी प्रकाशित झालेले त्या मूर्तीचे मुखकमल फारच सुंदर दिसत होते. कमरेत कमर-पट्टा, हातांत कडीतोडे, कंठात हार, पायांत नूपुरे, कंठात कौस्तुभमणी असून वक्षःस्थलावर लक्ष्मी शोभत होती. त्या मूर्तीच्या गळ्यात वन-माला होती. सुदर्शनादी शस्त्रे तिची उपासना करीत होती. त्या सर्व देवांनी अशा स्वरूपातील परमात्म्याची मनापासून स्तुती केली. त्या स्तुतीने प्रसन्न झालेले भगवंत मेघासारख्या गंभीर वाणीनें म्हणाले,

'ब्रह्मदेवा, शंभो, देवांनो, गंधर्वांनो, तुम्ही एकाग्रचित्तानं माझं भाषण ऐकावं. तुमचं सर्वांचं कल्याण होईल. तुम्ही आधी दैत्यदानवां-कडं जावं. तुमचा उत्कर्षकाल येईपर्यंत त्या दैत्यांबरोबर सख्य करावं. सध्या काळानं अनुग्रह त्यांच्यावर केला आहे. देवांनो, एखादे कार्य करण्यासाठी प्रसंगी शत्रूबरोबरही मैत्री करावी लागते. ती तुम्ही करा. सख्य झाल्यानंतर ज्याचं प्राशन केल्यावर मृत्यूनं ग्रासलेला प्राणी अमर होतो, असं अमृत उत्पन्न व्हावं, म्हणून तुम्ही त्यांच्याबरोबर प्रयत्न करावा. देवांनो, प्रथम तुम्ही आता क्षीरसागरात वेली, गवत, लता,

औषधी टाका व मंदरपर्वताची रवी करून, वासुकीचा दोर करून समुद्राचं मंथन करा. या कामी दैत्य क्लेश भोगतील व तुम्हांला त्याचं फल मिळेल. हे कार्य होईपर्यंत ते असुर जे जे म्हणतील त्याला अनुमोदन द्या. साममार्गानं कामं होतात. क्रोधानं होत नाहीत. समुद्रातून निर्माण झालेल्या कालकूट नावाच्या विषाची भीती बाळगू नका. या मंथनापासून निर्माण झालेल्या पदार्थांबद्दल तुम्ही काम, क्रोध, लोभ कधीच धारण करू नका.'

## समुद्रमंथनातून हालाहल विष

देवांना असा उपदेश करून भगवान त्यांच्या समक्ष अंतर्धान पावले. भगवंतांना नमस्कार करून ब्रह्मदेव, रुद्र आपापल्या स्थानी निघून गेले. इतर सर्व देव बलीच्या दरवाज्यापाशी आले. संधी व विग्रह यांचा काल बली जाणत होता. देवरूपी शत्रू पाहून त्याचे सेनापती मात्र रागावून देवांवर धावून गेले. बलीनें त्यांना आवरून धरले. सर्व देवांना जिंकणाऱ्या, परम संपत्तीने युक्त असणाऱ्या, असुरसेनापतींनी सुरक्षित असलेल्या विरोचनपुत्र बलिराजाजवळ देव गेले. मधुर वाणीने त्यांनी अमृतमंथनाचा निरोप बलीला नम्रत्वानें सांगितला. इंद्राने सांगितलेला हा उपाय बली, पौलोम, कालकेय, शंबर, अरिष्टनेमी इत्यादी दैत्याधिपतींना,मायेच्या तीन नगरांत राहणाऱ्या असुरांना पसंत पडला. देव व असुर यांनी एकमेकांचे मानून मैत्री संपादन केली. अमृतप्राप्तीसाठी त्यांनी मिळून मोठा प्रयत्न केला.

देवांनी व दैत्यांनी प्रथम मंदरपर्वताला मोठ्या प्रयत्नानें उचलून धरले. गर्जना करीत ते त्याला समुद्राच्या तीरावर नेत होते. पर्वताचा भार वाहून इंद्र व बली यांना फारच परिश्रम झाले. त्याला आणखी पुढे नेण्यास त्यांना सामर्थ्य अपुरे पडले. त्यांनी त्या पर्वताला वाटेतच टाकून दिले. पडता पडता त्या सुवर्णपर्वताने आपल्या अंगाखाली अनेक देवदैत्यांचे चूर्ण केले. अशा वेळी भगवान गरुडध्वज विष्णू त्या ठिकाणी एकाएकी प्रकट झाले. पर्वत ज्यांच्या अंगावर पडला आहे अशा देवदैत्यांना त्यांनी आपल्या अमृतमय दृष्टीनें पूर्वीप्रमाणे शक्तिमान व व्रण-

रहित केले. त्यांनी एका हातानें सहज लीलेनें तो पर्वत उचलून गरुडा-वर ठेविला. त्याच्यासह त्यांनी देवदैत्यांसाठी सहज तो समुद्राच्या तीरावर आणून पोचविला. पक्षिश्रेष्ठ गरुडानें आपल्या खांद्यावरील तो पर्वत समुद्राच्या पाण्याजवळ ठेविला.

नंतर देवदैत्यांनी नागराज वासुकीला अमृताचा काही भाग देण्याचे वचन देऊन त्याला दोरीप्रमाणे त्या मंदरपर्वताच्या भोवती गुंडाळून अमृतप्राप्तीसाठी मोठ्या उत्साहानें त्यांनी समुद्राचे मंथन सुरू केले. त्या वेळी प्रथम विष्णूंनी वासुकीला मुखाकडून धरले. इतर देवांनीही त्यांचेच अनुकरण केले. पण भगवंतांचे हे कृत्य दैत्याधिपतींना पसंत पडले नाही. ते म्हणाले, 'आम्हीही वेदशास्त्रसंपन्न आहोत. जन्मकर्मानं श्रेष्ठ आहोत. आम्ही सर्पाचं पुच्छरूप हे अमंगल असल्यानं धरणार नाही.' तेव्हा हसून भगवानांनी सर्पाचे मुख सोडले व त्यांनी देवांना घेऊन त्याचा पृष्ठभाग पकडला. ते कश्यपपुत्र देव व दैत्य मोठ्या प्रयत्नानें अमृतासाठी समुद्रमंथन करू लागले.

मंथन सुरू झाले तेव्हा पर्वताच्या तळाशी कसलाच आधार नसल्यानें तो पर्वत समुद्रात खोल खोल जाऊ लागला. आपला प्रयत्न फसतो की काय, अशा विचारानें देव व दैत्य खिन्न झाले. त्या वेळी भगवान श्रीहरींनी कूर्मरूप धारण केले व त्यांनी पाण्यात बुडत असलेल्या पर्वताला आपल्या पाठीचा आधार दिला. देव व दैत्य यांचे समुद्रमंथ-नाचे कार्य पुन्हा सुरू झाले. तेव्हा त्यांच्या बाहुबलाने कापू लागलेला, गरगर फिरणारा तो पर्वत त्या भगवान कूर्मांना अंग खाजवल्याप्रमाणे वाटू लागला. देवदैत्यांत शक्ती उत्पन्न व्हावी म्हणून ते असुरांत असुर-रूपाने व देवांत देवरूपानें, नागराजांत निद्रारूपानें प्रविष्ट झाले. हा सर्व प्रकार जाणून ब्रह्मदेव, शंकर, इंद्र इत्यादी देवांनी भगवंतांची स्तुती केली.

देव व दैत्य यांनी समुद्राचे मंथन अत्यंत जोरानें चालू केले. तेव्हा समुद्रातील सुसरींचे थवे घाबरून गेले. सर्पराज वासुकीच्या मुखातून, नेत्रांतून, श्वासांतून निघालेल्या अग्नीच्या व धुराच्या योगाने पौलोम, कालेय, बली, इल्वल इत्यादी असुरांचे तेज नष्ट झाले. वणव्यानें दग्ध

झालेल्या सुरूच्या वृक्षांप्रमाणे ते दिसू लागले. वासुकीच्या श्वासांनी देवांची वस्त्रे निस्तेज झाली. माळा, कवचे, मुखे धूम्रवर्णाची बनली. तेव्हा भगवंतांच्या आज्ञेवरून मेघांनी त्यांच्यावर वृष्टी केली. समुद्राच्या लाटांवरून गार वारे वाहू लागले.

इतके मंथन झाले तरी समुद्रातून अमृत प्रकट होईना. म्हणून स्वत: भगवान विष्णूंनी मंथनात भाग घेतला. त्यांनी पीतांबर नेसला होता. त्यांच्या कानांतील कुंडले विजेप्रमाणे तळपत होती. त्यांच्या मस्तकावरील केस उडत होते. त्यांनी वनमाला धारण केली होती. त्यांचे नेत्र आरक्त झाले होते. भगवान विष्णूंनी मंथन सुरू करताच तिमी, मत्स्य, गज, नक्र, तिमिंगिल यांनी भरलेल्या समुद्रातील पाणी खवळून गेले. मकर, सर्प, कासवे पाण्यावर येऊ लागली. तेव्हा सागरापासून प्रथम हालाहल नावाचे विष निर्माण झाले. अत्यंत तीव्र असे ते विष सर्वांनाच तापदायक झाले. तेव्हा देव भगवान शिवांना शरण गेले. त्यांनी महादेवांची स्तुती केली. ते म्हणाले,

'देवाधिदेवा, त्रैलोक्याला जाळून टाकणाऱ्या या विषापासून आमचं आपण रक्षण करावं. देवा, अत्यंत गुह्य असं ब्रह्म आपणच आहात. देव, मनुष्य, पशू इत्यादी प्राण्यांचे उत्पादकही आपणच आहात. प्रभो, आपणच वेदांचंही मूळ आहात. सर्वदेवतास्वरूप अग्नी हे आपलं मुख आहे. भूमी हे आपलं चरणकमल. भगवाना, आकाश ही आपली नाभी, वायू हा श्वास, सूर्य हा नेत्र, जल हे रेत, चंद्र हे मन, स्वर्ग हे आपलं शिर आहे. सप्त समुद्र हे आपलं उदर, पर्वत हे केस, धर्म हे आपलं हृदय आहे. ईश्वरा, तत्पुरुष, अघोर, सद्योजात, वामदेव, ईशान असे पांच मंत्र म्हणजे आपली मुखं आहेत. शंकरा, सत्त्व, रज, तम या गुणांविरहित असं भेदशून्य व परंज्योतिरूप ब्रह्मस्वरूप असं आपलं रूप आहे. परमेश्वरा, आपलं केवळ सगुण रूपच आम्हांस दिसतं. आपलं अतिसूक्ष्म निर्गुण रूप आम्हांस दिसत नाही. समजत नाही. पण आपल्या दर्शनानं आम्ही कृतार्थ झालो आहोत. केवळ लोकांच्या सुखार्थ आपण या विषाचा नाश करून आम्हांस तृप्त करावं.'

सर्व लोकांवर आलेल्या संकटामुळे महादेवांना दया वाटली. ते

आपल्या प्रिय पार्वतीला म्हणाले, ' भवानी, समुद्रमंथनातून पाहा केवढं भयानक संकट या विश्वावर आलं आहे! प्राणरक्षणाची इच्छा करणाऱ्या लोकांना अभय द्यायला हवंय. दीनांचं परिपालन हेच आपलं कर्तव्य आहे. म्हणून प्रजेस सुखी करण्यासाठी हे विष मी प्राशन करतो.'

शंकरांच्या मतास पार्वतीनें अनुमोदन दिले. सर्व लोकांना सुखी करण्यासाठी महादेवांनी ते विष आपल्या ओंजळीत घेऊन पिऊन टाकले. महादेवांचा गळा त्या विषामुळे निळा झाला. पण हा नीलवर्ण त्यांना भूषणच झाला. भगवान शंकरांच्या या कृत्याची प्रशंसा सर्व लोक, पार्वती, ब्रह्मदेव, विष्णू यांनी केली. महादेव विष प्राशन करीत असताना काही थोडे थेंब जमिनीवर पडले. ते विंचू, सर्प, विषारी औषधी यांनी टिपून घेतले.

## समुद्रमंथनातून चौदा रत्ने

शिवांनी विष प्राशन केल्यानंतर देवदैत्यांनी पुन्हा जोरानें समुद्राचे मंथन सुरू केले. तेव्हा त्यातून कामधेनू उत्पन्न झाली. ही कामधेनू अग्निहोत्राला उपयुक्त असे घृतादी पदार्थ देणारी असल्यामुळे होमद्रव्यासाठी वेदवेत्त्या ऋषींनी तिचा स्वीकार केला. त्यानंतर चंद्राप्रमाणे शुभ्र वर्णाचा उच्चैःश्रवा नावाचा घोडा मंथनातून प्रकट झाला. तो दैत्यराज बलीनें घेतला. त्यानंतर चार दातांनी शोभणारा व चंद्राप्रमाणे शुभ्र असा ऐरावत नावाचा हत्ती तयार झाला. मंथनातून पद्मराग जातीचे एक कौस्तुभरत्न प्रकट झाले. कौस्तुभमणी विष्णूंनी आपल्या वक्षःस्थलावर धारण केला. त्यानंतर देवलोकाचे भूषण असा पारिजातक वृक्ष उत्पन्न झाला. त्यानंतर उत्तम वस्त्रांच्या, कंठांत भूषणे असलेल्या, मोहक क्रीडा व कटाक्ष यांनी रमविणाऱ्या अप्सरा निर्माण झाल्या. सर्व दिशांना प्रकाशित करणारी साक्षात लक्ष्मी प्रकट झाली. तिचे रूप सुंदर होते. औदार्य, वय, कांती यांमुळे देव, असुर व मनुष्य यांना तिची इच्छा झाली.

त्या लक्ष्मीसाठी महेन्द्रानें एक सुंदर आसन तयार केले. सर्वश्रेष्ठ नद्यांचे पवित्र जल सुवर्णकुंभांतून आणले गेले. अभिषेकास लागणाऱ्या

सर्व औषधी वनस्पती पृथ्वीनें दिल्या. गायींनी दूध, दही दिले. वसंतऋतूने फलपुष्पादी सामग्री अर्पण केली. ऋषींनी शास्त्रोक्त रीतीने तिला अभिषेक करायला सुरुवात केली. गंधर्वांनी मंगल गीते म्हटली. नटस्त्रियांनी नृत्य व गायन केले. मेघांच्या मंदमंद गर्जना होत राहिल्या. मृदंग, पणव, मुरज, आनक, गोमुख इत्यादी वाद्यांचे गजर झाले. शंख, वेणू, वीणा यांचेही नाद झाले. हातात कमल धारण करणाऱ्या त्या लक्ष्मीला ब्राह्मणांनी म्हटलेल्या सूक्तांच्या घोषात जलपूर्ण घटांनी दिग्गजांनी अभिषेक केला. सागरानें तिला किरमिजी वर्णाची दोन रेशमी वस्त्रे समर्पण केली. मत्त भ्रमर जीवर गुंजारव करीत आहेत अशी वैजयंती माळ वरुणानें दिली. विश्वकर्म्यानें नाना रंगांची रत्नजडित भूषणे दिली. सरस्वतीनें हार अर्पण केला. ब्रह्मदेवांनी तिला कमळ दिले. नागांनी दोन कुंडले दिली.

लक्ष्मीच्या सुंदर गालांवर कुंडलांची कांती झळकू लागली. सलज्ज हास्यानें तिचे मुख शोभू लागले. तिच्या भोवती भ्रमर गुंजारव करीत होते. अशी ही लक्ष्मी योग्य वर शोधण्यासाठी हातात कमलमाला घेऊन इकडें तिकडे फिरू लागली. तिचे उदर कृश होते. तिच्या दोनही स्तनांवर चंदन व केशर यांचा लेप होता. ते दोनही स्तन एकमेकांना चिकटून होते. ती इकडून तिकडे हिंडताना तिच्या पायांतील नूपुरांचा ध्वनी अतिशय मनोहर होत होता. ती सुवर्णलतेप्रमाणे चमकत होती. गंधर्व, यक्ष, असुर, सिद्ध, चारण, देव यांतून लक्ष्मी निर्दोष, शाश्वत, सद्गुणयुक्त असा पतिरूप आश्रय शोधीत होती. कोठे तरी एखादा दोष तिला दिसून येई. दुर्वासांत तप होते, पण त्यांनी क्रोध जिंकला नव्हता. गुरुशुक्रादिक ज्ञानी होते, पण वैराग्यशील नव्हते. ब्रह्मदेव, चंद्र महात्मे होते, पण कामावर त्यांनी जय मिळविला नव्हता. इंद्रादिकांना दुसऱ्यांचा आश्रय लागे. परशुराम धर्मनिष्ठ होता, पण त्याच्यात भूतदया नव्हती. शिबिराजासारख्यांत दानशक्ती होती, पण केवळ दानच उपयोगी होत नाही. कार्तवीर्यसारख्या पुरुषांना बल होते, पण ते कालवेगाच्या तावडीत होते. सनकादी मुनी निःसंग होते, पण ते निरंतर समाधीत असल्याने त्यांना वरून काय फायदा ? कोणी मार्कंडेयांसारखे

दीर्घायुषी होते. पण स्त्रियांना सुखदायक असा त्यांचा स्वभाव नव्हता.

हिरण्यकशिपूसारख्या काही पुरुषांत स्त्रियांना सुखदायक गुण होते, पण त्यांच्या आयुष्याला स्थिरता नव्हती. शंकर स्थिर असले तरी अमंगल होते. जो पुरुष अत्यंत मंगलकारक, आचरणांनी युक्त, निर्दोष असून आपली इच्छा करीत नाही, जो स्वतःच्या आश्रयावरच अवलंबून आहे, ज्याला कसलीही अपेक्षा नाही; असा विचार करून लक्ष्मीनें आपला पती म्हणून मुकुंदांनाच पसंत केले. ती नित्य नूतन अशी कमळांची माळ तिनें मुकुंदांच्या गळ्यात घातली. लज्जायुक्त नेत्रांनी ती मुकुंदांच्या वक्षःस्थलाकडे पाहात उभी राहिली. तेव्हा सर्व वैभवांनी संपन्न अशा मुकुंदांनी आपले वक्षःस्थल तिचे आश्रयस्थान बनविले. लक्ष्मी त्यांच्या वक्षःस्थली स्थिरावली. त्या वेळी, शंख, सूर्य, मृदंग या वाद्यांचा गजर झाला. स्त्रियांनी नृत्यगायन केले. ब्रह्मदेव, रुद्र, अंगिरा इत्यादींनी त्या लक्ष्मीनारायणांवर पुष्पवृष्टी केली. वैदिक मंत्रांनी प्रभूंची सर्वांनी स्तुती केली.

## मोहिनीरूपधारी श्रीविष्णू

लक्ष्मीनें विष्णूंना वरल्यावर इतर देव-दानव धैर्यहीन, आशाळभूत, आळशी व निर्लज्ज बनले. कमलांप्रमाणे नेत्र असलेल्या सगरकन्येचा, सुरा नावाच्या देवीचा त्यानंतर जन्म झाला. श्रीहरींच्या अनुमतीनें असुरांनी तिला पत्करले. शेवटी त्या मंथनातून एक अद्‌भुत असा पुरुष निपजला. त्याचे हात लांब व पुष्ट होते. त्याचा कंठ शंखासारखा तीन रेषांनी युक्त होता. त्याचा रंग मेघासारखा सावळा होता. तो तरुण असून त्याच्या गळ्यात पुष्पमाळा होती. तो सर्व भूषणांनी शोभत होता. त्यानें पिवळे वस्त्र पांघरले होते. त्याचे वक्षःस्थल विशाल होते. त्याच्या कानांतील कुंडले फार तेजस्वी होती. त्याचे केस मऊ व कुरळे होते. तो दिसायला सुंदर व पराक्रमाने सिंहासारखा होता. त्यानें हातात अमृतानें भरलेला कलश धारण केला होता. तो धन्वंतरी असून वैद्यकशास्त्राचा प्रवर्तक होता. त्याच्या हातातील अमृतकलश आपणांस प्राप्त व्हावा

अशा हेतूने असुरांनी तो आपणांकडे ओढून घेतला. असुर अमृतकलश घेऊन गेले तेव्हा देव खिन्न होऊन श्रीहरींकडे गेले. तेव्हा श्रीहरी त्यांना म्हणाले,

'देवांनो, तुम्ही घाबरू नका. खेद करू नका. मी मायेच्या योगानं त्यांच्यांत कलह लावून तुमचं कार्य करीन.'

अमृतासाठी असुरांची मने अगदी आतुर बनली होती. त्याच्या प्राप्तीसाठी ते आपापसांत कलह करू लागले. दैत्यांत कलह सुरू झाल्यावर भगवान विष्णूंनी अत्यंत सुंदर अशा स्त्रीचे रूप धारण केले. तिचा वर्ण निळ्या कमळासारखा श्याम होता. तिचे अवयव सुंदर होते. तिच्या दोनही कानांत भूषणे असून तिचे गाल तेजस्वी व नाक उत्कृष्ट होते. तिचे मुख अतिशय रमणीय होते. वर्तुळाकार स्तनांच्या भाराने तिचे उदर कृश झाले होते. तिने आपल्या वेणीत मोगऱ्याच्या फुलांचा गजरा घातला होता. गळ्यात विविध प्रकारचे अलंकार होते. तिच्या दंडावर सुंदर बाजूबंद होते. निर्मळ वस्त्र नेसून तिनें कमरेस शोभिवंत कमरपट्टा बांधला होता. तिच्या पायांत तोरड्या होत्या. ती चालू लागली की, त्यांचा मधुर ध्वनी होई. ती सलज्ज बनून नेत्रकटाक्ष टाकीत, भुवया चाळवीत दैत्याधिपतींना अस्वस्थ करीत राहिली.

त्या सुरापान करणाऱ्या दैत्यांची दृष्टी सुंदर स्त्रीकडे गेली. तिला पाहून त्यांच्यांत कामवासना निर्माण झाली. ते म्हणाले, 'काय हे रूपसौंदर्य ! काय हे यौवन !' ते त्या सुंदर स्त्रीला म्हणाले, 'कमलपत्राक्षी, आमची मनं चाळवणारी तू कोण कुणाची आहेस ? तू कुठून आलीस ? तू इथं येऊन काय करणार आहेस ? संदरी, देव, दैत्य, सिद्ध, गंधर्व, चारण, यांच्यापैकी आजपर्यंत तुला कुणीच स्पर्श केला नाही असं दिसतंय. मग मनुष्याचा संपर्क कुठला ? सुंदरी, देहधारी प्राण्यांची इंद्रियं व मनं तृप्त करण्यासाठी दयाळू परमेश्वरानं तुला इथं पाठविलं काय ? म्हणून तू एकाच वस्तूसाठी भांडणाऱ्या व चढाओढ करणाऱ्या आमचं रक्षण कर. सुंदरी, आम्ही कश्यपांचे पुत्र. परस्परांचे भाऊ. पण अमृतप्राप्तीसाठी आम्ही चढाओढ करतो. तू या अमृताची वाटणी करून दे ना.'

दैत्यांच्या या प्रश्नास आपल्या हास्यवदनानें व मनोहर नेत्र-कटाक्षानें ती उत्तर देऊ लागली. 'कश्यपपुत्रहो, तुम्ही मजसारख्या व्यभिचारिणी स्त्रीवर कसे आसक्त झालात? ज्ञानी पुरुष अशा स्त्रीवर कधीही विश्वास ठेवीत नाहीत. दैत्यांनो, नित्य नव्या वस्तूचा शोध घेणाऱ्या कोल्ह्या-लांडग्यांच्या प्रमाणेच या व्यभिचारिणी स्त्रियांचं सौख्य कायमचं नसतं, असं ज्ञानी पुरुष म्हणतात.'

तिनें असे म्हटल्यावर असुरांनी अमृतपात्र त्या सुंदर मोहिनीच्या हातात दिले. तेव्हा ती स्त्री म्हणाली, 'दैत्यांनो, मी या अमृताची वाटणी करून देते.' दैत्यांनी तिला अनुमती दिली. नंतर सर्वांनी उपोषण-पूर्वक स्नान केले. अग्नीत हविर्भाग अर्पण केला. गायी, ब्राह्मण, इतर प्राणी इत्यादींना दानें दिली. ब्राह्मणांकडून पुण्याहवाचन करवून त्यांनी नवीन वस्त्रे परिधान केली. सर्व देव व दैत्य पूर्वेकडे अग्रे असलेल्या दर्भांवर बसले. ती सुंदर स्त्री हातात अमृताचा कलश घेऊन त्या पंगतीत आली. तिच्या मांड्या हत्तीच्या सोंडेप्रमाणे सुंदर होत्या. तिनें सुंदर वस्त्र नेसले असून स्थूल नितंबांच्या भारानें तिचे चालणे मंदमंद झाले होते. तिच्या पायांतील सुवर्णाच्या तोरड्या रुणझूण वाजत होत्या. मद्यानें तिचे डोळे चंचल बनले होते. तिचे स्तन घटासारखे वर्तुळाकार व पुष्ट होते. तिच्या कानांत सुवर्णाची कुंडले होती. तिच्या वस्त्राचा पदर थोडा स्तनांवरून घसरला होता.

तिच्या मंद कटाक्षांनी देव, दैत्य अगदी मोहून गेले. स्वभावतःच क्रूर असलेल्या असुरांना अमृत देणे म्हणजे सर्पास दूध पाजण्यासारखे अन्यायाचे असे समजून श्रीहरींनी त्यांना अमृत दिले नाही. त्यांनी त्यांच्या वेगवेगळ्या पंगती केल्या. त्या मोहिनीनें आपल्या नेत्रकटाक्षांनी, हास्यानें, लज्जावृत्तीनें दैत्यांना मोहित करून जरा व मृत्यू यांचा नाश करणारे ते अमृत देवांना पाजले. त्या सुंदर स्त्रीच्या मोहात पडल्यामुळे असुरांनी तिच्याशी वादविवाद केला नाही. त्यांनी काहीच अप्रिय भाषण केले नाही.

परंतु त्याप्रसंगी देववेषात गुप्तरूपानें राहू देवांच्या पंगतीत चंद्र व सूर्य यांच्यामध्ये बसला होता. त्यानेंही अमृताचे प्राशन केले. एवढ्यात

चंद्र-सूर्यांनी हा दैत्य असल्याचे विष्णूंना सांगितले. तेव्हा आपल्या तीक्ष्ण धारेच्या सुदर्शनचक्राने श्रीहरींनी अमृतपान करणाऱ्या राहूचे मस्तक कापून काढले. अमृताचा स्पर्श न झाल्यामुळे त्याचे धड गतप्राण होऊन जमिनीवर पडले. पण मस्तक मात्र अमर झाले होते. म्हणून भगवंतांनी त्याला ग्रहाचा अधिकार दिला. चंद्र-सूर्यांनी पंगतीत चहाडी केली म्हणून त्यांच्याशी वैर पत्करून राहू पर्वणीच्या दिवशी त्यांच्या अंगावर धावत जातो. देवांनी सर्व अमृत प्राशन केल्यानंतर मोहिनीनें आपले खरे रूप प्रकट केले. देश, काल, हेतू, अर्थ, प्रयत्न, बुद्धी इत्यादी सर्व देवांचे व दैत्यांचे सारखेच होते. पण त्यांना फलप्राप्ती मात्र वेगवेगळी झाली. विष्णूंच्या चरणप्राप्तीमुळे देवांना अमृताचा वाटा सहज मिळाला.

## दैत्यांचे देवांबरोबर युद्ध

वासुदेवांना न जाणल्यामुळे दैत्यदानवांना अमृताचा लाभ झाला नाही. ते देवांना मिळून त्यांचा उत्कर्ष झाल्याचे पाहून त्यांनी आयुधे सज्ज करून देवांशी युद्ध सुरू केले. अमृत प्राशनामुळे व नारायणांच्या कृपेने देव बलवान बनले होते. क्षीरसागराच्या तीरी देवदैत्यांचे अंगावर रोमांच उठतील, असे जोराचे युद्ध झाले. नाना प्रकारच्या आयुधांनी परस्परांवर हल्ला झाला. शंख, डंका, मृदंग, भेरी, डमरू यांचे निनाद झाले. हत्ती, घोडे, रथ, शिपाई यांचा एकच गोंधळ झाला. काही योद्धे उंटांवर होते. काही हत्तींवर, काही गाढवांवर, काही हरिणांवर, काही अस्वलांवर, काही वाघांवर, काही सिंहांवर, तर काही गिधाडांवर होते. काही कंक पक्ष्यांवर, काही बगळ्यांवर, काही ससाण्यांवर, काही तिमिंगल नावाच्या मत्स्यांवर, काही गेंड्यांवर, काही बैलांवर, काही गव्यांवर, कांही अरुण नावाच्या पशूंवर, काही कोल्ह्यांवर, काही उंदरांवर, काही सरड्यांवर, काही सशांवर, काही मनुष्यांवर, काही बोकडांवर, काही काळविटांवर, काही हंसांवर, काही डुकरांवर, काही जलचर प्राण्यांवर स्वार झाले होते.

नाना प्रकारच्या ध्वजपताका, शुभ्र व निर्मल छत्रे, रत्नजडित दांड्यांचे पंखे, मोरचेल व चवऱ्या, वायूने उडणारी अंगावरील वस्त्रे,

मंदिलांचे पदर, देदीप्यमान कवचे, अलंकार, उज्ज्वल शस्त्रे यांनी शोभणाऱ्या वीरांच्या रांगा पसरल्या होत्या. विरोचनपुत्र बलिराजा सर्व साधनांनी सज्ज अशा विमानात बसला होता. ते मयासुरानें निर्माण केले होते. हे वैहायस नावाचे विमान हव्या त्या देशात जाणारे होते. त्या विमानातील बळी चवऱ्या व छत्रे यांनी उदयकालच्या चंद्राप्रमाणे शोभू लागला. त्याच्या भोवती असंख्य असुर सेनापती होते. नमुची, शंबर, बाण, विप्रचित्ती, अधोमुख, द्विमूर्धा, कालनाभ, प्रहेती, हेती, इल्वल, शकुनी, भूतसंताप, वज्रदंष्ट्र, विरोचन, हयग्रीव, शंकुशिरा, कपिल, मेघदुंदुभी, तारक, चक्रदृक्, शुंभ, निशुंभ, जंभ, उत्कल, अरिष्ट, अरिष्टनेमी, त्रिपुराधिपती, मयासुर, पौलव, कालेय, निवातकवच अशा असुर सेनापतींनी युद्धभूमी गजबजून गेली.

दैत्य अमृताचा वाटा न मिळाल्यानें केवळ क्लेशाचे अधिकारी बनले होते. त्यांनी सिंहासारख्या गर्जना करून मोठमोठ्या आवाजांचे शंख वाजविले. आपले शत्रू उन्मत्त झालेले पाहून इंद्र ऐरावतावर आरूढ झाला. त्याच्याबरोबर नाना प्रकारची वाहनें, ध्वज, आयुधे यांनी सज्ज झालेले देव तत्पर झाले. वायू, अग्नी, वरुण इत्यादी इंद्राबरोबर सज्ज झाले. देव व दैत्य यांच्यांत समोरासमोर द्वंद्वयुद्धे सुरू झाली. इंद्राबरोबर बलिराजा, तारकाबरोबर षडानन, देवीशी वरुण, प्रहेतीशी मित्र; अशी द्वंद्वयुद्धे झाली. कालनाभाशी यम, मयासुराशी विश्वकर्मा, त्वष्ट्याशी शंबर, सवित्याशी विरोचन, अपराजिताशी नमुची, वृषपर्व्याशी अश्विनी-कुमार, बाणासुरादी बलीच्या शंभर पुत्रांशी सूर्यदेव, यांच्यांत युद्धे झाली. राहूशी चंद्र, पुलोम्याशी वायू, शुंभानिशुंभांशी महावेगवती देवी भद्र-काली, जंभासुराशी विभावसू, ब्रह्मपुत्रांशी वातापीसह इल्वल; अशी आणखी द्वंद्वयुद्धे सुरू झाली. कामदेवाशी दुर्मर्ष, मातृगणांशी उत्कल, शुक्राचार्यांशी बृहस्पती, नरकासुराशी शनैश्चर, निवातकवचांशी मरुद्-गण, कालेयांशी वसुदेव, पौलोमांशी विश्वेदेव, क्रोधवशाशी एकादश रुद्र; अशा युद्धांना प्रारंभ झाला.

देव आणि दैत्य यांनी परस्परांच्या अंगांवर तीक्ष्ण बाण, खड्ग, तोमर, भुशुंडी, चक्र, गदा, खड्ग, पट्टे, शक्ती, उलमुक, प्रास, परशू,

निस्त्रिंश, भाले, परिघ, मुद्गर, गोफण; इत्यादींनी परस्परांवर प्रहार केले. हत्ती, घोडे, रथी, पायदळ इत्यादींच्या युद्धांत कित्येकांच्या मांड्या मोडल्या, कित्येकांचे बाहू मोडले, कित्येकांच्या माना मोडल्या, कित्येकांचे पाय मोडले. कित्येकांचे ध्वज मोडले. धनुष्ये, कवचे, अलंकार, यांचे तुकडे झाले. देवदैत्यांच्या रथांच्या चाकांनी व पायांच्या आघातांनी इतकी धूळ उडाली की, तिने सारे आकाश, दिशा व सूर्य यांना झाकून टाकले. रक्तप्रवाहांनी धूळ इतकी भिजली की, ती पुन्हा जमिनीवर येऊन स्थिरावली.

या रणभूमीवर काहींची किरीटकुंडले पडून गेली. दृष्टी क्रोधयुक्त, ओठ चावलेले, अशी मस्तके विखुरलेली होती. आयुधांसह भूषणयुक्त तुटलेले हात, हत्तींच्या सोंडेसारख्या मांड्या यांनी रणभूमी भरून गेली. बलिराजाने दहा बाणांनी महेंद्राला, तीन बाणांनी ऐरावताला, चार बाणांनी पादरक्षकांना, एका बाणानें माहुताला प्रहार केला. इंद्राने आपल्या भल्ल नावाच्या बाणांनी त्यांचे तुकडे तुकडे केले. तेव्हा बलीनें इंद्राला मारण्यासाठी शक्ती नावाचे आयुध घेतले, पण ते त्याच्या हातात असतानाच इंद्राने तोडून टाकले. त्यानंतर बलीनें शूळ घेतला. तोमर, दुधारी खड्ग अशा सर्व आयुधांचा इंद्रानें नाश केला.

त्यानंतर बलीनें आसुरी माया उत्पन्न करून देवांच्या सैन्याच्या डोक्यावर एक पर्वत उत्पन्न केला. त्या पर्वतावरून अग्नीत जळणारे वृक्ष व तीक्ष्ण टोकांच्या शिळा खाली पडू लागल्या. मोठमोठे सर्प, विंचू, सिंह, वाघ, डुकरे इत्यादी प्राणी देवांसमोर येऊन त्रास देऊ लागले. राक्षसांचे थवे 'हाणा मारा' करीत चालून आले. मोठा ध्वनी करणारे मेघ आकाशात जमा झाले. ते जळजळीत निखाऱ्यांचा वर्षाव करू लागले. दैत्यराज बलीनें नंतर अत्यंत भयंकर असा अग्नी निर्माण केला. त्याच्यात देव अगदी होरपळून गेले. प्रचंड वायूच्या लाटा व भोवरे यांनी समृद्ध असणारा समुद्र सर्वत्र पसरू लागला. गुप्त राहून असुरांनी असा प्रलय सुरू केल्यामुळे देवांना खिन्नता प्राप्त झाली.

त्यांनी विश्वपालक भगवंतांचे चिंतन केले. श्रीहरी गरुडावरून तेथे प्रकट झाले. त्यांनी पीतांबर नेसला होता. त्यांचे डोळे कमळाप्रमाणे

होते. त्यांच्या आठ हातांत आयुधे होती. वक्ष:स्थलावर लक्ष्मी होती. कंठात कौस्तुभमणी, मस्तकावर मूल्यवान किरीट, कानांत मकराकार कुंडले, यांनी शोभा वाढली होती. भगवान वीरांत प्रकट होताच असुरांची माया संपली. देवांना तेज चढले. श्रीहरी युद्धभूमीवर येताच कालनेमीनें त्यांच्या मस्तकावर आपला शूळ फेकला, तो वरच्यावर झेलून त्यानेंच श्रीहरींनी कालनेमीचा त्याच्या वाहनासह वध केला. महाबलाढ्य माली व सुमाली यांचीही मस्तके श्रीहरींनी उडविली. माल्यवान नावाच्या असुराचे मस्तक श्रीहरींनी आपल्या चक्रानें तोडून टाकलें.

## दैत्य सेनापतींशी इंद्राचे युद्ध

भगवान श्रीहरी प्रकट होताच देवांना विजयाचे स्फुरण चढले. इंद्राने क्रुद्ध होऊन विरोचनपुत्र बलीला मारण्यासाठी वज्र उगारले; तेव्हा दैत्यांत हाहाकार माजला. वज्रपाणी इंद्र अत्यंत तिरस्काराने बलीस म्हणाला, 'मूढा, तू मायेच्या योगानं आम्हांला जिंकण्याचा प्रयत्न करतोस ? पण तुझ्यासारख्यांना मी आहे त्या स्थानापेक्षाही खाली घालवीन. मी आताच शंभर गाठींच्या या वज्रानं तुझं शिर तोडून टाकतो. तू आपलं रक्षण करण्यासाठी सिद्ध हो.' त्यावर बली त्याला म्हणाला, 'इंद्रा, कीर्ती, जय, पराजय, मृत्यू यांची प्राप्ती काळामुळंच होते. ज्ञानी पुरुषांना हर्ष होत नाही व ते शोकही करीत नाहीत. पण तुम्ही मात्र अज्ञानी आहात. कीर्ती, जय आपल्याच हाती आहेत असं तुम्ही मानता. तुमची कीव करावी तेवढी थोडीच.'

इतके म्हणून बलीनें आपल्या बाणांनी इंद्राला वेढले. बलीने इंद्राची निर्भर्त्सना केलीच. ती निंदा इंद्राला सहन झाली नाही. त्यानें आपल्या वज्राचा प्रहार बलीवर केला. पंख तुटलेल्या पर्वतासारखा बली विमानासह पृथ्वीवर पडला. त्याला साह्य करण्यासाठी त्याचा मित्र जंभासुर तेथे धाऊन आला. त्यानें आपली गदा इंद्रावर चालविली. त्यानें मोठ्या वेगानें इंद्राच्या व ऐरावताच्या मानेवर प्रहार केला. त्या प्रहारानें ऐरावत कष्टी होऊन विव्हळ झाला. गुढगे जमिनीला टेकून

तो मूर्च्छित झाला. अशा वेळी सहस्र अश्वांचा एक रथ मातलीने इंद्राजवळ आणला. इंद्रानें त्या रथावर आरोहण केले. इंद्रावर जंभासुराने आपल्या शूलाचा प्रहार केला. मातलीनें तो प्रहार सहन केला. इंद्रानें क्रुद्ध होऊन आपल्या वज्रानें जंभासुराचे शिर कापून टाकले.

जंभासुराचा वध झाल्याचे वर्तमान नमुची, बल व पाक यांना समजले. त्यांनी मोठ्या त्वेषानें कठोर शब्दांत इंद्राची निंदा केली. त्यांनी बाणांच्या वर्षावानें इंद्राला आच्छादून टाकले. शीघ्रपराक्रमी बलासुराने इंद्राच्या हजार घोड्यांना हजार बाणांनी रणभूमीवर विदीर्ण केले. पाकासुरानेंही दोनशे बाण सोडून, मातलीला चीत करून रथाचे भाग तोडून टाकले. नमुचीनें पंधरा सोन्याच्या मुठींचे बाण सोडून संग्रामात इंद्राला जर्जर केले. पाण्याने भरलेल्या मेघाप्रमाणे त्यानें गर्जना केली. इतर असुरांनीही इंद्राच्या भोवती बाणांचे जाळे तयार केले. इंद्र दृष्टीस न पडल्यानें देवांनी एकच आक्रोश केला. पण थोड्याच वेळात अश्व, रथ, ध्वज, सारथी यांच्यासह इंद्र त्या बाणांच्या पिंजऱ्यातून बाहेर पडला व शत्रूला नाहीसे करण्यासाठी त्यानें आपले वज्र सज्ज केले. त्यानें बल व पाक या दोनही असुरांची मस्तके उडविली.

हा भयंकर प्रकार पाहाताच नमुचीनें शोक केला व तो इंद्राचा वध करण्यासाठी दीर्घ प्रयत्न करू लागला. मोठ्या त्वेषानें त्यानें घुंगुर लावलेला सोन्याच्या टोपणाचा लोखंडी शूल घेतला व इंद्राची निंदा करीत त्याच्या अंगावर फेकीत तो म्हणाला, ' इंद्रा, पाहा, तू आता मेलासच. ' आपल्या अंगावर येणाऱ्या त्या शूलाचे इंद्रानें आपल्या बाणांनी हजारो तुकडे करून टाकले. त्या असुराचे शिर कापण्यासाठी इंद्रानें वज्राचा प्रहार केला. परंतु त्या असुराची त्वचाही दुखावली नाही ! आपले वज्र कुंठित झालेले पाहून इंद्र भयभीत झाला. जेव्हा आकाशवाणीनें त्याला सांगितले, ' इंद्रा, हा नमुची शुष्क वा आर्द्र वस्तूंनी मरणार नाही, असा याला वर आहे. तू याच्या वधासाठी दुसरा उपाय शोधून काढ.' तेव्हा इंद्राने ओलेही नाही, सुकेही नाही, असा पाण्याचा फेस ध्यानात आणून त्यानें त्या फेसानें नमुचीचे शिर कापून टाकले.

नमुची गतप्राण होताच विश्वावसू, परावसू यांनी गुणगान सुरू

केले. देवांच्या दुंदुभी वाजू लागल्या. अप्सरांची आनंददायक नृत्य सुरू झाली. अग्नी, वायू, वरुण आदी देवांनीही आपापल्या शत्रूंचा नाश केला. तेव्हा नारद देवांना म्हणाले,

'देवांनो, नारायणांचा आश्रय तुम्ही घेतलात, म्हणून तुम्हांला अमृत प्राप्त झालं. तुम्हांस विजय मिळून ऐश्वर्य प्राप्त झालं. आता तुम्ही युद्ध बंद करावं.'

नारदांच्या वचनास मान देऊन देवांनी आपला क्रोध आवरला. ते गंधर्वांसह आपल्या स्वर्गलोकात निघून गेले. संग्रामात उरलेल्या असुरांनी वज्रप्रहारानें जखमी झालेल्या बलीला नारदांच्या संमतीनें अस्ताचलास नेले. तेथे काही असुरांना शुक्राचार्यांनी संजीवनीविद्येनें जिवंत केले. शुक्राचार्यांचा स्पर्श होताच बलिराजाची इंद्रिये परत ताजीतवानी झाली. त्याची खिन्नताही दूर झाली.

## महादेवांना विष्णूंचे मोहिनीदर्शन

श्रीहरींनी स्त्रीरूप घेऊन दानवांना मोहित केले व देवांना अमृत पाजले. हा सर्व वृत्तांत वृषभध्वज महादेवांना समजला. तेव्हा त्यांचे मोहिनीरूप आपण पाहावे, अशी इच्छा मनात धरून ते पार्वतीसह नंदीवर आरूढ झाले. सर्व भूतगणांना बरोबर घेऊन ते मधुसूदन भगवानांकडे आले. भगवान विष्णूंनी मोठ्या आदरानें महादेवांचा व पार्वतीचा सत्कार केला. महादेवही आसनावर संपन्न झाल्यावर त्यांनी विष्णूंचा सत्कार केला. महादेव विष्णूंना हसत हसत म्हणाले,

'जगदीशा, जगन्मया, देवाधिदेवा, आपण सर्व पदार्थांचे आत्मे आहात. कारण आहात. आपण सर्वसमर्थ आहात. जगाची उत्पत्ती, स्थिती, लय ही आपणांपासून होतात. सत्य व चैतन्यरूप आपणच आहात. प्रभो, इहलोकी व परलोकी भोगांचा त्याग करून मुमुक्षु मुनिजन आपल्याच चरणकमलांची आदरानं उपासना करतात. परमेश्वरा, आपण निर्गुण, शोकरहित, निर्विकार, आनंदमय, सर्वव्यापक, सुखस्वरूप व परिपूर्ण आहात. आपण निरपेक्ष आहात. जगदीशा, वेदान्ती आपणांस ब्रह्म म्हणतात. मीमांसक धर्म म्हणतात. सांख्य आपणांस

प्रकृती व पुरुष यांच्याहून भिन्न मानतात. पांचरात्र आपणांस नऊ शक्तींनी युक्त मानतात, तर पातंजलमताचे योगी आपणांस जन्मादी विकाररहित स्वतंत्र महापुरुष मानतात. मी, ब्रह्मदेव, मरीची प्रभृती आपणांस जाणू शकत नाही. तर पापकर्म करणारे दैत्य, मनुष्यादी आपणांस कसं जाणतील ? परमेश्वरा, आपण सर्व जगताचा आत्मा आहात. संसारबंध व मोक्ष आपण जाणता. ईश्वरा, तुझे नृसिंहादी अवतार मी पाहिले. अमृतमंथनाच्या प्रसंगी आपण मोहिनीचं स्त्रीरूप धारण केलं होतं. ते मात्र पाहाण्याची इच्छा मला आहे. ज्या रूपानं आपण दैत्यांना मोहित केलं, देवांना अमृत पाजलंत, ते आपलं सुंदर रूप पाहाण्यासाठी आम्ही सर्वच उत्सुक आहोत. कारण त्यामुळं आम्हांस फारच आश्चर्य वाटत आहे.'

'शंकरा, अमृताचं पात्र दैत्यांच्या हातात पाहून आता या देवांचं कसं होणार ? या प्रश्नाच्या विचारानं मी दैत्यांना मोह निर्माण होईल असा स्त्रीवेष धारण केला. सुरश्रेष्ठा, कामोत्पादक व कामीजनांना आवडणारं असं ते अत्यंत रमणीय रूप तुम्हांस पाहायचं असेल तर ते मी दाखवितो.'

एवढे म्हणून भगवान विष्णू अंतर्धान पावले. त्यानंतर चित्र-विचित्र फुले व तांबूस रंगाची कोवळी पानें यांनी समृद्ध असलेल्या वृक्षांच्या एका उपवनात एक सुंदर स्त्री महादेवांना दिसली. ती चेंडूशी खेळत होती. तिनें सुंदर रेशमी शालू नेसला होता. कमरेस कमरपट्टा होता. वरखाली उडणाऱ्या चेंडूच्या गतींबरोबर ती वारंवार खाली वाके व उभी राही. त्यामुळे तिचे स्तन कंपित होत. गळ्यातील सर्वोत्कृष्ट हारामुळे, त्याच्या भारानें ती पदोपदी खाली वाकत असे. तिचे पाय कोवळ्या पानांप्रमाणे नाजूक होते. चेंडूबरोबर ती इकडेतिकडे फिरत होती. चेंडूच्या गतींमुळे तिच्या डोळ्यांतील बुबुळे फारच चंचल झाली होती. कानांतील चमकदार कुंडलांमुळे तिचे गाल प्रकाशत होते. काळ्याभोर केसांनी तिचे मुख फारच शोभिवंत दिसत होते. तिचे वस्त्र सैल झाले होते. वेणी सुटत चालली होती. आपल्या डाव्या हातानें ती वेणी सावरत होती. दुसऱ्या हातानें चेंडू वरखाली करीत होती. ती आपल्या मायेनें

सर्व जगाला मोह पाडीत होती.

अशा या सुंदर स्त्रीला पाहाताच पार्वती, शिवपार्षद व स्वतः शंकरही मोहित झाले. कंदुकक्रीडेत असलेल्या तिच्या सुंदर हास्याने व कटाक्षाने ते जर्जर झाले. त्यांचे मन अगदी विव्हल बनले. एवढ्यात तिच्या हातातील चेंडू वर उडाला. तो झेलण्यासाठी ती त्याच्या मागोमाग गेली. कमरपट्ट्यासह तिचे झिरझिरीत वस्त्र महादेवांच्या समक्ष वायूनें उडविले. त्या सुंदर नेंत्रकटाक्षाच्या स्त्रीवर, दर्शनीय व मनोहर अशा त्या रमणीवर महादेवांचे मन एकदम जडले. त्यांना आसक्ती वाटू लागली. त्यांची विचारशक्ती क्षीण झाली. तिच्या-बद्दलची कामवासना त्यांच्या मनात उत्पन्न झाली. देवी पार्वतीच्या देखतच ते त्या सुंदर स्त्रीकडे निघाले.

महादेव आपणांकडे येत आहेत हे पाहून वस्त्ररहित अशा त्या सुंदर स्त्रीला अतिशय लज्जा वाटली. ती हसत हसत एका वृक्षाआड लपली. त्या वेळी कामासक्त भगवान शंकरांचे चित्त अस्वस्थ झाले. ते त्या स्त्रीच्या मागोमाग गेले. जणू एखाद्या हत्तिणीच्या मागे लागलेला कामातुर गजेंद्रच ! मोठ्या त्वरेनें ते त्या रमणीजवळ गेले व ती झिडकरीत असताना महादेवांनी तिची वेणी धरली व तिला आपणांकडे ओढून आपल्या दोनही बाहूंनी घट्ट आलिंगन दिले. तिचे केस अस्ताव्यस्त झाले असल्याने ती चळवळ करू लागली. त्या मायावी स्त्रीचा नितंब-भाग स्थूल होता. तरी तिने महादेवांकडून स्वतःस सोडवून घेतले. ती दूर पळून गेली. भगवान महादेव स्त्रीवश बनून त्या स्त्रीच्या मागे धावत गेले. गर्भधारणेची वेळ प्राप्त झालेल्या गायीच्या मागे धावणाऱ्या मस्तवाल बैलाप्रमाणे शंकरांचा वीर्यपात होऊ लागला. पृथ्वीवर जेथे महादेवांचे वीर्य पडले, त्या जागा रुप्याच्या व सोन्याच्या खाणी झाल्या.

नद्या, सरोवरे, पर्वत, वनें, उपवने ओलांडून महादेव तिच्या मागून जात होते. ऋषींच्या आश्रमात वीर्यपतनामुळे महादेवांचा निवास झाला. रेताचे स्खलन झाले तेव्हा महादेवांचा मोह दूर झाला. आपणां-कडून झालेला वेडेपणा त्यांच्या ध्यानात आला. पण श्रीहरींचे माहात्म्य त्यांना माहीत असल्याने या मोहाचे त्यांना नवल वाटले नाही. ते

झालेल्या प्रकारामुळे गोंधळले नाहीत, की लज्जितही झाले नाहीत. हे पाहून भगवान विष्णू संतुष्ट झाले. ते पुरुषरूप धारण करून महादेवांना म्हणाले,

'सुरश्रेष्ठा, माझ्या स्त्रीरूप मायेला तुम्ही मोहित झालात, पण सावध लौकर झालात. हे फार उत्तम झाले. ही त्रिगुणात्मक माया आजपासून तुम्हांस मोहित करणार नाही.'

श्रीहरींनी महादेवांचा सत्कार केल्यावर ते विष्णूंना प्रदक्षिणा घालून आपल्या स्थानी निघून गेले. त्यांनी पार्वतीला भगवंतांच्या मायेचे माहात्म्य मोठमोठ्या ऋषींच्या समोर समजावून सांगितले.

## बलीराजाचा वाढता प्रभाव

राजा परीक्षितानें एकदा शुकाचार्यांना विचारले, 'भगवन्, श्रीहरी एवढे समर्थ. मग त्यांनी एखाद्या कृपणाप्रमाणं बलीपासून तीन पावलांची भूमी का मागितली ? ते स्वतः परिपूर्णमनोरथ असतानाही त्यांनी बलीला बांधून कशासाठी ठेविलं ? यज्ञफलदाते व पूर्णकाम परमेश्वरानं याचना करावी, निरपराधी बलीला बंधन पडावं, या दोनही गोष्टी मोठ्या आश्चर्यकारक वाटतात.'

राजाच्या या प्रश्नास अनुसरून शुकाचार्यांनी त्याला बलीचा सर्व वृत्तान्त ऐकविला. देवदैत्यांच्या युद्धात बलीची संपत्ती नष्ट झाली. इंद्रानें त्याला मूर्च्छित केले. पण शुक्राचार्यांनी त्याला पुन्हा जिवंत केल्यानें तो उदार चित्ताचा बली त्यांचा शिष्य झाला. त्यांना इष्ट ते पदार्थ समर्पण करून तो त्यांची सेवा मनोभावे करू लागला. त्या भृगुवंशीय ब्राह्मणांनी संतुष्ट होऊन स्वर्ग जिंकू पाहाणाऱ्या बलीकडून विश्वजित नावाचा एक यज्ञ करविला. या यज्ञातून सुवर्णाच्या पट्ट्यांनी बांधलेला रथ, इंद्राच्या घोड्यांप्रमाणे हिरव्या रंगाचे घोडे, सिंहाच्या चित्रानें शोभणारा ध्वज अशा वस्तू प्रकट झाल्या. सुवर्णाचे दिव्य धनुष्य, अक्षय भाते, दिव्य कवच यांचीही प्राप्ती अग्नीपासून झाली. आजोबा प्रल्हाद यानें कधीही न कोमेजणाऱ्या पुष्पांची माळ बलीला दिली. शुक्राचार्यांनी शंख दिला. ब्राह्मणांनी त्याला युद्धसामग्री दिली.

माळा, उत्तम कवच, धनुष्य, खड्ग, भाते यांनी संपन्न असलेला बली ब्राह्मणांनी दिलेल्या रथावर आरूढ झाला.

त्याचे बाहू त्या वेळी सुवर्णाच्या बाहुभूषणांनी झळकत होते. त्याच्या कानांत मकराकार कुंडले तळपत होती. कुंडातील अग्नीप्रमाणे बली रथावर शोभू लागला. प्रभाव, बल व संपत्ती यांनी समृद्ध झालेला बली स्वर्ग, पृथ्वी यांना कंपित करीत आपल्या मोठ्या सेनेसह अत्यंत वेगाने इंद्रपुरीकडे निघाला. त्या नगरीत अत्यंत शोभायुक्त अशी वने व उपवने होती. तेथे पक्ष्यांची अनेक जोडपी अत्यंत मधुर शब्द करीत होती. कोमल पल्लव, फुले, पुष्पे यांनी कल्पवृक्षाच्या शाखा डवरून गेल्या होत्या. देवांना उपभोग्य अशा सुंदर स्त्रिया सरोवरात क्रीडा करीत होत्या. हंस, सारस, चक्रवाक, कारंडव तेथे क्रीडा करीत होते. तेथेच आकाशगंगा एखाद्या खंदकाप्रमाणे प्रकाशली होती. तेथे अग्नी-सारखा तेजस्वी असा उंच तट होता. दरवाज्यांना सोन्याच्या पट्ट्या व दारे स्फटिकांची होती. रस्ते अगदी आखीव होते. सभागृहे, अंगणे, लहान रस्ते यांनी ती नगरी शोभिवंत असून दहा कोटी विमाने तेथे होती. हिऱ्यांचे व पोवळ्यांचे ओटे असून चव्हाट्यांवरील भूमींत रत्ने मढविली होती.

या नगरीतील स्त्रिया सदैव तरुण, सुकुमार व निर्मल वस्त्रे परिधान केलेल्या होत्या. त्यांनी उत्तम अलंकार घातलेले होते. त्या नित्य सोळा वर्षांच्या दिसत. त्यांची शोभा ज्वालांप्रमाणे वाटे. देवांगनांच्या केसांतून गळालेल्या चंपकमालांचा सुवास वायू ग्रहण करीत होता. सर्व रस्ते सुवर्णाच्या जाळ्यांतून बाहेर पडणाऱ्या अगरुधूपाच्या सुगंधी सुवासाने भरलेले असून तेथे देवांगनांचा संचार असे. रस्त्यांत मधून मधून छते होती. त्यांवर रत्नजडित सुवर्णध्वज फडकत होते. नाना प्रकारच्या पताका शोभत होत्या. मोर, पारवे, भुंगे यांच्या मधुर नादांनी सारी नगरी दुमदुमून गेली होती. देवांगनांची मधुर गीते मंगलदायक वाटत होती. अनेक ठिकाणी मृदंग, शंख, नगारे, टिमक्या इत्यादी वाद्यांचा घोष होत होता. टाळ, वीणा, ढोलकी, ऋषी, वेणू इत्यादी वाद्यांच्या मधुर नादाबरोबर गंधर्वादिकांचे नृत्यगायन सुरू होते.

या नगरीत पातकी, दुष्ट, प्राण्यांना पीडा देणारे, वंचक, अभिमानी, विषयासक्त, लोभी अशा पुरुषांना प्रवेश नव्हता. अधार्मिक लोक तेथे नव्हते. अशा या देवनगरीस सेनापती बलीनें चारही बाजूंनी वेढा दिला. इंद्राच्या स्त्रियांना भय वाटावे म्हणून शुक्राचार्यांनी दिलेला महानादयुक्त शंख त्यानें जोरानें वाजविला. तेव्हा बलीचा प्रभाव ओळखून इंद्रानें सर्व देवांसमक्ष गुरूला विचारले,

'भगवन्, आपला पूर्ववैरी बली याचा उद्योग अत्यंत असह्य आहे. त्याला एवढं बळ कशानं प्राप्त झालं ? याचा प्रतिकार कोण कसा करणार ? प्रलयकालाप्रमाणं हा आमचा नाश करण्यासाठी तत्पर झाला आहे. तो आपल्या तोंडानं सारं विश्वच पिऊन टाकतो आहे. हा तर जिभेनं दहाही दिशा चाटीत आहे. नेत्रांनी तो जाळून टाकीत आहे. त्याला एवढं सामर्थ्य कसं मिळालं ?'

'इंद्रा, या तुझ्या शत्रूचं सामर्थ्य मला माहीत आहे. भृगुकुलोत्पन्न शुक्राचार्यांनी त्याला हे अद्‌भुत सामर्थ्य दिलं आहे. एका श्रीहरींवाचून कुणीही पुरुष याच्यासमोर उभा राहू शकणार नाही. तुम्ही सर्वांनी या स्वर्गभूमीचा त्याग करावा. कुठं तरी गुप्तपणानं वावरावं. तुमच्या या शत्रूचा पराभव होईपर्यंत वाट पाहावी. ब्राह्मणांच्या बलामुळंच या बलीचा उत्कर्ष झाला आहे. तूर्त तर तो फारच पराक्रमी आहे. पण हा जेव्हा ब्राह्मणांचाच अपमान करील तेव्हा तो आपल्या परिवारासह नाश पावेल.'

गुरूच्या सांगण्यावरून देवांनी योग्य ती रूपे धारण केली व ते स्वर्गाचा त्याग करून कोठेतरी गुप्तरूपाने राहू लागले. देवांचे इंद्रपुरीचे आधिपत्य विरोचनपुत्र बलीनें स्वीकारले. त्यानें तीनही लोकांना वश करून घेतले. ब्राह्मणांनी बलीकडून शंभर अश्वमेधयज्ञ केले. अनुष्ठानाच्या प्रभावानें बलीची कीर्ती त्रिभुवनांत पसरून तो एखाद्या नक्षत्राप्रमाणे चमकू लागला. तो उदार अंत:करणाचा होता. आपल्या विपुल संपत्तीचा भोग घेत तो राहिला.

## अदितीला पयोव्रताचा विधी

बलीच्या वाढत्या प्रभावामुळे इंद्रादी देव दिसेनासे झाले. देवमाता अदिती एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणे दुःख करू लागली. एके दिवशी कश्यपमुनी तिच्या आश्रमात आले. अदितीनें त्यांचे अत्यंत आदरानें पूजन केले. ते दीनवदन झालेल्या आपल्या पत्नीस म्हणाले,

'भद्रे, सांप्रत काही आपत्ती तर नाही आली? धर्मावर कुठलं संकट तर नाही? अर्थ, काम यांवर एखादं संकट कोसळलं नाही? कुणी अतिथी तर तुझा सत्कार न घेता घरातून तसेच गेले नाहीत? मी देशांतरास गेलो होतो. मनातून तू उद्‌विग्न झालीस. त्या अवस्थेत होमकाळी हविर्भाग तर द्यायचा राहून गेला नाही ना? मनोनिग्रही अदिती, तुझे सर्व पुत्र कुशल आहेत ना? तुझं मन तर मला अत्यंत म्लान व अस्वस्थ दिसतंय.'

'ब्रह्मनिष्ठ मुनें, ब्राह्मण, गायी, सर्व लोक खुशाल आहेत. अग्नी, अतिथी, सेवक, संन्यासी इत्यादींचा सत्कार मी यथायोग्य केला आहे. दर क्षणी मी आपलंच चिंतन करीत असल्यानं मला उणं असं काहीच नाही. पण प्रभो, आपण आता माझं व माझ्या पुत्रांचं रक्षण करावं. शत्रूंनी पुत्रांची सर्व संपत्ती हरण केली आहे. त्यांना स्थानभ्रष्ट केलं आहे. त्यामुळं मी दुःखसागरात बुडून गेले आहे. त्या प्रबल शत्रूंनी माझं ऐश्वर्य, माझी संपत्ती, माझं यशस्थान सर्व काही नष्ट केलं आहे. म्हणून प्रभो, माझ्या पुत्रांचं ऐश्वर्य पुन्हा प्राप्त होईल, असा काही उपाय आपण सांगावा.'

'अदिती, हा त्या विष्णुमायेचा प्रताप! तिनं सारं जग आपल्या स्नेहपाशात बांधून ठेवलं आहे. पती, पुत्र इत्यादी खरं पाहाता कोण कुणाचे आहेत? मोहामुळंच हे संबंध निर्माण झाले आहेत. म्हणून अदिती, षड्‌गुणसंपन्न अशा जगद्‌गुरू वासुदेवांची तू आराधना कर. ते दीनदयाळ प्रभू तुझे मनोरथ पूर्ण करतील. अदिती, भगवंतांची सेवाच सफल होते.'

'भगवन्, मी भगवंतांचं स्मरण कसं करू? आराधना कशी

करू ?'

'भद्रे, फाल्गुन महिन्याच्या शुक्लपक्षातील प्रतिपदेपासून द्वादशी-पर्यंत बारा दिवस तू केवळ दूध प्राशन करून भगवंतांचं पूजन कर. अमावास्येच्या दिवशी प्रथम रानडुकरानं उकरलेली माती घेऊन नदीच्या प्रवाहात उभं राहावं. प्राण्यांना निवासस्थान प्राप्त होण्यासाठी, तू त्यांना वराहावतार धारण करण्यासाठी प्रार्थना कर. त्यानंतर शरीराला ती मृत्तिका लावावी. स्नान करून, नित्यनैमित्तिक कृत्य आटोपून प्रतिमा, स्थंडिल, सूर्य, जल, अग्नी, गुरू, यांपैकी कोणत्या तरी ठिकाणी देवांचे अर्चन करावे. तेव्हा म्हणावे, ' भगवंता, पुरुषोत्तमा, ब्रह्मादिकांना पूज्य, सर्व भूतांचे निवासस्थान व सर्वसाक्षी अशा तुज वासुदेवास नमस्कार असो. अव्यक्त, अतिसूक्ष्म, प्रकृतिपुरुषरूप, चोवीस तत्त्वांचा ज्ञाता आणि सांख्यशास्त्रप्रवर्तक, अशा तुज भगवंताला माझा नमस्कार असो.

नमस्तुभ्यं भगवते पुरुषाय महीयसे ।
सर्वभूतनिवासाय वासुदेवाय साक्षिणे ।।
नमोऽव्यक्ताय सूक्ष्माय प्रधानपुरुषाय च ।
चतुर्विंशद्‌गुणज्ञाय गुणसंख्यानहेतवे ।।

'भद्रे, त्या यज्ञमूर्तीला नमस्कार करावा. सर्व भूतांचा, विद्यांचा अधिपती, सर्वशक्तिधर, परमानंदस्वरूप अशा त्या रुद्रमूर्तीला नमस्कार कर. हिरण्यगर्भ, सूत्ररूप, जगदात्मा, योगैश्वर्य शरीरानं युक्त, योगप्रवर्तक, अशा त्या ब्रह्ममूर्तीला नमस्कार कर. सर्व जगाला पूज्य, सर्वसाक्षीभूत, दुःखनिवर्तक अशा त्या नरनारायणरूप ऋषिरूप हरीला नमस्कार कर. तू असं म्हण की, ज्याचं शरीर पाचेप्रमाणं श्याम आहे, ज्याच्या ठिकाणी लक्ष्मीनं आश्रय घेतला आहे, त्या तुज पीतांबरधारीस नमस्कार असो. नरश्रेष्ठा, सर्वोत्तमा, तू सर्व प्रकारचे वर देणारा आहेस. देव व लक्ष्मी तुझ्याच चरणांची सेवा करतात. भगवान, अशा रूपानं आपण माझ्यावर प्रसन्न व्हावं. भद्रे, त्या भगवंतांचं अशा नऊ मंत्रांनी ध्यान करून त्यांचं पाद्य, आचमन, इत्यादींनी श्रद्धापूर्वक पूजन करावं. गंधपुष्पादिकांनी प्रभूंना दुधाचा अभिषेक घालावा. मग वस्त्रं, यज्ञोपवीत, भूषणं, बारा

अक्षरांच्या मंत्रानं त्यांचं पूजन करावं. सामर्थ्यानुसार दुधात शिजविलेल्या तूप व गूळमिश्रित भाताचा नैवेद्य दाखवावा. प्रसाद भक्षण करावा. द्वादशाक्षर मंत्राचा एकशेआठ वेळा जप करून, प्रभूस प्रदक्षिणा घालून साष्टांग नमस्कार करावा. नंतर निर्माल्य मस्तकी धारण करावा. निदान दोन तरी ब्राह्मणांना खिरीचं भोजन घालावं. दक्षिणा देऊन त्यांचा सत्कार करावा.'

कश्यपांनी अदितीला सर्वोत्कृष्ट असे हे पयोव्रत समजावून दिले. त्यांनाही हे प्रत्यक्ष ब्रह्मदेवांनी सांगितले होते. इंद्रियांचे दमन करून हे व्रत केल्यास अविनाशी अशा भगवंतांची कृपा प्राप्त होते. या अनुष्ठानालाच सर्वयज्ञ असे नाव आहे. हेच व्रत सर्वोत्कृष्ट, असे त्यांनी अदितीला सांगितले.

## 'आपणच सर्वोत्कृष्ट आधार आहात'

कश्यपांनी केलेल्या उपदेशाप्रमाणे अदितीनें आळस सोडून बारा दिवसपर्यंत या व्रताचे आचरण केले. एकाग्रचित्ताने तिने भगवंतांची आराधना केली. त्या व्रताच्या प्रभावाने शंख, चक्र, गदा ही आयुधे धारण करणारे चतुर्भुज, पीतांबरधारी श्रीहरी तिच्यापुढे प्रकट झाले. त्यांना पाहाताच अदितीचे अंतःकरण भरून आले. तिनें त्यांना साष्टांग नमस्कार घातला. तिचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले होते. तिच्या देहावर रोमांच उमटत होते. तिच्या शरीराला कंप सुटला. भूमीवरून उठून तिनें भगवंतांची मनापासून स्तुती केली. पण प्रेमाचा गहिवर दाटून आल्यामुळे तिच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. ती नुसती हात जोडून उभी राहिली. ती त्या श्रीहरींकडे टक लावून एकसारखी पाहात होती. ती त्यांना म्हणाली,

'यज्ञफलदात्या, यज्ञपुरुषा, अच्युता, तुमचं चरित्र किती पवित्र ! श्रवण केलं तरी सर्वांचं मंगल होतं. आदिपुरुषा, शरणागतांच्या दुःखांना दूर करण्यासाठीच आपण प्रकट होता. भगवंता, आपण आमचं कल्याण करावं. आपण दीनांचे नाथ आहात. आपणांस, आपल्या विश्वरूपास

नमस्कार असो. अनंता, तुझा संतोष झाला तर मानवांना दीर्घायुष्य, इच्छित देह, अनुपम संपत्ती, स्वर्ग, भूमी, रसातल, अणिमादी सिद्धी, धर्म, अर्थ, काम, मोक्ष, ज्ञान इत्यादींची प्राप्ती होते. शत्रूंवर जय मिळतो हे सांगायला नकोच.'

'देवमाते, शत्रूंनी संपत्ती हरण करून देवांना स्वस्थानांवरून भ्रष्ट केलं आहे. हे मी जाणलं आहे. त्या असुरश्रेष्ठांना रणात तुझ्या पुत्रांनी जिंकावं, पुन्हा जय व संपत्ती यांना प्राप्त करून घ्यावं, अशी तुझी इच्छा आहे. वीरमाते, युद्धात तुझ्या पुत्रांनी शत्रूचा वध करावा, शत्रूंच्या स्त्रिया त्यांच्याजवळ रडत बसाव्यात, अशी तुझी इच्छा आहे, आपल्या पुत्रांनी स्वर्गात क्रीडा करावी, असं तू म्हणतेस.

'पण अदिती, तूर्त ते असुरसेनापती अजिंक्य आहेत. समर्थ असे ब्राह्मण त्यांचे रक्षण करीत असतात. त्यांचा पराभव करणं या वेळी सुखकारक होणार नाही. पण देवी, तू मला व्रत करून प्रसन्न करून घेतलं आहेस. माझ्या पूजनाचं फल व्यर्थ नाही जाणार. म्हणून कश्यपांच्या तपापासून निर्माण झालेल्या तेजात मी प्रवेश करीन व तुझ्या पोटी त्या अंशाचा पुत्र म्हणून येईन. आणि तुझ्या पुत्रांचं रक्षण मी करीन. म्हणून भद्रे, तू तुझ्या पतीच्या ठिकाणी तेजोरूपानं मीच आहे, अशी भावना करून त्यांची मनोभावानं सेवा कर.'

एवढे सांगून भगवंत गुप्त झाले. कृतकृत्य झालेली अदिती मोठ्या निष्ठेने आपल्या पतीच्या सेवेत रमून गेली. सर्वज्ञ अशा कश्यपांनीही आपल्या ठिकाणी श्रीहरींचा अंश कल्पून अदितीच्या ठिकाणी वीर्य-स्थापना केली. त्या गर्भस्थ देवाचे ब्रह्मदेवांनी मनापासून स्तवन करताना म्हटले, 'भगवंता, आपला जयजयकार असो. आपण ब्राह्मणांचं हित करणारे आहात. आपण नाना प्रकारची क्रीडा करता. भगवंता, आपणांस वारंवार नमस्कार असो. आपण पृश्निपुत्र (अदितीचे पूर्व-जन्मीचे नाव) असून आपण सर्वव्यापी आहात. आपणांस नमस्कार असो. ईश्वरा, आपण अनंत शक्तियुक्त पुरुष आहात. कालरूपी प्रलयात आपण सर्व विश्वास आकर्षित करून घेता. देवा, स्थावर-जंगमात्मक प्रजा व प्रजापती यांना आपणच उत्पन्न करता. स्वर्गापासून च्युत

झालेल्यांना आपणच उत्कृष्ट आधार आहात.'

## बलीच्या यज्ञात वामनांचे आगमन

अदितीच्या गर्भाची ब्रह्मदेवांनी प्रार्थना केली तेव्हा श्रीहरी शंख, चक्र, गदा, पद्म या आयुधांसह पीतांबरधारी, चतुर्भुज कमलाप्रमाणे सुंदर नेत्रांचे, अदितीच्या ठिकाणी प्रकट झाले. त्या पुरुषोत्तमांचा श्यामवर्ण निर्मळ होता. मकराकार कुंडले त्यांच्या मुखावरची शोभा वाढवीत होती. त्यांच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सलांच्छन होते. कडी, तोडे, बाहुभूषणे त्यांनी घातली असून उज्ज्वल किरीट, कमरपट्टा, नूपुरे यांनी ते शोभत होते. भ्रमरांच्या गुंजारवाने त्यांच्या गळचात सुंदर वनमाळ शोभत होती. त्यांच्या कंठात कौस्तुभमणी होता.

भगवंत प्रकट होताच कश्यपांच्या आश्रमातील अंधार एकदम नष्ट झाला. सर्व दिशा प्रसन्न झाल्या. सरोवरातील उदके स्वच्छ झाली. सर्व लोकांना अत्यंत हर्ष झाला. ऋतू आपापल्या पुष्पफळांनी समृद्ध झाले. स्वर्गलोक, अंतरिक्ष, भूलोक, यांतील देव, गायी, ब्राह्मण, पर्वत इत्यादींना आनंद झाला. श्रवणनक्षत्रास चंद्र असताना श्रावण द्वादशीस अभिजित मुहूर्तावर प्रभूंचा अवतार झाला. अश्विन्यादी नक्षत्रे, गुरू, शुक्र, सूर्य, चंद्र इत्यादी ग्रह या सर्वांनीच हा काळ शुभ होता.

श्रोणायां श्रवणद्वादश्यां मुहूर्तेऽभिजिति प्रभुः।
सर्वे नक्षत्रताराद्याश्चक्रुस्तज्जन्म दक्षिणम् ॥

ज्या द्वादशीला भगवंतांचा जन्म झाला तिला विजयाद्वादशी म्हणतात. त्या दिवशी जन्मकाळी सूर्य मध्यान्ही होता. प्रभूंचा जन्म होताच शंख, दुंदुभी, मृदंग, पणव, आनक इत्यादी वाद्यांचा नाद झाला. चौघडा, डंका इत्यादींचा ध्वनी झाला. अप्सरा आनंदाने नृत्य करू लागल्या. गंधर्वांची गाणी सुरू झाली. मुनी स्तुती करू लागले. देव, मनू, पिता, अग्नी, सिद्ध, विद्याधर, किंपुरुष, किन्नर, चारण, यक्ष, राक्षस, गरुड, भुजंग, इत्यादींनी अदितीच्या आश्रमावर पुष्पांचा वर्षाव केला. आपल्या नवजात पुत्राला पाहून अदितीला नवल वाटले. तिचे हृदय

आनंदानें भरून गेले, कश्यपांनी त्याला ' विजयी हो ' असा आशीर्वाद दिला. त्या श्रीहरींनी कांती, भूषणे, आयुधे, यांनी शरीर धारण केले व माता-पित्यांच्या समक्ष वामनरूप स्वीकारले.

त्या बटुरूपाचे कश्यपांनी जातकर्मादी संस्कार केले. उपनयन-प्रसंगी त्यांनी त्याला गायत्रीमंत्राचा उपदेश केला. बृहस्पतीनें यज्ञोपवीत दिले. कश्यपांनी कटिसूत्र दिले. भूमीनें त्याला कृष्णाजिन दिले. वनाधिपती चंद्रानें दंड दिला. अदितीनें लंगोटी दिली. स्वर्गाभिमानी देवीने वामनाला छत्र अर्पण केले. ब्रह्मदेवांनी कमंडलू दिला. सप्तर्षींनी कुश दिले, सरस्वतीने रुद्राक्षमाळ अर्पण केली. उपनयन झालेल्या त्या बटूस कुबेराने भिक्षापात्र दिले. जगन्माता पतिव्रता उमादेवीनें त्यास भिक्षा समर्पण केली.

भृगुवंशी ब्राह्मणांनी चालविलेल्या अश्वमेधात बलिराजा ईश्वराचे पूजन करीत आहे, तो मोठा सामर्थ्यवान आहे, तो आपल्या भारानें पदोपदी पृथ्वीला वाकवीत आहे, हे सर्व वामनांना समजल्याने ते बलीच्या यज्ञस्थानाकडे निघाले. नर्मदेच्या उत्तर तटाकी हे अनुष्टान सुरू होते. वामन येत आहेत असे समजताच प्रत्यक्ष सूर्याचा उदय होत आहे असेच सर्वांना वाटले. वामनांच्या तेजाने सारे ऋषी निस्तेज झाले. हा सूर्य आहे की, सनत्कुमार आहे, असा तेथे तर्क सुरू झाला. दंड, छत्र, जलपूर्ण कमंडलू धारण करून भगवान वामनांनी यज्ञमंडपात प्रवेश केला. त्यांच्या कमरेस तृणाची मेखला होती. हरणाचे कातडे त्यांनी यज्ञोपवीताप्रमाणे उजव्या काखेखालून धारण केले होते. त्या ब्रह्मचाऱ्याने मायेच्या योगाने जटा धारण केल्या होत्या. त्यांचा यज्ञ-सभेत प्रवेश होताच भृगुब्राह्मण व त्यांचे शिष्य गडबडून गेले. त्यांनी उठून वामनांचा सत्कार केला. त्यांना पाहून यज्ञकर्त्या बलिराजास फारच आनंद झाला त्याने त्यांचे मनापासून स्वागत करून त्यांचे पाय धुतले. त्यांचे पूजनही केले. पायांचे अत्यंत मंगलकारक तीर्थ बलीनें मस्तकी धारण केले. तो बलिराजा त्या वामनांना म्हणाला,

' ब्राह्मणा, आपलं स्वागत असो. मी आपणांला नमस्कार करतो. आम्ही काय कार्य आपलं करावं ? द्विजा, आपण तर ब्रह्मर्षींचं मूर्तिमंत

तपच आहात. आज आपण इथं आलात, म्हणून आमचे पिता तृप्त झाले. आमचं कुल पवित्र झालं. आज आमचा यज्ञ यथासांग पार पडला. द्विजश्रेष्ठा, आपल्या पादप्रक्षालनानं मी आज निष्पाप झालो आहे. आज यज्ञाग्नीची पूजा यथाविधी झाली आहे. ही माझी भूमी आपल्या कोमल चरणांनी पवित्र झाली आहे. ब्राह्मणश्रेष्ठा, तुला काय हवं असेल ते तू माग. गाय, सुवर्ण, गृह, शुद्ध व मधुर अन्न, विवाहासाठी ब्राह्मणकन्या, समृद्ध गाव, घोडे, हत्ती, रथ, काय आपणांस हवं ते सांगावं.'

## त्रिपादभूमीची वामनांकडून याचना

विरोचनपुत्र बलीचे असे धर्मयुक्त भाषण ऐकून प्रसन्न झालेले भगवान वामन त्याला म्हणाले, 'लोकनाथा, परम धार्मिक व शांत वृत्तीचा प्रल्हाद तुझा आजा. त्यामुळं तुझं वचन सत्य, कुलास शोभणारं धर्मयुक्त व कीर्तिप्रद आहे. दैत्याधिपते, माझ्या पावलांनी मोजलेली अशी तीन पावलांइतकीच भूमी मी तुझ्यापासून इच्छितो. राजा, अत्यंत उदार अशा तुझ्यापासून मला दुसऱ्या कशाचीच गरज नाही.'

'ब्राह्मणपुत्रा, आपलं भाषण वृद्धांनाही संमत होईल. पण अल्पवयामुळं थोडा पोरकटपणा वाटतो. अरे, मी त्रैलोक्याचा राजा. सर्व द्वीपं देण्यास समर्थ असताना तू केवळ तीन पावलांचं दान मागतोस? खरोखरच तू अप्रबुद्ध आहेस. पोरा, तुझी उपजीविका नीट चालेल एवढं तू मागून घे ना.'

'राजा, त्रैलोक्यातील सर्व विषय मिळाले तरी अजितेंद्रिय पुरुषाचे मनोरथ पूर्ण होत नाहीत. त्रिपादभूमीनं मी तृप्त होईन. तृप्त झालो नाही तर नऊ खंडांची भूमीही मला समाधान देणार नाही. अर्थ व काम यांच्या मागे लागलेल्यांची तृष्णा कधी शांत झालेली नाही. तेव्हा प्रारब्धानं मिळालं त्यातच जो संतुष्ट होतो तोच सुखानं राहातो. अजितेंद्रिय मनुष्याला तीनही लोक प्राप्त झाले तरी तो असंतुष्टच असतो. म्हणून राजा, तुझ्यापासून मी फक्त तीन पावलांची भूमीच मागतो. तेवढ्यानंच मी कृतार्थ होईन.'

'बरं. तुझ्या इच्छेनुसारच घे.'

असे म्हणून बलिराजानें वामनांना भूमिदान देण्यासाठी हातात पाण्याचे भांडे घेतले. शुक्राचार्यांनी या वामनांचे हृद्गत जाणले. बलीचे सर्वस्व हरण करणारा हा वामनरूपी विष्णू आहे, हे ओळखून शुक्राचार्य राजास म्हणाले,

'विरोचनपुत्रा, बलिराजा, देवांचं कार्य साधण्यासाठी भगवान विष्णू अदितीच्या पोटी अवतीर्ण झाले आहेत. पुढे होणारा अनर्थ न जाणता तू या ब्राह्मणाला भूमिदान देत आहेस, हे मला चांगलं दिसत नाही. ही गोष्ट दैत्यांवरील संकटासारखी वाटते. हा मायेनं ब्राह्मण-रूप धारण करून आलेला श्रीहरी तुझं स्थान ऐश्वर्य, यश इत्यादी सर्व हरण करून त्या इंद्राला देईल. हा विश्वरूप होऊन फक्त तीन पावलां-नीच सर्व लोक व्यापून टाकील. मूढा, विष्णूला सर्वस्व अर्पण केलंस तर तुझा निर्वाह कसा होईल ? असुरश्रेष्ठा, ज्याच्या योगानं निर्वाहाचं साधन नष्ट होतं त्या दानाची प्रशंसा श्रेष्ठ लोक करीत नाहीत. म्हणून मी सांगतो ते तू ऐक. विरोचनपुत्रा, स्त्रियांना वश करताना, विनोदात, विवाहासाठी कन्या मिळविताना, उपजीविकेचं साधन मिळविताना, प्राणावर संकट आले असताना, गोब्राह्मणांचं हित करताना, एखादी हिंसा टाळताना अनृत म्हणजे असत्य भाषण निंद्य होत नाही.

**स्त्रीषु नर्मविवाहे च वृत्त्यर्थे प्राणसंकटे ।**
**गोब्राह्मणार्थे हिंसायां नानृतं स्याज्जुगुप्सितम् ।।**

शुक्राचार्यांचे हे भाषण ऐकून बलिराजा त्यांना म्हणाला, 'गुरो, अर्थ, काम, यश, निर्वाहाचं साधन यांना बाधा न करणाराच गृहस्थाचा धर्म होय. पण मी विरोचनाचा पुत्र. ब्राह्मणास देतो असं मी वचन दिलं आहे. आता केवळ द्रव्यलोभानं मी नाही कसं म्हणू ? असत्याहून मोठा अधर्म नाही. म्हणून खोटं बोलणाऱ्या मनुष्याखेरीज इतर काहीही सहन करणं शक्य आहे असं पृथ्वीनंही सांगितलं आहे. आचार्या, ब्राह्मणाला फसविण्यासाठी मी जसा भितो तसा नरकाला, दुःखाला, दारिद्र्याला, स्थानभ्रंशाला, मृत्यूलाही मी नाही भीत. मनुष्य मरण पावल्यावर धन त्याला सोडतंच. द्रव्यानं जर ब्राह्मण संतुष्ट होणार नाही तर मग

त्यागाचा उपयोग तरी काय ? आचार्या, दधीची, शिबी इत्यादी साधु-लोकांनी प्राण समर्पण करून उपकार केले आहेत. मग भूमीसारखी वस्तू देताना विचार कसला ? गुरो, याचकाची कामना पूर्ण करताना जर दैन्य प्राप्त झालं तर ते कल्याणकारकच समजावं. म्हणून ब्राह्मणाच्या इच्छित गोष्टी मी पूर्ण करणारच. हा विष्णू माझा हितकर्ता असो वा शत्रू असो, त्याच्या इच्छेप्रमाणं मी भूमी त्याला देईनच.'

आपल्यावर श्रद्धा न ठेवणाऱ्या बलीस शाप देताना शुक्राचार्य म्हणाले, 'तू अज्ञानी व उद्धट आहेस. तू स्वतःला पंडित मानतोस. पण आज तू माझ्या आज्ञेचं उल्लंघन केलं आहेस. माझी उपेक्षा केल्यामुळं तुझं ऐश्वर्य लौकरच नष्ट होईल.'

## वामनांची विश्वरूप वाढ

गुरूने शाप दिला तरी सत्यापासून भ्रष्ट न होता वामनांचे पूजन करून बलिराजानें त्यांना उदकपूर्वक पृथ्वीचे दान केले. मोत्यांच्या व रत्नांच्या माळा धारण करणारी बलीची पत्नी विंध्यावली वामनांचे पाय धुण्यासाठी उदकाचा कुंभ घेऊन तेथे उपस्थित झाली. यज्ञकर्त्या बलीने वामनांचे सुंदर चरण आनंदानें पाण्यानें धुतले. ते तीर्थोदक त्यानें आपल्या मस्तकी धारण केले. स्वर्गातील देवांनी, गंधर्वांनी, विद्याधरांनी, सिद्धांनी, चारणांनी त्या सत्यपालनस्वरूप कर्माची व सरळपणाची प्रशंसा केली व त्या दैत्याधिपतीवर पुष्पवृष्टी केली. हजारो दुंदुभी वाजू लागल्या. गंधर्व, किंपुरुष व किन्नर यांचे गायन सुरू झाले.

त्यानंतर श्रीहरींचे त्रिगुणात्मक वामनरूप वाढू लागले. भूमी, आकाश, दिशा, स्वर्ग, सप्तपाताळ, सप्तसागर, पशू, पक्षी, नर, देव, ऋषी या सर्वांचे विश्व त्यांनी व्यापून टाकले. त्या पुरुषोत्तमांच्या पायांशी रसातळ, पायांजवळ पृथ्वी, पोटऱ्यांशी पर्वत, गुडघ्यांवर पक्षी, मांड्यांत वायुसमुदाय प्रकट झाले. त्या सर्वव्यापी श्रीहरींच्या उरु-क्रमाच्या वस्त्रात संध्या, गुह्यस्थानी प्रजापती, जघनावर मोठमोठे असुर, काखेजवळ सप्तसागर, वक्षःस्थलावर नक्षत्रमाला यांचे दर्शन झाले. त्या श्रीहरींच्या हृदयावर बलीनें धर्माला पाहिले. स्तनांवर ऋत व सत्य,

मनात चंद्र, वक्षःस्थलावर हातात कमल धारण करणारी लक्ष्मी, कंठात सामवेद यांचे दर्शन त्याला झाले.

वामनांच्या बाहूंत इंद्रादी देव, कानांच्या जागी दिशा, मस्तकावर स्वर्ग, केसांत मेघ, नाकाच्या ठिकाणी प्राणवायू, डोळ्यांत सूर्य, मुखात अग्नी इत्यादींचे दर्शन त्याला झाले. त्या पुरुषोत्तमाच्या वाणीत चार वेद, जिभेवर वरुण, भुवयांच्या ठिकाणी विधी व निषेध, पापण्यांवर दिवस व रात्र, ललाटावर क्रोध, ओठावर लोभ, त्वगिंद्रियाच्या ठिकाणी काम, रेतःस्थानी जल, पृष्ठभागी अधर्म, पावलांत यज्ञ, छायेत मृत्यू, हास्यात मायाशक्ती, केसांत सर्व औषधी यांचे दर्शन बलीला झाले. वामनांच्या नाड्यांत त्याला सर्व नद्या दिसल्या. नखांत शिला आढळल्या. बुद्धीत ब्रह्मदेव, इंद्रियांच्या ठिकाणी इतर देव व ऋषी, सर्व देहात स्थावरजंगमात्मक भूते त्यानें पाहिली.

भगवंतांच्या ठिकाणी हे सर्व विश्व पाहून असुरांना मूर्च्छा आली. वामनांच्या हातात असह्य तेजाचे सुदर्शनचक्र होते. मेघाप्रमाणे गर्जना करणारे शार्ङ्ग धनुष्य, पर्जन्यासारखा ध्वनी करणारा पांचजन्य शंख, महावेगवती कौमोदकी गदा, ढालीसह विद्याधर खड्ग, सर्वोत्कृष्ट भाते यांनी श्रीहरी वामन शोभत होते. त्या वामनांनी एका पावलानें बलीची पृथ्वी, शरीराने आकाश, बाहूंनी दिशा व्यापून टाकल्या. दुसऱ्या पावलानें वामनांनी स्वर्ग थोडा करून टाकला. तिसऱ्या पावलास थोडीही जागा त्यांना दिसेना.

## बलिराज वरुणपाशात

यज्ञ करणाऱ्या आपल्या अधिपतीची सर्व पृथ्वी कपट करून वामनांनी हरण केली ही गोष्ट असुरांना सहन झाली नाही. त्यांनी अतिशय रागावून भाषण केले. ते म्हणाले, 'हा कुणी ब्राह्मण नसून मायावी विष्णूच आहे. ब्राह्मणाच्या वेषानं हा आपलं कार्य साधण्यासाठी इथं आला आहे. आमच्या अधिपतीचं सर्वस्व याचना करून या बटूनं हरण केलं आहे. आमचा अधिपती सत्यनिष्ठ आहे. त्यानं यज्ञाची दीक्षा घेतली आहे. तो ब्राह्मणभक्त असून दयाळू आहे. त्याला खोटं

भाषण करणं अशक्य आहे. म्हणून या वटूचा वध करूनच आपण आपल्या यजमानाची सेवा करावी.' असे म्हणून असुरांनी आपली आयुधे सज्ज केली. बलीची इच्छा नसतानाही शूल, पट्टिश इत्यादी आयुधांनी ते वामनांच्या अंगावर धावून गेले. विष्णूंच्या सेवकांनी हसून त्यांचे निवारण केले. नंद, सुनंद, जय, विजय, प्रबल, बल, कुमुद, कुमुदाक्ष, विश्वक्सेन, गरुड, जयंत, श्रुतदेव, पुष्पदंत, सात्वत अशा विष्णुपार्षदांनी ती दैत्यसेना मारून टाकली. बलीनेंही आपल्या सेनेस आवरून धरले. विप्रचित्ती, राहू यांना त्याने मागे फिरविले. आपल्या यजमानाचे ऐकून विष्णुदूतांकडून पराभूत झालेले दैत्यदानवांचे सेनापती रसातलात गेले. श्रीहरींचा अभिप्राय जाणून पक्षिराज गरुडानें यज्ञात सोमरस काढण्याच्या दिवशी वरुणपाशांनी बलीला बांधून ठेविले. स्वर्गात, पृथ्वीवर मोठाच हाहाकार माजला. स्थिरबुद्धीचा, उदारकीर्तीचा बलिराजा, ऐश्वर्यभ्रष्ट झाला. बद्ध झालेल्या बलीस पाहून श्रीहरी म्हणाले, 'असुरा, तू मला तीन पावलं भूमी दिली आहेस. दोन पावलांनी सारी पृथ्वी व्यापून गेली. आता तिसरं पाऊल कुठं ठेवू ? दैत्या, सूर्य-किरणांनी, चंद्रानं व नक्षत्रांनी युक्त व पर्जन्य वृष्टी करीत आहे, तेवढीच तुझी भूमी. आता तुला तिसऱ्या पावलासाठी भूमी देता येत नसेल तर तुला नरकात प्रवेश करावा लागेल. जो वचन देऊन याचकास फसवितो, त्याचा मनोरथ व्यर्थ होतो. मग स्वर्गाची गोष्ट कशासाठी ? त्याला नरकातच जावं लागतं. मी त्रैलोक्याचा स्वामी. मी त्रिपादभूमी देतो, असं सांगून तू मला फसविलंस. म्हणून तुला नरकाचं फल प्राप्त होईल.'

श्रीहरींनी असे म्हटले तरी बलिराजा वचनापासून ढळला नाही. तो त्यांना म्हणाला, 'देवश्रेष्ठा, आपली कीर्ती सर्वश्रेष्ठ आहे. मी आपणांस दिलेलं वचन खोटं ठरणार नाही. आपण आपलं तिसरं पाऊल माझ्या मस्तकावर ठेवावं. अपकीर्तीचं भय मला वाटतं. नरकाचं नाही. स्थानभ्रष्टत्वाचं अथवा पाशानं बांधल्याचं देवा, भय वाटत नाही. परमेश्वरा, आपण आम्हा असुरांचे हितकर्ते आहात. श्रेष्ठ गुरूच आहात. विविध प्रकारच्या मदांनी अंध झालेल्या आम्हा असुरांचं ऐश्वर्य आपण

नष्ट करता, आम्हांला आपण नवीन दृष्टी देता. आपणांशी वैर धरल्यानंच आम्हा असुरांना सिद्धी प्राप्त होतात. मला वरुणपाशानं आपण बद्ध केलंत, याचं दुःख नाही वाटत. माझे आजोबा प्रल्हाद आपले थोर भक्त होते. पण त्यांच्या पित्यानं त्यांचा अतिशय छळ केला. देवा, शरीर हे केव्हातरी संपणारच. त्याचा काय उपयोग ? घरादारांच्या योगानं माणसाचं आयुष्य मात्र व्यर्थ जातं, अशा विचारांनी माझ्या आजोबांनी आपल्या चरणांचा आश्रय घेतला.'

बली एवढे म्हणत आहे तोच चंद्राप्रमाणे शीतल असा भगवद्-भक्त प्रल्हाद तेथे येऊन पोचला. त्याचे नेत्र कमळाप्रमाणे मोठे होते. तो श्यामवर्ण, पीतवस्त्र, आजानुबाहू, सुंदर कांतीचा होता. अशा पिता-महांना बलीनें पाहिले. वरुणपाशाने तो बद्ध असल्यानें त्याला प्रल्हादास नमस्कार करता आला नाही. तरी त्याचे नेत्र अश्रूंनी भरून आले. बलिराजाचे तोंड लज्जेनें खाली झाले होते. प्रल्हाद भगवानांपाशी पाहाताच बलीच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्याच्या नेत्रांत आनंदाचा पूर आला. प्रल्हाद भगवंतांना म्हणाला,

'भगवंता, आपण समृद्ध असं इंद्रपद याला दिलं होतं. पण ते आपण त्याच्याकडून परत घेता हे ठीकच आहे. संपत्तीचा मोह धारण करणाऱ्या या बलीवर आपण अनुग्रहच करीत आहात. नारायणा, तुज सर्वसाक्षी जगदीश्वराला नमस्कार असो.'

वरुणपाशांनी बद्ध झालेल्या बलीची अवस्था पाहून त्याची पत्नी पतिव्रता विंध्यावली नम्रपणानें हात जोडून वामनांना म्हणाली, 'ईश्वरा, हे त्रैलोक्य आपण आपल्या क्रीडेसाठी निर्माण केलंत. पण अप्रबुद्ध लोक त्यावर आपलं स्वामित्व दाखवितात.' त्यानंतर ब्रह्मदेव वामनांना म्हणाले, 'भूतोत्पादका, भूतनियंत्या, देवाधिदेवा, जगदात्म्या, हा बलिराजा दंडास पात्र नाही. याचं सर्वस्व हरण झालं आहे. तरी आपण याला सोडून द्यावं. यानं उदार होऊन सर्व भूमीच काय, पण स्वर्गादी लोक व प्रत्यक्ष देहही आपणास अर्पण केला आहे. त्रैलोक्य आपल्या चरणांवर अर्पण केल्यावर याला दुःख कसं प्राप्त व्हावं ?

'ब्रह्मदेवा, ज्यावर मी अनुग्रह करतो, त्याचं द्रव्य, ऐश्वर्य मी

हिरावून घेतो. कारण या ऐश्वर्यानं मदमत्त होऊन पुरुष लोकांचा व माझा अवमान करतो. जीव हा परतंत्र असतो. कृमिकीटकांची योनी फिरत फिरत तो परम पुण्यानं पुरुषजन्म पावतो. तेव्हा त्याला जाती, कर्म, रूप, विद्या, ऐश्वर्य, धन इत्यादींचा गर्व न झाला तर माझी कृपा समजावी. पण माझ्याशी अनन्य निष्ठा ठेवणारा मात्र कशातच मोहित होत नाही. ब्रह्मदेवा, दैत्यांचा हा अधिपती बली क्लेश भोगीत असून मोहग्रस्त नाही. यानं मायेला जिंकलं आहे. याचं द्रव्य क्षीण झालं, हा आपल्या स्थानापासून भ्रष्ट झाला, शत्रूंनी याचा तिरस्कार करून याला बद्ध केलं, गुरूनं या निंदा करून याला शाप दिला; पण याचा संकल्प दृढ असल्यानं यानं सत्याचा त्याग केला नाही, म्हणून मी याला देवासही प्राप्त होणार नाही असं स्थान देतो. सावर्णी मन्वन्तरात हा माझ्या आश्रयानं इंद्र होईल. तोपर्यंत हा सुतलात राहील. तिथं राहणाऱ्या लोकांना आधी, व्याधी, ग्लानी, आळस, पराभव, इतर उपद्रव यांचा त्रास होणार नाही.'

ब्रह्मदेवांना एवढे सांगून झाल्यावर श्रीहरी बलीला म्हणाले, 'बलिराजा, तू आपल्या बंधुबांधवांसह सुतलात जावंस. तुझं कल्याण असो. तिथं तुझा इंद्रादी देवही पराभव करू शकणार नाहीत. जे दैत्य तुझ्या आज्ञेच्या बाहेर जातील त्यांचा नाश माझं सुदर्शनचक्र करील. वीरा, तुझं मी सर्व उपद्रवांपासून रक्षण करीन. मी सतत तुझ्या जवळच राहीन. तुला माझं दर्शन सतत होईल.'

## बलिराजाचे सुतलात प्रयाण

भगवंतांचे भाषण ऐकून बलिराजाचे नेत्र आनंदाश्रूंनी भरून आले. त्याने हात जोडले व म्हटले, 'भगवंता, आपण केवढी कृपा मजवर केलीस. मी केवळ आपणांस नमस्कार केला. त्यानंच इष्टकार्य प्राप्त झालं' श्रीहरींनी बलीस वरुणपाशातून मुक्त केले. ब्रह्मदेवांना व श्रीहरींना प्रणाम करून बलिराजा असुरांसह सुतलात गेला. प्रल्हादानें श्रीहरींची मनापासून स्तुती केली. तो म्हणाला,

'प्रभो, आपल्या कृपादृष्टीला दुष्ट आचरण व उग्र असे आम्ही

असुर कसे पात्र झालो ? आपलं चरित्र आश्चर्यकारक आहे आपण सर्वात्मा, सर्वज्ञ, समदृष्टी, भक्तांचं प्रिय करणारे आहात.'

'वत्सा, प्रल्हादा, तुझं कल्याण असो. आता तूही सुतलात जा व आपल्या नातवाबरोबर सुखानं राहा. तिथं मी हातात गदा घेऊन द्वारावर उभा राहीन. तुला माझं दर्शन नित्य घडेल. तुला त्यामुळं मोठा आनंद होईल.'

प्रल्हादानेही सर्वांना नम्रत्वाने प्रणाम करून सुतलात प्रयाण केले. सर्व असुर निघून गेल्यावर वामन शुक्राचार्यांना म्हणाले, 'या यज्ञात काही कमी पडलं असेल तर ते तुम्ही पूर्ण करावं. कर्मांतील वैगुण्य ब्राह्मणच पूर्ण करतात.' तेव्हा शुक्राचार्य म्हणाले,

'भगवन्, ज्या बलीनं आपणांस सर्वस्व अर्पण केलं, यज्ञफलदाता व यज्ञमूर्ती म्हणून ज्यानं आपलं पूजन केलं, त्याच्या कर्मात वैगुण्य कुठून येणार ? आपल्या नामसंकीर्तनानंच सर्व कर्मांची पूर्तता होते.'

श्रीहरींना असे सांगून शुक्राचार्यांनी बलीच्या यज्ञातील न्यून कर्म पूर्ण केले. वामनांनी बलीचे हरण केलेले सर्व राज्य इंद्राला दिले. दक्षादी प्रजापती, भृगू, अंगिरा, देव, ऋषी, पितर, भूपती, सनत्कुमार, शंकर, ब्रह्मदेव इत्यादींनी कश्यप व अदिती यांना संतुष्ट करण्यासाठी लोक व लोकपाल यांचे आधिपत्य वामनांना दिले. वेद, सर्व देव, धर्म, यश, श्री, मंगलव्रते, स्वर्ग व मोक्ष यांचे पालन करण्यासाठी वामनांना उपेंद्राचा अधिकार प्राप्त झाला. लोकपालांसह इंद्राने वामनांना विमानात बसवून स्वर्गास नेले. त्यानंतर ब्रह्मदेव, शंकर, सनत्कुमार, भृगू आदी मुनी, पिता, सर्व भूते, सिद्ध, देव इत्यादींनी विष्णूंची व अदितीची प्रशंसा केली.

असे हे वामनांचे चरित्र ऐकल्याने श्रोत्यांची पातकापासून मुक्तता होते. त्यांना सर्वोत्कृष्ट अशी गती प्राप्त होते. यज्ञादिक प्रसंग, श्राद्धादिक प्रसंग, गुरुपूजनासारखी कर्मे यांत वामनांचे चरित्र गाइल्यास ते ते कर्म यथासांग पूर्ण होते.

## मत्स्यावताराची कथा

शुकाचार्यांना मत्सरूपाचा अवतार घेणाऱ्या श्रीहरींची कथा निवेदन करण्याची विनंती परीक्षिताने केली. शुकांनी ती सर्व चरित्र-कथा परीक्षिताला सांगितली. भगवान स्वतंत्र असले तरी गायी, ब्राह्मण, देव, साधू, वेद, अर्थ यांच्या रक्षणासाठी मत्स्यादी अवतार घेतात. कल्पाच्या अंती ब्रह्मदेव निद्रित झाल्यानें प्रलय झाला. लोक समुद्रात बुडून गेले. ब्रह्मदेवांच्या मुखांतून बाहेर पडलेले वेद जवळच्या हयग्रीव नावाच्या दैत्यानें हरण केले.

त्या कल्पात नारायणांचा एकनिष्ठ भक्त सत्यव्रत नावाचा एक महात्मा होता. हा राजर्षी केवळ उदक प्राशन करून तपश्चर्या करीत असताना एकदा तो कृतमाला नदीच्या तीरी जलानें तर्पण करीत होता. त्याच्या ओंजळीतील पाण्यात एक लहानसा मासा आला. त्या द्रविड-देशाधिपती सत्यव्रत राजानें त्या ओंजळीतील मत्स्याला पाण्यासह नदीच्या पाण्यात सोडण्याचा विचार केला. तेव्हा तो मासा राजाला घाबरून म्हणाला,

'दीनवत्सल राजा, जलचर प्राण्यांना भिऊन मी दीन झालो आहे. तू या नदीच्या पाण्यात मला कृपा करून सोडू नकोस.'

त्याचे अति दीन बोलणे ऐकून त्या दयाळू राजानें त्या मत्स्याला आपल्या कमंडलूतील पाण्यात सोडले. आश्रमात आल्यावर तो मासा एका रात्रीतच एवढा मोठा झाला की, त्या कमंडलूत तो मावेनासा झाला. तेव्हा तो सत्यव्रताला म्हणाला,

'राजा, या कमंडलूत मला कष्ट होतात. मला सुखानं राहाता येईल अशी चांगली व्यवस्था तू करावीस.'

राजानें त्याला कमंडलूतून बाहेरच्या रांजणातील पाण्यात सोडले. तेथेही तो मासा एका मुहूर्तातच तीन हात लांब मोठा झाला. तो राजाला म्हणाला, 'राजा, हा रांजणही मला सुखानं वाढू देत नाही. मला याहून मोठं स्थान हवंय.' तेव्हा राजाने त्याला रांजणातून काढून एका सरोवरात ठेविले. पण तेथेही तो सारखा वाढतच गेला. ते सर्व

सरोवर त्यानें व्यापून टाकले. राजा सत्यव्रतानें त्याला मोठ्या डोहात सोडले. पण तो डोहही त्याला अपुरा वाटल्यावर त्यानें त्याला समुद्रात नेऊन सोडले. तेव्हा तो मासा त्याला म्हणाला, 'राजा, मला या समुद्रात सोडू नकोस. कारण येथील अति बलवान मकरादी जलचर मला खाऊन टाकतील.'

सत्यव्रत राजा त्याचे सुंदर भाषण ऐकून मोहित झाला व त्याला म्हणाला, 'असं मत्स्यरूपानं मोह पाडणारे आपण आहात तरी कोण? एका दिवसात आपण शंभर योजनांचं सरोवर व्यापून टाकलंत. असा प्रभावी जलचर प्राणी आम्ही कधी पाहिला नाही. कधी ऐकलाही नाही: क्षयरहित व दुःखहर्ता असा साक्षात नारायण आपण असून आमच्यावर अनुग्रह करण्यासाठी या जलचर प्राण्याचं रूप धारण करून प्रकट झाला आहात. जगाची उत्पत्ती, स्थिती, लय करणाऱ्या देवा, आपणांस नमस्कार असो. विश्वव्यापका, शरणागत भक्तांचं आश्रयस्थान आपणच आहात. आपण हे मत्स्यरूप का धारण केलं आहे?' सत्यव्रत राजाला उत्तर देताना भगवान म्हणाले,

'शत्रुदमना, राजा, आजपासून सातव्या दिवशी हे त्रैलोक्य प्रलयसमुद्रात बुडून जाणार आहे. त्या वेळी मी सोडलेली एक मोठी नौका तुझ्याजवळ येईल. तेव्हा तू त्या महानौकेत सर्व औषधी, सर्व बीजं घेऊन सप्तर्षींसह चढ. त्या प्रलयसागरात सूर्यप्रकाश नसतानाही ऋषींच्या प्रकाशामुळं तुला निर्भयपणानं संचार करता येईल. मोठ्या वाऱ्यानं ती नाव डुलू लागली की, मी तिथं येईन. मग ती नाव वासुकी सर्पाचा दोर करून माझ्या शिंगाला नीट बांध. जोपर्यंत ब्रह्मदेवाची रात्र आहे तोपर्यंत ऋषींसह मी तुला त्या नावेतून ओढून संचारास मदत करीन. त्यानंतर मी माझं स्वरूप व माहात्म्य तुला कथन करीन.'

एवढे सांगून भगवान गुप्त झाले. पूर्वेकडे अग्रे असलेले दर्भ पसरून, त्यावर बसून राजा मत्स्यरूप श्रीहरींचे चिंतन करू लागला. इतक्यात आकाशात मेघांची वृद्धी झाली आणि समुद्रांनी सर्व पृथ्वीला बुडविण्याचा प्रयत्न केला. तेव्हा सत्यव्रताला जवळच असलेली एक

नौका दिसली. तीत तो औषधी व बीजे घेऊन चढला. सप्तर्षी त्याला म्हणाले,

'राजा, तू केशवांचं ध्यान कर. तेच या संकटातून तुझं रक्षण करतील.'

राजाने त्याप्रमाणे भगवंतांचे स्मरण केले. तेव्हा सोनेरी रंगाचा, लक्ष योजने विस्तीर्ण असलेला एक मोठा मासा त्या महासागरात प्रकट झाला. पूर्वी सांगितल्याप्रमाणे वासुकीचा दोर करून सत्यव्रताने ती नाव मत्स्याच्या शिंगास बांधिली. मनात प्रसन्न होऊन त्याने भगवंतांची स्तुती करताना म्हटले,

'भगवन्, आपल्या सहज कृपेनं मला आपला आश्रय प्राप्त झाला आहे. आपण साक्षात मुक्तिदाते आहात. आपण आमचे परमगुरू आहात. आपण आमच्या हृदयरूपी ग्रंथीचा भेद करावा. व्ययरहित ईश्वरच आमचे गुरू व्हावेत. तेच गुरूंचेही परमगुरू आहेत. भगवंता, मी आपणांस शरण आलो आहे. परमेश्वरा, आपण सर्व लोकांचे हितकर्ते आहात. प्रिय, ईश्वर, आत्मा, गुरू, अभीष्ट फल देणारे, ज्ञानस्वरूप असे आपण आहात. पण विवेकशून्य व विषयासक्त लोक हृदयात असलेल्या आपणांस जाणीत नाहीत. भगवन्, आपण देवांनाही पूज्य आहात. आपणांस मी तत्त्वोपदेशासाठी शरण आलो आहे. म्हणून आपण मला उपदेश करून आपलं रूप प्रकट करावं.'

त्या सत्यव्रताची विनंती ऐकून महासागरात मत्स्यरूपानें क्रीडा करणाऱ्या त्या श्रीहरींनी तत्त्वाचा उपदेश केला. सांख्य, योग, कर्म यांतून आत्मरहस्य प्रकट करणारी पूर्ण मत्स्यपुराणाची संहिता भगवंतांनी सत्यव्रतास सांगितली. ऋषींसह नौकेत असलेल्या त्या राजानें ते सनातन ब्रह्मतत्त्व संशयरहित होऊन ऐकले. मत्स्यरूप श्रीहरींनी हयग्रीव असुराचा वध करून वेद परत आणले. शास्त्रोक्त ज्ञान व प्रत्यक्ष ज्ञान यांनी युक्त बनून त्या सत्यव्रत राजास विष्णूच्या प्रसादाने श्राद्धदेव नावाच्या वैवस्वत मनूचे स्थान प्राप्त झाले.

मत्स्यरूपाच्या या श्रीहरींचे व सत्यव्रत राजाचे हे आख्यान जो श्रवण करील तो पुरुष सर्व पातकांपासून मुक्त होईल. त्याचे सर्व

मनोरथ सिद्धीस जातील. शेवटी त्याला उत्तम गती प्राप्त होईल.

## च्यवनमुनी व सुकन्या

शुकदेवांनी परीक्षिताला एकदा महर्षी च्यवन व सुकन्या यांचे आख्यान निवेदन केले. मनुपुत्र शर्यातीची एक कमललोचना कन्या सुकन्या नावाची होती. एकदा राजा शर्याती आपल्या या कन्येसह वनात फिरत फिरत च्यवनऋषींच्या आश्रमापर्यंत आला. सुकन्या आपल्या सख्यांसह वृक्षवेलींचे सौंदर्य न्याहाळीत हिंडत होती. तिने एके ठिकाणी एका वारुळात दोन काजव्यांसारख्या ज्योती पाहिल्या. बालसुलभ स्वभावास अनुसरून सुकन्याने एका काटयाने त्या ज्योतींना टवकारले. त्यांतून बरेचसे रक्त बाहेर आले. त्याच वेळी राजा शर्यातीच्या सैनिकांचे मलमूत्र थांबले. त्याला याचे मोठे आश्चर्य वाटले. आपल्यापैकी कोणीतरी महर्षी च्यवनांचा अपराध केला की काय ? असा संशय शर्याती राजाला आला. तेव्हा सुकन्या भीत भीत आपल्या पित्यास म्हणाली,

'पिताजी, अपराध मी केला आहे. अजाणता मी त्या दोन ज्योतींना काटयानं टोचलं.'

आपल्या कन्येचे बोलणे ऐकून शर्याती घाबरला. त्यानें स्तुती करून च्यवनमुनींना प्रसन्न केले. त्यांचा अभिप्राय जाणून त्यानें आपली कन्या च्यवनमुनींना समर्पण केली व तो स्वस्थ चित्ताने आपल्या राजधानीस निघून गेला.

सुकन्या मोठ्या तत्परतेने आपल्या कोपिष्ट पतीची सेवा करून त्याला प्रसन्न करू लागली. त्यांच्या मनोवृत्तीस अनुसरून ती वागायची. काही काळानंतर त्यांच्या आश्रमात अश्विनीकुमार आले. च्यवनमुनींनी त्या दोघांचा सत्कार केला. त्यांनी विनंती केली, 'आपण दोघे समर्थ आहात. म्हणून मला यौवन प्राप्त करून द्यावं. युवतींना आवडेल असं रूप आपण मला द्यावं. मी आपणांस सोमरस देईन.' वैद्यशिरोमणी अश्विनीकुमारांनी च्यवनांचे अभिनंदन केले. ते म्हणाले, 'हे कुंड सिद्धांनी निर्माण केलं आहे. आपण यात स्नान करावं.' च्यवनमुनींचे शरीर थकले होते. त्यांच्या अंगावर शिरा दिसत होत्या. त्यांचे केस

पिकले होते. अश्विनीकुमारांबरोबर त्यांनी त्या कुंडात प्रवेश केला. त्याच वेळी त्या कुंडातून तीन पुरुष बाहेर आले. कमलांची माळ, कुंडले, सुंदर वस्त्र यांनी ते शोभून दिसत होते. ते मोठे सुंदर व स्त्रियांना प्रिय वाटणारे होते. परमसाध्वी सुकन्याने त्या तीनही पुरुषांना एकाच रूपात सूर्यासमान तेजस्वी अशा स्वरूपात पाहिले. आपल्या पतीस न ओळखून ती अश्विनीकुमारांना शरण गेली. तिचे पातिव्रत्य पाहून अश्विनीकुमार संतुष्ट झाले. त्यांनी तिच्या पतीशी ओळख करून दिली व मुनींची आज्ञा घेऊन ते परत विमानाने स्वर्गलोकी गेले.

काही काळानंतर यज्ञ करण्याच्या इच्छेने राजा शर्याती च्यवन-मुनींच्या आश्रमात आला. आपल्या कन्येशेजारी एक सूर्यासारखा तेजस्वी पुरुष बसलेला त्याने पाहिला. सुकन्या त्याच्या चरणांना वंदन करीत होती. शर्याती राजा तिला आशीर्वाद न देताच अप्रसन्न होऊन म्हणाला, ‘दुष्टे, तू हे काय केलंस? तू त्या वंदनीय च्यवनमुनींना धोका दिलास? तू त्या वृद्धाला सोडून दिलंस? तू अशा जार पुरुषाची सेवा करतेस? तुझा जन्म श्रेष्ठ कुलात झाला. तुला ही अशी भ्रष्ट बुद्धी कशी निर्माण झाली? तुझा हा व्यवहार कलंक लावणारा नाही? निर्लज्ज बनून तू परपुरुषाची सेवा करतेस? तू आपला पिता व पती यांना घोर नरकात टाकलंस.’

राजाचे हे क्रोधाचे बोलणे ऐकून मंदहास्य करून सुकन्या म्हणाली, ‘तात, हेच आपले जामात भृगुनंदन च्यवनमहर्षी आहेत.’ तिने च्यवनांना यौवन व सौंदर्य यांची प्राप्ती कशी झाली हा सर्व वृत्तान्त पित्यास सांगितला. तो ऐकून राजा शर्यातीस अत्यंत आनंद झाला.

## राजा अंबरीषांचे रक्षण

राजा परीक्षिताच्या प्रश्नावरून शुकाचार्यांनी राजर्षी अंबरीषांचे चरित्र त्याला समजावून दिले. अंबरीष मोठा भाग्यवान होता. सप्त द्वीपांची पृथ्वी, अचल संपत्ती, अतुलनीय ऐश्वर्य असूनही अंबरीष त्यांना स्वप्नवत मानीत. धन– वैभवाच्या लोभाने मनुष्य नरकात जातो, हे त्यांनी जाणले होते. भगवान श्रीकृष्ण व त्यांचे भक्त यांचे ते मोठे

भक्त होते. त्यांचे प्रेम प्राप्त झाल्यामुळे त्यांना हे सर्व वैभव मातीसमान वाटले. त्यांचे चित्त श्रीकृष्णांच्या चरणांशी, त्यांची वाणी त्यांच्या गुण-वर्णनात, त्यांच्या कथा ऐकण्यात त्यांचे मन रमून गेले होते. त्यांनी भगवान श्रीकृष्णांच्या पवित्र स्थानांची यात्रा केली होती. माला, चंदन, भोगसामग्री श्रीकृष्णांना त्यांनी समर्पित केली होती. भगवद्भक्त ब्राह्मणांच्या आज्ञेने ते पृथ्वीवर राज्य करीत होते.

त्यांनी 'धन्व' नावाच्या निर्मल देशात सरस्वतीनदीच्या प्रवाहासमोर वसिष्ठ, असित, गौतम आदी आचार्यांकडून अश्वमेधयज्ञ करून यज्ञाधिपती भगवानांची आराधना केली होती. त्यांच्या हृदयात नेहमी प्रेमदान करणाऱ्या श्रीहरींची मूर्ती असे. त्या राजांनी अशा प्रकारे मन ईश्वरनिष्ठ करून घर, स्त्री, पुत्र, भाऊबंद, हत्ती, घोडे, रथ, सेना, रत्ने, आभूषणे, आयुधे यांतून मन काढून घेऊन त्यांना असत्य मानले. त्यांच्या या प्रेमभक्तीस वश होऊन भगवंतांनी त्यांच्या रक्षणासाठी एका सुदर्शनचक्राची नियुक्ती केली होती.

राजा अंबरीषांची पत्नीही त्यांच्यासारखीच धर्मशील, संसारातून विरक्त व भक्तिपरायणा होती. एकदा त्यांनी आपल्या पत्नीसह भगवान श्रीकृष्णांची आराधना करून एक वर्षभर द्वादशीप्रधान एकादशी व्रताचा नियम केला. व्रत समाप्त झाल्यावर कार्तिक महिन्यात त्यांनी तीन रात्र उपवास केला. यमुनेत स्नान करून मधुवनात जाऊन त्यांनी भगवान श्रीकृष्णांची पूजा केली. भगवंतांना महाभिषेक करून वस्त्र, आभूषणे, चंदन, माला इत्यादींनी त्यांनी भगवंतांना प्रसन्न केले. ब्राह्मणांना स्वादिष्ट व गुणकारी भोजन देऊन त्यांना त्यांनी साठ कोटी गायींचे दान दिले. त्या गायींची शिंगे सुवर्णाची व खूर चांदीचे होते. सुंदर वस्त्रांनी त्यांना सजविले होते.

ब्राह्मणांना अंबरीषांनी संतुष्ट केल्यावर त्यांनी व्रताचे पारणे फेडण्याची तयारी सुरू केली. त्याच वेळी महर्षी दुर्वास ऋषी अतिथी म्हणून तेथे आले. त्यांना पाहून राजा अंबरीष उठून उभे राहिले, त्यांनी विविध सामग्रीने दुर्वासांचे मनापासून पूजन केले. त्यांच्या चरणांना प्रणाम करून अंबरीषांनी त्यांना भोजन करण्याची विनंती केली. त्यांनी

ती विनंती मान्य केली व ते नदीस स्नानासाठी गेले. इकडे द्वादशी केवळ अगदी थोडा वेळच उरली होती. धर्मज्ञ अंबरीषांनी धर्मसंकटात सापडून ब्राह्मण पुरोहितांशी चर्चा केली. ब्राह्मणास भोजन न देता स्वत: भोजन करणे व द्वादशीचा मुहूर्त टळू देणे, या दोन संकटांत अंबरीष सापडले होते. केवळ जल पिऊन पारणे करता येईल, असा निर्णय ब्राह्मणांनी दिला. त्याप्रमाणे केवळ जल पिऊन ते दुर्वासांची वाट पाहू लागले.

अत्यावश्यक नित्यकर्मे आटोपून दुर्वासमुनी यमुनेच्या तीरावरून परत आले. राजाने त्यांचे स्वागत केले. तेव्हा त्यांनी राजानें पारणे सोडले असल्याचे जाणले. त्या वेळी दुर्वासांना खूप भूक लागली होती. पण राजाने उपवास सोडला हे पाहून ते रागानें थरथर कापू लागले. भुवया चढवून त्यांनी मुख वाकडे केले. धनानें मत्त होऊन या अंबरीषानें धर्माचे उल्लंघन केले ? अतिथीचा योग्य सत्कार केला नाही ? अशा विचारांनी दुर्वासांचा क्रोध उफाळून आला. त्यांनी आपल्या जटेतील एक केस उपसून काढला. त्यापासून अंबरीषास मारण्यासाठी एक कृत्या दुर्वासांनी निर्माण केली. ती प्रलयकालाच्या अग्नीप्रमाणे दाहक होती. आगीप्रमाणे तळपून, हातात तलवार घेऊन ती अंबरीषांच्या मागे लागली. तिच्या पायांच्या आघातांनी पृथ्वी कापत होती. परंतु राजा अंबरीष तिला पाहून क्षणभरही विचलित झाले नाहीत.

भगवंतांनी दिलेल्या सुदर्शनचक्राने अंबरीषांचे रक्षण केले. कृत्या जसजशी अंगावर येत गेली त्याच वेळी चक्रानें त्या कृत्येस जाळून भस्म केले. आपण केलेली कृत्या जळून गेली व चक्र आपणांकडे येत आहे असे पाहून दुर्वास भयभीत झाले व पळू लागले. भगवानांचे चक्र त्यांच्या मागेच लागले होते. त्यांनी शेवटी सुमेरूपर्वताच्या गुहेत प्रवेश करण्याचा प्रयत्न केला. पण सुदर्शनचक्राने त्यांची पाठ सोडली नाही. त्यांनी ब्रह्मदेवांना प्रार्थना केली, ‘ब्रह्मदेवा, आपण स्वयंभू आहात. भगवानांच्या तेजस्वी चक्रापासून आपण माझं रक्षण करावं.’ पण ब्रह्मदेवांनीही त्यांना निराश केले. महादेवांनीही त्यांना स्थान दिले नाही.

भगवानांच्या चक्राच्या आगीनें दुर्वास तप्त झाले होते. शेवटी ते

भगवंतांच्या परमधामास, वैकुंठास गेले. भगवंतांच्या चरणांवर त्यांनी साष्टांग नमस्कार घातला. ते म्हणाले, 'अच्युता, अनंता, मी अपराधी आहे. आपण माझं रक्षण करावं. मी आपला प्रभाव न ओळखून आपल्या भक्ताचा अंत पाहिला. आपण आता मला वाचवावं.' त्यावर भगवान म्हणाले,

'दुर्वास, मी तर सर्वंथा भक्तांच्या अधीन असतो. मी थोडाही स्वतंत्र नाही. भक्त माझ्यावर प्रेम करतात, मी त्यांच्यावर करतो. मी आपल्या भक्तांना सोडून स्वतःवर अथवा प्रत्यक्ष लक्ष्मीवरही लोभ करीत नाही. जे भक्त स्त्री, पुत्र, गृह, गुरुजन, प्राण, धन, इहलोक, परलोक, सर्व सोडून केवळ मलाच शरण आले त्यांना मी कसा सोडू ? दुर्वासा, मी तुम्हांस काय सांगू ? मी एक उपाय मात्र सांगतो. आपण त्या नाभागनंदन अंबरीषापाशी जावं. त्याची क्षमा मागावी. तेव्हाच आपल्या मनाला शांती प्राप्त होईल.'

भगवंतांनी हा उपाय सांगितल्यानंतर दुर्वासऋषी चक्राच्या तापाचा मारा सहन करीतच अंबरीषराजांकडे आले. अत्यंत दुःखी होऊन त्यांनी राजाचे चरण पकडले. राजा अंबरीषांनी भगवानांच्या चक्राची प्रार्थना केली तेव्हा ते चक्र शांत झाले. दुर्वासांच्या मनातही भगवंतांच्या चरणांबद्दल प्रेमभावना उत्पन्न झाली. त्यांनी अंबरीषराजाची क्षमा मागितली. अंबरीषांनीही दुर्वासांचे चरण धरून त्यांना भोजन-सामग्री देऊन तृप्त केले व नंतर स्वतः भोजन केले. दुर्वासांनी अंबरीषांच्या गुणांची व भक्तीची प्रशंसा केली. अबरीषांचे हे पवित्र आख्यान ऐकणारा भगवंतांचा भक्त बनतो.

## परशुरामाचे आख्यान

अशा प्रकारची अनेक आख्याने शुकाचार्यांनी परीक्षितास सांगितली. मांधाता, सौभरी ऋषी, त्रिशंकू, सागर, भगीरथ, श्रीराम, राजा निमी, ऋचीक, जमदग्नी, परशुराम, ययाती, राजा दुष्यन्त, भरत, राजा रंतिदेव, अशा अनेकांच्या कथा शुकांनी राजास सांगितल्या. गाधी राजाच्या कन्येचे नाव सत्यवती होते. ऋचीकऋषींनी गाधींस त्या

कन्येची मागणी केली. त्याने एक हजार श्वेत रंगाच्या व श्याम वर्णाच्या कानाच्या घोडयांची मागणी केली. ऋचीकमुनींनी वरुणापासून तशा घोडयांची प्राप्ती करून घेतली व सत्यवतीशी विवाह केला.

एकदा महर्षी ऋचीकमुनींना त्यांची पत्नी व सासू यांनी पुत्र-प्राप्तीसाठी प्रार्थना केली. ऋचीकांनी दोघांसाठी वेगवेगळे चरू तयार केले व ते स्नानासाठी गेले. इकडे सत्यवती व तिची माता यांनी एक-मेकींचे चरू भक्षण केले. हे ऋचीकांना समजताच ते सत्यवतीस म्हणाले, 'आता मोठा अनर्थ होईल. आता तुझा पुत्र सर्वांना दंड देणारा, घोर प्रकृतीचा होईल. तुझा भाऊ मात्र एक श्रेष्ठ ब्रह्मवेत्ता होईल.' सत्यवतीने मुनींना प्रसन्न करून म्हटले, 'स्वामी, असं होऊ नये.' तेव्हा मुनी म्हणाले, 'ठीक आहे. पुत्राऐवजी तुझा पौत्र घोर प्रकृतीचा होईल.'

समय प्राप्त होताच सत्यवतीच्या गर्भातून जमदग्नींचा जन्म झाला. सत्यवती सर्व लोकांना पावन करणारी कौशिकीनदी झाली, रेणूऋषींची कन्या रेणुका होती. जमदग्नींनी तिच्याशी विवाह केला. तिच्या गर्भा-पासून त्यांना वसुमान आदी पुत्र झाले. त्यांतील लहान परशुराम नावाने या जगात प्रसिद्ध झाले. हैहयवंशाचा अंत करण्यासाठी स्वतः भगवंतांनी परशुरामांचा अवतार धारण केला असे सांगतात. त्यांनी या पृथ्वीस एकवीस वेळा क्षत्रियविहीन केले. त्याचे कारण असे झाले—

त्या वेळी हैहयवंशातील अधिपती अर्जुन राज्य करीत होता. तो एक थोर क्षत्रिय होता. त्याने दत्तात्रेयांपासून वर प्राप्त केला होता त्याला एक हजार हात प्राप्त झाले होते. युद्धात त्याचा पराभव कोणीच करू शकत नव्हता. इंद्रियांचे अगाध बल, अतुल संपत्ती, तेज, शौर्य, कीर्ती यांनीही तो संपन्न होता. तो योगेश्वर बनून सूक्ष्माहून सूक्ष्म व स्थूलाहून स्थूल रूप धारण करी. त्याला सर्व सिद्धी अनुकूल होत्या वायूप्रमाणे तो सर्व जगात संचार करी.

एकदा गळयात वैजयंती माळ घालून सहस्रबाहू अर्जुन सुंदर स्त्रियांबरोबर नर्मदानदीत क्रीडा करीत होता. त्या वेळी मदोन्मत्त अर्जुनाने आपल्या बाहूंनी नर्मदानदीचा प्रवाह रोखून ठेवला दशमुख रावणाचे शिबिर तेथेच नदीच्या काठी होते. नदीची धारा उलटी वाहू

लागताच ते शिविर बुडू लागले. सहस्रार्जुनाचा हा पराक्रम रावणाला सहन झाला नाही. रावणाने स्त्रियांसमोर जेव्हा अर्जुनास भलेबुरे भाषण केले तेव्हा त्याने रावणास पकडले व आपल्या राजधानीस, महिष्मतीस त्याला कैद करून ठेविले. पुलस्त्यांच्या सांगण्यावरून नंतर रावण मुक्त झाला.

एकदा सहस्रबाहू अर्जुन शिकार खेळण्यासाठी घोर जंगलात गेला. दैवाने तेथेच त्यानें महर्षी जमदग्नींचा आश्रम पाहिला. त्या परम तपस्वी ऋषींच्या आश्रमात त्यानें एक कामधेनू पाहिली. तिचा प्रतापही त्याने ऐकला. सेना, मंत्री, वाहने यांचा मोठा आदरसत्कार जमदग्नींनी कामधेनूच्या साह्याने केला. या जमदग्नींचे ऐश्वर्य आपल्याहून मोठे असल्याचे अर्जुनाने पाहिले. स्वागताचा, सत्काराचा आदर न करताच तो त्या कामधेनूला घेऊन जाण्याच्या प्रयत्नात राहिला. त्याने अभिमान-वश होऊन जमदग्नींकडे तिची मागणीही केली नाही. कामधेनूस घेऊन चलण्याबद्दल त्यानें आपल्या सेवकांना आज्ञा दिली. ती आज्ञा प्रमाण मानून ओरडणाऱ्या व रडणाऱ्या वासरासह सेवकांनी त्या कामधेनूस माहिष्मतीस नेले. ते निघून गेल्यानंतर परशुराम आश्रमात आले. त्यांना सर्व दुष्ट वृत्तान्त समजला. सर्पाप्रमाणे ते तप्त होऊन उठले. परशू, ढाल, बाण, धनुष्य घेऊन त्यांनी अर्जुनाचा पाठलाग केला.

सहस्रबाहू अर्जुन आपल्या नगरात प्रवेश करीत होता. एवढ्यात मोठ्या वेगानें व त्वरेने परशुराम तेथे येऊन पोचले. त्यांच्या हातांत धनुष्यबाण व परशू होता. त्यांच्या शरीरावर काळ्या रंगाचे मृगचर्म होते. त्यांच्या जटा सूर्याच्या किरणांप्रमाणे चमकत होत्या. परशुरामांनी अर्जुनाच्या मोठ्या सैन्यास एकट्यानेच नष्ट केले. त्यांच्या गतीस मनाचा व वायूचा वेग होता. शत्रूची सेना कापीतच ते चालले. त्यांचा हा पराक्रम पाहून अर्जुनास फारच क्रोध आला. तो स्वतः त्यांच्याशी लढण्यास सिद्ध झाला. त्याने आपल्या हजार हातांनी पाचशे धनुष्यांवर बाण रोखून परशुरामांवर सोडले. पण परशुराम सर्व शस्त्रधारियांत शिरोमणी होते. त्यांनी आपल्या बाणांनी त्या सर्व बाणांना कापून टाकले. हैहयाधिपतीनें आपल्या हातांनी पहाड व झाडे उखडून युद्ध-

भूमीवर परशुरामांवर टाकली. परशुरामांनी आपल्या तीक्ष्ण परशूने त्याच्या भुजाच कापून टाकल्या. त्याने अर्जुनाचे शिरही धडापासून वेगळे केले. पिता मरण पावताच त्याचे दहा हजार पुत्र रणावरून पळून गेले.

विपक्षी वीरांचा असा नाश करून परशुरामांनी आपली कामधेनू तिच्या वत्सासह सोडवून आणली. ती फारच दुःखी झाली होती. त्यांनी तिला आश्रमात आणून आपल्या पित्याच्या स्वाधीन केले. त्यांनी सर्व वृत्तान्त पित्यास व आपल्या बंधूंना सांगितला. तेव्हा पिता त्यांना म्हणाला, 'हाय हाय ! परशुराम, तू फार मोठं पाप केलंस. तू मोठा वीर आहेस. पण सर्वदेवमय त्या नरदेवाचा तू व्यर्थ वध केलास. पुत्रा, आपण ब्राह्मण. क्षमेच्या गुणानं आपण या जगतात पूज्य आहोत. ब्रह्मदेवही क्षमेमुळंच त्या पदास पोचले आहेत. ब्राह्मणाची शोभा क्षमेनंच वाढते. पुत्रा, सार्वभौम राजाचा वध ब्राह्मणाच्या हत्येपेक्षा फार भयंकर असतो. जा. तू भगवंतांचं स्मरण करीत तीर्थयात्रा करून पाप नाहीसं कर.'

पित्याची आज्ञा मान्य करून परशुरामांनी एक वर्षभर तीर्थयात्रा केली व ते परत आश्रमात आले. एके दिवशी परशुरामांची माता गंगेच्या तटावर गेली होती. तेथे चित्ररथ गंधर्व अप्सरांसह जलविहार करीत होता. रेणुकेने ती क्रीडा पाहिली व पतिदेवांच्या हवनाचा समय ती विसरून गेली. तिचे मन चित्ररथाच्या जलक्रीडेत गुंतून गेले. हवनाचा समय झाल्यानंतर ती सावध झाली व भयभीत होऊन जमदग्नींपाशी आली. जलपूर्ण कलश त्यांच्या समोर ठेवून ती हात जोडून उभी राहिली. जमदग्नींनी आपल्या पत्नीचा मानसिक व्यभिचार जाणला. त्यांनी क्रोधात येऊन आपल्या पुत्रांना म्हटले, 'या पापिणीस मारून टाका.' पण त्यांच्या पुत्रांनी आज्ञा मानली नाही. पण परशुरामाने मात्र मातेसह सर्व भावांना मारून टाकले. पित्याचा योगप्रभाव ते नीट जाणीत होते.

परशुरामांच्या या कृत्यावर सत्यवतीनंदन महर्षी जमदग्नी प्रसन्न झाले व म्हणाले, 'पुत्रा, तुला काय इच्छा होईल तो वर तू माग.'

परशुराम म्हणाले, ‘ पिताजी, माझी आई, माझे बंधू मरण पावले आहेत. ते जिवंत व्हावेत. त्यांना या प्रसंगाचं स्मरण उरू नये.’ परशुरामांनी अशी इच्छा करताच त्याचे सर्व भाऊ जिवंत झाले. माताही जिवंत झाली.

परशुरामांनी सहस्रार्जुनाचा वध केला होता. त्याच्या पुत्रांनी आपल्या पित्याच्या वधाची जखम आपल्या हृदयावर बाळगली होती. त्यांना एक क्षणभरही चैन नव्हते. एकदा परशुराम आपल्या बंधूंसह आश्रमाच्या बाहेर वनात गेले. ही संधी पाहून सहस्रबाहूचे पुत्र आश्रमात आले. त्या वेळी महर्षी जमदग्नी अग्निशाळेत बसले होते. भगवंतांच्या चिंतनात ते मग्न होते. त्यांना बाहेरची शुद्धी कोणतीच नव्हती. अशा अवस्थेत त्या पापी पुत्रांनी जमदग्नींना मारून टाकले. माता रेणुकेची विनंती त्यांनी ऐकली नाही. त्यांनी बलपूर्वक जमदग्नींचे शिर कापून टाकले.

सती रेणुका दु:खाने अतिशय व्याकुळ झाली. तिने आपली छाती पिटून जोराने शोक केला. ‘ परशुरामा, धाव रे बाबा ’ म्हणून तिनें हाक मारताच परशुराम धावतच आश्रमात आला. पिता मरण पावल्याचे त्याने पाहिले. परशुरामांना अतिशय दु:ख झाले. क्रोध, असहिष्णुता, मानसिक पीडा, शोक यांनी ते व्यथित झाले. त्यांनी पित्याचे शरीर बंधूंच्या स्वाधीन केले व हातात परशू घेऊन ते आश्रमाबाहेर पडले. क्षत्रियांचा संहार करण्याचे त्यांनी ठरविले. माहिष्मती नगरीस जाऊन त्यांनी सहस्रार्जुनांच्या पुत्रांच्या शिरांनी एक मोठा पर्वतच उभा केला. त्यांच्या रक्तानें एक मोठी नदी वाहू लागली. क्षत्रिय उन्मत्त झालेले पाहून काहीतरी निमित्त करून भगवंतांनीच परशुरामांचा अवतार घेऊन क्षत्रियांचा असा संहार केला. त्यांनी एकवीस वेळा पृथ्वी क्षत्रियहीन करून पांच तलाव रक्ताने भरलेले निर्माण केले. त्यांनी आपल्या पित्याचे शिर आणून ते त्यांच्या धडास जोडले. सर्वदेवमय असा एक यज्ञ करून त्यांनी भगवानांचे यजन केले. यज्ञान्त स्नान करून ते सर्व पातकांपासून मुक्त झाले. परशुराम सन्मानित होऊन सप्तर्षींच्या मंडळातील सातवे ऋषी झाले. आजही कोणालाही दंड न करता परशुराम

महेंद्रपर्वतावर निवास करून आहेत. तेथे सिद्ध, गंधर्व व चारण त्यांच्या चरित्राचे गायन करतात.

महाराज गाधींस प्रज्वलित अग्नीसारखा एक पुत्र झाला. त्याचे नाव विश्वामित्र . त्यांनी आपल्या तपोबलाने क्षत्रियत्वाचा त्याग करून ब्रह्मतेजास प्राप्त करून घेतले.

## राजा ययातीचे आख्यान

राजा नहुषास सहा पुत्र झाले. यती, ययाती, संयाती, आयती, वियती व कृती; ही त्यांची नावे होत. नहुषाने आपल्या वडील पुत्रास यतीस राज्य देण्याचा विचार केला, पण त्याने ते स्वीकारले नाही. इंद्र-पत्नी शचीचा सहवास मिळण्याची इच्छा केल्यामुळे नहुषास ब्राह्मणांनी इंद्रपदापासून च्युत केले. तो अजगरस्वरूप बनला. तेव्हा राज्यावर ययाती बसला. ययातीने आपल्या लहान बंधूंना चार दिशांची चार राज्ये दिली व स्वत: शुक्राचार्यांची कन्या देवयानी व दैत्यराज वृषपर्व्याची पुत्री शर्मिष्ठा यांना पत्नी म्हणून स्वीकारून पृथ्वीचे राज्य तो करू लागला.

शुक्राचार्य ब्राह्मण, ययाती क्षत्रिय, त्यांचा विवाह कसा झाला, या परीक्षिताच्या प्रश्नास उत्तर देताना शुकदेवांनी ययातीचे सर्व आख्यान त्याला सांगितले. दानवराज वृषपर्व्याची एक मोठी कन्या होती. तिचे नाव शर्मिष्ठा होते. ती आपल्या गुरुकन्येबरोबर व इतर मैत्रिणींसह राजधानीमधील एका उद्यानात हिंडण्यासाठी गेली होती. त्या उद्यानात सुंदर सुंदर पुष्पांनी लगडलेले वृक्ष होते. तेथे एक सुंदर मोठे सरोवर होते. सरोवरात कमले फुललेली होती त्यांवर भुंग्यांचा मधुर गुंजारव होत होता.

जलाशयापाशी पोचताच आपली वस्त्रे उतरवून घाटावर ठेविली व त्या कन्या तलावात प्रवेश करून एकमेकींच्या अंगावर पाणी उडवीत स्नान करू लागल्या. त्याच वेळी पार्वतीबरोबर बैलावर बसून शंकर तेथे आले. त्यांना पाहून सर्व कन्या संकोचून गेल्या. झटपट त्यांनी सरोवराच्या बाहेर येऊन वस्त्रे नेसली. या घाईत शर्मिष्ठाने चुकून देवयानीचे वस्त्र

स्वतःचे समजून नेसले. यामुळे देवयानीस क्रोध येऊन ती म्हणाली,

'पाहा तर खरं. या दासीनं केवढं अनुचित काम केलं. कुत्रं यज्ञातील हविष्यभाग उचलतं, तसं हिनं माझं वस्त्र नेसलं पाहा. आम्ही श्रेष्ठ भृगुवंशी ब्राह्मण. हिचा पिता तर असुर. तरी तो आमचा शिष्य. पण या दुष्टेनं माझं वस्त्र नेसलं की.'

देवयानी याप्रमाणे रागावून बोलत असताना शर्मिष्ठाही क्रोधाने संतापली. नागिणीप्रमाणे फूत्कार करीत ती दीर्घ श्वास घेऊन, ओठ दाबून म्हणाली, 'भिकारणी, तू कशास एवढी बडबड करतेस? कावळे अन् कुत्री यांच्याप्रमाणे आमच्या दारात रोटीची वाट पाहाणारी माणसं तुम्ही!' शर्मिष्ठाने अशा रीतीने गुरुकन्येचा तिरस्कार केला. क्रोधात येऊन तिने देवयानीचे वस्त्र हिरावून घेतले व तिला एका विहिरीत ढकलून दिले.

शर्मिष्ठा निघून गेल्यावर दैवयोगाने तेथे शिकार खेळताना राजा ययाती आला. त्याने विहिरीत पडलेल्या देवयानीस पाहिले. त्या वेळी ती वस्त्रहीन होती. म्हणून त्याने आपले एक वस्त्र तिला नेसायला दिले व हात देऊन कसेतरी तिला विहिरीबाहेर काढले. देवयानीने मोठ्या प्रेमभराने ययातीस म्हटले,

'वीरशिरोमणी राजन्, आज आपण माझा हात पकडला आहे. आता कुणी दुसऱ्यानं हा पकडू नये. वीरश्रेष्ठा, या विहिरीत पडल्यानंच मला आज आपलं दर्शन अचानक झालं. भगवंतांची ही मोठी कृपाच समजली पाहिजे. राजा, मी पूर्वी बृहस्पतीच्या पुत्रास, कचास शाप, दिला होता. म्हणून त्यानंही मला शाप दिला. म्हणून ब्राह्मण माझं पाणिग्रहण करू शकत नाही.'

ययातीला हा संबंध मान्य नव्हता. शास्त्रप्रतिकूल हा विवाह असला तरी प्रारब्धाने प्राप्त झालेला हा स्नेहसंबंध त्याला मानवला. ययातीने तिच्या बोलण्यास रुकार दिला. राजा ययाती जेव्हा निघून गेला तेव्हा देवयानी रडत भाकत पिता शुक्राचार्यांपाशी गेली. शर्मिष्ठाने केलेला अत्याचार तिने पित्यास सांगितला. शुक्राचार्यांचेही मन व्यथित झाले. ते पुरोहितपणाची निंदा करू लागले. यापेक्षा शेतात धान्य पेरून

उपजीविका केली तर काय वाईट ? आपल्या कन्येस, देवयानीस बरोबर घेऊन ते घरातून बाहेर पडले. वृषपर्व्यास हे समजले. गुरुजी आपणांस शाप देतील ? शत्रूंना जिवंत करतील ? त्यांना प्रसन्न केले पाहिजे अशा विचारानें तो रस्त्यावरच शुक्राचार्यांचे चरण पकडून विनवू लागला. शुक्राचार्यांचा क्रोध संपला. ते राजास म्हणाले,

'राजन्, मी कन्या देवयानीस तर सोडू शकत नाही. तू हिची इच्छा पूर्ण कर. तरच मी सुखानं परत राजधानीस येईन.'

'ठीक आहे' असे वृषपर्व्याने म्हटले तेव्हा देवयानी म्हणाली,

'पिताजी, मी जिथं जाईन तिथं इतर मैत्रिणींबरोबर शर्मिष्ठा माझी दासी होऊन सेवा करण्यासाठी येईल.' शर्मिष्ठास हा सर्व प्रकार समजला. आपल्या परिवारावरील संकट ओळखून तिनें ही अट मान्य केली. मैत्रिणींसह ती देवयानीची सेवा करू लागली. शुक्राचार्यांनी देवयानीचा विवाह राजा ययातीशी केला. शर्मिष्ठा तिची दासी म्हणून राहिली. 'राजन, या शर्मिष्ठास कधी शेजेवर घेऊ नकोस' अशी सूचनाही ययातीस दिली गेली. काही दिवसांनी देवयानी पुत्रवती झाली. तिला पुत्रवती पाहून एके दिवशी शर्मिष्ठाने ययातीजवळ एकान्ताची याचना केली. तिची प्रार्थना धर्मास अनुसरून होती. म्हणून शुक्राचार्यांची सूचना ध्यानात असूनही ययातीनें शर्मिष्ठाच्या प्रार्थनेंस होकार दिला. देवयानीस यदू व तुर्वसू असे दोन पुत्र झाले. शर्मिष्ठास तीन पुत्र झाले. आपल्या पतीपासून शर्मिष्ठासही पुत्र झाले हे समजून देवयानी क्रोधात येऊन आपल्या पित्याच्या घरी निघून गेली. शुक्राचार्यांनी कामी ययातीस क्रोधात येऊन म्हटले, 'तू अत्यंत स्त्रीलंपट आहेस. मंदबुद्धी आहेस. खोटा आहेस, मनुष्याला कुरूप करणारं वृद्धत्व तुला प्राप्त होईल.' त्यावर ययाती म्हणाला,

'ब्रह्मन्, आपल्या पुत्रीसह विषय भोगताना माझं मन तृप्त झालं नाही. आपल्या या शापानं आपल्या कन्येचं अभीष्ट होणार नाही.'

'बरं तू जा. प्रसन्न होऊन जो तुला आपलं यौवन देईल त्याला तू आपलं वृद्धत्व दे.'

शुक्राचार्यांनी केलेली ही योजना ययातीला मान्य झाली. घरी

येऊन त्यानें आपल्या थोरल्या पुत्रास, यदूस म्हटले, 'पुत्रा, तू तुझं यौवन मला दे. आणि माझं हे वृद्धत्व तू स्वीकार. मुला, माझी अजून विषय-वासना तृप्त झाली नाही. म्हणून तुझं यौवन घेऊन मी अनेक वर्षांपर्यंत सुखानं भोग भोगीन.' त्यावर यदू म्हणाला, 'पिताजी, आपलं वृद्धत्व घेऊन मी जिवंत नाही राहू शकणार. विषयसुखाचा अनुभव घेतल्या-खेरीज कोणाही मनुष्यास वैराग्य येत नाही.' अशाच प्रकारे तुर्वसू, द्रुह्यू, अनू या पुत्रांनी ययातीची विनंती अमान्य केली. खरे पाहता त्या पुत्रांनाही धर्मतत्त्व माहीत नव्हते. ते या अनित्य शरीरासच नित्य मानीत होते. सर्वांत छोटचा व परमगुणांनी मोठचा अशा आपल्या पुत्रास, पुरूस बोलावून ययातीनें तोच प्रश्न केला. तेव्हा पुरू म्हणाला,

'पिताजी, पित्याच्या कृपेनंच मनुष्यास मोठेपणा प्राप्त होतो. पुत्राचं शरीर हे पित्यानंच दिलेलं असतं. त्याचा उपकार फेडणार नाही असा कोण आहे ? पित्याचं ऐकणं हेच उत्तम पुत्राचं लक्षण आहे. त्याची आज्ञा पुत्रानं मान्य करावी. पित्याची आज्ञा जो पुत्र मान्य करीत नाही तो पुत्र कसला ? तो तर पित्याचं मलमूत्र समजावं.'

असे बोलून पित्याचे वृद्धत्व पुरूनें मोठचा आनंदानें स्वीकारले. राजा ययाती पूर्वीप्रमाणेच तरुण होऊन विषयसेवन करू लागला. तो सात द्वीपांचा एकछत्र सम्राट होता. पित्याप्रमाणेच उत्तम राज्य तो करीत असे. त्याच्या इंद्रियांची शक्ती जोरदार असल्यानें तो विषयाचे सेवन मोठचा आनंदाने करी. देवयानी त्याची परमप्रिय पत्नी होती. आपल्या प्रियतम पतीला तिने आपले मन, आपली वाणी, आपले शरीर अर्पण करून ती त्याची उत्तम प्रकारे सेवा करी. दिवसरात्र एकान्तातली त्याला सुखे देई.

राजा ययातीने पुष्कळ दक्षिणा देऊन यज्ञपुरुष भगवान श्रीहरी-संतुष्ट करण्यासाठी मोठमोठे यज्ञ केले. हजार वर्षेपर्यंत त्यानें आपल्या उच्छृंखल इंद्रियांनी सुख भोगले. परंतु त्याची भोगप्रवृत्ती शांत झाली नाही. पण एकदा स्वतःच्या अधःपतनावर त्याची दृष्टी गेली. त्याला वैराग्य उत्पन्न झाले. तो देवयानीस म्हणाला, 'भृगुनंदिनी, तू माझं थोडं ऐक. या पृथ्वीवर माझ्यासारखीच विषयी पुरुषाची कथा आहे.

एक बकरा होता. तो वनात एकटाच प्रिय वस्तूस शोधीत हिंडत होता, त्यानं एकदा पाहिलं की, आपल्यासारखीच एक बकरी एका विहिरीत पडलेली आहे. तो बकरा मोठा कामी होता. त्यानं त्या बकरीला वर काढण्यासाठी आपल्या शिगानं रस्ता तयार केला. त्या बकरीला वर काढलं. ती बकरी त्या बकऱ्यावर प्रेम करू लागली. तो दाढी-मिशावाला बकरा चांगला धष्टपुष्ट, जवान, बकरीला सुख देणारा व विहारकुशल होता. काही दुसऱ्या बकऱ्यांनीही त्या बकऱ्यास आपला पती मानले. तो बकरा एकटाच अनेक बकऱ्यांसह विहार करू लागला. इतर बकऱ्यांसह आपला पती विहार करतो हे विहिरीतून निघालेल्या बकरीस सहन झालं नाही. हा मोठा कामी आहे, याच्या प्रेमाचा काही भरवसा नाही, हे तिनं जाणलं. त्या इंद्रियालोलुप बकऱ्यास सोडून ती बकरी आपल्या पालकाच्या घरी निघून गेली. तो दीन बकरा 'में में' करीत तिच्यामागं गेला. पण तो तिला रोखू शकला नाही. त्या बकरीचा स्वामी एक ब्राह्मण होता. त्याने क्रोधात येऊन त्या बकऱ्याचा अंडकोश कापून टाकला. पण आपल्याच बकरीचं भलं मनात आणून तो कोश त्यानं पुन्हा जोडून दिला. त्यामुळं तो बकरा पुन्हा त्याच्या बकरीशी सुख पावू लागला. पण त्या बकऱ्याचं समाधान कधी झालं नाही. सुंदरी, माझीही दशा अशीच आहे. तुझ्या प्रेमानं मी असाच अत्यंत दीन झालो आहे. तुझ्या मायेनं मोहित झालो आहे. मी स्वतःच विसरून गेलो आहे.

'प्रिये, विषयांचा भोग भोगून विषयवासना कधीच तृप्त होत नाही. तुपाची धार अग्नीत टाकली की अग्नी भडकतोच. भोगवासना भोगानंच प्रबल होते. पण जेव्हा मनुष्य रागलोभाच्या पलीकडं जातो तेव्हा तो समदर्शी होतो व त्याला सुख लाभतं. विषयांची तृष्णाच दुःखाचं उगमस्थान आहे. मंद बुद्धीचे लोक त्या विषयांचा त्याग करीत नाहीत. शरीरानं ते वृद्ध होतात, पण त्यांची तृष्णा नित्य नवीन असते. ज्याला आपलं कल्याण साधायचं असतं त्यानं या तृष्णेचा, भोगवासनेचा त्याग करायला हवा. आपली आई, बहीण, कन्या, यांच्याबरोबर त्यानं एकान्तात एका आसनावर बसू नये. बलवान इंद्रियं मोठमोठ्या विद्वानांनाही फसवितात.

'विषयांचं वारंवार सेवन करताना माझी हजार वर्षं निघून गेली. पण प्रत्येक क्षणी आजही माझी भोगलालसा वाढणारी आहे. म्हणून आजपासून मी या भोगलालसेचा त्याग करून आपलं मन मी परमात्म्यास समर्पण करणार आहे. शीत-उष्ण, सुखदु:ख आदी भावांच्या पलीकडं होऊन मी आता हरिणांच्या बरोबर वनात विहार करीन. लोकपरलोकांतील भाग असत् आहेत, असं समजून मी चिंतन करीन. त्यामुळं मी अलग राहून सुखी होईन.'

ययातीने आपल्या पत्नीस असे सांगून आपले यौवन पुरूला परत देऊन टाकले. त्याने स्वत:चे वृद्धत्व स्वीकारले. त्यामुळे आता त्याच्या मनात विषयवासना राहिली नाही. त्यानंतर त्याने दक्षिण-पूर्वेस द्रह्यूस, दक्षिणेस यदूस, पश्चिमेस तुर्वसूस, उत्तरेस अनूस राज्य देऊन तो वनात निघून गेला. ययातीने अनेक वर्षे विषयभोग भोगले, पण पंख फुटताच पक्षी आपले घरटे सोडतात त्याप्रमाणे ययातीने एका क्षणात सर्व भोग सोडून दिले. आत्मसाक्षात्कारामुळे त्याचे लिंग-शरीर नष्ट झाले. त्याला परब्रह्म परमात्म्याची प्राप्ती झाली.

देवयानीनेही ययातीची गाथा ऐकून निवृत्तिमार्गाचे चिंतन केले. तिनेही सर्व पदार्थांची आसक्ती सोडली. तिने आपले लिंगशरीर सोडून ती परमात्मा श्रीकृष्णांस जाऊन मिळाली. तिने त्यांना म्हटले, 'सर्व जगाच्या निर्मात्या, सर्वान्तर्यामी, सर्वांना आश्रय असणाऱ्या, सर्वशक्तिमान, भगवान वासुदेवा, आपणांस नमस्कार असो. परम शांत व अनंत अशा तत्त्वास मी नमस्कार करते.'

## राजा दुष्यन्त आणि भरत

पुरूच्या वंशात दुष्यन्त नावाचा एक राजा होऊन गेला. तो एकदा आपल्या सैनिकांसह खेळता खेळता वनात कण्वऋषींच्या आश्रमात गेला. त्या आश्रमात त्याने एक अतिशय देखणी व सुंदर मुलगी पाहिली. तिच्या लक्ष्मीसारख्या अंगकांतीने तो सारा आश्रम प्रकाशित झाला होता. त्या सुंदरीस पाहाताच दुष्यन्ताचे मन मोहून गेले. व तो तिच्याशी बोलण्याचा प्रयत्न करू लागला. तिला पाहून त्याच्या

मनास मोठा आनंद झाला. त्याच्यातील कामभावना जागी झाली. परिश्रम दूर करण्याच्या उद्देशाने तो तिला म्हणाला,

'कमलदलांप्रमाणे सुंदर नेत्र असणाऱ्या देवी, तू कोण आहेस? तू कुणाची पुत्री आहेस? तू या निर्जन वनात राहून काय करतेस? सुंदरी, मला वाटतं तू क्षत्रियाची कन्या आहेस. कारण पुरुवंशीयाचं मन कधी अधर्माकडं प्रवृत्त होत नाही.'

'आपलं म्हणणं सत्य आहे.' ती सुंदरी बोलू लागली, 'मी विश्वामित्रांची पुत्री आहे. मेनका नावाच्या अप्सरेनं मला या वनात सोडलं. महर्षी कण्वांनी माझं पालनपोषण केलं. वीरशिरोमणे, मी आपली काय सेवा करू? कमलनयना, आपण इथं बसावं. आमच्या सत्काराचा स्वीकार आपण करावा. आपली इच्छा असेल तर आपण भोजन करावं.'

'सुंदरी, तू कुशिकवंशात उत्पन्न झाली आहेस. असा आतिथ्य-सत्कार करणं तुला योग्यच आहे. राज्यकन्याच आपणांस योग्य अशा पतीस वरतात.'

शकुंतलेची स्वीकृती मिळताच दुष्यन्ताने-देश, काल, शास्त्राची आज्ञा जाणणाऱ्या राजाने गांधर्वविधीच्या धर्मानुसार तिच्याशी विवाह केला. राजर्षी दुष्यन्ताचे वीर्य अमोघ होते. रात्री त्याला शकुंतलेचा सहवास लाभला. दुसऱ्या दिवशी सकाळीच तो राजधानीस निघून गेला. समय होताच शकुंतलेस एक पुत्र झाला. महर्षी कण्वांनी त्या वनातच राजकुमाराचे जातकर्मादी संस्कार केले. ते बालक जन्मापासूनच अत्यंत बलवान होते. मोठमोठ्या सिंहांना पकडून तो त्यांच्याशी खेळत राही.

ते बालक भगवानांचा अंशावतार होते. त्याचे बल मोठे होते. त्याला आपल्या बरोबर घेऊन रमणीया शकुंतला आपल्या पतीपाशी गेली. पण राजा दुष्यन्ताने आपली पत्नी व आपला पुत्र यांचा स्वीकार केला नाही. एवढ्यात एक आकाशवाणी झाली. 'पुत्र हा पित्याचाच असतो. पिताच पुत्राच्या रूपानं जन्म घेतो. आपल्या पुत्राचं भरणपोषण करतो. दुष्यन्ता, तू या शकुंतलेचा तिरस्कार करू नकोस. आपल्या पुत्राचा सांभाळ कर. या शकुंतलेचं म्हणणं बरोबर आहे. या गर्भास तूच

जबाबदार आहेस.'

पिता दुष्यन्ताने ती आकाशवाणी ऐकून त्याप्रमाणे केले. तो मृत्यू पावल्यावर हे बालक चक्रवर्ती सम्राट झाले. ते तर भगवानांचा अंश होते. त्याची कीर्ती सर्वत्र पसरली. हा भरत मोठा शक्तिवान राजा झाला. त्यानें दीर्घतमा ऋषीस पुरोहित बनवून गंगासागरापासून गंगोत्रीपर्यंत पंचावन अश्वमेधयज्ञ केले. यमुनातटावर त्यानें अठ्ठयाहत्तर अश्वमेधयज्ञ केले. या यज्ञांत त्यानें अपार धनराशीचे दान केले. त्याने ब्राह्मणांना इतक्या गायी दान दिल्या की प्रत्येकास १३०८४ गायी मिळाल्या. असे हजार ब्राह्मण होते. राजा भरताने आपल्या यज्ञात एकशे तेहतीस घोडे बांधून सर्वांना चकित केले. राजा भरताने मोठे यश संपादन केले. यज्ञातील 'मष्णार' नावाच्या एका कर्मात त्याने सुवर्णांने विभूषित, श्वेत दातांचे, काळ्या रंगाचे चौदा लाख हत्ती दान केले. दिग्विजय करून भरताने किरात, हूण, यवन, अंध्र, कंक, खश, शक, म्लेच्छ आदी सर्व ब्राह्मणद्रोही राजांचा पराभव केला. रसातलातील देवांना व देवांगनांना त्याने मुक्त केले. भरताने सत्तावीस हजार वर्षांपर्यंत या पृथ्वीवर एकछत्र शासन केले. शेवटी त्याने ऐश्वर्य, सार्वभौम संपत्ती, अखंड राज्यकारभार, जीवन यांना मिथ्या समजून तो संसारापासून उदासीन झाला.

विदर्भराजाच्या तीन कन्या भरताच्या पत्नी होत्या. तो त्यांचा मोठा आदरही करी. 'तुमचे पुत्र मला अनुरूप नाहीत,' असे जेव्हा भरत त्यांना म्हणाला तेव्हा त्यांना भीती वाटली. हा सम्राट आमचा त्याग तर करणार नाही ? अशी शंका त्यांच्या मनात आली. म्हणून त्यांनी आपल्या मुलांस मारून टाकले. अशा प्रकारे सम्राट भरताचा वंश विच्छिन्न होऊ लागला. त्याने म्हणून संतानासाठी 'मरुत्स्तोम' नावाचा यज्ञ केला. मरुद्गणांनी प्रसन्न होऊन त्याला भरद्वाज नावाचा एक पुत्र दिला.

## आणि हा रन्तिदेव

भरताच्या वंशात रन्तिदेवाचे यश या लोकात व परलोकात

गौरवाने गायिले जाते. रन्तिदेव दैववश प्राप्त झालेल्या वस्तूवर भागवीत असे. संग्रह-परिग्रह, ममता यांनी रहित असा हा रन्तिदेव मोठा धैर्यशाली होता. आपल्या कुटुंबाबरोबर दुःख भोगायचा. एकदा तर लागोपाठ अठ्ठेचाळीस दिवस त्याने पाणीही प्याले नाही. एकोणपन्नासाव्या दिवशी त्याला थोडे तूप, खीर, पाणी इत्यादींची प्राप्ती झाली. भूक व तहान यांनी त्याचा परिवार व्याकुळ बनला होता. त्यांनी जेवण्याची तयारी केली, एवढ्यात एक ब्राह्मण तेथे अतिथी म्हणून उपस्थित झाला. रन्तिदेव सर्वत्र भगवानांना पाहात असे. मोठ्या श्रद्धेने त्याने त्या अतिथी ब्राह्मणास भोजन दिले.

ब्राह्मण भोजन करून निघून गेला. उरलेल्या अन्नाची वाटणी करून रन्तिदेवाने भोजन करण्याचा विचार केला. त्याच वेळी एक शूद्र अतिथी आला. रन्तिदेवाने त्या उरलेल्या अन्नाचा काही भाग त्या शूद्राला दिला. त्यानंतर एका कुत्र्यास घेऊन आणखी एक अतिथी आला व त्याने म्हटले, 'राजन्, मला व या माझ्या कुत्र्याला फार भूक लागली आहे. काही खायला मिळेल?' रन्तिदेवाने जे थोडे उरले होते ते त्याला दिले व त्यास स्वामी समजून नमस्कार केला. आता केवळ थोडे पाणीच उरले होते. ते एकट्या माणसास पुरणारे होते. पण एवढ्यात तेथे एक चांडाळ आला. तो म्हणाला, 'मी अत्यंत नीच आहे. मला थोडं पाणी द्यावं.' दयाळू रन्तिदेवाने मनाशी म्हटले, 'मी भगवंतांपासून अष्टमहासिद्धींची अपेक्षा नाही करीत. मला मोक्षाचीही इच्छा नाही. पण या सर्व प्राण्यांचं दुःख कसं सहन करू? आता या दीन प्राण्याला मी जल देईन. त्याच्या जीवनाचं रक्षण होईल. आता माझी भूक, पीडा, माझा विषाद, माझा मोह या गोष्टी संपतील. मी सुखी होईन.'

असे म्हणून रन्तिदेवांनी त्या चांडाळास ते पाणी देऊन टाकले. तो स्वतः जलावाचून व्याकुळ झाला होताच. पण स्वभावतःच तो दयाळू असल्याने त्याने हा परोपकार केला. परमेश्वराने अतिथिरूपाने रन्तिदेवाची जणू परीक्षाच पाहिली. ती पूर्ण झाल्यावर ब्रह्मा, विष्णू व

भा...१२

महेश हे तीनही देव त्याच्या समोर प्रकट झाले. रन्तिदेवान त्यांच्या चरणांना प्रणाम केला. त्याला काहीच मागायचे नव्हते. काही घ्यायचे नव्हते. आसक्ती व स्पृहा यांनी तो रहित झाला होता. प्रेममय भक्तीत तो रंगून गेला असल्याने त्याने त्यांना काहीच मागितले नाही. भगवंतांशिवाय त्याला काहीच नको होते. रन्तिदेवाचे अनुयायीही असेच परम भक्त होते. ते सर्व प्रेमभावाने भगवंतांचे आश्रित झाले.

## वसुदेव व देवकी बंदिवासात

त्यानंतर शुकदेवांनी परीक्षित राजास भरताचा वंश समजावून दिला. पांचाळ, कौरव, मगधदेशीय राजांची ओळख करून दिली. विदर्भाच्या राजवंशाचे वर्णन केले. वसुदेव व देवकी यांच्या आठ अपत्यांचे वर्णन त्यांनी विस्ताराने केले. या जगतात धर्माचा ऱ्हास होत चालला की, सर्व शक्तिमान प्रभूंचा अवतार होतो. या सर्व वंशावळीचे वर्णन ऐकून एकदा परीक्षित राजा शुकाचार्यांना म्हणाला,

'मुने, आपण आतापर्यंत माझ्यासाठी चंद्रवंश व सूर्यवंश यांचं सविस्तर वर्णन केलंत. धर्मशील अशा यदूची कथा आपण मला सांगितलीत. आता या यदूच्या कुळातील श्रीकृष्णांनी जी अलौकिक कृत्यं केली ती मला सर्व सांगावीत. भगवंतांच्या गुणांचं गायन हे संसाररूपी रोगावरचं एक उत्तम औषध आहे. भारतीय युद्धात कौरवांचा पराभव करणं अत्यंत कठीण काम होतं. कारण देवांवरही विजय मिळविणारे भीष्मांसारखे वीर पुरुष त्यांच्याकडं होते. पण माझ्या आजोबांनी भगवंतांच्या कृपेची नौका केली व त्यामुळं आम्ही तो सेनासागर तरून आलो. त्या भगवंतांनी तर माझ्या मातेच्या उदरात प्रवेश करून आपल्या सुदर्शनचक्रानं माझं रक्षण केलं. ज्ञानवान मुने, आपण मला या श्रीकृष्ण भगवानांचं सर्व चरित्र कृपा करून सांगावं.'

परीक्षित राजाची ही निर्मळ बुद्धी ऐकून शुकाचार्यांना आनंद झाला व त्यांनी त्याचे मनापासून कौतुक केले. त्यांनी कलिकालाचे पाप नष्ट करणारे श्रीकृष्णांचे पवित्र चरित्र त्याला विस्ताराने ऐकविले. गर्विष्ठ अशा दैत्यांचा भार असह्य झाल्यामुळे एकदा पृथ्वी ब्रह्मदेवांना शरण गेली.

तिने गायींचे रूप धारण केले होते. डोळ्यांत अश्रू आणून रडतच ती ते ब्रह्मदेवांजवळ गेली व आपल्यावरील संकटाची कल्पना तिने ब्रह्मदेवांना दिली. ब्रह्मदेवांनी सर्व ऐकून घेतले आणि इतर देव आणि पृथ्वी यांच्यासह क्षीरसागराच्या तीरी गेले. तेथे त्यांनी पुरुषसूक्त म्हणून भगवंतांची स्तुती केली. तेव्हा आकाशवाणी झाली, 'पृथ्वीचं संकट आदिपुरुषाला कळालं आहे. पृथ्वीचा भार उतरविण्यासाठी तो परमेश्वर लवकरच अवतार धारण करणार आहे. स्वत: भगवान आदिपुरुष वसुदेवाच्या घरी जन्मास येईल व त्यांचाच एक अंश सहस्रवदन शेषही अवतार धारण करणार आहे. जगन्मोहिनी मायाही अवतार धारण करणार आहे.'

फार पूर्वी यादवांचा राजा शूरसेन मथुरानगरीत राहात होता. त्या शूरसेनाचा पुत्र वसुदेव आपल्या नवपरिणित वधूस बरोबर घेऊन रथातून चालला होता. त्याच्या पत्नीचे नाव देवकी होते. आपल्या बहिणीच्या हितासाठी उग्रसेनाचा पुत्र कंस सोन्याचे शेकडो रथ बरोबर घेऊन स्वत: तिच्या रथाचा सारथी झाला होता. त्याच्या हातात घोड्याचे लगाम होते. सासरी निघालेल्या कन्येबरोबर सुवर्ण कमलांनी नटलेले चारशे हत्ती, पंधरा हजार घोडे, अठराशे रथ, अलंकारांनी नटलेल्या दोनशे तरुण दासी होत्या. वधू-वर घरी जाण्यास निघाले तेव्हा शंख, तुताऱ्या, मृदंग, दुंदुभी इत्यादी मंगलवाद्यांचे गजर होत होते. कंस रथाचे घोडे हाकीत होता. एवढ्यात त्याला उद्देशून एक आकाशवाणी झाली.

'अरे मूर्खा, जिचा रथ तू हाकीत आहेस तिचा आठवा गर्भ तुला ठार मारणार आहे.' ही वाणी ऐकताच भोजकुलकलंक कंसाने बहिणीलाच ठार मारण्याचा निश्चय केला. त्यानं तिचे केस पकडून तलवार उपसली. उदार मनाच्या वसुदेवाने त्याला शांत करताना म्हटले, 'कंसा, शूर लोक तुझ्या पराक्रमाचं कौतुक करतात. तू एका स्त्रीला, आणि तेही तुझ्या बहिणीला या लग्नसमारंभातच ठार मारतोस ? अरे, दीनवाणी झालेली ही तुझी धाकटी बहीण पाहा एखाद्या बाहुलीप्रमाणं निश्चेष्ट होऊन पडली आहे. अशा निरपराधी बहिणीची तू हत्या करणार ?'

कंस हा मोठा निष्ठुर व राक्षसी वृत्तीचा होता. वसुदेवाच्या

बोलण्याचा त्याच्या मनावर कसलाही परिणाम झाला नाही. तेव्हा कंसास देवकीचा पुत्र देण्याचा विचार वसुदेवाला सुचला. त्यानें कंसाचे गुणवर्णन केले. तो प्रसन्नतेनें म्हणाला, ' भल्या माणसा, तुला हिच्यापासून काहीच भय नाही. हिचे पुत्र मी तुझ्या स्वाधीन करीन.' वसुदेवाचे हे एक आश्वासन ऐकून कंसाचा विचार बदलला. काही काळ लोटल्यावर त्या देवकीला वर्षाच्या अंतरानें आठ पुत्र व कन्या यांची प्राप्ती झाली. असत्य बोलण्याचे पाप लागायला नको म्हणून वसुदेवानें आपल्या पहिल्या पुत्रास मोठ्या दुःखानें कंसाच्या स्वाधीन केले. या साधुपुरुषाचे वर्तन पाहून पुत्र परत देताना कंस त्याला म्हणाला, ' वसुदेवा, या पुत्रास तू घेऊन जा. यापासून मला भय नाही. पण आठव्या गर्भापासून मात्र भीती आहे.' वसुदेव मुलाला घेऊन घरी निघून गेला.

एवढ्यात नारदमुनी कंसाकडे येऊन म्हणाले, ' कंसा, गोकुळातील नंदादी गोप, त्यांच्या स्त्रिया, वृष्णिकुळातील वसुदेव आदी यादव, देवकी आदी स्त्रिया, हे सर्व देवाचे अवतार आहेत. पृथ्वीला भारभूत होणाऱ्या असुरांचा संहार करण्याचा त्यांचा उद्योग चालू आहे.' तेव्हा कंसाने जाणले की, देवकीच्या पोटी येणारा पुत्र म्हणजे आपला वध करणारा साक्षात विष्णूच होय. तेव्हा त्याने वसुदेव व देवकी यांच्या पायांत शृंखला ठोकून त्यांना बंदिवासात कोंडून ठेविले. देवकीला होणारा प्रत्येक मुलगा हा विष्णूच असेल अशा कल्पनेनें तो त्याला ठार मारू लागला. पूर्वी विष्णूंनी मारलेला कालनेमी नावाचा दैत्य म्हणजे आपणच असे मानून तो यादवांचा वैरी बनला. यदू, भोज, अंधक यांचा अधिपती व स्वतःचा पिता उग्रसेन यालाही त्याने बंदिवासात टाकले.

## देवकीच्या उदरात श्रीहरी

कंसाने मगधराज जरासंधाचा आश्रय घेतला व प्रलंब, बक, चाणूर, तृणावर्त, अघासुर, मुष्टिक, अरिष्ट, द्विविद, पूतना, केशी, धेनुक, बाणासुर, भौमासुर इत्यादी दैत्यांच्या साह्याने यादवांना त्रास द्यायला प्रारंभ केला. सर्व यादव त्रासून गेले व त्यांनी कुरू, पांचाल, केकय, शाल्व, विदर्भ, निषध, विदेह, कोसल इत्यादी देशांत प्रयाण केले.

काहींनी कंसाचे प्रेम संपादन करून मथुरेतच मुक्काम केला. त्या दुष्ट कंसानें देवकीचे सहा पुत्र ठार केले. अनंत नावाचा विष्णूंचा एक अंश देवकीच्या सातव्या गर्भात स्थिर झाला. हर्ष व शोक यांनी देवकीचे मन भरून गेले. भगवानांनी याच वेळी योगमायेस आज्ञा केली, 'कल्याणी, तू गोपगोपांच्या गोकुळात जा व तिथं नंदाच्या घरी वसुदेवाची भार्या रोहिणी आहे. इतर स्त्रियाही कंसाच्या भीतीनं तिथं गुप्तरूपानं आहेत. देवकीच्या उदरात माझा शेषरूप अंश आहे. तेथून तू त्या गर्भाला काढ व त्याची स्थापना रोहिणीच्या उदरात कर. आता मीच पूर्णत्वानं देवकीचा पुत्र म्हणून जन्म घेणार आहे तूही नंदाच्या व यशोदेच्या पोटी स्त्रीचा जन्म घे. तू इच्छित वर देणारी आहेस. धूप, पुरुष, बळी यांनी लोक तुझी पूजा करतील. पृथ्वीवर तुझी देवळं होतील. तुलाच दुर्गा, भद्रकाली, विजया, वैष्णवी, कुमुदा, चंडिका, कृष्णा, माधवी, कन्यका, माया, नारायणी, ईशानी, शारदा, अंबिका, अशी अनेक नावं मिळतील. गर्भाचं संकर्षण झाल्यामुळं त्याला संकर्षण असं नाव प्राप्त होईल. सर्व लोकांचं मनोरंजन करणारा म्हणून तो राम, बलवान म्हणून बल, अशीही नावं त्याला प्राप्त होतील.'

भगवंतांची आज्ञा योगमायेनें मान्य केली. तिने देवकीचा गर्भ आकर्षित करून तो रोहिणीच्या उदरात स्थापन केला. सर्व विश्वात भरून राहिलेले भगवान वासुदेवाच्या मनात प्रकट झाले. त्या श्रीहरींचे स्वरूप देवकीनेंही आपल्या हृदयात धारण केले. श्रीविष्णूच तिच्या उदरातील गर्भात राहिल्यामुळे तिची कांती एकदम पालटली. तिचे हसतमुख पाहून कंसास भीती वाटली. श्रीहरींच्या नाशाचा विचार तो सतत करीत राहिला. देवकीचा वध म्हणजे स्त्रीचा, बहिणीचा, गर्भिणीचा म्हणून त्यानें तो विचार सोडून दिला. पण येणाऱ्या अपत्याचा नाश करण्याचा मात्र त्याचा विचार पक्का होता. हिंडतांना, फिरताना, निजताना, उठताना, बसताना, खाताना, पिताना त्याला श्रीहरीच दिसू लागल्यानें तो श्रीहरिमय बनला. सर्व जग त्याला श्रीहरिमय दिसू लागले देवकीच्या उदरातील भगवंतांची मनापासून स्तुती ब्रह्मदेव, शंकर, आदी देवांनी केली. ते त्या प्रभूला म्हणाले,

'ईश्वरा, आपण आतापर्यंत मत्स्य, कच्छप, नृसिंह, वराह, हंस, क्षत्रिय, ब्राह्मण, देव इत्यादींत अवतार धारण करून पृथ्वीचं रक्षण केलंत. आताही आपण असंच रक्षण करावं. यदुश्रेष्ठा, आमचा नमस्कार तुला असो. माते देवकी, आमच्या सुदैवानं तुझ्या उदरात प्रत्यक्ष श्रीहरींचा निवास आहे. आता त्या कंसाचा मृत्यू जवळ आला आहे. त्याच्यापासून तुला मुळीच भय नाही. हा पुत्र यादवांचं रक्षण करील.'

## श्रीकृष्ण कारागृहातून गोकुळात

त्यानंतर उत्तम लक्षणांनी युक्त व परममंगलकारक अशा श्रीकृष्णांचा जन्म-समय झाला. नक्षत्रे, ग्रह, तारका शांत असून चंद्र रोहिणी नक्षत्रात होता. सर्व दिशा प्रसन्न झाल्या होत्या. पवित्र नक्षत्रांचा उदय झाला होता. पृथ्वीवरील नगरे, घरे, गौळीवाडे, रत्नादिकांच्या खाणी इत्यादींत मंगलोत्सव सुरू झाले. नद्यांचे पाणी स्वच्छ झाले. सरोवरे कमळांनी सुशोभित झाली. वनातील पुष्पगुच्छ पक्षी, भ्रमर-समुदाय यांच्या शब्दांनी नादयुक्त बनले. सुगंध आणणारा वारा वाहू लागला. ब्राह्मणांचे अग्नी शांतपणाने प्रज्वलित होऊ लागले. सज्जनांची मनें प्रसन्न झाली. श्रीकृष्णांच्या जन्माच्या वेळी स्वर्गात दुंदुभी वाजू लागल्या. गंधर्व व किन्नर यांचे गायन सुरू झाले. सिद्ध व चारण त्यांची स्तुती करू लागले. विद्याधरांच्या स्त्रिया अप्सरांच्यासह नृत्य करू लागल्या. देव व ऋषी आनंदित होऊन पुष्पवृष्टी करू लागले. समुद्राचे अनुकरण करून मेघही गर्जना करू लागले.

मध्यरात्रीचा काळोख गडद झालेला असताना देवकीच्या समोर भगवान श्रीविष्णू प्रकट झाले. त्यांचे नेत्र कमलांप्रमाणे विशाल होते. त्यांना चार हात होते. त्यांत शंख, चक्र, गदा, पद्म ही आयुधे होती. त्यांच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सचिन्ह होते. गळ्यात कौस्तुभमणी होता. त्यांनी पीत वस्त्र परिधान केले होते. त्यांचे रूप पाण्यानें भरलेल्या मेघाप्रमाणे श्याम होते. त्यांची किरीटकुंडले अत्यंत मौल्यवान अशा वैडूर्यरत्नांच्या प्रकाशानं चमकत होती. त्यांचे हजारो कुरळे केस प्रकाशत होते. कमरेत कमरपट्टा, केयूरादी बाहुभूषणे, कडीतोडे इत्यादी

अलंकारांनी अत्यंत मोहक असे वासुदेव बाळस्वरूपात वसुदेवासही दिसले. त्याने आनंदानें हजारो गायी ब्राह्मणांना दान देण्याचा संकल्प केला. हा बालक म्हणजे प्रत्यक्ष श्रीहरीच आहे, असे जाणून त्यानें त्यांची प्रेमानें स्तुती केली. देवकीनेंही त्या भगवानांची, अव्यक्ताची, आद्याची, ब्रह्मरूपाची, ज्योतिर्मयाची, निर्गुणाची, निराकाराची, भेदरहिताची, इच्छारहिताची मनापासून स्तुती केली. ती त्यांना म्हणाली,

'भगवंता, सर्व कल्याणांचं माहेरघर तू आहेस. मी तुला शरण आले आहे. या भयंकर अशा उग्रसेनपुत्रापासून तू आमचं रक्षण कर. मधुसूदना, माझ्यापोटी तुझा जन्म झाला हे त्या दुष्टाला कळता कामा नये. तुला तो छळील याची मला भीती वाटते. विश्वात्म्या, शंख, चक्र, गदा, पद्म यांनी शोभणारं हे तुझं रूप तू आता आवरून घर.'

देवकीच्या प्रार्थनेस अनुसरून ते श्रीहरी त्वरित आपल्या मायेच्या साह्यानें एक लहान व सामान्य बालक झाले. भगवंतांच्याच प्रेरणेनें वसुदेवानें पुत्राला कारागृहाच्या बाहेर नेऊन सोडण्याचा विचार केला. याच सुमारास गोकुळात नंदाच्या स्त्रीच्या पोटी जन्मरहित अशा योग-मायेनें जन्म घेतला. तिनेंच कारागृहाच्या सर्व द्वारपालांचे चैतन्य हिरावून घेतले. संरक्षकांना गाढ झोप आणली. श्रीकृष्णांना घेऊन वसुदेव दारांशी येताच सर्व दारे आपोआप उघडली. त्या वेळी मेघ मद मंद वृष्टी करीत होते. शेषही आपला फणा उगारून पावसाचे निवारण करीत वसुदेवामागून चालला होता. यमुनेस अत्यंत मोठा पूर आला होता. उसळणाऱ्या लाटांनी ती फेसयुक्त बनली होती. तिच्यात अनेक भोवरे निर्माण झाले होते. सीतापती रामचंद्रांना जसा समुद्राने मार्ग दिला तसाच यमुनेनेही वसुदेवास मार्ग करून दिला.

वसुदेव नंदाच्या गोकुळात गेला तेव्हा सर्वजण गाढ झोपले होते. त्याने त्या नवजात बालकास यशोदेच्या पलंगावर ठेवले. तिच्या कन्येला घेऊन तो पुन्हा आपल्या घरी गेला. तेथे पोचल्यावर त्याने त्या कन्येला देवकीच्या कुशीत झोपविले. पायांत शृंखला अडकवून वसुदेव पुन्हा बंदिखान्यात पडला. नंदाच्या स्त्रीस श्रम व निद्रा यांमुळे अपत्य झाल्याचे समजले, पण पुत्र की कन्या हे मात्र समजले नव्हते.

## आदिमायेची आकाशवाणी

वसुदेव बंदिखान्यात येऊन बसल्यावर दारांची कुलपे होती तशी लागली. मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकून पहारेकरी जागे झाले. धावतच कंसाकडे जाऊन त्यांनी देवकी प्रसूत झाल्याची वार्ता दिली. कंस वाटच पाहात होता. तो त्वरित अंथरुणावरून उठला. आपला काळच जन्मास आला असे समजून तो फारच घाबरून गेला. तो तसाच केस मोकळे सोडूनच बाळंतिणीच्या खोलीकडे गेला. आपल्या भावाला पाहून देवकी अत्यंत दीनवाणीने म्हणाली,

'दादा, ही तुझी सून होईल. ही कन्या आहे. हिला मारणं उचित होणार नाही. मला आतापर्यंत अग्नीसारखे तेजस्वी पुत्र झाले. पण त्यांना तू ठार केलंस. आता ही एक मुलगी तरी जगू दे. दादा, तू समर्थ आहेस. मी तुझी धाकटी बहीण नव्हे का रे? या अभागिनीला एवढं शेवटचं तरी अपत्य असू दे. एवढी दया कर ना.'

देवकी असे दीनवाणीने म्हणत असतानाच कंसाने तिच्याकडून ती कन्या तिचीच निर्भर्त्सना करून बळानेच घेतली. स्वार्थामुळे त्याचे प्रेम नष्ट झाले होते. त्याने नुकत्याच जन्मलेल्या त्या मुलीचे पाय धरून तिला शिळेवर आपटले. पण एवढ्यात ती कन्या त्याच्या हातून निसटली व आकाशात त्वरित गेली. विष्णूंची धाकटी बहीण झालेली ती योग-माया त्या वेळी हातांत शस्त्रे धारण केलेली अष्टभुजा देवी दिसू लागली. तिच्या गळ्यात स्वर्गीय फुलांच्या माळा होत्या. अंगावर उत्तम वस्त्रे, उटचा, अलंकार यांनी ती शोभून दिसत होती. तिच्या आठ हातांत धनुष्य, शूल, बाण, ढाल, तलवार, शंख, चक्र व गदा अशी शस्त्रे होती. सिद्ध, चारण, गंधर्व, अप्सरा, किन्नर, सर्प इत्यादींनी तिच्यासाठी भेटी आणल्या होत्या. त्यांनी तिला त्या समर्पण करून तिची स्तुती केली. ती कंसाला म्हणाली,

'मूर्खा, मला मारून तुला काय मिळणार? तुझा घात करणारा वैरी आता जन्मास आला आहे. तो कुठं तरी वाढतो आहे. तू आता निरपराध मुलांचे प्राण घेऊ नकोस.'

इतके बोलून ती योगमाया निरनिराळी नावे घेऊन प्रसिद्धीस आली. योगमायेची ही आकाशवाणी ऐकून कंसास मोठे नवल वाटले. नम्र होऊन त्याने वसुदेव व देवकी यांना बंधमुक्त केले. त्याने डोळ्यांत पाणी आणून त्यांचे पाय धरले व क्षमा मागितली. वसुदेवाचाही राग शांत झाला.

रात्र सरल्यावर कंसाने आपल्या मंत्र्यांना बोलावून घेतले. सर्व प्रकार ऐकून मंत्र्यांना मोठा राग आला. आपण सर्व नगरे, सर्व गौळीवाडे, सर्व गावे हुडकून दहा दिवसांच्या आतील सर्व मुले मारून टाकू अशी भाषा त्यांनी केली. देव आपले काय वाकडे करणार आहेत? एवढी भीती कशासाठी? ब्राह्मण, तपस्वी, यज्ञकर्ते, गायी यांचा नाश केला की, देव सावध होऊन शरण येतील, असा त्यांना विश्वास वाटला. दानवांनी सज्जनांचा नाश करावा असे कंसाने ठरविले. दैत्यांनी सज्जनांचा छळ करायला सुरुवात केली.

## कृष्णाचा जातकर्मसंस्कार, गोकुळात आनंदोत्सव

उदार मनाच्या नंदाला पुत्रजन्माचा फार मोठा आनंद झाला. स्नान करून तो शुद्ध झाला. उत्तम वस्त्रे व अलंकार धारण करून त्याने ज्योतिष्यांना घरी बोलावून आणले. स्वस्तिवाचन करून त्याने विधीस अनुसरून पुत्राचा जातकर्मसंस्कार केला. पितर व देव यांचे पूजन केले. दोन लक्ष गायी, रत्ने, सोने, वस्त्रे यांनी आच्छादिलेल्या तिळांचे सात पर्वत त्याने ब्राह्मणांना दान दिले. भाट व बंदिजन यांनी स्तुतिपाठ गाइले. ब्राह्मणांनी मंगलदायक आशीर्वाद दिले. नगारे व चौघडे ही वाद्ये वाजत होती. गोकुळातील चौक, रस्ते, वेशी, घरांपुढील अंगणे स्वच्छ करून सर्वत्र चंदनाचे सुवासिक सडे घातले होते. ध्वजा, तोरणे, पताका, पुष्पांच्या माळा, शोभिवंत झालरी इत्यादींनी सर्व घरे सुशोभित झाली होती. गायी, बैल, वासरे यांच्या अंगांना तेल व हळद लावून त्यांना फुलांनी, मोरपिसांनी, सोन्याच्या पुतळ्यांच्या माळांनी, भरजरी वस्त्रांनी सजविले होते. गोकुळातील सर्व गोप मूल्यवान वस्त्रे घेऊन, कपडे घेऊन, भेटी घेऊन नंदाच्या घरी जमा झाले.

यशोदेस पुत्र झाल्याचे समजून गोपींना आनंद झाला. त्यांनी वस्त्रे, भूषणे, काजळ यांनी स्वत:स सजविले व त्यांनी आपल्या मुखांना केशराची उटी लावली. ओटीची सामग्री घेऊन त्या घाईनें यशोदेकडे निघाल्या. चालताना कटिभाग स्थूल असल्यामुळे त्यांचे स्तन हालत होते. त्यांच्या कानांत सुंदर कुंडले होती. गळचांत पुतळचांच्या माळा होत्या. त्यांनी नाना रंगांची वस्त्रे नेसली होती. त्यांच्या हातांत कंकणे होती. लगबग करून नंदाच्या घरी जाताना त्यांच्या वेणींतून फुले गळत होती. चालताना त्यांच्या कानांतील कुंडले, गळचातील रत्नहार, स्तन हालत असल्यानें अपूर्व शोभा आली होती.

नंदाच्या घरी येऊन त्यांनी यशोदेची ओटी भरली. बाळकृष्णास हातात घेऊन ' आम्हां गोकुळवासियांचं तू रक्षण कर ' असा आशीर्वाद त्यांनी दिला. तेल-पाण्यात हळद मिसळून ते एकमेकींच्या अंगावर उडवीत कृष्णाची गाणी त्या म्हणू लागल्या. या महोत्सवाच्या निमित्तानें नाना प्रकारची मंगलवाद्ये वाजू लागली. आनंदाच्या भरात गोपींनी एकमेकांच्या अंगावर दूध, तूप, पाणी उडविले. लोण्याने एकमेकांना माखले. एकमेकांवर दही फेकले. या आनंदाप्रीत्यर्थ नंदानें गोपगोपींना वस्त्रे, अलंकार देऊन त्यांचा यथोचित सत्कार केला. सूत, मागध, बंदीजन, गीतनृत्य करणारे इत्यादींची नंदानें संभावना केली.

या उत्सवप्रसंगी रोहिणीही नटूनथटून जमलेल्या स्त्रियांचा आदर-सत्कार करीत होती. नंदाचे गोकुळ आता धनधान्यांनी समृद्ध झाले. लक्ष्मीचे ते एक क्रीडास्थान बनले. एके दिवशी गोपांकडे गोकुळाचे रक्षण करण्याचे काम देऊन नंद कंसाला कर देण्यासाठी मथुरेस गेला. नंद व वसुदेव यांचे एकमेकांवर फार प्रेम होते. नंद आल्याचे समजताच वसुदेव गाडीच्या तळावरच त्याला भेटण्यासाठी गेला. वसुदेवास पाहाताच नंदाला प्रेमाचे उधाण आले. त्यानें एकदम वसुदेवास प्रेमाने आलिंगन दिले. आदरसत्कार झाल्यावर वसुदेवाने कुशल विचारल्यावर दोघांनी सुख-दुःखांच्या गोष्टी केल्या. भेटीच्या शेवटी वसुदेव नंदाला म्हणाला, ' तुम्ही वर्षाचा कर भरलात. आपली भेटही झाली. पण तुम्ही आता इथं फार दिवस राहू नका.' गोकुळावर तिकडे संकटं येत आहेत.' हे

ऐकून नंदाने आपल्या गाड्या जुंपल्या व तो गोपांसह गोकुळास जाण्यासाठी सिद्ध झाला.

## पूतनेला सद्गती

नंद गोकुळाची वाट चालू लागला. गोकुळावर संकटे येतील, ही वसुदेवाची वाणी त्याला अस्वस्थ करीत होती. तो मनातल्या मनात श्रीहरींना शरण गेला. इकडे कंसाने मुलांना मारण्यासाठी पूतना नावाची एक भली मोठी राक्षसी पाठवली. ती गावोगाव, वाड्यावाड्यांत फिरत होती. एके दिवशी पूतना गोकुळात आली. गौळीवाड्यापाशी येताना तिने सभ्य स्त्रीचे रूप घेतले होते. तिनें आपल्या वेणीत मोगरीची फुले घातली होती. स्थूल कटिभागामुळे व स्तनांच्या भारामुळे तिच्या कमरेचा भाग वाकला होता. तिने उत्तम वस्त्र नेसले होते. तिच्या कानांत कुंडले झळकत होती. तिच्या चमकदार केसांनी तिच्या मुखास शोभा आली होती. तिचे स्मितहास्य, तिचे कटाक्ष पाहून गोकुळातील लोकांची मनें आनंदित झाली. हातात कमळ घेऊन आलेली ही स्त्री म्हणजे साक्षात लक्ष्मीच आपल्या पतीस भेटण्यासाठी आली आहे, असे त्यांना वाटले.

लहान मूल कोठे आहे, याचा शोध घेत ती नंदाच्या घरी आली. तिला बाळकृष्ण बिछान्यात पडलेला दिसला. त्याने आपले तेज तूर्त झाकून घेतले असल्यामुळे भस्मात झाकलेल्या अग्नीप्रमाणे तो दिसत होता. ही येणारी स्त्री म्हणजे डाकीण आहे, असे कृष्णानें जाणले. तो डोळे मिटून स्वस्थ पडून होता. त्या पूतनेने श्रीकृष्णाला आपल्या मांडीवर घेतले. त्या सुंदर स्त्रीचे रूप पाहून कृष्णाच्या दोनही माता तिच्याकडे टक लावून पाहात होत्या. त्या दुष्ट स्त्रीने त्वरित आपला विषाने माखलेला स्तन कृष्णाच्या मुखात दिला. तेव्हा कृष्णाने आपल्या दोनही हातांनी तो घट्ट आवळून धरला व त्यातील विषाबरोबर तिचे प्राण पण हरण केले.

पूतनेच्या सर्व कोमल स्थानांना तणाव बसले. 'सोड रे, अरे सोड' असे म्हणून ती मोठ्याने ओरडू लागली. तिचे डोळे ताठरले. तिच्या अंगास घाम आला. हात-पाय आपटीत ती रडू लागली. तिच्या आक्रोशाने

सर्व पृथ्वी पर्वतांसह, ग्रहांसह थरथर कापू लागली. दिशा प्रतिध्वनींनी दुमदूमून गेल्या. त्या राक्षसीच्या स्तनास पीडा झाल्याने तिचा प्राण गेला. ती तोंड वासून हात-पाय अस्ताव्यस्त पसरून पडली. या वेळी ती आपल्या मूळच्या रूपात असल्याने वृत्रासुरच मरून पडला, असे सर्वांना वाटले. तिचा देह पडला तेव्हा त्याच्याखाली सहा कोस भूमीवरील झाडांचा चुरा झाला. तिच्या तोंडातील दाढा नांगराएवढ्या होत्या. नाकपुड्या जणू पर्वताच्या गुहा होत्या. तिचे स्तन म्हणजे जणू पर्वतावरून गडगडणाऱ्या शिळाच होत्या. तिचे रूप मोठे भयंकर असून तिच्या डोक्यावरचे केस अस्ताव्यस्त झाले होते. तिचे डोळे म्हणजे खोल अशा विहिरीच. तिचे शरीर वाळवंटासारख्या विस्तीर्ण ढुंगणामुळे अत्यंत भयानक दिसत होते. तिचे पोट म्हणजे पाणी असलेला एक डोहच होता. त्यावरचे हात, पाय, मांड्या म्हणजे जणू पूलच होते.

तिचे हे भयंकर रूप पाहून गोपगोपी अतिशय घाबरून गेल्या. तिच्या दीर्घ किंकाळीमुळे त्यांचे कान, त्यांची मस्तके फुटून गेल्यासारखी झाली. लहान कृष्ण मात्र तिच्या छातीवर वागडत होता. त्याला कसलेच भय वाटत नव्हते. गोपी त्वरित तेथे गेल्या व त्यांनी त्याला उचलून घेतले. यशोदा, रोहिणी, गोपी यांनी गायींच्या शेपट्या त्याच्यावरून फिरविल्या. त्याला नीट राखी बांधली. त्याला गोमूत्राने त्यांनी स्नान घातले व गायींच्या पायांची धूळ त्याला लावली. गोपींनी बाळकृष्णाच्या अंगावर न्यास करून मंत्रोच्चार केला. 'तुझ्या पायांचे अज रक्षण करो, गुडघ्यांचे अणिमान, मांड्यांचं यज्ञ, कंबरेचं अच्युत, उदराचं हयग्रीव, हृदयाचं केशव, वक्षःस्थलाचं ईश, कंठाचं सूर्य, भुजांचं विष्णू, मुखाचं उरुक्रम, मस्तकाचं ईश्वर रक्षण करो' अशा अर्थाचा मंत्र त्यांनी म्हटला. 'चक्रधारी श्रीहरी तुझ्या अग्रभागी असो. गदाधारी हरी तुझ्या पाठीमागे, धनुर्धर मधुसूदन व खड्गधारी अजन हे तुझ्या दोन्ही बाजूंस, शंखमूर्ती देव तुझ्या चारही कोपऱ्यांत, ऊर्ध्वभागी उपेंद्र, अधोभागी गरुड, हलधर, परमेश्वर तुझ्या सभोवती असो. अशी त्यांनी प्रार्थना केली. त्या म्हणाल्या,

'तू खेळत असताना गोविंद तुझं रक्षण करो. तू निद्रित असताना माधव, चालताना वैकुंठपती, बसताना लक्ष्मीपती, सर्व ग्रहांना व उप-

ग्रहांना भीती उत्पन्न करणारा तो यज्ञभोक्ता परमेश्वर भोजनसमयी तुझं रक्षण करो. डाकिणी, राक्षसी, कूष्मांड इत्यादींपासून, भूत, प्रेत, पिशाच, यक्ष, राक्षस, विनायक, कोटरा, रेवती, ज्येष्ठा, पूतना, मातृका, प्राण व इंद्रियं यांना भ्रम निर्माण करणारे उन्माद, अपस्मार, फेफरं, इत्यादी रोगांपासून, संकटांपासून तुझं रक्षण व्हावं,' अशी त्यांनी प्रार्थना केली.

गोपींनी अशा प्रकारे रक्षणविधी केल्यावर यशोदेनें बालकृष्णाला स्तनपान देऊन झोपविले. एवढ्यात नंदादी गोप मथुरेहून परत गोकुळात आले. पूतनेचा तो अस्ताव्यस्त देह पाहून ते आश्चर्यचकित झाले. वसुदेवाच्या बोलण्याचा त्यांना प्रत्यय आला. त्या गोपांनी पूतनेच्या देहाचे अवयव तोडून सुटे केले आणि दूरच्या ठिकाणी ते लाकडांत जाळून टाकले. पूतनेचा उपभोग श्रीकृष्णाने घेतला असल्याने तो देह जळत असताना चंदनासारखा सुगंध आला. पूताना कृष्णाला मारण्याच्या उद्देशाने आली होती, पण कृष्णानें स्तनपान केल्यामुळे तिला सद्गती प्राप्त झाली.

## तृणावर्तवध, विश्वदर्शन

श्रीकृष्ण आता उपडा वळू लागला होता. त्याच्या जन्मनक्षत्राचा योग साधण्यासाठी एक उत्सव करावा, या हेतूने यशोदेने गोपींना घरी बोलावले. वाद्ये, गाणी, मंगलगीते, ब्राह्मणांचा वेदघोष यांत यशोदेनें बालकृष्णाला स्नान घातले. त्याला अन्न, वस्त्र, माळा घालून त्याचे पूजन केले. श्रीकृष्णाला झोप येत आहे असे समजून यशोदेने त्याला एका गाड्याखालच्या पाळण्यात निजविले. ती गोपींचा सत्कार करीत होती. उत्सवातच मग्न होती. एवढ्यात पाळण्यातील कृष्ण जागा झाला. तेथेच तो रडू लागला. स्तनपानाच्या इच्छेनें तो हात-पाय झाडू लागला. पण कोणाचेच लक्ष त्याच्याकडे गेले नाही.

ज्या पाळण्यात तो झोपला होता तो एका गाड्यास बांधला होता. कृष्णाचे पाय त्या गाड्यास लागताच तो गाडा उलटला. त्यातील भांडी फुटली. द्रव पदार्थ वाहू लागले. चाके निसटून गेली. जोखड मोडून गेले.

सर्व गोपगोपी व यशोदा यांना या झाल्या प्रकारानें आश्चर्य वाटले. सर्व मंडळी घाबरून त्या गाडयाभोवती जमली. तेव्हा तेथील मुले त्यांना म्हणाली, 'अहो, या तुमच्या कृष्णानं रडताना पाय हलवून हा गाडा उलटविला.' त्या मुलांचे म्हणणे कोणासच पटले नाही. कारण कृष्ण केवढा लहान. त्याच्या सामर्थ्याची जाणीवच कोणासही नव्हती. मुलगा रडतो आहे असे पाहून, त्याला पिशाचबाधा झाली की काय असे वाटून यशोदेनें त्याला उचलून घेतले. ब्राह्मणांकडून वेदमंत्रांनी त्याची शांती करून त्याला स्तनपान करविले. गोपांनी तो गाडा परत पूर्वीप्रमाणे नीट करून ठेवला. नंदाने उत्तम ब्राह्मणांकडून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद यांतील मंत्रांचे पाठ म्हणवून कृष्णाला उत्तम औषधांनी अभिषेक केला. त्यांच्याकडून त्याने शुभाशीर्वाद मिळविले. त्यानें ब्राह्मणांना खूपसे दान दिले.

एकदा यशोदामाता श्रीकृष्णाला मांडीवर घेऊन खेळवीत होती. इतक्यात कृष्ण एखाद्या पर्वतासारखा जड झाला व त्याचा भार तिच्या मांडीला सहन होईनासा झाला. तिने कृष्णाला आपल्या मांडीवरून खाली ठेवले. परमेश्वराचे ध्यान करून ती आपल्या कामाकडे वळली. इतक्यात कंसाचा एक तृणावर्त नावाचा दैत्य वावटळीचे रूप घेऊन तेथे आला. तेथे बसलेल्या कृष्णाला उचलून तो घेऊन गेला. सर्व गोकुळ त्याच्या धुळीने व्यापून गेले. कोणालाच काही दिसेनासे झाले. सर्वत्र अंधार पसरला होता. यशोदेनें कृष्ण घरी नाही हे पाहून आकांत केला. सर्वत्र धूळ पसरलेली. अंधार झालेला. यशोदेला स्वतःचा मुलगा कोठेच दिसेना. करुण वाणीने ती कृष्णाला आठवून रडू लागली.

तिचे रडणे ऐकून इतर गोपीही जमा झाल्या. त्यांचेही डोळे पाण्याने भरून आले. वावटळ एवढ्यात थांबली. वाराही मंदावला. पण तिला कृष्ण कोठेच दिसेना. इकडे कृष्णास त्या तृणावर्त राक्षसाने वावटळीच्या रूपाने पळवून नेले होते. पण त्याची शक्ती कमी झाली. त्याला कृष्णाचे ओझे सहन झाले नाही. अशात कृष्णाने त्याचा गळा एकदम आवळून धरला. तृणावर्त त्यामुळे निश्चेष्ट झाला. त्याने डोळे मिटून घेतले. तो जवळ जवळ मेल्यासारखाच झाला. तो कृष्णासह

एकदम गोकुळात पडला. दगडावर आपटल्यामुळे त्याचे सर्व अंग ठेचून निघाले. हा सर्व प्रकार तेथील गोपगोपींनी पाहिला. छिन्नविच्छिन्न झालेल्या त्या तृणावर्ताच्या छातीवर कृष्ण बसलेला होता. गोपींनी त्याला तेथून ओढले व यशोदेजवळ आणून दिले.

आपला बालक सुखरूप परत आला. एवढ्या मोठ्या संकटातून वाचला, म्हणून यशोदेस, नंदास, गोपगोपींना अतिशय आनंद झाला. कृष्णाच्या या अद्‌भुत लीलेचे सर्वांनाच नवल वाटले. एके दिवशी यशोदा कृष्णाला मांडीवर प्रेमाने घेऊन स्तनपान करवीत होती. त्याचे पिणे संपल्यावर ती त्याचे हास्यमुख कुरवाळून कौतुक करू लागली. एवढ्यात कृष्णाने एक जांभई दिली. त्यावेळी यशोदेस त्याच्या मुखात साऱ्या विश्वाचे दर्शन झाले. आकाश, स्वर्ग, पृथ्वी, तारे, दिशा, सूर्य, चंद्र, अग्नी, वायू, सप्तसमुद्र, नद्या, पर्वत, द्वीपे, खंडे, चराचर भूते, इत्यादींना पाहून तिला अतिशय आश्चर्य वाटले. तिच्या अंगाला कंप सुटला. ती डोळे मिटून स्तब्ध राहिली.

## श्रीकृष्णाच्या बाललीला

वसुदेवाच्या निरोपावरून यादवांचे पुरोहित महातपस्वी गर्गमुनी एकदा गोकुळात नंदाकडे आले. त्यांना पाहून नंदाला अतिशय आनंद झाला. त्याने मोठ्या आदराने त्यांचे पूजन केले व मधुरवाणीने म्हटले, ‘ मुने, आपण ज्योतिषशास्त्र जाणता. या मुलाचे जातकसंस्कार आपल्या हातून होणे इष्ट आहे. आपण जन्मतःच सर्वांचे गुरू आहात. ’ तेव्हा नंदाला गर्गमुनी म्हणाले, ‘ नंदा, यादवांचा आचार्य म्हणून माझी सर्वत्र प्रसिद्धी आहे. तुझ्या पुत्राचा संस्कार मी केल्यावर तो वसुदेवदेवकीचाच आहे असं कंस मानील. कंस मोठ्या दुष्ट स्वभावाचा आहे. कृष्ण हा देवकीपुत्र असा संशय येऊन तो या मुलाला मारीलही. आपणांवर मोठा अनर्थच कोसळेल. '

‘ मुनिवर्य, आपण म्हणता ते खरं आहे. आपण अगदी एकान्तात गोठ्यात बसून यावर संस्कार करावेत. ‘ गर्गांनी दोघांवर संस्कार करून म्हटले,

'राजा, हा रोहिणीपुत्र आपल्या मित्रांना रमवील. त्यामुळं याचं नाव 'राम' या शब्दानं सार्थ होईल. हा बलवान असल्याने 'बल' या नावानंही याला लोक ओळखतील. यादवांत फूट पडल्यावर हा एकोपा निर्माण करील म्हणून याला 'संकर्षण' हे नावही शोभेल. आता हा तुझा पुत्र कृष्ण. हा तर युगायुगींचा अवतार आहे. याचे श्वेत, रक्त, पीत असे तीन वर्ण झाले आहेत. तूर्त हा कृष्ण असल्यानं याचं नाव कृष्ण होईल. हा तुझा पुत्र वसुदेवाच्या पोटी आला म्हणून याला वासुदेवही म्हणतील. गायी व गोप यांना हा आनंद देईल. सर्वांचं हा कल्याण करील. हा चोरांचा नाश करील. हा शत्रूंपासून सज्जनांचं रक्षण करील. नंदा, हा तुझा मुलगा गुणांनी, ऐश्वर्यानं, पराक्रमानं केवळ प्रतिविष्णूच आहे. तू नेहमी याचं काळजीपूर्वक रक्षण कर.'

असे भविष्य वर्तवून गर्ग मुनी आपल्या आश्रमाकडे निघून गेले. गोकुळात राम व कृष्ण हे हातांवर, गुडघ्यांवर रांगू लागले. खेळू लागले. रांगत रांगत ते गोठ्यात जात. तेथील चिखलाने अंग माखून घेत. रांगत असताना त्यांच्या कमरेतील व पायांतील घागऱ्यांचा मंजुळ ध्वनी होई. ते एकदमच आपल्या मातांना भेटत. त्यामुळे मातांना प्रेमाचा पान्हा फुटत असे. चिखलानें माखलेले ते कुमार त्यांना सुंदरच वाटत. त्यांना त्या माता पोटाशी धरून पाजीत असत. स्तनपान करताना त्यांचे कोवळे दात पाहून, त्यांचे हसरे मुख पाहून मातांना अतिशय आनंद होई. ते कुमार वाटेल ते खेळ करू लागले. लहान वासरांच्या शेपटचा घट्ट पकडून ते ठेवीत. शिंगांचे पशू, अग्नी, श्वापदे, पाणी, शस्त्रे, पक्षी, काटेरी झाडे यांपासून त्यांना आवरणे त्यांच्या मातांनाही कठीण झाले. त्यांना आवरताना त्यांची कामे राहून जात. त्यांच्या मनाची घाई उडे.

थोड्याच दिवसांत बलराम व कृष्ण विनासायास स्वतःच्या पायांनी चालू लागले. बरोबरीच्या मुलांना घेऊन ते गोकुळातील स्त्रियांना आनंद वाटेल अशा अनेक प्रकारच्या क्रीडा करू लागले. 'यशोदे, हा तुझा पोर किती ग खोडकर आहे. हा आमची वासरं सोडतो. कुणी ओरडले की हा हसतो. आमच्या घरातील दही, दूध, लोणी हा चोरून खातो. कधी माकडांनाही खायला देतो. कधी हा दहृयादुधांची भांडी

फोडून टाकतो, त्याला कधी खायला मिळाले नाही की, हा लहान मुलांना रडवून पळून जातो. दूध, दही जर उंचावर असेल तर पाट, उखळ पायांखाली घेऊन हा शिक्यावरचा पदार्थ काढतो. भांड्यांना भोकं पाडतो. हा अंधाऱ्या खोलीतही दूध-दही शोधतो. स्वत:च्या रत्नमय शरीराच्या प्रकाशात याला सर्व काही दिसतं. आम्ही अगदी घरकामात गुंतून गेलो की तुझा हा पोर घरात चोरी करतो ग.' असे सांगताना गोपी म्हणत,

'याचं साहस तरी किती सांगू ग ? हा घरातच मलमूत्र करतो. चोरीचे अनेक उपाय याला माहीत आहेत. अशी कृती करून पुन्हा वर दिसतो कसा साधूसारखा !' गोपींची ही अशी गाऱ्हाणी ऐकून यशोदा फक्त हसली. मुलाला दटवावे असे तिच्या मनातही आले नाही. एकदा तर कृष्णाने खेळता खेळता माती खाल्ली. यशोदेला कळताच तिनें येऊन त्याचा हात धरला. रागावून ती म्हणाली, 'काय रे दांडग्या, माती का खाल्लीस ?'

'आई, मी माती नाही खाल्ली. ही मुलं तुला खोटंच सांगतात. माझं तोंडच पाहा ना.'

'बरं तर. दाखीव बरं तुझं तोंड.'

यशोदेनें असे म्हणताच श्रीकृष्णाने आपले तोंड उघडले. त्याच्या मुखात समुद्र, नद्या, पर्वत, द्वीपे, भूगोल, अग्नी, वायू, चंद्र, सूर्य, तारे, अंतरिक्ष, इंद्रिय, मन, शब्दादी विषय, सत्वादी त्रिगुण, स्थावरजंगम सृष्टी असे सारे विश्व तिने श्रीकृष्णाच्या मुखात पाहिले. चित्रविचित्र असे हे जग, स्वत:सह गोकुळ त्याच्या मुखात पाहून त्या मातेला भारी नवल वाटले. हे काय स्वप्न की काय ? की ही ईश्वरी माया ? का आपल्याच बुद्धीला भ्रंश झाला ? की या पोराला जन्मतःच हे वैभव प्राप्त झाले आहे ? असे विचार मनात येऊन तिने परमात्म्याच्या चरणांना नमस्कार केला. आपण यशोदा, आपला पती, आपला पुत्र, या गोपगोपी, या गायी, यांच्याबद्दल मला ममत्व वाटते. पण ही कुबुद्धी ज्यामुळे मला झाली तो परमात्माच माझा आधार आहे असे यशोदेने

मानले.

असे ज्ञान जरी यशोदेस झाले तरी लगेच ती पुत्रस्नेहाने त्याच्यावर माया करू लागली. तत्त्वविचारांचा तिला विसर पडला. तीन वेद, उपनिषदे, सांख्यशास्त्र, योगशास्त्र, पंचरात्रादिक तंत्रे ज्याचे वर्णन करतात त्या श्रीहरीला तिने आपला पुत्र मानले. श्रीकृष्णांचे एवढे माहात्म्य ऐकून एकदा परीक्षिताने शुकाचार्यांना विचारले,

'मुने, नंदानं असं पुण्य तरी काय केलं होतं ? यशोदेचं स्तनपान श्रीकृष्णांनी करावं, असं तिचं तरी पुण्य काय ? या श्रीकृष्णाचं बल, चरित्र पापाचं क्षालन करतं, हे इतरांनी पाहिलं, पण त्याच्या मातापित्यांना मात्र हे भाग्य नाही असं का ?'

'राजा, अष्टवसूंत श्रेष्ठ असा द्रोण नावाचा एक वसू होता. त्याची धरा नावाची स्त्री होती. पृथ्वीवर गोरक्षण व्हावं म्हणून ब्रह्मदेवांनी आज्ञा केली. ती प्रमाण मानून तो वसू व त्याची स्त्री धरा, या पृथ्वीवर नंद व यशोदा बनून या गोकुळात जन्मास आली. म्हणूनच गोकुळातील इतरांपेक्षा नंद-यशोदेचं प्रेम या पुत्ररूप भगवानांवर विशेष प्रकारचं आहे.'

## उलूखलबंधन व कुबेरपुत्रमोक्ष

घरातील इतर दासी काही कामांत गुंतलेल्या होत्या. म्हणून एकदा यशोदा स्वतःच दही घुसळत होती. घुसळताना श्रीकृष्णाच्या क्रीडा आठवून ती गात होती. यशोदेने आपल्या अंगाभोवती रेशमी वस्त्र गुंडाळून ते नाडीने बांधले होते. पुत्रप्रेमाने तिच्या दोनही स्तनांना पान्हा फुटला होता. ती दही घुसळत असल्याने ते कापत होते. दोरी ओढण्याच्या श्रमामुळे तिच्या हातांतील कंकणे व कानांतील कुंडले हलत होती. तिचा चेहरा घामाने डवरला होता. तिच्या वेणीतून चमेलीची फुले खाली गळून पडत होती.

एवढ्यात स्तनपान करण्याच्या इच्छेने श्रीकृष्ण मातेजवळ आला. त्याने हातात रवी धरून तिचे घुसळविणेच थांबविले. यशोदेने त्याला मांडीवर घेतले व आपला स्तन त्याच्या मुखात देऊन ती त्याच्या हंसऱ्या

मुखाकडे पाहू लागली. त्याचे स्तनपान पुरे झाले नव्हते. पण चुलीवरील दूध उतू गेले म्हणून तिनें त्याला खाली ठेवले व ती चुलीकडे गेली. कृष्णाला याचा मोठा राग आला. त्या भरात त्याने वरवंटयाने ताकाचा डेराच फोडून टाकला. रडत रडत तो एकांतात जाऊन लोणी खाऊ लागला. तापलेल्या दुधाचे भांडे चुलीवरून उतरवून यशोदा पुन्हा त्या जागी आली. डेरा फुटलेला, ताक सांडलेले तिने पाहिले. कृष्ण मात्र जवळ दिसत नव्हता. तरी त्याचेच हे कृत्य असे तिनें जाणले. तिला हसू आले.

इतक्यात पालथ्या उखळीवर बसून शिक्यातील लोणी कृष्ण माकडांना देत आहे असे यशोदेनें पाहिले. चोरीच्या भीतीनें त्याचे डोळे कावरेबावरे झाले होते. यशोदा हातात काठी घेऊन हळूच त्याच्याकडे गेली. तिला पाहाताच उखळीवरून उडी मारून कृष्ण पळून जाऊ लागला. यशोदा त्याच्यामागे धावत होती. धावता धावता ती थकून गेली. तिची वेणी सुटून तीमधली चमेलीची फुले गळू लागली. पण शेवटी कृष्ण तिच्या हातांत सापडला. आपला अपराध आठवून तो मोठयानें रडू लागला. काजळाने माखलेले आपले तोंड त्यानें मातेकडे केले. त्याला भीती बसावी म्हणून यशोदा त्याच्यावर रागावली. पुत्र-वात्सल्याने यशोदेने काठी टाकून दिली, या कृष्णाला दाव्याने बांधून टाकण्याचा विचार तिने केला. ज्याला अंत नाही, ज्याला मागचे नाही, पुढचे नाही, जो जगात ओतप्रोत भरून राहिलेला, तो अधोक्षज आपला पुत्र समजून सामान्य मुलाप्रमाणे यशोदा त्याला उखळीशी बांधू लागली. पण बांधताना दर वेळेस ते दावे दोन बोटांनी कमी ठरे. दुसरे, तिसरे, चौथे; अशी सर्व दावी तिने आणली व ती त्याला बांधू लागली. पण त्याला बांधताना दावी दोन बोटे कमीच ठरली.

यशोदेची ही खटपट पाहून सर्व गोपी नवलाने हसू लागल्या. यशोदेसही मनातल्या मनात हसू येत होते. दाव्यांनी बांधता बांधता श्रमाने यशोदा घामेजून गेली. तिच्या वेणीतला गजरा अस्ताव्यस्त झाला. शेवटी कृष्णाला तिची दया आली व त्याने स्वतःस बांधून घेतले. उखळीस बांधून घेत असतानाच त्याला अर्जुनवृक्षांच्या रूपाने कुबेराचे

दोन यक्षपुत्र दृष्टीस पडले. ते पूर्वी नलकूबर व मणिग्रीव या नावांनी प्रसिद्ध व ऐश्वर्यसंपन्न होते. पण त्यांच्या उन्मत्तपणामुळे नारदांचा शाप मिळाला, म्हणून त्यांना वृक्षाचा जन्म मिळाला होता.

या कुबेरपुत्रांना नारदांचा शाप का व कसा मिळाला? या परीक्षिताच्या प्रश्नास शुकाचार्यांनी सविस्तर उत्तर दिले. कुबेराचे हे पुत्र रुद्रांचे सेवक बनून अतिशय गर्विष्ठ बनले. वारुणी नावाचे मद्य पिऊन ते अतिशय उन्मत्त झाले होते. त्यांचे डोळे नेहमी मदाने धुंद असायचे. अशाच अवस्थेत ते एकदा गंगेच्या काठी एका उपवनात मना-प्रमाणे हिंडत होते. कमळांनी भरलेल्या गंगेच्या पाण्यात ते तरुणींबरोबर क्रीडा करू लागले. एवढ्यात नारद तेथे आले. त्यांनी हा प्रकार पाहिला. मद्य पिऊन उन्मत्त झालेल्या कुबेरपुत्रांचे चाळे त्यांनी पाहिले. नारदांना पाहाताच त्या नग्न स्त्रिया लाजल्या व त्यांनी भीत भीत काठावर येऊन वस्त्रे नेसली. वस्त्रहीन कुबेरपुत्रांना मात्र कसलाच संकोच वाटला नाही. त्यांनी देवर्षींचा मानही ठेवला नाही. कुबेरपुत्र धनसंपत्तीनेही अंध झाले होते. त्यांना शाप देताना नारद म्हणाले,

'संपत्तीच्या मदानं मनुष्याचा बुद्धिभ्रंश होतो. संपत्तीच्या मदानं धुंद होणाऱ्या पुरुषास दारिद्र्यच ताळ्यावर आणील. दरिद्री पुरुषाला अहंकार नसतो. त्याला गर्व नसतो. त्याच्या वासनेचा क्षय होऊन तो शुद्ध होत जातो. संपत्तीच्या मदानं अंध झालेल्या, वारुणीमदिरेच्या पानात धुंद बनलेल्या या इंद्रियमग्न दोघांचा मद उतरविला पाहिजे. हे वृक्षयोनीला जातील. माझ्या प्रसादानं त्यांना स्मरण राहील. दिव्य शंभर वर्षं झाल्यानंतर यांना वासुदेवाचं सान्निध्य लाभून हे पुन्हा स्वर्गलोकी येतील.'

नारदांच्या शापामुळे नलकूबर व मणिग्रीव हे दोन अर्जुनवृक्ष बनले त्या वृक्षांच्या जोडीकडे बालकृष्ण हळूहळू गेला. त्या जुळ्या अर्जुनवृक्षांच्या मधून तो जाऊ लागला. त्याच्या मागोमाग त्याला बांधलेली उखळीही होती. ती उखळी त्या वृक्षांत अडकली. जोराने ओढताच त्या वृक्षांची पाळेमुळे हादरली. खोडे, फांद्या, पाने डळमळू लागली प्रचंड शब्द करीत ते वृक्ष उन्मळून पृथ्वीवर पडले. त्यांतून

अग्नीप्रमाणे तेजस्वी असे दोन सिद्ध पुरुष प्रकट झाले. ते हात जोडून कृष्णाला म्हणाले,

'कृष्णा, तू महायोगी आहेस. तूच परमश्रेष्ठ असा आदिपुरुष आहेस. स्थूल, सूक्ष्म असे सर्व विश्व तुझंच रूप आहे. सर्व प्राण्यांचे देह, प्राण, अहंकार, इंद्रियं यांचा अधिपती तूच आहेस. तूच काल, तूच ऐश्वर्यसंपन्न विष्णू आहेस. तूच महत्तत्त्व, तूच सत्त्व, रज, तम आहेस. सर्व इंद्रियांचे व्यापार तूच जाणतोस. परमकल्याणरूपा, वासुदेवा, यादवाधिपते, तुला नमस्कार असो. परमेश्वरा, आम्ही तुझे दासानुदास आहोत. आम्हांला आता जाण्याची अनुज्ञा द्यावी. आमची वाणी तुझंच नित्य गुणवर्णन करील. आमचे कान तुझीच गुणकथा ऐकतील. आमचे हात तुझ्या पूजनादी कर्मांत गुंतून राहातील, आमचे मन नित्य तुझ्याच चरणांचं चिंतन करतील. आमचं मस्तक तुझं निवासस्थान असं हे जग त्याला नित्य प्रणाम करील. आमची दृष्टी सत्पुरुषांच्या व तुझ्या दर्शनासाठी नित्य उत्कंठित राहील.'

**वाणी गुणानुकथने श्रवणा कथायां ।**
**हस्तौ च कर्मसु मनस्तव पादयोर्नः ।।**
**स्मृत्यां शिरस्तव निवासजगत्प्रमाणे ।**
**दृष्टिः सतां दर्शनेऽस्तुभवत्तनूनाम् ।।**

कृष्णाचे असे स्तवन करणाऱ्या त्या कुबेरपुत्रांना तो हसत म्हणाला, 'धनाच्या मदानं तुम्ही धुंद झाला होता. नारदानं शाप देऊन तुमच्यावर कृपाच केली. कुबेरपुत्रांनो, तुम्ही माझ्यावर निष्ठा ठेवून स्वस्थानी परत जा.' कृष्णाचा निरोप ऐकून त्यांनी उखळीशी बांधलेल्या कृष्णाला प्रणाम केला व त्याचा निरोप घेऊन ते उत्तरेकडे निघून गेले.

## वत्सासुर, बकासुर यांचा वध

उन्मळून पडलेल्या अर्जुनवृक्षांच्या मोठ्या आवाजाने वीज पडली की काय, असे वाटून नंदादी गोप घाबरतच त्या स्थानी आले. त्यांना तेथे आडवी पडलेली उखळी, तिला दाव्यांनी बांधलेला कृष्ण, पडलेले

वृक्ष यांचे दृश्य दिसले. नंदाने दाव्यांपासून प्रथम कृष्णाची सुटका केली. या पोरामुळे हे वृक्ष कोसळले हे नंदाला खरेच वाटले नाही. गोपींच्या बरोबर कृष्ण नाना प्रकारच्या क्रीडा करी. सर्व गोकुळास त्याने आनंद दिला. एकदा फळे विकणाऱ्या बाईच्या पाटीत कृष्णाने ओंजळभर धान्य टाकले. तो तिची टोपली हिऱ्यामाणकांनी भरून गेली. एकदा कृष्ण व बलराम यमुनेच्या तीरावर खेळत होते. रोहिणीने त्यांना हाका मारल्या तरी त्यांना समजले नाही. यशोदा त्यांना आणायला आली.

पुत्रप्रेमामुळे तिला पान्हा फुटला होता. ती कळवळून म्हणाली, 'कृष्णा, कमलनयना, बाळा, ये रे. स्तनपान कर ना. आता खेळ पुरे. भुकेनं तू व्याकुळ झाला असशील. खेळून दमला असशील रे बाळा, धुळीनं तुझं अंग पाहा बरं किती भरलं आहे ते. तू आता आधी स्नान कर. आज तुझा वाढदिवस आहे. घरी लौकर चल. स्नान करून ब्राह्मणांना गोप्रदानं दे. तुझे हे सोबती पाहा कसे अलंकारांनी नटले आहेत, तूही असाच नटून थटून तयार हो.' ब्रह्मादिकांना पूज्य असलेला कृष्ण यशोदा आपला पुत्रच स्नेहाने समजत होती. तिने बलरामास, कृष्णास घरी नेऊन दोघांना स्नान घातले. त्यांना नवा पोषाख, नवे अलंकार देऊन तिने त्यांचा वाढदिवस साजरा केला.

गोकुळात वारंवार उत्पात होतात, म्हणून नंदादी गोप चिंताग्रस्त झाले होते. उपनंद नावाच्या एका गोपाने गोकुळ सोडून दुसरीकडे निघून जाण्याचा बेत केला. पूतना, तृणावर्त, अर्जुनवृक्ष; अशी अनेक संकटे त्याला आठवली. जवळच वृंदावन नावाचे एक सुंदर वन होते. तेथे आपण जाऊ, असे त्याने म्हटले. त्या वृंदावनात पवित्र पर्वत आहे, गवत, वेली, वृक्ष भरपूर आहेत. गोप, गोपी, गायी यांना ते फार उपयोगी आहे. आपण तेथेच जाऊ. उशीर नको. असा आग्रह त्याने धरल्यामुळे सर्व गोपांनी गाड्या जोडल्या. सर्व गोप एकत्रच वृन्दावनाकडे निघाले. म्हातारे, स्त्रिया, मुले यांना गाड्यांत बसवून गोपांनी हातात धनुष्य-बाण घेतले होते. गायी पुढे चालल्या होत्या. शिंगे, कर्णे इत्यादी वाद्यांचा गजर होत होता. गोपींच्या अंगावर सोन्याचे अलंकार होते, त्यांच्या स्तनांना केशराची उटी होती, त्या उंची वस्त्रे नेसल्या होत्या, कृष्णलीला

गात गात त्या चालल्या होत्या.

त्या गोपांनी वृंदावनात आपली वस्ती केली. वृंदावन, गोवर्धन-पर्वत, यमुनानदी पाहून बलराम व कृष्ण यांना फारच आनंद झाला. ते वासरांना चारण्यासाठी वनात नेंऊ लागले. मुरल्या, पावे, अलगुजे, शिंगे, चेंडू इत्यादी खेळांच्या नादात ते गायींना चारत असत. ते कधी गोफणींनी दगड मारीत, कधी घुंगरू बांधून नाचत, कधी बैलाप्रमाणे गर्जना करीत. कधी निरनिराळ्या प्राण्यांसारखे आवाज करीत.

एके दिवशी यमुनेच्या तीरावर राम-कृष्ण वासरांना चारीत होते. त्यांना मारण्यासाठी एक राक्षस वासराचे रूप घेऊन त्या वनात आला. कृष्णाने बलरामास खुणावले. एखाद्या भोळसर मुलाप्रमाणे कृष्ण त्याच्या जवळ गेला. कृष्णानें शेपटी व त्याचे मागचे पाय धरून त्याला गरगर फिरविले. त्या गतप्राण झालेल्या राक्षसाला कृष्णानें एका कवठाच्या झाडावर फेकून दिले. त्याबरोबर पुष्कळ कवठे झाडावरून खाली पडली. तो प्रचंड वृक्षही उन्मळून पडला. कृष्णाचा हा पराक्रम पाहून सर्वांनाच अतिशय आनंद झाला.

सर्व गोपबालकांनी एकदा आपली वासरे पाणी पाजण्यासाठी एका तळ्यावर आणली. तेथे त्यांनी एक प्रचंड प्राणी पाहिला. त्याला पाहून त्यांना फार भीती वाटली. बगळ्याचे रूप धारण करणारा तो बक नावाचा एक राक्षस असून त्याची चोच तीक्ष्ण होती. त्या महा-बलिष्ठ राक्षसाने कृष्णावर उडी टाकून त्याला गिळून टाकले. हे पाहाताच बलरामादी गोपबालक मूर्च्छित झाले. पण तो कृष्ण आतून बकासुराची टाळू अग्नीप्रमाणे जाळू लागला. तेव्हा तो ताप त्याला सहन झाला नाही. त्याने कृष्णाला बाहेर सोडले. चोचीने त्याच्यावर प्रहार करण्या-साठी बकासुर धावून आला. तेव्हा कृष्णाने त्याला चोचीने धरून उभे चिरले. त्याच्या या कृत्यामुळे सर्वांनाच आनंद झाला. त्याच्यावर फुलांची वृष्टी झाली.

बकासुराच्या तावडीतून सुटलेल्या कृष्णाला बलरामानें आलिंगन दिले. कृष्णाचा पुनर्जन्म झाला असे पाहून वृंदावनातील गोपगोपींनी आनंदाचा उत्सव साजरा केला. त्यांना सांसारिक दुःखेही वाटेनाशी झाली.

## वनलीला, अघासुराचा वध

एके दिवशी वनभोजन करण्याच्या उद्देशानें कृष्ण पहाटेच उठला. त्याने वासरांना सोडले. शिंग वाजवून मित्रांना त्याने जमा केले. गोपबालक काठचा, मुरल्या, शिंगे, शिदोप्या बरोबर घेऊन, वासरांना पुढे घालून मोठचा आनंदानें कृष्णामागे चालले. त्यांनी अनेक प्रकारचे खेळ केले. घरातून बाहेर पडताना त्यांच्या मातांनी त्यांना सोन्याच्या भूषणांनी, काचेच्या मण्यांनी, गुंजांनी, अनेक रत्नांनी सजविले होतेच. पण वनात आल्यावर त्यांनी फळांचे घोस, कोवळी पाने, फुलांचे गुच्छ, मोरांची पिसे, काव इत्यादींनी स्वतःस सजविले. वनशोभा पाहाण्यासाठी दूर गेलेल्या कृष्णाला शोधून काढण्याचा खेळ गोपबालक खेळू लागले. मुरल्या, शिंगे यांचे ध्वनी होत होते. कित्येकांनी भुंग्यांच्या नादाबरोबर गाणी म्हटली. कित्येकांनी कोकिळांच्या शब्दांचे अनुकरण केले. कित्येकांनी हंसासारखी चाल केली. कित्येकांनी बगळचासारखी ध्यानें केली. कित्येकांनी मोरांबरोबर नृत्य केले. कित्येकांनी माकडांच्या शेपटचा धरून झाडावर स्थान मिळविले. कित्येकांनी त्यांना वाकुल्या दाखविल्या. कित्येकांनी फांद्यांवरून उडचा मारल्या.

कित्येकांनी नदीच्या प्रवाहात बेडकांप्रमाणे उडचा मारल्या. कित्येकांनी नदीच्या पाण्यात स्वतःची छाया पाहून तोंडे वेडीवाकडी केली. मोठचाने ओरडून कित्येकांनी प्रतिध्वनी उमटविले. गोपबालकांच्या अशा विविध क्रीडा पाहून अघासुर नावाचा एक राक्षस गोकुळावर चाल करून आला. तो पूतना व बक यांचा धाकटा भाऊ होता. कंसाने कृष्णाला मारण्यासाठी त्याला पाठविले होते. कृष्णाचा गाईवासरांसह वध करावा, असा त्याचा विचार होता. त्या दुष्ट राक्षसाने चार कोस लांबीच्या अजगराचे रूप धारण केले. कृष्णाला गिळण्यासाठी तो गोकुळाच्या वाटेवर आडवा पसरून राहिला. त्याचे शरीर एखाद्या पर्वतासारखे प्रचंड होते. त्याचे पसरलेले तोंड एखाद्या अंधेऱ्या गुहेसारखे होते. त्याचा खालचा ओठ जमिनीला व वरचा आकाशाला भिडला होता. त्यांत जीभ एखाद्या वाटेप्रमाणे दिसत होती. त्याच्या दाढा पर्वता-

सारख्या विशाल होत्या. त्याचे डोळे पेटलेल्या वणव्याप्रमाणे वाटत होते.

गोपबालक त्या अजगरास पाहून नाना प्रकारच्या कल्पना करीत असतानाच सर्व गोपबालकांनी त्या अजगराच्या पोटात प्रवेश केला. कृष्णाला गिळायला टपलेल्या त्या अजगराने आपले तोंड उघडेच ठेविले. कृष्णास गोपबालकांची दया आली. त्या कृष्णाने अजगराच्या मुखात प्रवेश केला. अघासुराच्या बांधवांना व कंसाला मोठा आनंद झाला. पण अजगराच्या पोटात श्रीकृष्ण एकदम वाढू लागला. त्याने अमर्याद शरीर धारण केल्यामुळे त्याचा श्वास कोंडून राहिला. त्याचे डोळे बाहेर आले. तो कासावीस झाला. शेवटी त्याचे प्राण त्याचे मस्तक फोडून बाहेर पडले. अघासुराच्या पोटात गुदमरून राहिलेल्या गोपबालकांना व वासरांना कृष्णाने बाहेर काढले.

कृष्णाने अघासुराला मारले, म्हणून सर्वत्र आनंद झाला. त्याच्यावर पुष्पांची वृष्टी झाली. अप्सरांचे नृत्य झाले. गंधर्वांनी गायन केले. विद्याधरांनी वाद्यांचे गजर केले. पार्षदांनी जयजयकार केला. वृंदावनात पडलेले अजगराचे कातडे गोपबालकांना खेळण्यासाठी पुष्कळ दिवस गुहेसारखे उपयोगी पडले. कृष्णाच्या स्पर्शाने त्या अघासुराला भगवंतांचे साम्य प्राप्त झाले.

## ब्रह्मदेवांच्या मोहाचे निरसन

कृष्णाने अघासुराचा वध केला. नंतर त्याने सर्व गोपाळांना यमुनेच्या वाळवंटाकडे नेले. तो त्यांना म्हणाला, 'गड्यांनो, या वाळवंटात आपण खेळ खेळू. सभोवती दाट झाडी आहे. वाळू पाहा कशी मऊ आहे. कमळांच्या सुगंधानं भुंगे, पक्षी पहा कसे मधुर शब्द करीत आहेत. आता दिवस खूप वर आला आहे. आपण इथंच भोजन करू या. वासरं पाणी पिऊन सावकाश चरतील.' वासरांना पाणी दाखवून कृष्णाबरोबर सर्व गोपाळांनी आपल्या शिदोऱ्यांची शिंकी सोडली. कृष्णाच्या भोवती वर्तुळ करून ते बालक बसले. त्या रांगा कमलपरागाभोवतीच्या पाकळ्यांप्रमाणे शोभत होत्या. कित्येकांनी फुले, पाने, पालवी, फळे, शिंकी, झाडांच्या साली, दगड यांनाच आपली

भोजनपात्रें बनविली. हास्यविनोदात त्यांचे भोजन सुरू झाले.

श्रीकृष्णाच्या कमरेस मुरली खोवलेली होती. त्याच्या डाव्या काखेत शिंग होते. त्यानें वेताची छडी हातात धरली होती, उजव्या हातावर दहीभाताचा घास होता. अशा थाटात कृष्ण सर्वांना बोलून हसवीत होता. गोपबालक असे भोजनात रमत असताना तिकडे वासरे चरत चरत गवताच्या लोभाने दूरवर अरण्यात गेली. गोपबालकांना भय वाटले. पण कृष्णानें 'मी वासरांना आणीन, तुम्ही भिऊ नका' असे सांगितले. वासरे शोधण्यासाठी कृष्णानें सर्व पर्वत, गुहा, वेलींच्या जाळ्या, दाट वने यांचा शोध घेतला.

पण वासरांचा शोध लागला नाही. ब्रह्मदेवांनी कृष्णाची लीला पाहाण्यासाठी मायेनें बालरूप धारण करून त्या वासरांना पळवून नेले होते. ब्रह्मदेवांना, गोपबालकांना दुःख न व्हावे म्हणून स्वतः कृष्णाने गोपालांची व वासरांची रूपे घेतली. त्या बालकांसह व वासरांसह श्रीकृष्ण गोकुळात परत आला. गोकुळात कोणास शंका आली नाही. परस्परांचे प्रेम, वात्सल्य जसेच्या तसे होते. एक वर्षभर कृष्णानें अशी क्रीडा केली. वर्ष पूर्ण होण्यास आता पाच-सहा दिवसांचा अवकाश होता. एके दिवशी बलरामासह कृष्णाने वासरे घेऊन वनात प्रवेश केला. दूरच्या गोवर्धनपर्वतावर गोकुळातील गायी चरत होत्या. त्या वासरांना पाहाताच धावतच आल्या. शेपटीचा गोंडा पाठीवर टाकीत हंबरून त्या पळू लागल्या. त्यांचा पान्हा आवरेनासा झाल्यावर दुधाच्या धारा जमिनीवर गळू लागल्या.

आपल्या वासरांना चाटून, पुसून त्या पाजू लागल्या. गोपबालकांचे गायींचे, वत्सांविषयीचे प्रेम पाहून बलरामास नवल वाटले. त्याला गोप-बालक व वासरे कृष्णमय दिसू लागली. ब्रह्मदेवांनाही या घटनेचे कौतुक वाटले. आपल्या मायेनें वासरे, गायी, गोपबालके निद्रिस्त असताना ही बालके, वासरे आली कोठून ? आपण नेलेली वासरे खरी की ही खरी ? अशा प्रश्नांनी ते चकित झाले. स्वतःच्याच मोहजालात ते गुरफटून गेले. ब्रह्मदेवांना ते गोपबालक, ती वासरे, सारीच कृष्णमय दिसू लागली. त्यांचा वर्ण श्यामल होता. त्यांनी पिवळी वस्त्रे परिधान

केली होती. त्यांच्या चतुर्भुज रूपास किरीट, कुंडले, वनमाळ यांनी शोभा आणली होती. त्यांच्या वक्ष:स्थलावर वत्सलांच्छन होते. बाहूंवर केयूरादी भूषणे होती. कानांत रत्नकुंडले होती. हातांत कडीतोडे व अंगठ्या होत्या. पायांत नूपुर होते. कमरेत करगोटा होता. त्यांच्या गळ्यांत तुळशीच्या माळा होत्या. ती वासरे सत्त्व, रज या गुणांनी शोभत होती. ती वासरे, त्या गायी, ते गोप त्यांना परब्रह्माच्या मूर्तीप्रमाणे वाटले.

ब्रह्मदेवांची स्थिती एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणे झाली. तेव्हा कृष्णाने आपले मायापटल दूर केले. ब्रह्मदेवांनी मोठ्या कष्टानें डोळे उघडून पाहिले. त्यांना पुढे वृंदावन दिसले. नानाविध लता दिसल्या. वृक्ष दिसले. त्यांना श्रीकृष्ण गोपवेषात दिसला. हातावर दही-भाताचा घास घेऊन तो गोपालांचा व वासरांचा शोध घेताना त्यांना दिसला. तेव्हा ब्रह्मदेवांनी त्वरित कृष्णाला साष्टांग नमस्कार केला. त्याचे माहात्म्य मुक्तकंठाने गाइले. त्यांनी मनापासून श्रीकृष्णाची स्तुती केली. ते म्हणाले,

'कृष्णा, तू स्तुतीस पात्र आहेस. तुझं शरीर मेघाप्रमाणं श्याम आहे. विजेप्रमाणं सतेज वस्त्र तू धारण केलं आहेस. तुझ्या कानांत गुंजांचे तुरे आहेत. मस्तकावर मोरपिसांचा मुकुट आहे. गळ्यात वनमाला व हातावर दही-भाताचा घास आहे. तुझ्या काखेत पावा, शिंग आहे. तुझी पावलं अत्यंत मृदू आहेत. कृष्णा, नंदगोपाच्या या पुत्राला मी मनोभावानं नमस्कार करतो. देवा, या गोकुळातील गायी धन्य आहेत. गोपी धन्य आहेत. आजपर्यंत अनेक यज्ञांत हविर्भाग देऊनही तू तृप्त झालेला दिसत नाहीस. वासरांच्या रूपानं गायींच्या स्तनांतील दूध तू मोठ्या आनंदानं पीत आहेस. आनंदमय, सनातन, पूर्णब्रह्मस्वरूपी असा तू त्यांचा पुत्र व मित्र झाला आहेस. या नंदाचं, गोपांचं, गोकुळवासी जनांचं केवढं भाग्य ! खरोखरच ते धन्य आहेत. कृष्णा या वृंदावनात, या गोकुळात कोणत्या तरी प्राण्याचा जन्म घेण्याचं भाग्य मला दे. येथील कुणाच्या तरी चरणधूलीनं मला स्नान घडेल. येथील चरणधूलीचा शोध वेद अद्यापि घेत आहेत. कृष्णा, तू या गोकुळवासी लोकांना आत्मस्वरूपाखेरीज दुसरं काय देणार ? भक्ताचा

नुसता वेष धारण करणाऱ्या पूतनेलाही तुझ्या स्वरूपाची प्राप्ती झाली. या गोकुळातील घरं, मित्र, पुत्र, प्राण, मन ही सर्व तुझ्यासाठीच आहे. देवा, श्रीकृष्णा, तू सर्वसाक्षी आहेस. परमेश्वर आहेस. या त्रैलोक्याचा तू स्वामी आहेस. मी निर्माण केलेलं हे जग मी तुलाच अर्पण करतो. मला आता सत्यलोकी जाण्याची अनुज्ञा दे. कृष्णा, तू यादवरूपी कमलाला विकसित करणारा आहेस. तुझ्यामुळं पृथ्वी, देव, गायी, ब्राह्मण यांच्या आनंद-सागरास भरती येते. पाखंडरूपी अंधाराचा तू नाश करतोस. पृथ्वीवरील राक्षसांचा तू शत्रू आहेस. परमेश्वरा, अणु-रेणूपासून सूर्यापर्यंत तूच सर्वांना पूज्य आहेस. भगवंता, तुला नमस्कार असो.'

श्रीकृष्णाची अशी स्तुती करून ब्रह्मदेवांनी त्याला तीन प्रदक्षिणा घातल्या व ते स्वस्थानी परत निघून गेले.

## धेनुकासुर, कालियासर्प

श्रीकृष्ण व बलराम यांनी आपल्या पायधुळीनें सारे वृंदावन पवित्र केले. असाच एकदा श्रीकृष्ण वृंदावनात गोपालांसह चालला होता. त्या वृंदावनाची शोभा काय वर्णन करावी ? हरिणांचा व शुक-सारिकांचा संचार तेथे होता. भ्रमरांचा गुंजारव सुरू होता. साधूंच्या अंतःकरणासारखी स्वच्छ व सुंदर सरोवरे होती. त्यांवरून कमळांचा सुगंध दरवळत होता. येथे कृष्णाने क्रीडा करण्याचे ठरविले. वृक्षांना नुकतीच कोवळी, तांबूस पालवी फुटली होती. फळे व फुले यांच्या भारांनी वाकून त्यांच्या फांद्या जमिनीस टेकल्या होत्या.

वृंदावनाची अशी शोभा पाहून कृष्णाला फारच आनंद झाला. गायी-वासरांना चरायला सोडून तो यमुनेच्या तीरावर गोपालांसह खेळ खेळू लागला. गळ्यांत माळा घालून, फुलांतील रस पिऊन त्यांनी भुंग्यांच्या साथीवर गायन केले. त्यानें कलहंसाचे अनुकरण केले. नाचणाऱ्या मोरासमोर कृष्ण नाचला, गायी-वासरांना त्यांच्या नावांनी त्यानें हाका मारल्या. चकोर, क्रौंच, चक्रवाक, चंडोल, मोर यांच्यासारखे शब्द त्याने काढले. वाघ, सिंह इत्यादी भयंकर जनावरांचे आवाज काढून तो

प्रीतीने पहात राहिला. खेळ खेळल्यावर बलराम थकून गेला. एका सोबत्याच्या मांडीवर डोके ठेवून तो विश्रांती घेत होता. कृष्णाने त्याचे पाय दाबून त्याचा थकवा दूर केला.

पुढे थोड्या वेळाने गोपबालक नाचू लागले. गाऊ लागले. बडबड करू लागले. त्यांनी आपापसांत कुस्त्या खेळल्या. कृष्णानेही या खेळात भाग घेतला. शेवटी थकल्यावर झाडाच्या पायथ्याशी पानांच्या अंथरुणावर एका सोबत्याची मांडी उशाला घेऊन तो झोपी गेला. गोपबालकांनी त्याचे पाय चेपले. काहींनी त्याला पंख्यांनी वारा घातला. काहींनी त्याच्या गुणांचे वर्णन केले. काहींनी त्याची गीते म्हटली. त्यांनी परस्परांची थट्टाही केली. श्रीदामा, सुबल, स्तोककृष्ण इत्यादी मित्रांनी जवळच्या एका ताडाच्या अरण्याकडे चलण्याची विनंती कृष्णाला केली. तेथील ताडफळे त्यांना हवी होती. पण त्या वनात धेनुकासुर नावाचा एक भयंकर असुर होता. तो त्या पोरांना ताडाची फळे घेऊ देत नसे. ताडफळे मोठी रुचकर व स्वादिष्ट, म्हणून गोपाळांना हवी होती. त्या फळांचा सुगंध त्यांना मोहवीत होता.

आपल्या मित्रांची इच्छा पाहून रामकृष्ण त्यांना हसतच त्या ताडांच्या वनाकडे घेऊन निघाले. तेथे पोचल्यावर बलरामाने ताडांची झाडे गदागदा हालवून पुष्कळ फळे खाली पाडली. फळांचा आवाज ऐकून तो गर्दभरूपी असुर भयंकर गर्जना करीत बलरामाच्या अंगावर धावून आला. त्याने आपल्या मागच्या दोनही पायांनी बलरामाच्या छातीवर प्रहार केला. गाढवासारखा बेसूर आवाज करीत तो बलरामाभोवती फिरत राहिला. पुन्हा क्षुब्ध होऊन त्याने बलरामावर झडप घातली. तो बलरामावर दुगाण्या झाडू लागला. एवढ्यात बलरामाने त्याचे दोन्ही पाय एका हातात पकडले. त्याला गरगर फिरवताच तो गतप्राण झाला. बलरामाने त्याला जवळच्याच एका ताडावर फेकून दिले. त्याच्या आघाताने तो ताडवृक्ष प्रचंड आवाज करून शेजारच्या ताडावर पडला. याप्रमाणे त्या आघाताने अनेक ताडवृक्ष उन्मळून पडले. त्या झाडांची पुष्कळ नासधूस झाली.

धेनुकासुरास मारल्याचे पाहताच त्याचे बांधव गर्दभ मोठ्या

त्वेषानें रामाच्या व कृष्णाच्या अंगावर धावत आले. त्या दोघांनी त्यांचे पाय धरून, त्यांना गरगर फिरवून ताडांच्या झाडांवर फेकून दिले. ते सर्व वन मग मोडलेल्या ताडांच्या झाडांनी, फळांनी, ताडांच्या शेंडयांनी, राक्षसांच्या प्रेतांनी भरून गेले. रामकृष्णांचा हा अद्‌भुत पराक्रम पाहून देवांनी त्यांच्यावर पुष्पवृष्टी केली. मंगलवाद्यांचा मोठा गजर झाला.

धेनुकासुराचा, त्यांच्या बांधवांचा असा नाश केल्यावर गोपबालकांनी ताडफळे वाटेल तेवढी खाल्ली. जनावरांनी तेथील पाणी मनापासून प्याले. नंतर कमलनेत्र व पुण्यवान कृष्णासह, बलरामासह ते गोपाल परत गोकुळाकडे आले. गोपी त्यांची वाट पाहात होत्या. कृष्णाचे रूप फारच मोहक दिसत होते. त्याचे कुरळे केस धुळीनें माखले होते. त्यांत त्यानें मोराची पिसे खोवली होती. कानांत रंगीबेरंगी फुले घातली होती. तो सुंदर बासरी वाजवीत होता. त्याचे मित्र त्याच्या पराक्रमाची गीते गात होते.

तो जवळ येताच गोपींनी सलज्ज मुद्रेनें त्याचे स्वागत केले. रामकृष्ण घरी सुखरूप आलेले पाहून रोहिणी, यशोदा यांना अतिशय आनंद झाला. त्यांनी मुलांना मनापासून आशीर्वाद दिले. त्यांना सुवासिक तेले, उटणी लावून चांगले न्हाऊमाखू घातले. सुंदर वस्त्रे दिली. सुगंधी फुलांच्या माळा त्यांच्या गळयांत घातल्या. त्यांना सुवासिक गंध लावलेल्या उपचारामुळे त्या मुलांचे परिश्रम दूर झाले. मातांनी वाढलेले मधुर भोजन त्यांनी घेतले. गाणी गात गात, ऐकत ऐकत ते सुखानें झोपी गेले.

वृंदावनात राहात असताना असाच एकदा श्रीकृष्ण बलराम बरोबर नसताना इतर सोबत्यांसह यमुनातीरावर गेला. दिवस उन्हाळयाचे होते. गायी व गोपाळ यांना अतिशय तहान लागली होती. कालिया नावाच्या एका महाविषारी सर्पाच्या विषानें बिघडलेले पाणी ते प्याले. त्या गोपांना, गायींना ते पाणी पिताच मृत्यू आला. गायीगोपांची ती अवस्था पाहाताच श्रीकृष्णाने त्यांच्यावर अमृताचा वर्षाव करून त्यांना जिवंत केले. विषप्राशन करून आपण प्राणांना मुकलो होतो, पण श्रीकृष्णाच्या कृपादृष्टीनें आपण परत सजीव झालो हे त्यांनी

जाणले.

## कालियासर्पाचे दमन, नागपत्नींनी कृष्णाची केलेली स्तुती

यमुनेच्या डोहात कालिया नावाचा एक सर्प राहात असे. त्याच्या प्रखर विषामुळे त्यातील पाणी अतिशय उष्ण बनत असे. त्या डोहावरून उडणारे पक्षीही मरून जात. त्या पाण्यावरून येणाऱ्या वाऱ्याचा नुसता स्पर्शही वृक्षास, प्राण्यास सहन होत नसे. प्राणी मरून जात. त्या सर्पाच्या विषाचा प्रभाव अतिशय तीव्र व प्रखर होता. त्यामुळे यमुनेचे पाणी अतिशय दूषित झाले होते. हे सर्व जाणून कृष्णानें कमर कसली. डोहाच्या काठावरील कळंबाच्या झाडावर तो चढला व तेथून त्याने पाण्याच्या डोहात उडी टाकली. त्याच्या उडीसरशी त्या पाण्याचे फवारे उंच उडाले. कडू पाण्याच्या लाटा वर उसळून आल्या.

एखाद्या हत्तीप्रमाणे क्रीडा करीत करीत, हातांनी पाणी फिरवीत फिरवीत कृष्ण येत असता त्या पाण्याच्या आवाजानेच कालिया सावध झाला. तो कृष्णाच्या अंगावर धावून गेला. त्या कृष्णाचे शरीर कोमल व श्यामल रंगाचे होते. त्याच्या वक्ष:स्थलावर वत्सचिन्ह होते. त्याने पीतांबर नेसला होता. स्मित हास्यामुळे त्याचे शरीर अत्यंत मोहक दिसत होते. तो त्या डोहात निर्भयपणाने क्रीडा करीत होता. कालियानें त्याच्या मर्मस्थानी दंश केला. शेपटीने त्याचे अंग वेढून टाकले. श्रीकृष्ण त्याच्या वेढ्यात निश्चेष्ट असा पडल्यावर त्याचे गोप अगदी घाबरून गेले. त्यांना त्यांचा कृष्ण जीव की प्राण होता. कृष्ण दृष्टीआड झाला हे पाहून ते अगदी कष्टी झाले. त्यांनी शोक सुरू केला. गायी, बैल, वासरे यांचीही अवस्था तशीच झाली. गोकुळातही अनेक उत्पात झाले. नंदादिकांचे मन भीतीने ग्रस्त झाले. कृष्ण एकटाच वनात गेला, हे समजून अतिशयच दु:ख झाले. कृष्ण कोणत्या तरी संकटात आहे हे त्यांनी जाणले. त्यांचा शोक अनावर झाला. ते सर्व आबालवृद्ध गोपगोपी गुरासारखे ओरडत, रडत कृष्णाच्या शोधासाठी बाहेर पडले. व्रजवासी लोकांची ही अवस्था पाहून बलराम थोडा हसला, पण काही बोलला नाही. त्याला कृष्णाचा पराक्रम माहीत होता.

गोकुळातील स्त्री-पुरुष कृष्णाची पावले ज्या मार्गावर उमटली होती त्या मार्गानें यमुनेच्या तीरावर आले. तेथे कालियाने कृष्णाच्या अंगाला वेढे घातले आहेत, कृष्ण निश्चेष्ट झाला आहे, जवळच तीरावर गायी, गोपगोपी शोक करीत आहेत, हे दृश्य पाहून गोकुळवासी लोकही मूर्च्छित झाले. कृष्णाचे प्रेम, त्याचे मंद हास्य, त्याचे मधुर भाषण यांची आठवण त्यांना झाली. सर्पाचे विळखे कृष्णाला पडलेले पाहून स्वभावतःच प्रेम करणाऱ्या गोपी अधिकच शोकमग्न झाल्या. त्यांना श्रीकृष्णाशिवाय सारे त्रिभुवन शून्य झाले. आपल्या लाडक्या पुत्राची अवस्था पाहून यशोदामातेचे भान हारपले. ती तर नदीच्या डोहात उडी टाकायला सिद्ध झाली. त्या वेळी गोपींनी यशोदेला सावरून धरले. कृष्णाच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगून त्यांनी तिला शांत केले. कृष्णाच्या मुखाकडे पाहात त्या सर्व उभ्या होत्या. नंदादी गोपही डोहात उड्या टाकण्याच्या बेतात होते. बलरामाने त्यांना आवरून धरले.

सर्व लोकांची अशी अवस्था पाहून कृष्णाने आपले अंग फुगविण्यास आरंभ केला. त्याने अंग फुगविताच कालियाच्या अंगाला वेदना होत गेल्या. त्यानें कृष्णाच्या शरीराचे वेढे सोडून दिले. कालिया रागानें तप्त झाला होता. भयंकर विषाचे फूत्कार सोडीत तो कृष्णाकडे एकटक पाहात राहिला. तो आपल्या दोन्ही जिभांनी ओठ चाटीत होता. अग्निकणाप्रमाणे विषमय दृष्टी असणाऱ्या त्या कालियाच्या भोवती कृष्ण गरगर फिरू लागला. कालियाही आपल्या जाग्यावर फिरत होता. शेवटी कालियानें आपला फणा वर उचलला. इतक्यात त्याला चुकवून श्रीकृष्ण त्याच्या विस्तृत फणांवर चढला. तो त्यांच्यावर नृत्य करू लागला. त्याची आरक्त वर्णाची पावले कालियाच्या मस्तकावरील मण्याच्या तेजाने अधिकच लाल दिसू लागली.

श्रीकृष्ण कालियाच्या मस्तकावर नृत्य करीत आहेसे पाहून सिद्ध, चारण, देव, गंधर्व, अप्सरा इत्यादींनी वाद्ये वाजवून गायन करायला सुरुवात केली. कृष्णावर त्यांनी मोठ्या प्रेमाने फुलांची वृष्टी केली. सर्पाच्या फण्यांपैकी ज्या नम्र झाल्या नव्हत्या, त्यांवर कृष्ण आपल्या

पायांचे आघात करू लागला. कालिया शेवटी निर्बल झाला. त्याच्या नाका-तोंडातून, डोळ्यांतून, मुखातून रक्तस्राव होऊ लागला. तो मूर्च्छितच झाला. रागाने त्याच्या डोळ्यांतून विषाचे लोट बाहेर पडत होते. कृष्णानें त्याचे मस्तक आपल्या पायांनी ठेचून त्याची सर्व गात्रे खिळखिळी केली. त्याच्या मुखातून रक्त बाहेर आले. शेवटी तो चराचर स्वामी भगवान नारायणांना शरण गेला.

ज्याच्या पोटात सारे विश्व सामावले आहे त्याच्या भारानें कालिया अगदी जर्जर व मरणोन्मुख झाला. कालियाचा फणा वाकलेला पाहाताच त्याच्या दीन व कष्टी झालेल्या स्त्रिया दुःखी होऊन कृष्णापाशी आल्या. त्यांच्या वेण्या विस्कटून गेल्या होत्या. त्यांची वस्त्रे, त्यांचे अलंकार पार अस्ताव्यस्त झाले होते. आपल्या पतीचे पातक नाहीसे व्हावे म्हणून त्यांनी आपल्या लहान मुलांना पुढे करून श्रीकृष्णास साष्टांग नमस्कार घातला. त्या त्याला शरण जाऊन म्हणाल्या,

'प्रभो, तुझा अवतार दुष्टांना शासन करण्यासाठी व सज्जनांचं रक्षण करण्यासाठीच आहे. तेव्हा आमच्या पतीनं जो अपराध केला असेल त्याबद्दल तू क्षमा करावीस. त्याला झालं एवढं शासन पुरं आहे. शत्रू काय, मित्र काय, तुझ्या दृष्टीला सर्व सारखेच आहेत. पण तू हे शासन केलं नसून आमच्यावर हा तुझा अनुग्रहच आहे असं आम्ही मानतों. तुझ्या अशा शासनानं दुष्टांचे सारे दोष नाहीसे होतात. पूर्व-कर्मानुसार आमच्या या पतीला सर्पाची योनी प्राप्त झाली. पण आता तो निष्पाप झाला आहे. तुझा आम्हांवरील क्रोधही आम्हांस अनुग्रहच वाटतो. याचं भाग्य फार थोर. यानं पूर्वजन्मी तपश्चर्या केली असावी. यानं दानधर्म केला असावा. म्हणूनच सर्व जीवांचा आधार असा तू संतुष्ट झालास. तुझ्या पावन पदस्पर्शानं हा भाग्यवान ठरला. देवा, तुझ्या चरणांना शरण आलेले तुझे भक्त स्वर्गाची, सार्वभौमत्वाची, ब्रह्मपदाची, वरुणलोकाची, योगसिद्धीची, मोहाची इच्छा करीत नाहीत. नाथा, तामसयोनीत निर्माण झालेल्या, क्रोधाच्या अधीन झालेल्या या

सर्पराजाला इतरांना दुर्लभ अशा तुझ्या चरणांची प्राप्ती झाली आहे. संसारात भ्रमणाऱ्या प्राण्याला तुझ्या पायांची इच्छा झाली की त्याच्या-पुढं मोक्ष उभाच असतो.

'वासुदेवा, तू सर्वांच्या अंतर्यामी वास करणारा आहेस. तू सर्व-व्यापक, पंचमहाभूतांचा आश्रय आहेस. तुला आमचा नमस्कार असो. परब्रह्मा, तुझ्या ठिकाणी ज्ञान व विज्ञान परिपूर्ण भरून आहे. तू निर्गुण व अविकारी आहेस. तुला आमचा नमस्कार असो. तू आत्मस्वरूप असल्यानं कालचक्राचाही आधार आहेस. कालाचे अवयव; दिवस, रात्र, पक्ष, मास, ऋतू, अयन, संवत्सर इत्यादींचाही तू साक्षी आहेस. हे विश्व तुझंच रूप असून तू त्याचं आदिकरण आहेस. मन, बुद्धी, इंद्रियं, प्राण, सूक्ष्म भूतं, ही सर्व तुझीच रूपं आहेत. तू अनंत, सूक्ष्म, उपाधिरहित असून उत्तम ज्ञाता आहेस. तुला आमचा नमस्कार असो. संकर्षण, वासुदेव, प्रद्युम्न, अनिरुद्ध इत्यादी नावं तूच धारण केली आहेस. तुला नमस्कार असो.

'देवा, आमचा हा तामसी पती मूढ आहे. त्यानं तुझं खरं स्वरूप ओळखलं नाही. याच्या हातून अपराध घडला आहे. शांतस्वरूपा कृष्णा, तू याला क्षमा करावीस. भगवंता, या सर्पराजावर तू कृपा केली नाहीस तर हा आता मृत्युवश होईल. आमचा हा प्राणच असा आमचा पती तू आम्हांस दे. देवा, तुझ्या आज्ञेनुसार वागण्यासाठी आम्ही दासी तयार आहोत.'

नागपत्नींनी याप्रमाणे कृष्णाची स्तुती केल्यावर आपल्या लाथांनी विदीर्ण झालेल्या त्या कालियास कृष्णानं सोडून दिले. हळूहळू कालिया शुद्धीवर आला. मोठ्या कष्टाने तो श्वास घेऊ लागला. तो दीन वाणीने कृष्णास म्हणाला,

'देवा, आम्हां सर्पांचा स्वभावच दुष्ट व तामसी असतो. आम्हांस राग यायला वेळ लागत नाही आमचा रागही पुष्कळ वेळ टिकतो. जन्मसिद्ध असा दुष्ट स्वभाव सोडणं किती कठीण आहे. विश्वकर्त्या, हे जग तूच निर्माण केलं आहेस. त्यात नाना स्वभाव आहेत. नाना पराक्रम, नाना सामर्थ्यं, नाना कारणं, नाना बीजं आहेत. स्वभावतःच रागीट

असे आम्ही सर्व आहोत. देवा, तुझ्याच मायेनं निर्माण झालेला हा आमचा स्वभाव आम्ही कसा टाकून द्यावा? आमच्या अशा प्रकारच्या स्वभावास तूच कारण आहेस. तरी जगदीश्वरा, तू कृपा करायची की आमचा नाश करायचा हे तूच ठरीव.'

कालियाचे हे भाषण ऐकून श्रीकृष्ण त्याला म्हणाला, 'कालिया, तू आता या डोहात राहू नकोस. आपल्या परिवारासह तू शक्य तितक्या लवकर समुद्रात जा. या नदीतील पाणी गायीगोपांना उपयोगी पडलं पाहिजे. तुला हा जो मी दंड केला आहे त्याचं सकाळ-संध्याकाळ जो श्रवण-पठण करील त्याला तुझ्याकडून त्रास होणार नाही. माझ्या क्रीडेनं पवित्र झालेल्या या डोहात जो स्नान करून पितरांचं तर्पण करील तो सर्व पापांपासून मुक्त होईल. कालिया, तू हा डोह सोडून पूर्वीच्या रमणकद्वीपात जा. ज्याच्या भीतीनं तू या डोहाचा आश्रय केलास तो गरुड आता तुला खाणार नाही. कारण माझ्या पावलांच्या खुणा तुझ्या फणांवर आता उमटल्या आहेत.'

श्रीकृष्णाचे हे भाषण ऐकून त्या नागपत्नींना परमावधीचा आनंद झाला. त्यांनी मोठ्या आदरानें कृष्णाची पूजा केली. उत्तम वस्त्रे, भूषणे, किमती रत्ने, सुवासिक द्रव्ये, चंदनाची उटी, कमळांच्या माळा इत्यादींनी त्यांनी त्या जगन्नाथाची पूजा केली व त्याचा निरोप घेऊन त्याला प्रदक्षिणापूर्वक नमस्कार करून कालिया सर्प मोठ्या संतोषानें स्त्री-पुत्रांसह आपल्या पूर्वीच्या रमणकद्वीपात गेला. तो गेल्यानंतर यमुनेच्या डोहाचे पाणी विषरहित व अमृतासारखे गोड झाले.

## कालियाचा पूर्ववृत्तान्त, गोपांचे वणव्यापासून रक्षण

कालियाचा हा सर्व वृत्तान्त ऐकून परीक्षिताने शुकाचार्यांना विचारले, 'मुनिवर्या, नागांचं पूर्वीचं वसतिस्थान रमणकद्वीप होय. ते या कालियानं का सोडलं? त्यानं गरुडाचा कोणता अपराध केला? आपण कृपा करून मला सांगा ना.'

शुकाचार्यांनी राजाला सर्व पूर्ववृत्तान्त निवेदन केला. रमणकद्वीपात सर्पसमुदाय राहात असत. आपल्याला खाणाऱ्या गरुडाची पीडा

टळावी म्हणून त्याच्या वृक्षाच्या तळाशी एक बळी आपल्यांतला ठेवण्याचे ठरले होते. त्याच्यापासून रक्षण व्हावे म्हणून प्रत्येक सर्प त्याला प्रत्येक महिन्यात अमावास्या आली की आपला भाग देत असे. पण कालिया सर्प आपल्या विषाने उन्मत्त झाला. तो गरुडाला त्याचा भाग न देता आपण स्वतःच खाऊन टाकायचा. कालियाचा हा उद्दाम-पणा पाहून गरुडाला भारी राग आला. त्याला मारण्यासाठी गरुड मोठ्या वेगाने त्याच्या अंगावर धावून गेला. कालियानें युद्धासाठी गरुडावर आपला फणा उभारला. त्यानें आपल्या तीक्ष्ण दातांनी गरुडाला दंश केला. पण गरुडाने आपल्या पंखाने कालियावर एवढा जोरात आघात केला की, त्यामुळे कालिया अगदी व्याकुळ झाला. काही थोडच्या वेळाने तो गरुडाला न दिसेल अशा यमुनेच्या खोल डोहात जाऊन बसला.

या डोहाच्या काठी पूर्वी सौभरी नावाचे एक ऋषी तपश्चर्या करीत होते. तेथील जलचरांना कोणी पीडा देऊ नये, असा त्यानें नियम केला होता. एकदा गरुडाने त्या डोहातील सर्वांत मोठा असा मासा खाल्ला. माशांचा सर्व परिवार अतिशय कष्टी झाला. सौभरी-मुनींचे मनही द्रवून गेले. जलचरांना गरुडाची भीती उरू नये म्हणून त्यांनी गरुडास शाप दिला, 'जर गरुड या डोहातील माशांना त्रास देईल तर तो प्राणास मुकेल.' गरुडास मिळालेला हा शाप फक्त कालियास माहीत होता. म्हणून कालियाने या डोहाचा आश्रय घेतला होता.

कालियाचा पराभव कृष्णानें केला. नानाविध वस्त्रे, आभरणे, दिव्य पुष्पमाळा, सुगंधी चंदन, रत्नें, सुवर्ण, इत्यादींचा स्वीकार करून कृष्ण त्या डोहाच्या बाहेर आला. कृष्णाविना वाळवंटावर निश्चेष्ट पडलेले गोपाल एकदम जागे झाले. त्यांनी धावत जाऊन कृष्णाला आलिंगन दिले. यशोदा, रोहिणी, नंद, इतर गोपगोपी यांनी कृष्ण सुखरूप परत आला म्हणून आनंद व्यक्त केला. बलरामाला मात्र हसू येत होते. त्याला कृष्णाचा प्रभाव आधीच माहीत होता. पण त्यानेही कृष्णाला गाढ आलिंगन दिले. कृष्ण डोहातून परत आल्याचे समजताच गायी, बैल वासरे इत्यादींना आनंद झाला. वृक्षांनाही टवटवी आली.

त्या वेळी नंदादी गोपांचे उपाध्याय तेथे येऊन म्हणाले, 'नंदा, कालियासारख्या महासर्पाच्या दाढेतून कृष्ण सुखरूप परत आला म्हणून या आनंदाच्या निमित्तानं ब्राह्मणांना काही दान करणं उचित होईल.' ब्राह्मणांचे ऐकून नंदाने त्यांना संतोषाने गायी व सुवर्ण यांचे दान दिले. यशोदेला तर पुत्र पाहून आनंदाचे भरते आले. त्या भाग्यवान पुत्राला तिने आलिंगन दिले. त्याला मांडीवर घेऊन त्यावर आनंदाचे अश्रू तिने ढाळले.

दिवसभर झालेल्या श्रमाने अत्यंत थकल्यामुळे रात्रभर ते गोप, त्या गायी यांनी यमुनेच्या तीरावरच मुक्काम केला. ते सर्व गाढ निद्रेत असताना उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे मध्यरात्रीच्या सुमारास एक मोठा वणवा पेटला. त्यात गोप व गायी सापडून त्यांना अत्यंत दुःख झाले. वणव्याच्या आगीने त्यांची शरीरे होरपळू लागली. सर्व गोप खडबडून जागे झाले. ते अतिशय घाबरले होते. त्या आगीतून सुटण्याचा काही उपाय त्यांना सुचेना. ते भगवान कृष्णाला शरण गेले त्यांनी कृष्णाची प्रार्थना केली. ते म्हणाले, 'भगवंता, या कालस्वरूपी भयंकर अग्नीपासून तुम्ही आमचं रक्षण करावं. तुझ्यावाचून यातून वाचविण्यास कुणीच समर्थ नाही. आमची सर्व चिंता तुलाच आहे. तुझे पाय सोडून आम्ही कुठंच जाणार नाही.' ही प्रार्थना ऐकून श्रीकृष्णास त्यांची दया आली. त्याने आपल्या दिव्य शक्तीने तो भयंकर अग्नी एकदम पिऊन टाकला.

## वृंदावनवर्णन, प्रलंबासुराचा वध

दुसऱ्या दिवशी कृष्णाच्या अद्‌भुत कृत्याचे वर्णन करीत करीत गोप-गोपी सर्वजण परत गायींसह गोकुळात आले. राम व कृष्ण याप्रमाणे गोकुळात क्रीडा करीत असताना ग्रीष्म ऋतूस प्रारंभ झाला. हे दिवस प्रखर उन्हाचे असूनही वृंदावनातील सौंदर्याने व राम-कृष्णांच्या वास्तव्याने गोकुळवासीयांना ते वसंतऋतूप्रमाणे आनंददायक वाटत. त्या वेळी वृंदावनातील ओढे झुळझुळ शब्द करून प्रसन्नतेने वाहात होते. झल्लरी नावाच्या किडयांचा कर्कश आवाज आता संपला होता.

ओढ्यांतील पाण्याच्या तुषारांनी भोवतीची झाड आर्द्र, टवटवीत व हिरवीगार झाली होती. नद्या, सरोवरे, झरे इत्यादींच्या पाण्यावर कल्हार, कुमुद, उत्पल इत्यादी पुष्पांच्या सुगंधासह वायू वाहात होता. सर्वत्र कोवळे व हिरवेगार गवत उगवल्यामुळे सूर्याच्या प्रखर उन्हाचा ताप गोप-गोपींना झाला नाही.

तेथील नदीत एक डोह होता. त्याच्या लाटा जमिनीवर येऊन आदळत असल्याने नित्य हिरवेगार गवत उगवलेले असे. ते सारे वन सुंदर फुलांनी नटले होते. नाना प्रकारचे हरिणादी पशू, मधुर शब्द करणारे भुंगे, कोकिळ, सारस पक्षी इत्यादींची आनंदाने क्रीडा तेथे चाले. त्या वनात क्रीडेसाठी बलराम, इतर सोबती व गायी-वासरे घेऊन श्रीकृष्ण बासरी वाजवीत येई. तेथील रानफुलांच्या माळांनी, मोरांच्या पिसांनी, कोवळ्या पालवीने, काव, पिवडी इत्यादी रंगांनी कृष्ण, बलराम, इतर गोपकुमार यांनी आपापली शरीरे सुशोभित केली. नृत्य, गायन, कुस्त्या इत्यादीत ते सर्व रमून गेले. कृष्ण नाचू लागला की इतर गोपाल गाणे म्हणत, कित्येक पावे, शिंगे वाजवीत, कित्येक टाळी वाजवून ताल धरीत. डोक्यावर मनोहर झुलपे धारण करणाऱ्या त्या रामाने व कृष्णाने आपल्या सोबत्यांसह अनेक प्रकारची क्रीडा केली. त्यांनी पक्ष्यांसारखे आवाज केले, पशूंसारख्या वाकड्या तिकड्या उड्या मारल्या, बेडकांसारख्या उड्या मारून काहींनी इतरांना हसविले, झाडांना झोके बांधून काहींनी मौज अनुभवली, राजाप्रधानांचाही खेळ त्यांनी खेळला.

ही संधी साधून प्रलंब नावाचा एक राक्षस त्यांच्यांत चोरी करण्याच्या हेतूने गोपालांचा वेष धारण करून तेथे आला. कृष्णाने त्वरित ओळखले. त्याने आपल्या सोबत्यांना त्याच्याशी सख्य करायला सांगितले. त्यांनी जोड्या ठरवून खेळ खेळायचे ठरविले. काही गोपाळ कृष्णाकडे, काही बलरामाकडे आले. हा खेळ कुरघोडीचा होता. जो हरेल त्याने जिंकणारास पाठीवर घ्यायचे ठरले. त्याने अमुक एका स्थळापर्यंत पाठीवरून न्यायचा करार झाला. असा खेळ खेळत खेळत ते सर्वजण भांडीरक नावाच्या वडापाशी आले. त्या वेळी बलरामाच्या

गड्यांनी कृष्णाच्या पक्षाला जिंकले. प्रलंबासुर कृष्णाच्या पक्षात होता. ठरल्याप्रमाणे कृष्णाचे गडी बलरामाच्या गड्यांना पाठीवर घेऊन चालू लागले. कृष्णाने श्रीदामाला घेतले, भद्रसेनाने वृषभाला, प्रलंबासुर बलरामाला घेऊन निघाला. कृष्णाचा पराक्रम प्रलंबासुर ओळखून होता. पाठीवर बसलेल्या बलरामास मात्र घेऊन प्रलंबासुर मर्यादेच्या पलीकडे गेला.

पुढे गोपवेषात त्याला वाहून नेणे कठीण झाल्यावर प्रलंबासुर आपल्या राक्षसाच्या रूपात प्रकट झाला. त्या दैत्याच्या अंगावर सोन्याचे दागिने चमकत होते. त्याचे डोळे निखाऱ्यासारखे लाल होते. त्याच्या भुवया रागाने वर चढल्या होत्या. त्याच्या दाढा फारच भयंकर होत्या. त्याचे केस अग्नीच्या ज्वालांप्रमाणे होते. त्याचे ते भयानक रूप पाहून प्रथम बलरामासही भीती वाटली. आपल्या सोबत्यांना सोडून प्रलंबाने आपणास येथे भलतीकडे आणले, याचा त्याला फार राग आला. त्याने आपली वज्रासारखी मूठ आवळून त्या दैत्याच्या मस्तकावर प्रहार केला. बलरामाच्या प्रहाराने त्याचे मस्तक विदीर्ण झाले. तो बेशुद्ध झाला. त्याच्या नाका-तोंडावाटे रक्त आले. मोठी गर्जना करून तो असुर धाडकन गतप्राण होऊन जमिनीवर कोसळला.

बलरामाने अशा रीतीने प्रलंबाचा वध केला हे पाहून सर्व गोपांना अतिशय आनंद झाला. बलरामाच्या जीवावरचे संकट टळले, असे समजून अनेकांना आनंद झाला. त्यांनी बलरामाला गाढ आलिंगन दिले. देवांनीही आनंदाने त्याच्यावर पुष्पवृष्टी करून म्हटले, 'फार चांगली गोष्ट केलीस.'

## दावाग्निपान

एकदा बलराम व कृष्ण आपल्या सोबत्यांबरोबर खेळता खेळता त्यांची गुरे हिरव्या चाऱ्याच्या लोभाने एका मोठ्या गुहेत शिरली. तहानेने ती व्याकूळ होऊन थकून गेली होती. आपली गुरे दिसत नाहीत, असे पाहून कृष्ण व बलरामासह सर्व गोप त्यांना शोधू लागले. आपण खेळात गुंतलो, याचा पश्चात्तापही त्यांना झाला. त्यांना खाणे-पिणे

गड्यांनी कृष्णाच्या पक्षाला जिंकले. प्रलंबासुर कृष्णाच्या पक्षात होता. ठरल्याप्रमाणे कृष्णाचे गडी बलरामाच्या गड्यांना पाठीवर घेऊन चालू लागले. कृष्णाने श्रीदामाला घेतले, भद्रसेनाने वृषभाला, प्रलंबासुर बलरामाला घेऊन निघाला. कृष्णाचा पराक्रम प्रलंबासुर ओळखून होता. पाठीवर बसलेल्या बलरामास मात्र घेऊन प्रलंबासुर मर्यादेच्या पलीकडे गेला.

पुढे गोपवेषात त्याला वाहून नेणे कठीण झाल्यावर प्रलंबासुर आपल्या राक्षसाच्या रूपात प्रकट झाला. त्या दैत्याच्या अंगावर सोन्याचे दागिनें चमकत होते. त्याचे डोळे निखाऱ्यासारखे लाल होते. त्याच्या भुवया रागाने वर चढल्या होत्या. त्याच्या दाढा फारच भयंकर होत्या. त्याचे केस अग्नीच्या ज्वालांप्रमाणे होते. त्याचे ते भयानक रूप पाहून प्रथम बलरामासही भीती वाटली. आपल्या सोबत्यांना सोडून प्रलंबाने आपणास येथे भलतीकडे आणले, याचा त्याला फार राग आला. त्याने आपली वज्रासारखी मूठ आवळून त्या दैत्याच्या मस्तकावर प्रहार केला. बलरामाच्या प्रहाराने त्याचे मस्तक विदीर्ण झाले. तो बेशुद्ध झाला. त्याच्या नाका-तोंडावाटे रक्त आले. मोठी गर्जना करून तो असुर धाडकन गतप्राण होऊन जमिनीवर कोसळला.

बलरामाने अशा रीतीने प्रलंबाचा वध केला हे पाहून सर्व गोपांना अतिशय आनंद झाला. बलरामाच्या जीवावरचे संकट टळले, असे समजून अनेकांना आनंद झाला. त्यांनी बलरामाला गाढ आलिंगन दिले. देवांनीही आनंदाने त्याच्यावर पुष्पवृष्टी करून म्हटले, 'फार चांगली गोष्ट केलीस.'

## दावाग्निपान

एकदा बलराम व कृष्ण आपल्या सोबत्यांबरोबर खेळता खेळता त्यांची गुरे हिरव्या चाऱ्याच्या लोभाने एका मोठ्या गुहेत शिरली. तहानेनें ती व्याकुळ होऊन थकून गेली होती. आपली गुरे दिसत नाहीत, असे पाहून कृष्ण व बलरामासह सर्व गोप त्यांना शोधू लागले. आपण खेळात गुंतलो, याचा पश्चात्तापही त्यांना झाला. त्यांना खाणे-पिणे

सुचेना. ते मनातून खिन्न झाले. गायींच्या दातांनी कुरतडलेल्या पावलांनी तुडविलेल्या गवताच्या अनुरोधाने त्यांनी गुरांचा शोध करण्याचा प्रयत्न चालविला. उन्हात फिरून फिरून ते थकून गेले. शेवटी त्यांना त्यांच्या गायींचे हंबरणे ऐकू आले. आपल्या गायींची नावे घेऊन त्यांनी हाका मारल्या. जणू ओ देतच त्या त्यांच्याकडे धावत आल्या.

एवढ्यात दुर्दैवाने रानात सर्वत्र मोठा वणवा पेटला. वारा अनुकूल झाल्यामुळे तो सर्वत्र भडकला. आपल्या ज्वालांच्या तावडीत जे सापडेल ते जाळीत तो वाढतच राहिला. त्याने गायीगोपालांना वेढून टाकले. ते दीन गोपकुमार रामकृष्णांची प्रार्थना करू लागले. ते म्हणाले, 'रामा, कृष्णा, तुम्ही मोठे शूर आहात. पराक्रमी आहात. आमचं या वणव्यापासून रक्षण करा नं. आता आम्हांस एक तुमचाच आधार आहे.' तेव्हा कृष्ण त्यांना म्हणाला, 'गड्यांनो, भिऊ नका. तुम्ही आपले डोळे मिटा पाहू. म्हणजे त्वरित तुम्ही या संकटातून मुक्त व्हाल.' गोपालांनी 'बरं आहे' म्हणून डोळे मिटले. योगेश्वर कृष्णाने आपल्या योगमायेने तो भयानक वणवा एका क्षणात पिऊन टाकला. गोपालांचा त्रास त्याने दूर केला. गोपकुमारांनी डोळे उघडून पाहिले वणवा शांत झाला आहे, आणि आपण वनात नसून भांडीरकाच्या वडाखाली आहोत, आपली गायी-वासरे सुखरूप आहेत, असे त्यांना दिसले. त्यांना या प्रसंगाचे मोठे कौतुक वाटले. कृष्ण म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराचा अवतारच, अशी त्यांची खात्री झाली. सायंकाळी गायी-गुरांना घेऊन ते परत आपल्या घरी आनंदाने आले. वाटेने सर्व सोबती कृष्णाची मनापासून स्तुती करीत होते. कृष्ण परत आला हे पाहून यशोदेलाही मोठा आनंद झाला.

## वृंदावनातील वर्षाऋतू

प्रलंबासुराचा वध, दावाग्नीचे भक्षण, या अद्‌भुत गोष्टी गोपालांनी आपापल्या घरी आपल्या स्वकीयांना सांगितल्या. आबालवृद्ध गोप-गोपींना त्या ऐकून रामकृष्ण हे देवच आहेत, अशी त्यांच्या मनाची खात्री पटली. त्यानंतर काही दिवसांनी ग्रीष्म संपून वर्षाऋतूस प्रारंभ झाला. सर्वत्र

नवीन जीवजंतू निर्माण झाले. आकाशात विजा चमकत राहिल्या. मेघांचा गडगडाट झाला. काळेकुट्ट ढग आकाशात इकडून तिकडे फिरू लागले. मेघांच्या होणाऱ्या गर्जनेनें, विजेच्या प्रकाशानें आकाशातील चंद्र-सूर्य झाकून गेले.

राजा प्रजेकडून कराच्या रूपाने द्रव्य घेतो व ते तिच्याच कल्याणासाठी खर्च करतो. त्याचप्रमाणे आपल्या प्रखर किरणांनी आठ महिनें सूर्यानें जे पाणी शोषून घेतले होते, ते या ऋतूत पावसाच्या रूपानें पृथ्वीवर पडू लागले. विजेच्या प्रकाशाने, वाऱ्याच्या तडाख्यांनी प्रक्षुब्ध होऊन मेघ सर्वांना जीवन वाटणाऱ्या पाण्यास पृथ्वीवर ओतू लागले. सहेतुक तप करणाऱ्या एखाद्या माणसास त्याचे फळ मिळाल्यावर तो पुष्ट होतो, त्याप्रमाणेच प्रखर सूर्यानें तापलेली धरणी पावसाच्या पाण्याने भिजल्यामुळे पुष्ट झाली. कलियुगात वेदविद्येचा लोप होतो, त्याप्रमाणे मेघांनी भरलेल्या आकाशात गुरुशुक्रादी ग्रह दिसेनासे झाले. पण काजवे मात्र चमकत होते. नित्यकर्म आटोपल्यावर वैदिक ब्राह्मण वेदघोष करतात, त्याप्रमाणे पूर्वी स्तब्ध असलेले बेडूक मेघगर्जना ऐकून ओरडू लागले. आतापर्यंत शांत असलेल्या नद्या पर्जन्यवृष्टीमुळे दुथडी भरून सैरावैरा वाहू लागल्या. अनेक ठिकाणी हिरव्यागार गवताने, इंद्रगोप या तांबड्या किड्यांनी, श्वानछत्र्यांनी ही भूमी म्हणजे सैन्याचा तळ पडलेल्या एखाद्या महाराज्ञीप्रमाणे शोभू लागली.

शेतातील विपुल धान्यसंपत्ती पाहून शेतकरी आनंदित झाले. पावसाच्या पाण्याने मत्स्यादी जलचरांना, वृक्षादिकांना चांगलीच टवटवी आली. नद्यांच्या संगमाने, वाऱ्यानेही समुद्र भयंकर लाटांनी चंचल बनून खवळून गेला. गोवर्धनासारखे पर्वत पर्जन्याच्या मुसळधार वर्षावाने डगमगले नाहीत. येण्या-जाण्याच्या वाटा गवताने झाकल्या गेल्याने दिसेनाशा झाल्या. आकाशात इंद्रधनुष्य शोभून दिसले. काळ्याकुट्ट मेघांनी आच्छादिलेला चंद्र अगदी निस्तेज होऊन गेला. उन्हामुळे त्रासलेले मोर पर्जन्यवृष्टी करणाऱ्या मेघांना पाहून आनंदाने नाचू लागले. ग्रीष्मऋतूत वाळून, वठून गेलेल्या वृक्षांना पावसामुळे नवी पालवी फुटली. ते टवटवीत दिसू लागले. मत्स्यादी जलचरांच्या

आशेने चक्रवाकादी पक्षी काटचांनी व चिखलाने भरलेल्या सरोवरांच्या काठी जमा झाले. इंद्र पर्जन्यवृष्टी करीत असताना काही पूल पाण्याच्या पुराने कोसळून गेले.

याप्रमाणे त्या वृंदावनास पावसाळ्यामुळे नवे सौंदर्य प्राप्त झाले. खजुरीचे, जांभळीचे वृक्ष फुलून आले. राम, कृष्ण व सोबती यांनी गायींना घेऊन वृंदावनात प्रवेश केला. दुधाने भरलेल्या मोठ्या कासेच्या गायी मंदमंद चालत होत्या. कृष्णाने हाक मारताच पान्हा फुटून त्या त्वरेने त्याच्याकडे धावून आल्या. कधी रानातील भिल्लिणी, कधी डोंगरावरून कोसळणारे धबधबे, कधी गुहा, कधी पशुपक्ष्यांचे शब्द, कधी कंदमुळे, फळे पाहून कृष्ण रानातून फिरे. कधी पर्वताच्या गुहांत शिरून तो तेथे क्रीडा करी. कधी बलराम झऱ्याच्या काठी बसून बरोबर आणलेल्या दही-भाताच्या शिदोऱ्या सोडून भोजन करी. त्याच्याबरोबर त्याचे सोबती असत. भोवतीच्या हिरव्यागार कुरणावर डोळे मिटून स्वस्थपणाने रवंथ करीत असलेले बैल, वासरे, कासेच्या भाराने श्रमलेल्या गायी, वर्षाऋतूची ती शोभा पाहून श्रीकृष्णाला अतिशय आनंद झाला.

असा हा वर्षाकाळ संपून शरदऋतूला प्रारंभ झाला. आकाश व नद्यांचे पाणी स्वच्छ झाले. वारा शांत वाहू लागला. नद्यांच्या पाण्यात कमळे फुलली. आकाशातील मेघ, जीवजंतूंची दाटी, चिखल, पाण्याचा गढूळपणा इत्यादी गोष्टी अदृश्य झाल्या. आकाशातील मेघ शुभ्र वर्णाने शोभू लागले. लतादिकांचा कोवळेपणा संपून त्या पक्वदशेस आल्या. समुद्रावरील तुफान नाहीसे होऊन तो अगदी शांत झाला. चंद्रप्रकाशाने प्राण्यांचा ताप दूर झाला. फुलांच्या ताटव्यांवरून येणाऱ्या सुगंधी वायूने सर्व श्रम दूर झाले. पण कृष्णाने मन हरण केल्यामुळे गोपींचा मनस्ताप मात्र दूर झाला नाही. शरदऋतूत पशू, पक्षी, मनुष्य इत्यादीत स्त्री-जातीला पतिसान्निध्यामुळे गर्भधारणा झाली. नवीन ऋतूत नवी धान्ये तयार होऊन लोकांनी उत्सव साजरे केले. व्यापारी, संन्यासी, राजे, स्नातक इत्यादींनी आपले नवे उद्योग सुरू केले.

## वेणुनादवर्णन

अशा या शरद्ऋतूत एके दिवशी कृष्ण आपल्या गायी व गोपाल यांना घेऊन वनात क्रीडा करू लागला. भ्रमरांच्या मधुर गुंजारवाने, पक्ष्यांच्या शब्दांनी, नद्या, पर्वत, सरोवरे समृद्ध बनली होती. अशा या रम्य वनात कृष्णाने आपली मुरली वाजविण्यास प्रारंभ केला. कामोद्दीपक असे ते वेणुगीत ऐकताच गोकुळातील गोपी आपल्या मैत्रिणींसह कृष्णाच्या रूपगुणांची प्रशंसा करू लागल्या. पण त्याच्या प्रेमाच्या अतिरेकाने, कामपीडेने त्या इतक्या व्याकुळ बनल्या होत्या की, त्यांना त्याचे वर्णन करणे अशक्य झाले.

कृष्णाने त्यावेळी डोक्यावर पुष्पमुकुट धारण केला होता. त्यावर मोराच्या पिसांचा तुरा होता. कानांत पांगाऱ्याची फुले होती. त्याने पिवळे वस्त्र परिधान केले होते. त्याच्या गळ्यातील वनमाळ पायापर्यंत पोचली होती. त्याचे सोबती भोवती जमून त्याचे गुणगान करीत होते. त्याच्या मधुर अशा वेणुनादाने सारे वृंदावन रमणीय बनले. तो ध्वनी ऐकून गोपी आपापल्या अंतःकरणांत श्याममूर्ती कृष्णाला आलिंगन देऊ लागल्या. त्यांनी श्रीकृष्णाचे वर्णन मोठ्या कौतुकाने, आवडीने केले. त्याच्या वेणूनादाचा सर्व वृंदावनावर पडलेला प्रभाव त्यांनी वर्णन केला. सारा निसर्गच त्या नादाशी एकरूप झालेला त्यांनी पाहिला.

## गोपींचे कात्यायनीव्रत

यानंतर हेमंतऋतू आला. मार्गशीर्ष महिन्यात व्रजवासी कुमारींनी कृष्णाची प्राप्ती व्हावी म्हणून कात्यायनीव्रतास प्रारंभ केला. त्यांनी सूर्योदयापूर्वी यमुनेत स्नान केले. तीरावर कात्यायनी देवीच्या वालुकामय मूर्तीची निर्मिती केली. अर्घ्य, पाद्य, चंदन, सुवासिक फुले, तांबूस आम्रपल्लव, धूप, दीप, अक्षता, फळे, लहान-मोठे नैवेद्य, दहीभाताचा बळी, इत्यादींनी तिचे पूजन केले. हात जोडून त्यांनी देवीची प्रार्थना केली, ‘महामाये देवी सर्वेश्वरी कात्यायनी, नंदपुत्र कृष्णासारखा पती मला मिळू दे.’

कात्यायनीदेवीची अशी आराधना व्रजवासी गोपींनी एक महिना केली. पहाटेच गोपी यमुनेच्या काठावर येत. आपली वस्त्रे नदीच्या काठावर काढून ठेवीत. एकदा अशाच अवस्थेत त्या कृष्णाचे चरित्र गात यमुनाजलात आनंदानें क्रीडा करीत होत्या. एवढ्यात श्रीकृष्ण आपल्या सोबत्यांसह तेथे आला. यमुनेच्या तटावर असलेली गोपींची वस्त्रे त्याने उचलून घेतली व तो त्यांच्यासह जवळच्याच एका कदंब-वृक्षावर जाऊन बसला. यमुनेंत क्रीडा करणाऱ्या त्या गोपकुमारींना श्रीकृष्ण गमतीनें म्हणाला, 'गोपींनो, तुम्ही वर येऊन आपापली वस्त्रं शोधून घ्या.' कृष्णानें केलेली ही थट्टा पाहून गोपींच्या मनातील कृष्ण-प्रेम वाढले. त्या लज्जेने एकमेकीकडे पाहात होत्या. पाण्याच्या बाहेर यायला त्यांना लाज वाटू लागली. गळ्याएवढ्या खोल पाण्यात उभ्या राहून त्यांनी कृष्णास विनंती केली.

'कृष्णा, असा अन्याय करू नकोस रे. नंदाचा तू आवडता पुत्र आहेस. तुझ्या हातून असा अनाचार होणार नाही. तू आमची वस्त्रं लौकर दे. आम्ही पाहा ना थंडीनं काकडत आहोत. श्यामसुंदरा, तू मोठा धर्मज्ञ आहेस. आम्ही तुझ्या दासी आहोत. तू सांगशील ते आम्ही करू. पण तू आधी आमची वस्त्रं दे. नाही तर तुझी ही खोडी आम्ही नंदाला कळवू.'

'सुंदरींनो, तुम्ही माझ्या दासी ना ? माझी आज्ञा तुम्हांला मान्य आहे ना ? तर मग इथं वर येऊनच तुम्ही तुमची वस्त्रं घेऊन जा.'

तेव्हा थंडीनें, गार पाण्यानें गारठलेल्या त्या गोपी आपली गुह्यांगे दोनही हातांनी झाकून यमुनेच्या पाण्याबाहेर आल्या. त्यांचे ते शुद्ध प्रेम पाहून कृष्ण प्रसन्न झाला. तो त्यांना म्हणाला,

'गोपींनो, तुम्ही कात्यायनीव्रताचं अनुष्ठान करीत आहात. वस्त्रहीन अवस्थेत तुम्ही यमुनेंत स्नान करून त्या देवीचा अपराध केला आहे. म्हणून ते पाप दूर व्हावं या हेतूनं दोनही हात वर जोडून मस्तक खाली वाकवून त्या देवीला नमस्कार करा व मग आपापली वस्त्रं घ्या.'

त्या गोपींनी कृष्णानें सांगितल्याप्रमाणे करून आपले पातक नष्ट केले. कृष्णाने त्यांची वस्त्रे मोठ्या आनंदानें परत केली. त्यांची वस्त्रे

हरण करून त्याने त्यांच्या लज्जेचा त्याग करविला. त्या गोपी वस्त्रे नेसल्या. पण त्या घरी न जाता उत्सुक होऊन कृष्णाकडे चोरून पाहात तशाच उभ्या राहिल्या. घरी जाण्याचे भानच त्यांना राहिले नाही. कृष्णाची प्राप्ती पतिरूपानें व्हावी, म्हणून त्या कात्यायनीव्रत करीत होत्या. ते ध्यानात घेऊन कृष्ण त्यांना म्हणाला,

'मुलींनो, तुमचा संकल्प मी ओळखला आहे. माझी सेवा घडावी हा तुमच्या व्रताचा हेतू आहे. तुमचं अंतःकरण माझ्या ठिकाणी अनुरक्त झालं हे फार चांगलं झालं. त्यामुळं संसारच मोक्षरूप बनून जातो. एकदा भाजलेलं बीज पुनः उगवत नाही. त्याप्रमाणं मला अर्पण केलेलं मन फिरून मोहपाशात गुंतत नाही. गोपींनो, आता तुमचे मनोरथ पूर्ण झाले असेच समजा. आता तुम्ही गोकुळात सुखानं जा. येत्या शरद्-ऋतूत रात्री तुम्ही मजबरोबर नाना विलास भोगाल.'

कृष्णाच्या उपदेशामुळे गोपी गोकुळात जायला निघाल्या. पण त्याच्या वियोगानें त्यांचे पाय तिकडे वळेनात. शेवटी मोठ्या कष्टानें त्या गोकुळात गेल्या. त्यानंतर कृष्ण, बलराम, सोबती गायींना घेऊन वृंदावनात बरेच दूर गेले. एका गर्द झाडांच्या सावलीत त्यांनी प्रवेश केला. कृष्णाने आपल्या सोबत्यांना म्हटले, 'स्तोककृष्णा, अंशा, श्रीदामा, सुबला, अर्जुना, विशाला, ऋषभा, तेजस्वी, देवप्रस्था, वरूथपा, प्रखर उन्हाचा ताप होऊ नये म्हणून वृक्षांनीही छाया आपल्यावर धरली आहे. हे वृक्ष धन्य आहेत. कारण हे केवळ परोपकारच करीत आहेत. थंडी, वारा, ऊन, पाऊस यांना न जुमानता हे आपलं रक्षण करतात. हे वृक्ष पानं, फुलं, फळं, सावली, मुळं, वल्कलं, समिधा, डिंक, चूर्ण, खोड इत्यादींच्या योगानं केवळ परोपकारच करतात. यांचं जीवन यामुळं सफल होतं.'

इतके म्हणून श्रीकृष्ण कोवळे अंकुर, फुलांचे तुरे, फळे यांनी वाकलेल्या वृक्षांमधून सर्व परिवारासह यमुनेच्या तीरावर गेले. सर्व गोपांनी यमुनेचे स्वच्छ, मधुर, शीतल पाणी आपल्या गायींना पाजले. आपणही प्राशन केले.

## ऋषिपत्नींवर अनुग्रह

यमुनेच्या तीरावर पाणी पिऊन झाल्यावर ते गोपाल कृष्णाला म्हणाले, ' बलरामा, कृष्णा, आता आम्हांस फार भूक लागली. काही खायला दे ना. ' विप्रस्त्रियांवर अनुग्रह करण्याची संधी ओळखून कृष्ण त्यांना म्हणाला, ' गड्यांनो, इथून जवळच ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांनी स्वर्गाच्या इच्छेनं आंगिरस नावाचा एक यज्ञ आरंभिला आहे. तिथं तुम्ही जावं. कृष्णानं, बलरामानं आम्हांस पाठविलं आहे, असं त्यांना सांगा. '

कृष्णाची अशी आज्ञा होताच ते गोप त्या यज्ञसत्राच्या ठिकाणी गेले. ब्राह्मणांना त्यांनी हात जोडून अन्न मागितले. त्या ब्राह्मणांनी ते न ऐकल्यासारखे केले. ते मूर्ख व अभिमानी ब्राह्मण स्वर्गासारख्या क्षुद्र सुखाच्या पाठीमागे लागून यज्ञाचा खटाटोप करीत होते. देश, काल, चरुपुरोडाशादी द्रव्यसामग्री, मंत्र, तंत्र, ऋत्विज, अग्नी, देवता, यजमान, या सर्व क्रिया ज्या परमात्म्याची रूपें, तोच साक्षात श्रीकृष्णरूपाने अवतरला आहे. त्या मर्त्य व जडबुद्धीच्या ब्राह्मणांना समजले नाही. त्यांनी त्या गोपकुमारांचा अपमान केला. ते त्यांना ' होय ' म्हणाले नाहीत. ' नाही ' म्हणाले नाहीत. निराश झालेल्या गोपालांनी हा सर्व वृत्तान्त परत येऊन राम-कृष्णांना सांगितला. ऐकून ब्राह्मणांच्या अज्ञानाचे कृष्णाला हसू आले. तो आपल्या सोबत्यांना म्हणाला, ' धीर सोडू नका. पुन्हा प्रयत्न करा. आता तुम्ही त्या ऋषींच्या, ब्राह्मणांच्या पत्नींकडं जा. मी व बलराम इथं बसलो आहोत, असं त्यांना सांगा. मित्रांनो, तुम्हांस खरंच खप अन्न प्राप्त होईल. त्यांना माझ्याबद्दल प्रेम आहे. त्या केवळ जडदेहानं यज्ञशाळेत असून त्यांची बुद्धी माझ्यातच लीन झाली आहे. '

श्रीकृष्णाची आज्ञा घेऊन ते गोपकुमार परत त्या यज्ञशाळेतील स्त्रियांकडे गेले. त्या ऋषिपत्नींनी नाना प्रकारचे अलंकार घातले होते. गोपालांनी त्यांना नमस्कार करून म्हटले, ' स्वाध्वींनो, तुम्हांस आमचा नमस्कार असो. भगवान कृष्ण इथून जवळच गायी चारीत आहे. त्यानं आम्हांस इथं पाठविलं आहे. तो कृष्ण, बलराम व आम्ही त्याचे सोबती भुकेनं फारच व्याकुळ झालो आहोत. आपण

आम्हांस थोडं अन्न द्याल तर बरं होईल.'

श्रीकृष्ण येथून जवळच आहे असे समजताच त्या ब्राह्मणस्त्रियांना फार आनंद झाला. त्यांचे चित्त त्याच्या दर्शनासाठी उत्सुक बनले. त्यांनी त्वरित चतुर्विध अन्नांची ताटे भरून घेतली व त्या कृष्णाच्या दर्शनासाठी निघाल्या. पती, पुत्र, आप्त, बांधव यांच्या निषेधास त्यांनी मानले नाही. यमुनेच्या तीरावर त्यांना अशोकवृक्षाच्या छायेत बलराम व कृष्ण दिसले. श्रीकृष्णाचे सुंदर रूप त्यांनी पाहिले. त्याच्या हातात कमळ होते. मुखावर मंदहास्य होते. कानांत कुंडले, गालांवर विखुरलेले केस, यांनी तो सुशोभित दिसत होता. आतापर्यंत विप्रस्त्रियांनी कृष्णाचे यश ऐकले होते. आता त्याची मूर्ती पाहून त्यांना अत्यंत आनंद झाला. त्यांनी ती जशीच्या तशी चित्तावर रेखाटली. त्या विप्रस्त्रियांना श्रीकृष्ण म्हणाला,

'भाग्यवान साध्वींनो, तुमचं स्वागत असो, या. बसा. मी तुमचं कोणतं काम करू ? माझ्या दर्शनासाठी तुम्ही एवढ्या दूर आलात, फार चांगलं झालं. विवेकी पुरुष फळाची अपेक्षा न ठेवता अशीच माझ्यावर एकनिष्ठ भक्ती ठेवतात. ज्या वस्तूबद्दल आवड निर्माण होते, तीत माझा अंश असतो. माझ्या दर्शनानं तुम्ही कृतार्थ झालात. आता तुम्ही यज्ञशाळेत जा. तुम्ही पतींच्या साहाय्यानं यज्ञाची समाप्ती करा. गृहस्थाची पुण्यकर्मं गृहिणींनी पुरी करायची असतात.'

'कृष्णा, असं निष्ठुर भाषण करणं तुला शोभत नाही. भक्ताला शाश्वतपदाची प्राप्ती होते. भक्ताचा नाश कधी होत नाही, ही तुझी वचनं तू खरी कर. सर्व आप्तजनांचा त्याग करून आम्ही इथं आलो. याचं कारण माहीत आहे ? देवा, तुझ्या पावलांवरून रुळणारी तुलसी-माळा आमच्या केसांत माळायची संधी मिळावी, म्हणून आम्ही इथं आलोत. आता आम्ही परत कशासाठी जाऊ ? आता आमचे पती, भाऊबांधव आम्हांस घरात घेणार नाहीत. आता तुझ्या चरणांवाचून आम्हांस दुसरं स्थान नाही.'

'स्त्रियांनो, तुमचे पती, पुत्र तुमचा स्वीकार करतील. आप्त तुमची निंदा करणार नाहीत. आकाशातील देवही तुमच्या कृत्याचं

अभिनंदन करतील. तुम्ही तुमचं चित्त मात्र माझ्यापाशी निरंतर ठेवा. म्हणजे तुम्हांस माझी प्राप्ती होईल.'

ब्राह्मणस्त्रिया नंतर परत यज्ञमंडपात आल्या. त्यांना दोष न देता ब्राह्मणांनी यज्ञविधी शेवटास नेला. ब्राह्मणपत्नी गेल्यावर श्रीकृष्णाने त्या चतुर्विध अन्नाचे भोजन आपल्या सोबत्यांना दिले. पुढे त्या विप्रांनाही आपल्या अपराधाची जाणीव झाली. रामकृष्णांच्या याचनेचा आपण अनादर केला, म्हणून त्यांना पश्चात्ताप झाला. 'आमचा ब्राह्मण जन्म व्यर्थ. आमचं वेदाध्ययन, ब्रह्मचर्य, कुलशील, यागनैपुण्य यांचा धिक्कार असो. इतकी अनुकूलता असूनही आम्ही कृष्णाकडं पाठ फिरविली. आम्हांस काय म्हणावं?

**धिग्जन्म नस्त्रिवृद्विद्यां धिग्व्रतं धिग्बहुज्ञताम् ।**
**धिक्कुलं धिक्क्रियादाक्ष्यं विमुखा ये त्वधोक्षजे ।।**

'या स्त्रिया असूनही यांची कृष्णभक्ती पाहा किती थोर आहे! भक्तीच्या बळावर त्यांनी संसारपाशही तोडून टाकले. या स्त्रियांना पुरुषांसारखे संस्कार नाहीत. गुरुगृही वेदांच अध्ययन नाही. तपश्चर्या नाही. अध्यात्मशास्त्राची माहिती नाही. शुचिर्भूतता नाही. पुण्यसंचय नाही. पण त्यांची भगवंताबद्दलची भक्ती पाहा किती दृढ. ती मात्र आमच्या ठिकाणी नाही. अज्ञानामुळं आम्हांस कशी भ्रांती झाली पाहा. पण या भगवद्भक्त स्त्रियांच्या प्राप्तीमुळं आम्ही धन्य झालो आहोत. कृष्णा, तुला आमचे शतशः प्रणाम असोत. आमच्या अपराधाची क्षमा करावी.'

## इंद्रयागाऐवजी गोवर्धनाचा आश्रय

राम, कृष्ण गोकुळात वाढत असताना नंदादी गोपांनी इंद्रासाठी एका यज्ञाची तयारी केली. तेव्हा श्रीकृष्णाने त्यांना विचारले, 'ही कसली धांदल चालली आहे? कसला यज्ञ? तुम्ही हा यज्ञ कशासाठी करीत आहात?' तेव्हा नंद म्हणाला, 'बाळा, भगवान इंद्र पर्जन्याचा देव. मेघही त्याचीच विभूती. तोच पाऊस पाडतो. आपली शेती पिकवतो.

तेव्हा इंद्राचा यज्ञ करण्याची चाल इथं पूर्वीपासूनच आहे. जो हा यज्ञयाग बंद करील त्याचं कल्याण होणार नाही.' त्यावर आपल्या पित्याला श्रीकृष्ण म्हणाला, 'बाबा, या जगात प्राण्यास कर्मानुसार सुखदुःख प्राप्त होतं. म्हणून या कर्माची पूजा करावी. एकापासून वैभव संपादन करायचं व पूजा दुसऱ्याची करायची, हा न्याय नाही. वैश्यांनी शेती, व्यापार, गोरक्षण, व्याजबट्टा या चार प्रकारांनी उपजीविका चालवावी. गोरक्षण करून आपण आपला निर्वाह करतो. याचा इंद्राशी काय संबंध ? आपण तर केवळ रानावनांत राहातो. आपण यज्ञच करायचा असेल तर गायी, ब्राह्मण, गोवर्धन यांच्यासाठी करावा. इंद्रासाठी जी सामग्री तुम्ही जमा केली तिनंच हा यज्ञ साजरा करावा. चांडाळ, पितर यांपासून कुत्र्या-मांजरांपर्यंत सर्वांना अन्नदान करा. गायींना चारा घाला. गोवर्धनपर्वताला महानैवेद्य समर्पण करा. बाबा, माझं मत असं आहे. पण तुम्हांस पटेल तसं करा.'

कृष्णाचे हे बोलणे सर्व गोपांना पसंत पडले. त्यांनी पक्वान्नांचा महानैवेद्य गोवर्धनास दाखविला. अन्नपदार्थ गायींना दिले. सुंदर वस्त्रे घालून त्यांनी गोवर्धनाची प्रदक्षिणा केली. गोवर्धन हा एक देवच त्यांना वाटला. सर्व गोपांनी त्या गोवर्धनास नमस्कार केला.

आपणांसाठी यज्ञ न करता गोपांनी कृष्णाच्या सांगण्यावरून गोवर्धनाचा यज्ञ केला हे इंद्राला समजून त्याला मोठा राग आला. त्यानें सांवर्तक नावाच्या प्रलयकालीन मेघांना बोलावून गोकुळाचा नाश करण्यासाठी आज्ञा केली. गोकुळात भयंकर पर्जन्यवृष्टी झाली. एकसारखा मुसळधार पाऊस सुरू झाला. जिकडे तिकडे पाणीच पाणी झाले. गोकुळवासी कृष्णाला शरण गेले. आपल्या योगसामर्थ्याने कृष्णानें एका हातानें गोवर्धनपर्वत उचलून धरला. त्याच्या खाली गोपाळांचे, गायी-गुरांचे त्यानें संरक्षण केले. सात दिवसपर्यंत कृष्णाने तो पर्वत हातावर धरला होता. कृष्णाचे हे सामर्थ्य पाहून इंद्राला नवल वाटले. त्यानें आपल्या मेघांना आवरून धरले. कृष्णाचे हे अद्भुत कृत्य पाहून गोप-गोपींना अत्यंत आनंद झाला. त्यांनी त्याला आशीर्वाद दिला. सर्वांनी

श्रीकृष्णाची स्तुती गाइली. इंद्रानेही संतुष्ट होऊन कृष्णाची स्तुती केली. त्यानें श्रीकृष्णास गोकुळाधिपती म्हणून अभिषेक केला.

वरुणाच्या तावडीत सापडलेल्या आपल्या पित्याची, नंदाची सुटकाही कृष्णाने याच वेळी केली. कृष्णाच्या अशा अद्‌भुत कृत्यांची सर्वांनाच नवलाई वाटली. त्यांनी कृष्णाच्या गुणांची व कर्तृत्वाची मनापासून स्तुती केली.

## वृंदावनातील रासक्रीडा

शरदऋतूमुळे वृंदावनातील वृक्षवेली व मोगरी प्रफुल्लित झालेल्या पाहून योगमायेचा आश्रय केलेल्या श्रीकृष्णानें गोपींशी क्रीडा करण्याचे ठरविले. ही वेळ गोपींचे मन हरण करण्यास योग्य आहे, असे समजून कृष्णाने चित्तवेधक असे गाणे म्हणण्यास आरंभ केला. श्रीकृष्णाचे ते कामोद्दीपक गाणे ऐकून गोकुळातील गोपींच्या चित्तवृत्ती कृष्णमय झाल्या. आपापली कामे सोडून गोपी वृंदावनाच्या दिशेनें धावू लागल्या. कित्येक-जणी दूध काढीत होत्या, कोणी आपल्या पति-पुत्रांना वाढीत होत्या, कोणी तान्हचा मुलांना पाजीत होत्या, कोणी सारवीत होत्या, कोणी घर झाडीत होत्या, कोणी काजळ घालीत होत्या. पण सर्वजणी आपापली कामे सोडून कृष्णाकडे धावल्या.

त्यानंतर कृष्णानें गोपींना परत आपापल्या घरी जाण्याविषयी विनंती केली. 'गोपींनो ! पतीची शुश्रुषा करणं, नातेवाइकांची सेवा करणं हाच स्त्रियांचा धर्म आहे. परपुरुषसमागम हा कुलीन स्त्रियांस अत्यंत निषिद्ध आहे. शिवाय माझीच सेवा करावयाची असेल तर माझं ध्यान करा, दर्शन घ्या, गुणानुवाद श्रवण करा. या मार्गानं जशी माझी भक्ती घडेल तशी माझ्या शरीरसंबंधानें घडणार नाही; यास्तव तुम्ही परत जा.'

गोपींची अर्थातच निराशा झाली. त्यांच्या डोळ्यांतून काजळ-मिश्रित अश्रू ओघळू लागल्यानें त्यांच्या स्तनांवरील केशराची उटी धुऊन गेली. त्यांनी कृष्णास प्रार्थना केली की, 'हे देवा, जे मन गृह-कृत्यांत लावावयाचं तेच तू हरण केलंस. मग आम्ही घरी कसं जावं ?

हे प्रियतमा, तुझ्या मंद हास्यानं, मधुर नेत्रकटाक्षांनी आणि मनोहर आलापांनी आमच्या ठिकाणी उत्पन्न झालेल्या आमच्या मदनाग्नीला तुझ्या अधरामृताच्या वर्षावानं शांत कर. नाहीतर विरहाग्नीत आमच्या देहाची आहुती पडेल.'

गोपींच्या या भाषणांनी कृष्णास दया आली आणि त्यानें क्रीडा करण्याचे ठरविले. हस्तस्पर्श, आलिंगन, विनोद, हास्य, थट्टा इत्यादी अनेक प्रकारच्या कामचेष्टा करीत आणि मधुर हास्यानें व नेत्रकटाक्षांनी त्यांचा मदनाग्नी प्रदीप्त करीत त्या प्रभूनें त्यांच्याबरोबर नाना प्रकारची क्रीडा केली. एवढ्यात गोपींना अभिमान उत्पन्न झाल्यामुळे त्यांचा अभिमान दूर करण्यासाठी व त्यांच्यावर कृपा करण्याकरिता श्रीकृष्ण गुप्त झाला.

गोपी कावऱ्याबावऱ्या झाल्या. कृष्णाशी केलेली क्रीडा त्यांच्या अंगात भिनून गेलेली असल्यानें त्या कृष्णाचे अनेक बाबतींत अनुकरण करू लागल्या. भ्रमिष्ट चित्ताने त्या श्रीकृष्णाचा सर्वत्र शोध करू लागल्या. वृक्षांना, वेलींना, पृथ्वीला, हरिणाला, मयूराला, पक्ष्यांना, भ्रमरांना त्या कृष्णाचे कुशल विचारू लागल्या. हिंडत असताना त्यांना एके ठिकाणी श्रीकृष्णाची पावले दृष्टीस पडली. त्या पावलांत कोण्या एका स्त्रीची पावलेही त्यांना दिसून आली. गोपींना फार दुःख झाले.

त्या म्हणाल्या, 'हिनं भगवान श्रीकृष्णाची चांगलीच आराधना केली असली पाहिजे. कारण तो आम्हांला सोडून तिच्यावर प्रसन्न होऊन तिला एकांतात घेऊन गेला. एकांतात श्रीहरीच्या अधरामृताचा आस्वाद घेणाऱ्या आमच्यांतीलच या एका स्वार्थी गोपीची ही उमटलेली पावलं पाहून आम्हांला तिचा मोठा संताप आला. अहो, इथं तर तिची पावलं दिसत नाहीत. बहुधा त्या प्रियतमेच्या सुकुमार पावलांना गवताची टोके बोचल्यामुळं, प्रियकर कृष्णानं तिला खांद्यावर घेतलं असावं. या ठिकाणी त्या कामुक कृष्णानं आपल्या प्रियकरणीची वेणी घातली असावी.' गोपी याप्रमाणे शोध करीत असताना त्या एका गोपीलाही गर्व झाल्याकारणाने श्रीकृष्ण तिलाही सोडून गेला. ती गोपी या शोध करणाऱ्या गोपींना भेटली व तिने आपला सर्व वृत्तान्त निवेदन

केला. मोठ्या उत्सुकतेनें कृष्णाची लीला गात गात गोपी कृष्णाची वाट पाहू लागल्या.

गोपींचा विलाप चालूच होता. 'श्रीकृष्णा, तुझ्याकरिता आम्ही व्याकुळ झालो आहेत. तू केवळ यशोदेचा पुत्र नसून अखिल प्राणिमात्रांच्या अंतर्यामी वास करणारा सर्वसाक्षी परमेश्वर आहेस. अनन्यभावानं शरण आलेल्या जीवांच्या पापांचा नाश करणारे, गाई-वासरांना चारताना त्यांच्यामागून जाणारे आणि कालियासर्पाच्या मस्तकावर ठेवलेले तुझे ते चरण एकदा आमच्या वक्ष:स्थलांवर ठेवून आमचा कामाग्नी एकदा शांत कर. तुझ्या मधुर भाषणानं मोहित झालेल्या या आम्हा दासींना आपलं अधरामृत पाजून सावध कर. हे यदुवीरा! तुझ्या अधरामृतानं रतिक्रीडेची अभिवृद्धी होते. शोक नाहीसा होतो. आणि जीवांना इतर विषयांच्या प्रेमाचा विसर पडतो हे सुकुमार प्रियकरा, आम्ही आमच्या कठीण अशा स्तनांवर, जे तुझे चरणकमल तुला पीडा होईल या भीतीनं हळू ठेवतो, तेच चरण अरण्यात भटकत असताना दगडाच्या कपाऱ्यांनी पीडित होत नसतील काय ?'*

गोपींचा हा विलाप ऐकून हसतमुख असा तो पीतांबरधारी भगवान कृष्ण त्यांच्यापुढे उभा राहिला. गोपींना फारच आनंद वाटला. प्रेमाने त्यांचे नेत्र प्रफुल्ल झाले. एकीने त्याच्या विड्याचा चोथा आपल्या ओंजळीत घेतला व कामपीडित झालेल्या दुसरीने त्याचे चरण आपल्या वक्ष:स्थळावर ठेवले गोपींचे विरहदु:ख नाहीसे झाले. गोपींनी त्या त्रैलोक्यसुंदर अशा कृष्णाचे यमुनेच्या वाळवंटात पूजन केले. श्रीकृष्णाने गोपींचे सांत्वन केले.

'गोपींनो, माझ्यावरील प्रेमासाठी तुम्ही लोकाचार, धर्माचार, स्वजन इत्यादिकांचा त्याग केलात. तेच तुमचं प्रेम निश्चल राहावं. म्हणून तुम्हांस एक वेळ दर्शन देऊन मी अंतर्धान पावलो. देवाच्या आयुष्याइतक्या दीर्घकाळातही मला तुमच्या शुद्ध अशा प्रेमाचं उतराई होणं अशक्य आहे. या विशुद्ध प्रेमाची फेड तुमच्या यापुढील सद्वर्तनानंच होवो.'

* हे समग्र गोपीगीत वामनपंडितांच्या अनुवादासह शेवटी दिले आहे.

कृष्णाच्या अमृतमधुर उपदेशामुळे सर्व गोपींना अपार आनंद वाटला. रासक्रीडेच्या खेळास प्रारंभ झाला. प्रत्येक गोपीजवळ एकेक श्रीकृष्ण निर्माण झाल्याचा भास प्रत्येकीला होऊ लागला. आकाशात विमानातून देवांनी कौतुकाने हा रासक्रीडेचा खेळ पाहिला. गोपींवर त्यांनी पुष्पवृष्टी केली. कृष्णाबरोबर नाचताना तालावर पडणारी पावले, हलणारे हात, भृकुटींचे विलास, खाली वाकताना होणारे कटि-विक्षेप, स्तनांवरून बाजूला वारंवार सरणारे वस्त्रांचे पदर, गालांवर लोंबणारी रत्नकुंडले, श्रमाने मुखांवर पसरलेले घर्मबिंदू, शिथिल झालेले कमरपट्टे व केशपाश; इत्यादींच्या योगाने सर्व गोपी शोभून दिसत होत्या. कोणी कृष्णाच्या खांद्यावर आपल्या अंगाचा भार टाकला, कोणी त्याचे चुंबन घेतले, कोणी त्याच्या गालाशी गाल देऊन आपल्या मुखातील तांबूल त्यास दिला, कोणी कृष्णाचा शीतल हात आपल्या स्तनांवर ठेवून दिला.

श्रीकृष्णाच्या अंगसंगानें गोपी इतक्या आनंदित झाल्या की, त्यांना कशाचेही भान राहिले नाही. त्यांच्या केसांतील, हातांतील, गळ्यांतील पुष्पमाळा गळून पडल्या. कित्येकींचे केशपाशच काय, पण वस्त्रेही शिथिल झाली व कित्येकींना स्तनांवरून सरकलेल्या पदराचेही स्मरण राहिले नाही. कृष्णलीला पाहून देवस्त्रियाही कामपीडेने त्रस्त झाल्या. मनसोक्त क्रीडा केल्यानें थकून गेलेल्या गोपींच्या मुखांवरील घर्मबिंदू त्या दयाळू श्रीकृष्णानें आपल्या कल्याणप्रद हातांनी पुसून काढले. यानंतर श्रीकृष्णानें गोपींबरोबर जलक्रीडाही केली. याप्रमाणे चंद्र-प्रकाशानें रमणीय झालेल्या व शरदऋतूसंबंधी काव्यात शृंगारादी रसांचे वर्णन करण्यास आधारभूत अशा त्या सर्व रात्री सत्यसंकल्प अशा भगवान श्रीकृष्णानें स्वतःच्या ठिकाणी वीर्याचा निरोध करून आपल्यावर अनुरक्त असणाऱ्या गोपींबरोबर क्रीडा करण्यात घालविल्या.

गोपींबरोबर श्रीकृष्णाने केलेली रासक्रीडा ऐकून परीक्षिताने शुकाचार्यांना प्रश्न केला, 'धर्माची संस्थापना करणाऱ्या कृष्णानं असं परस्त्रीसंभोगाचं आचरण कसं केलं?' त्याच्या प्रश्नास उत्तर देताना शुकाचार्यांनी त्याच्या आक्षेपाचे अनेक प्रकारांनी निरसन केले. विष्ठादिक

पदार्थं अग्नी जाळीत असला तरी अग्नीला काही दोष लागत नाही. तेजस्वी पुरुषांना अशा निंद्य कर्माचा दोष नसतो. असमर्थं व पराक्रमहीन अशा माणसानें मात्र असे आचरण कधी करू नये. समुद्रमंथनाच्या वेळी निघालेले विष शंकरांनी प्राशन केले, तरी त्यांचा नाश झाला नाही. पण इतर कोणाचा नाश झाला असता. ज्ञानवान व वैराग्यसंपन्न पुरुषाची वचने मात्र सत्य असतात. त्यानुसार त्यांचे आचरण असतेच असे नाही. देव, मनुष्ये, पशुपक्ष्यादी प्राणी यांचा नियंता श्रीकृष्ण याला पाप कसे लागणार? गोपी, त्यांचे पती, प्राणिमात्र यांच्या ठिकाणी तोच भरलेला असल्याने त्याला आपपरभाव नाही. केवळ लीलेसाठी त्याने देह धारण केला होता.

## सुदर्शनाचा उद्धार, शंखचूडाचा वध

एकदा गोपालांच्या मनात महादेवाच्या यात्रेला जावे असा विचार आला. त्यांनी लगेच गाड्या जुंपून सरस्वतीनदीच्या काठी अंबिकावनात ते गेले. त्यांनी प्रथम नदीत स्नानें केली. भगवान पशुपतींचे, जगदंबेचे यथाविधी पूजन केले. ब्राह्मणांना गायी, सुवर्ण, वस्त्रे इत्यादींची दानें दिली. नंदादी सर्व गोप तेथे व्रतस्थ होऊन त्या रात्री सरस्वतीनदीच्या काठीच राहिले. तेव्हा रात्री एक मोठा सर्प भुकेने व्याकुळ होऊन सरपटत तेथे आला व तो झोपलेल्या नंदास गिळू लागला. नंद घाबरून गेला. ' कृष्णा, अरे कृष्णा, हा सर्प पाहा मला गिळीत आहे. माझं रक्षण कर. ' असे त्यानें म्हटल्याबरोबर सर्वजण जागे झाले. सर्वांनाच त्या सर्पाची भीती वाटली. हातांत लाकडे घेऊन त्यांनी त्या सर्पाला टोचायला सुरुवात केली. पण तो सर्प काही केल्या नंदास सोडीना. कृष्णाने तेथे येऊन त्या सर्पास आपल्या पायाने स्पर्श केला. तेव्हा लगेच त्या सर्पाचे पूर्वपातक नष्ट झालें व तो एका अत्यंत तेजस्वी अशा विद्याधराच्या स्वरूपात प्रकट झाला. कृष्णाने त्याला विचारले,

' सुंदर पुरुषा, तुझं रूप फारच सुंदर आहे. तू कोण आहेस ? तू अशा निंद्य योनीत आलास तरी कसा ?'

' कृष्णा, मी पूर्वी सुदर्शन नावाचा एक प्रसिद्ध विद्याधर होतो.

धन व सौंदर्य यांनी उन्मत्त होऊन फिरत असताना अंगिराऋषींची व माझी भेट झाली. त्यांच्या कुरूपतेला पाहून मी हसलो. मी त्यांची निंदा केली. म्हणून त्यांनी मला या सर्पयोनीचा शाप दिला. पण देवा, त्या शापानं माझ्यावर मोठे उपकारच केले. कारण मला आपल्या पायाचा स्पर्श झाला. माझी सर्व पातकं संपली. कृष्णा, तू शरणागतांचं रक्षण करतोस. तुझ्या चरणांमुळं मी ब्रह्मशापापासून मुक्त झालो. मी तुला अनन्यभावानं शरण आलो आहे. आता मला जाण्याची आज्ञा दे.'

श्रीकृष्णाची अशी स्तुती करून विद्याधराने त्याला नमस्कार केला. प्रदक्षिणा घालून तो स्वर्गास गेला. कृष्णाने नंदाची एका संकटातून सुटका केली म्हणून सर्वांनी त्याची स्तुती केली. त्यानंतर एकदा राम व कृष्ण गोपींना घेऊन वनात क्रीडा करण्यासाठी गेले. त्या गोपींचे मन त्यांच्यावर जडले होते. रामकृष्णांच्या गायनात गोपी इतक्या तल्लीन झाल्या की, त्यांची वस्त्रे शिथिल झाली. त्यांचे केस विस्कटून गेले. त्यांतील फुले गळून पडली. यांचेही भान गोपींना राहिले नाही.

अशा आनंदात सर्वजण असताना शंखचूड नावाचा एक कुबेराचा दूत तेथे आला. त्याने रामकृष्णांच्या देखत गोपींना बलाने उचलले व तो उत्तरदिशेस धावू लागला. गोपी आक्रोश करून कृष्णाचा धावा करू लागल्या. त्यांची हाक ऐकताच राम व कृष्ण दोघेही त्या यक्षाच्या अंगावर धावून गेले. त्याने गोपींना सोडून दिले व जीव घेऊन तो पळत सुटला. बलराम गोपींच्या रक्षणासाठी राहिला व कृष्णाने त्याच्या मस्तकातील मण्यासाठी त्याचा पाठलाग केला. शेवटी कृष्णाने त्याला गाठलेच. एका मुठीच्या आघाताने त्याने शंखचूडाचे मस्तक धडापासून वेगळे केले व त्याच्या मस्तकातील तेजस्वी मणी सर्व गोपींच्या देखत कृष्णाने बलरामास दिला.

## अरिष्टासुराचा वध

अरिष्ट नावाचा एक दैत्य बैलाचे रूप धारण करून आपल्या पायांनी जमीन उकरीत, पृथ्वीला कापवीत गोकुळात येऊन पोचला. त्याच्या शरीरावर मोठे वशिंड होते, त्याचा स्वर कठोर होता. तो

पायांनी जमीन उकरे. शेपटी उभारून तीक्ष्ण शिंगांनी टेकाडे नष्ट करी. डोळे मिटून मलमूत्रोत्सर्ग करी. अशा या विशाल बैलाच्या डुरकण्या ऐकताच गोकुळातील स्त्रियांचे व गायींचे गर्भ एकदम गळून गेले. गोप-गोपी घाबरून जाऊन गायीगुरे भीतीने पळू लागली. 'कृष्णा, आमचं रक्षण कर. आम्ही शरण आलो आहोत.' अशी सर्वांनी प्रार्थना केली. 'भिऊ नका. मी आहे' असे आश्वासन कृष्णाने दिले. त्याने त्या वृषभासुराला हाक मारली. तो म्हणाला, 'अरे मूर्खा, दुष्टा, गोकुळा-तील गोपांना, पशूंना भय का दाखवितोस ? तुझा गर्व हरण करण्या-साठी मी इथं उभा आहे ना.'

असे म्हणून कृष्णाने दंड थोपटले. त्याच्याकडे त्याने क्रोधाने पाहिले. तो दुष्ट असुर संतापला. तो मोठ्या आवेशाने कृष्णाच्या अंगावर धावून गेला. कृष्णाने आपल्या हातांनी त्याची शिंगे धरली. तो मागे अठरा पावले जाऊन आदळला. क्रोधाने बेभान झालेला तो असुर पुन्हा उठला. त्याचे अंग घामानें चिंब झाले असून तो धापा टाकीत होता. त्यानें पुन्हा कृष्णावर हल्ला केला. कृष्णाने त्याची शिंगे धरून त्याला जमिनीवर पाडले. आपल्या एका पायाने त्याचे शरीर दाबले. त्याला पिरगळून काढले. त्याचे एक शिंग उपटून कृष्णाने त्यानेंच त्याला मारले. त्याच्या तोंडातून रक्त आले. मलमूत्र विसर्जित करीत तो जमिनीवर पडला. हात-पाय आपटून, डोळे फिरवून त्यानें प्राण सोडला. अशा रीतीनें अरिष्टासुराचा नाश होताच कृष्णावर देवांनी पुष्पवृष्टी केली. त्याची स्तुती केली.

अरिष्टासुराचा वध झाल्यावर नारद एकदा कंसाकडे गेले व त्याला म्हणाले, 'कंसा, योगमाया कन्या यशोदेची, कृष्ण देवकीचा. बलराम रोहिणीचा मुलगा. तुझ्या भीतीनं वसुदेवानं कृष्णाला नंदाकडे ठेवलं. त्यानंच पूतनादिकांचा नाश केला.' नारदांचे ऐकून कंसास अतिशय क्रोध आला. वसुदेवासच मारण्यासाठी तो तत्पर झाला. पण नारदांनी त्याला आवरले. पण त्यानें वसुदेवदेवकींना कारावासात ठेवले. कृष्णाला मारण्यासाठी केशी नावाच्या दैत्याला आज्ञा केली. आपले मंत्री, चाणूर, मुष्टिक, तोशल, शल इत्यादी मल्ल, मोठमोठे

हत्ती आणून त्यांच्याशी कंसाने चर्चा केली. कृष्णाला येथे बोलावून मारून टाकण्याचा त्याने बेत केला. नगरात एक प्रशस्त आखाडा उभारून कुस्तींची दंगल उडवावी, असे त्याने ठरविले. कुवलयापीड हत्तीस कृष्णाला मारण्यासाठी तयार केले. चतुर्दशीला धनुर्यागविधी करून हा बलिदानाचा समारंभ करावा असे ठरले.

राजनीतिकुशल अशा यदुश्रेष्ठ अक्रुराला कंसाने बोलाविले. गोकुळात जाऊन श्रीकृष्णाला घेऊन येण्याचे काम त्याच्यावर सोपविले. जरासंध, द्विविद, शंबर, नरक, बाण या असुरांचे साहय घ्यायचे ठरविले.

## केशीदैत्याचा, व्योमासुराचा वध

कंसाने पाठविलेला तो केशीदैत्य एका मोठ्या घोड्याचे रूप घेऊन धावत धावतच गोकुळात आला. त्याच्या टापांच्या आघातांनी पृथ्वी थरकाप पावत होती. त्याच्या आयाळीमुळे आकाशातील मेघ, देवांची विमाने एकमेकांवर आदळू लागली. त्याच्या किंकाळण्याने गोप घाबरून गेले. कृष्णाने त्याला युद्धासाठी आव्हान देताच तो दुष्ट अक्राळ विक्राळ असुर धावतच कृष्णाच्या अंगावर गेला. कृष्णावर त्याने दुगाण्या झाडल्या. कृष्णाने त्याचे मागचे पाय घट्ट धरले आणि त्याला गरगर फिरवून दूर फेकून दिले. या आघाताने दैत्य मूच्छित झाला. पण लगेच सावध होऊन पुन्हा तो कृष्णाच्या अंगावर धावत गेला. कृष्णाने आपला डावा हात त्याच्या तोंडात कोंबला. तो हात चावताना असुराचे सर्व दात पडून गेले. पोटात गेलेला कृष्णाचा हात एकदम वाढू लागला. दैत्याचा श्वासोच्छ्वास बंद झाला. तो तडफडू लागला. त्याच्या अंगाला घाम सुटला. त्याचे डोळे फिरू लागले. मलोत्सर्ग करून शेवटी त्याने प्राण सोडला.

कृष्णाने त्या असुरास मारल्याचे पाहून सर्व गोकुळवासियांना आनंद झाला. त्यांनी श्रीकृष्णाची मनापासून स्तुती केली. नारदांनीही येऊन कृष्णाच्या पराक्रमाची स्तुती केली. थोड्याच दिवसांत कुवलया-पीड हत्ती, चाणूर, मुष्टिक, कंस यांचा वध कृष्णाच्या हातून होईल.

शंखासुर कालयवन, मुर, नरकासुर यांचाही वध होईल, असे भविष्य नारदांनी वर्तवून कृष्णाच्या पुढील चरित्राचा एक आराखडाच उभा केला.

त्यानंतर एके दिवशी सर्व गोपालांना, गायींना बरोबर घेऊन कृष्णादी सोबती लपंडावाचा खेळ खेळू लागले. अशा वेळी मयासुराचा पुत्र व्योमासुर गोपवेषाने त्यांच्यांत शिरला व त्यानें गोपांना उचलून न्यायला सुरुवात केली. गोपालांना उचलून त्यानें एका पर्वताच्या गुहेत दडवून ठेवले. कृष्णाने हे कपट ओळखले व त्याच्यावर झडप घेतली. त्या दैत्यानें प्रचंड रूप धारण केले, पण कृष्णाच्या हातून तो निसटू शकला नाही. कृष्णानें त्याला जमिनीवर आपटून मारून टाकले, गुहेच्या तोंडावरील शिळा काढून त्याने गोपबालकांना मुक्त केले, नंतर आनंदित होऊन गोपालांसह कृष्ण परत गोकुळात आला.

## गोकुळात अक्रूराचे आगमन, गोपींचा विलाप

कंसाची आज्ञा होताच बुद्धिमान अक्रूर रथात बसून गोकुळात नंदाकडे येण्यासाठी निघाला, अक्रुराची कृष्णावर मोठी भक्ती होती. आपणांस आता भगवंतांचे दर्शन होणार, त्यांच्याशी बोलायला मिळणार, त्यांचा सहवास लाभणार, कंसाने आपणांवर हा मोठाच अनुग्रह केला आहे, असे विचार त्याच्या मनात येऊ लागले. वाटेनें त्याला अनेक शुभ-शकुन झाले. श्वफल्काचा पुत्र अक्रूर वाटेनें चालताना कृष्णाचे चिंतन करीतच संध्याकाळी सूर्यास्ताच्या सुमारास गोकुळात येऊन पोचला. गोकुळात सर्वत्र त्याला भगवंतांची पावले उमटलेली दिसली. त्याच्या अंगावर रोमांच उठले. डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. त्याने रथातून उडी टाकली व तो तेथील चरणांकित धुळीत गडबडा लोळू लागला.

त्यानंतर अक्रूर गोकुळात गेल्यावर त्याला गायींच्या गोठ्यात बलराम व कृष्ण यांचे दर्शन झाले. त्यांनी पीत वस्त्र धारण केले होते. त्यांचे दंड पुष्ट होते. त्यांच्या मुखांवर व नेत्रांत हास्य प्रकट झाले होते. सुवासिक उटयांनी त्यांची शरीरे माखली होती. त्यांच्या हातांत फुलांचे

गजरे होते. गळ्यांत रानफुलांच्या माळा होत्या. कृष्णाच्या प्रेमाने गोंधळून गेलेल्या अक्रूराने त्यांना साष्टांग नमस्कार घातला. भगवंतांच्या दर्शनामुळे त्याचे डोळे आनंदाने भरून आले. कृष्णानेही त्याला आपल्या हाताने जवळ ओढून आलिंगन दिले. बलरामाने त्याचे स्वागत करून त्याला उत्तम आसनावर बसविले. अक्रूराचा त्या दोघा बंधूंनी चांगला सत्कार केला. त्याला पवित्र अन्नाचे भोजन दिले.

भोजन झाल्यावर कृष्णाने मथुरेची हकीगत अक्रूरास विचारली. कंस कसा वागतो ? त्याचे काय काय बेत आहेत ? त्या मामामुळे आपणांस फार त्रास झाला. असे कृष्णाने सुचविल्यावर अक्रूराने तेथील परीस्थिती सांगितली. कंस यादवांचा द्वेष करतो, वसुदेवास त्रास देतो, आपण कंसाचा दूत म्हणून आलो आहोत, असे अक्रूराने कृष्णाला सांगितले. सर्व गोपांनी गोरस घेऊन मथुरेला निघण्याची तयारी केली. तेथील समारंभ पाहाण्यासाठी गोकुळवासी लोक उत्सुक झाले. बलराम व कृष्ण यांना घेऊन जाण्यासाठी अक्रूर गोकुळात आला आहे, हे समजताच गोपींना मात्र अतिशय वाईट वाटले. त्यांच्या हृदयाला धक्का बसला. त्यांच्या मुखावरील टवटवी संपली. काहींची वस्त्रे, काहींच्या वेण्या, काहींची कंकणे गळून पडली. आपणांस आता कृष्णाचा विरह होणार म्हणून काही गोपींच्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या.

गोपींनी विधात्यालाच दोष दिला. त्या म्हणाल्या, ' विधात्या, तुला दया कशी नाही ? तू प्राण्यांची प्रेमानं भेट घडवितोस. पण मनोरथ पूर्ण व्हायच्या आतच त्यांचा वियोग घडवितोस. कुरळ्या केसांनी शोभणारं, सुंदर गालांचं, उंच नाकाचं कृष्णाचं मुख आम्हांला थोडा वेळ दाखवून तू आता ते दृष्टीआड करतोस ? तुझं हे करणं दुष्टपणाचं आहे. तू खरोखरच क्रूर असून या अक्रूराकरवी तू कृष्णाला आमच्यापासून दूर नेत आहेस. पण हा नंदपुत्र तरी पाहा कसा. तोही मैत्रीचा भंग करणारा आहे. तो आमच्याकडे पाहातही नाही. घरदार, बांधव, मुलंबाळं, पती यांचा त्याग करून आम्ही या कृष्णाचं दास्य केलं. पण त्याचं त्याला काय ? त्याला नवीन वस्तूच आवडणार. आज खरोखर मथुरेच्या स्त्रिया भाग्यवान. कारण त्यांना या कृष्णाचं डोळे

भरून दर्शन होणार. तेथील स्त्रियांच्या मधुर भाषणांनी या कृष्णाचं मन भरून गेलं की, तो परत आमच्याकडं कसचा येतो ? कृष्णाला मथुरेस नेणारा हा अक्रूर नावाचा असला तरी तो मोठा क्रूर वाटतो.

'पाहा, तो कोरड्या अंतःकरणाचा कृष्ण रथात वसलाही, हे दुष्ट गवळीही त्याच्या मागून निघाले. आमचं दैवच आज प्रतिकूल झालं हेच खरं. आपणच या कृष्णाला प्रतिबंध करावा का ? गोपींनो, रासक्रीडा करताना, मंदहास्य, प्रेमालिंगन, मधुरभाषण, विविध विलास इत्यादींत आपल्यापाशी रमणारा हा कृष्ण. आता त्याच्यावाचून आपला काळ कसा संपेल ? त्याच्याशिवाय आम्ही जिवंत तरी कसं राहावं ?'

असा विलाप करणाऱ्या त्या गोपी 'गोविंदा, दामोदरा, माधवा' अशा हाका मारून मोठ्याने रडू लागल्या. सूर्योदय होताच अक्रूराने स्नानसंध्या आटोपली व गोपींच्या विलापाकडे लक्ष न देता रथ हाकण्यास सुरुवात केली. नंदादी गवळी अनेक नजराणे घेऊन, गोरसाची भांडी घेऊन त्याच्या मागोमाग निघाले. गोपी कृष्णाच्या मार्गावरच उभ्या राहिल्या. आपल्या वियोगाने कष्टी झालेल्या गोपींना कृष्णाने म्हटले,

'मी लौकरच परत येईन.'

पण कृष्णाचा रथ निघून गेला तेव्हा त्याच्या धुळीकडेच त्या चित्रासारख्या पाहात स्तब्ध झाल्या. त्या अत्यंत निराश झाल्या.

## अक्रूरास भगवंतदर्शन, मथुरेस आगमन

श्रीकृष्ण, बलराम, अक्रूर असे तिघेजण रथात बसून निघाले. थोड्याच वेळात पापनाशिनी नदीवर, यमुनेवर येऊन पोचले. त्यांनी निर्मल पाण्याचे आचमन केले. दाट झाडीत थोडी विश्रांती घेऊन राम व कृष्ण विश्रांतीसाठी रथात येऊन बसले. त्यानंतर अक्रूराने यमुनेच्या पाण्यात उतरून स्नान केले. पाण्यात बुडी मारून त्याने गायत्रीचा जप केला. तेव्हा त्या पाण्यात कृष्ण व बलराम यांना अक्रूराने एकत्र पाहिले. पण कृष्ण व बलराम तर रथात बसले होते. मग या पाण्यात कोण ? या शंकेने अक्रूराने बाहेर येऊन पाहिले. तो त्याला राम-कृष्ण रथातही

बसलेले दिसले ! त्यास या गोष्टीचे नवल वाटले. त्याने पुन्हा पाण्यात बुडी मारली. सहस्र फणा उभारलेल्या शेषावर आरूढ झालेला कृष्ण त्यानें पुन्हा पाहिला. सिद्ध, चारण, गंधर्व, असुर इत्यादींनी त्याच्यापुढे मस्तके लवविली होती. ते प्रभूची स्तुती करीत होते. श्रीकृष्णाची मूर्ती अतिशय सुंदर होती. चार हातांत शंख, चक्र, गदा, पद्म ही आयुधे, वक्षःस्थलावर वत्सलांच्छन, कौस्तुभमणी, गळयात वनमाळ होती. भगवंताचे हे रूप पाहून अक्रूराला अतिशय आनंद झाला. त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. त्याच्या अंतःकरणास गहिवर आला. त्यानें मन एकाग्र करून हात जोडले. भगवंतांना नम्रत्वानें नमस्कार केला. त्यानें श्रीहरींची मनापासून स्तुती केली.

पाण्यात झालेल्या भगवंतांच्या दर्शनानें अक्रूर संतुष्ट झाला. मनात आश्चर्य करीत तो पुन्हा आपल्या रथाजवळ आला. कृष्णानें त्याला विचारले, ' तू पृथ्वीवर, आकाशात, पाण्यात काय पाहिलंस ?' तेव्हा अक्रूराने घडलेला सर्व वृत्तान्त सांगितला. तो म्हणाला, ' कृष्णा, या जगात, पृथ्वीवर, आकाशात जे काही चमत्कार आहेत ते सर्व तुझ्याच ठिकाणी आहेत. तुला एकदा पाहिल्यावर आणखी अद्भुत असं पाहायचं काय उरतं ?'

असे म्हणून अक्रूराने रथ चालू केला. दिवस संपायच्या आत ते मथुरेस पोचले. वाटेत कृष्णाच्या दर्शनाने खेडयांतील लोक आनंदित झाले. आधीच पुढे मथुरेस गेलेले नंदादी लोक त्यांची वाट पाहात होते. कृष्ण अक्रूराला म्हणाला, ' अक्रूरा, तू रथ पुढं घेऊन जा. आम्ही इथंच उतरतो. जरा नगर पाहून मग येतो.'

## रजकाचा वध, सुदामा माळयास वर

श्रीकृष्णाचा निरोप घेऊन एकटाच अक्रूर खिन्न मनाने मथुरेत गेला. कंसास त्याने सर्व वृत्तान्त कळविला. दुपारच्या वेळी गोपांना बरोबर घेऊन कृष्ण व बलराम मथुरा नगरी पाहाण्यासाठी भटकू लागले. मथुरेच्या वेशीची दारे स्फटिकाची होती. दारांवर मोठया कमानी असून त्यांवर सोन्याची तोरणे बांधली होती. नगराच्या भोवती खंदक

होता. लहानमोठ्या बागांनी नगरी सुंदर दिसत होती. सुवर्णाचे चव्हाटे, वाड्यांपुढील उद्याने, व्यापारी पेठा, भव्य इमारती, घरांचे ओटे, गच्च्या, खिडक्या, फरशा, इत्यादींना वैडूर्य, हिरे, स्फटिके, नील, पोवळी, मोत्ये, पाचू इत्यादींनी तयार केले होते. कबूतरांचा व मोरांचा शब्द घुमत होता. रस्त्यावर सर्वत्र पाणी शिंपडले होते. त्यांवर फुले, कोवळे कोंब, लाह्या, तांदूळ पसरून नक्षी केली होती.

प्रत्येक घराच्या दरवाज्याशेजारी पाण्याने भरलेले माठ होते. त्यांवर चंदनाचे व दह्याचे पट्टे ओढले होते. त्यांवर फुलांच्या माळा होत्या. तोंडावर आंब्याच्या डहाळ्या होत्या. घरांवर केळीचे खुंट होते. त्यांना केळ्यांचे घड लगडलेले होते. प्रत्येक घरापुढे जरीच्या कापडाचे ध्वज उभे केले होते. राम व कृष्ण मथुरेच्या रस्त्यांतून चालले असताना त्यांना पाहाण्यासाठी मथुरेच्या स्त्रियांची एकच धांदल उडाली, कित्येक आपल्या घरांच्या गच्चीवर चढून पाहू लागल्या. कित्येकांनी गडबडीत आपली वस्त्रे व भूषणे उलटीच धारण केली. कित्येकांनी जोडीच्या वस्त्रांपैकी, अलंकारांपैकी एकएकच धारण केले. कित्येकांनी एकाच डोळ्यात काजळ घातले. कित्येक स्त्रियांनी जेवण अर्धवट टाकले. कित्येक जणी न्हाण्याची तयारी करीत असताना तशाच आल्या. कित्येक स्त्रिया मुलांना पाजीत असताना आल्या.

राम-कृष्णांच्या दर्शनाने मथुरेच्या स्त्रियांना अतिशय हर्ष झाला. त्यांनी कृष्णाला आपल्या हृदयांत साठवून घेतले. काहींनी राम-कृष्णां-वर पुष्पवृष्टी केली. काहींनी गोकुळातील गोप-गोपींचा हेवा केला. एवढ्यात कपडे धुणारा व रंगविणारा एक धोबी रस्त्यात आला. कृष्णाने त्याला उत्तम धुतलेली वस्त्रे मागितली. तेव्हा तो धोबी कृष्णाला अत्यंत रागाने व तिरस्काराने म्हणाला, 'अरे, तुम्ही डोंगरावर राहाता, रानात फिरता. तुम्ही असली वस्त्रं कधीतरी पाहिली होती का? उन्मत्तांनो, तुम्ही राजाच्या वस्त्रांची इच्छा करता? मूर्खांनो, चला. इथून निघून जा. नाहीतर राजसेवकांकडून मार खाल.'

एवढ्या रागाने अपशब्द बोलणाऱ्या त्या रजकाचा कृष्णास अतिशय क्रोध आला. त्याने आपल्या एका टिचकीने त्याचे मस्तक

धडावेगळे केले. त्याचे सेवक वस्त्रांचे गाठोडे सोडून पळून गेले. कृष्णानें स्वत:साठी व बलरामासाठी दोन वस्त्रे घेतली. बाकीची आपल्या गोपांना दिली. एका कोष्टयानें त्यांना सुंदर रंगांची वस्त्रे बनवून दिली. कृष्णानें त्या कोष्टयाला आपले स्वारूप्य दिले. संपत्ती, बल, ऐश्वर्य, स्मृती, इंद्रियशक्ती यांनी त्याला समृद्ध केले.

त्यानंतर राम व कृष्ण हे दोघे सुदाम नावाच्या एका माळयाच्या घरी गेले. ते येताच माळयानें त्यांना साष्टांग नमस्कार केला. त्यांचे त्यानें पाय धुतले. फुलांच्या माळा, विडे, उटया, भेटी देऊन त्यानें उभयतांची मनापासून पूजा केली. त्या सुदाम माळयानें त्या दोघांच्या गळयांत उत्तम अशा सुवासिक पुष्पांच्या माळा घातल्या. त्या माळयास रामकृष्णांनी अनेक वर दिले. त्यांना अचल भक्ती, मैत्री, प्रेम, वंशवृद्धी, संपत्ती, बल, आयुष्य, यश, कांती देऊन श्रीकृष्ण व बलराम तेथून निघून गेले.

## कुब्जेस कृपाप्रसाद, यागधनुष्याचा भंग

मथुरेच्या राजमार्गावरून जात असताना कृष्णाने सुंदर मुखाची एक स्त्री पाहिली. पण ती शरीराला कुबड आल्यामुळे वाकडी झाली होती. हातात उटीचे पात्र घेऊन जाणाऱ्या त्या स्त्रीस कृष्णाने विचारले, 'सुंदरी, तू कोण आहेस ? ही उटी कुणाची आहे ? ती आम्हांस देतेस ? तुझं कल्याण होईल.' तेव्हा ती तरुणी म्हणाली, 'सुंदरा, माझं नाव त्रिवक्रा आहे. अंगराग तयार करणारी मी कंसाची एक दासी आहे. मी केलेलं चंदन त्या भोजराजाला फारच आवडतं. पण असल्या या चंदनास तुम्हां दोघांशिवाय दुसरा पुरुष कोण योग्य आहे ?'

कृष्णाच्या रूपानें, सुकुमारपणानें, माधुर्यानें, हंसण्यानें, बोलण्यानें ती मोहित झाली होती. तिने ते सर्व चंदन उभयतांना दिले. त्या चंदनाने कृष्ण अतिशय शोभिवंत दिसू लागला. त्या कुब्जेला आपण सरळ करावे, असा विचार कृष्णाने केला. त्याने आपल्या दोनही पायांनी तिचे दोन चवडे दाबून धरले. आपल्या हाताने तिची हनुवटी धरून तिला वर खेचले. तेव्हा तिचा देह सरळ झाला. कृष्णाच्या स्पर्शाने

मोठ्या नितंबांनी व स्तनांनी युक्त अशी ती एक सुंदर स्त्री बनली. रूप, गुण, औदार्य यांनी युक्त अशी ती स्त्री आसक्त बनून तिने कृष्णाच्या वस्त्राचे एक टोक ओढून कृष्णास म्हटले,

'वीरा, चल. आपण घरी जाऊ, तुला इथंच सोडून जाणं माझ्या मनाला बरं वाटत नाही. पुरुषश्रेष्ठा, तुझ्या दर्शनानं माझं मन क्षुब्ध झालं आहे. तू माझ्यावर प्रसन्न व्हावंस.'

'सुंदरी,' गोपांकडे पाहून हसतच श्रीकृष्ण तिला म्हणाला, 'घरदार नसलेल्या आम्हां प्रवाशांना तूच एक चांगला आश्रय आहेस. पण माझं इथं काही काम आहे. ते झाल्यावर पुरुषांची मनोव्यथा नष्ट करणाऱ्या अशा तुझ्या घरी येईन.'

अशा मधुर शब्दांनी कृष्णाने कुब्जेस निरोप दिला. रस्त्यावरून जाताना त्याने अनेक व्यापाऱ्यांकडून भेटीचे पदार्थ स्वीकारले. तांबुल, पुष्पमाला, चंदन यांनी अनेकांनी त्या उभयतांची पूजा केली. कृष्णाला पाहाताच तर स्त्रिया कामभावनेने पीडित झाल्या. त्यांना आपल्या देहाचे भान उरले नाही. वस्त्रे, केस, कंकणे यांचेही भान त्यांना राहिले नाही.

अशा प्रकारे सर्वांना आनंद देत देत कृष्ण व बलराम धनुर्यागाच्या ठिकाणी येऊन पोचले. त्यांना तेथे इंद्राच्या धनुष्यासारखे एक आश्चर्य-युक्त धनुष्य दिसले. त्याची पूजा केली असून कंसाचे सेवक त्याचे रक्षण करीत होते. कृष्णाने लोक प्रतिकार करीत असतानाही ते धनुष्य बळेच उचलून घेतले. त्याला दोरी लावली व एखादे उसाचे कांडे जसे मोडतात तसे ते त्याने क्षणात मोडून टाकले. त्याच्या आवाजाने स्वर्ग, पृथ्वी, दशदिशा दणाणून गेल्या. कंसाला भीती वाटली. प्रतिकार करणाऱ्या काही राक्षसांचा व सैन्याचा नाश श्रीकृष्णाने केला. या सर्व प्रकाराने दुष्ट बुद्धीच्या कंसास रात्रभर झोप आली नाही. त्याला मृत्यूचीच स्वप्ने पडत राहिली. नाना प्रकारचे अपशकुन त्याला झाले.

दुसऱ्या दिवशी आखाड्यात नगारे, तुताऱ्या यांचे आवाज झाले. मल्लांच्या क्रीडेस आता प्रारंभ होणार होता. फुलांच्या माळांनी, पताकांनी, तोरणांनी सर्वत्र शोभा आली होती. ब्राह्मण, क्षत्रिय, निर-निराळे राजे आपापल्या स्थानांवर बसले. कंसही आपल्या प्रधानासह

खिन्न मनाने सिंहासनावर येऊन बसला. चाणूर, मुष्टिक, कूट, शल, तोशल इत्यादी मल्लांची युद्धासाठी तयारी झाली. याच प्रसंगी श्रीकृष्णाने अनेक अद्‌भुत पराक्रम केले. प्रथम त्याने कुवलयपीड नावाच्या हत्तीचा वध केला. मल्लयुद्ध करून चाणूर, मुष्टिक व कंस यांचा वध करून रामकृष्णांनी देवकी व वसुदेव यांची भेट घेतली. आपल्या माता-पित्यांचे सांत्वन केले. उग्रसेनास राज्यावर बसविले.

यानंतर रामकृष्णांचे उपनयन झाले. अवन्तीनगरात राहाणाऱ्या काश्यपगोत्री सांदीपनी नावाच्या गुरूंच्या घरी त्यांनी मन लावून अध्ययन केले. इंद्रियदमन करून, शरीरकष्ट करून, गुरूंची सेवा करून वेद, वेदांगे, उपनिषदे यांचे अध्ययन रामकृष्णांनी केले. धनुर्वेद, धर्मशास्त्र, न्यायशास्त्र, तर्कशास्त्र, राजनीती इत्यादींचाही अभ्यास त्यांनी तेथे केला. गुरूंची दक्षिणा म्हणून सांदीपनींचा मुलगा प्रभासक्षेत्रात समुद्रात बुडाला होता, त्याला कृष्णाने परत आणून गुरूंच्या स्वाधीन केले.

## उद्धव व गोकुळच्या गोपी

उद्धव नावाचा एक अत्यंत बुद्धिमान पुरुष यादवांत श्रेष्ठ व सल्लामसलतीत अत्यंत उपयुक्त होता. तो कृष्णाचा मित्र व बृहस्पतीचा शिष्य होता. त्यास एकदा श्रीकृष्णाने म्हटले, 'उद्धवा, तू गोकुळात जा. नंद व यशोदा यांचं समाधान कर. माझा निरोप गोपींना सांगून तू त्यांना झालेलं विरहाचं दुःख दूर कर.' कृष्णांच्या सांगण्यावरून उद्धव रथात बसून गोकुळात नंदाकडे येण्यासाठी निघाला. सूर्य मावळत असताना उद्धव गोकुळात येऊन पोचला. गुरांच्या खुरांनी उडविलेल्या धुळीनें उद्धवाचा रथ माखून गेला. अत्यंत मनोहर व कर्तव्यतत्पर अशा गोकुळाचे दर्शन उद्धवाने घेतले.

नंद व उद्धव यांची भेट आलिंगनपूर्वक झाली. नंदादी गोपांनी त्याला मथुरेतील सर्व वृत्तान्त विचारला. नंदाने आपल्या पुत्रांच्या सर्व लीला मोठ्या कौतुकाने व प्रेमानें उद्धवास ऐकविल्या. त्याचे उत्कट प्रेम पाहून, यशोदेचे वात्सल्य पाहून उद्धव संतोषित होऊन म्हणाला,

'श्रीकृष्ण थोड्याच अवधीत गोकुळात परत येणार आहे. नंदा, यशोदे, आता तुम्ही कसलाच खेद करू नका. श्रीकृष्ण सर्वांच्या अंतःकरणात असतोच. त्याला वास्तविक कुणी प्रिय नाही, कुणी अप्रिय नाही. त्याला माता नाही, पिता नाही, पत्नी नाही, पुत्र नाहीत. त्याला कुणी आपला नाही, कुणी परका नाही, पण तो अवतार घेतो. पण नंदा, यशोदे, भगवान श्रीहरी हा तुमचा एकटयांचाच पुत्र नाही. तो सर्वांचा पुत्र, सर्वांचा आत्मा, सर्वांचा पिता, सर्वांची माता आहे, तो सर्व विश्वाचा स्वामी आहे.'

अशा संवादात सर्व रात्र संपली. पहाटे गोकुळातील गोपी जाग्या झाल्या. त्यांनी दीप लावून घरे आणि अंगणे स्वच्छ केली. त्या दही घुसळू लागल्या. मंथन चालू असताना त्यांच्या हातांतील कंकणांचे मधुर ध्वनी होत होते. त्यांचे नितंब, त्यांचे स्तन, त्यांच्या गळयांतील पुष्पहार हलत होते. श्रीकृष्णाच्या लीलांचे गायन त्या करीत होत्या. सकाळी त्यांनी नंदाच्या घराशी एक सुवर्णाचा रथ पाहिला. त्यांनी त्याची चौकशी केली. एवढ्यात उद्धवच आपले प्रातःकर्म आटोपून बाहेर आला. त्या श्रीकृष्णभक्ताकडे पाहाताच गोपींची मने उल्हसित झाली. अनेक शंकांनी प्रेरित होऊन त्या उद्धवापाशी जमल्या. त्या उद्धवास म्हणाल्या,

'तुम्ही कृष्णाचे सेवक. आमच्या स्वामीनं आमचं समाधान करण्यासाठी इथं तुम्हांला पाठविलं ना ?' इतके म्हणून कृष्णाच्या लीला आठवून गोपी रडू लागल्या. एवढ्यात एक भ्रमर तेथे येऊन गुंजारव करू लागला. त्यालाच कृष्णाचा दूत समजून एक गोपी म्हणाली, 'मधुकरा, तू त्या कृष्णाचा धूर्त दूत आहेस. तू माझ्या पायाला स्पर्श करू नकोस. दूता, आमच्या सवतींच्या स्तनांवर लोळणाऱ्या कृष्णाच्या गळ्यातील केशराच्या रंगानं तुझ्या तोंडावरचे केस रंगलेले आहेत. त्या मानिनी स्त्रियांनाच कृष्णानं संतुष्ट करावं. तू जसा फुलांचा आस्वाद घेतलास की त्यांना टाकून जातोस, तसाच हा कृष्ण आम्हांला अधरामृत देऊन तो निघून गेला. आम्हांस नवल वाटतं की, त्याच्या चरणांची सेवा लक्ष्मी काय म्हणून करते ? ती बहुधा त्याच्या गोड बडबडीवर

भाळून गेली असावी. मधुकरा, तू कृष्णाचे ते जुने गुण कशासाठी गातोस रे ? आम्हांला ना घर. ना दार. भ्रमरा, माझ्या मस्तकावरचा पाय तू काढ. प्रार्थना करणाऱ्या त्या चतुर कृष्णाचा तू दूत आहेस, त्याच्यासाठी आम्ही मुलं, पती, स्वर्गादी लोक सोडून दिले. मग त्यानं आमचा त्याग का केला रे ? त्याच्याशी आता पुन्हा सख्य कशासाठी करायचं ? दूता, आम्ही आता त्याच्या लवाड भाषणावर विश्वास ठेवून फसलो आहोत. आता त्याच्या गोष्टी पुरेत. काही दुसरं असेल तर सांग. तू आता आम्हांस त्या कृष्णाजवळ का नेतोस ? अरे, एकदा त्याची संगत जडली की, ती सोडणं फार कठीण. पण भ्रमरा, आमचा तो स्वामी मथुरेत आहे ना ? त्याला नंदाची आठवण होते ? गोपांचं कधी स्मरण त्याला होतं काय ? आमची स्मृती त्याला होते काय ?'

गोपींचे हे भाषण ऐकून उद्धव त्यांना म्हणाला, 'गोपींनो, तुम्ही कृतकृत्य आहात. कारण तुमचं सर्वस्व त्या कृष्णास समर्पण झालं आहे. अहो, या कृष्णाची भक्ती साध्य व्हावी म्हणून दान, व्रतं, तप, यज्ञ, जप, वेदांचं अध्ययन, इंद्रियदमन इत्यादींचा प्रयत्न करावा लागतो. त्याची भक्ती ऋषींनाही दुर्लभ आहे. पण ही निरुपम भक्ती तुम्ही प्राप्त करून घेतली आहे. गोपींनो, तुमचा भाव हा माझ्यावर एक प्रकारचा उपकारच आहे.' इतके म्हणून उद्धवानें गोपींना कृष्णाचा निरोप सांगितला. तो ज्ञानमय निरोप ऐकून गोपींना अतिशय आनंद झाला. पण गोपींनी त्याला पुन्हा विचारले.

'उद्धवा, तो कृष्ण मथुरेत सुखरूप आहे असं समजून आनंद वाटला. पण उद्धवा, तो कृष्ण इथं आमच्यावर जसं प्रेम करीत होता, तसंच तो मथुरेतील स्त्रियांवरही करतो का ? तो निपुण पुरुष स्त्रियांचा अत्यंत आवडता आहे. त्यातून त्या मथुरावासी स्त्रिया. त्यांच्या मधुर भाषणांनी, विलासांनी तो बांधला गेला असेल, नाही ? आमची, या गावंढळ गोपींची त्याला आठवण तरी होते का ? वृंदावनातील क्रीडेची आठवण तरी तो करतो का ? विरहदुःखानं आम्ही पीडलेल्या आहोत. आपल्या अंगस्पर्शानं तो आम्हांस टवटवीत करील का ? पण तो आता इकडं कशाला येतो ? त्याला आता राज्य मिळालं. मोठमोठ्या राज-

कन्यांशी त्यानं विवाह केला. त्याला आता आम्हां रानवट गोपींची काय जरूरी ? पण कृष्णाबद्दलची आमची आशा मात्र सुटत नाही. उद्धवा, त्या नंदपुत्राची आम्हांस सारखी आठवण येते रे. त्याचं सुंदर चालणं, मोहक हास्य, विलासयुक्त कटाक्ष, गोड भाषण, यांनी आमचं मन वेधून गेलं आहे. आम्हांस त्याचा विसर कसा पडावा ?'

गोपींच्या मनाचे दुःख दूर करण्यासाडी उद्धव काही काळ गोकुळातच राहिला. गोपगोपींनी त्याच्याबरोबर कृष्णलीलांचे गायन व श्रवण केले. गोपालांची निष्ठा पाहून, गोपींचा प्रेमभाव पाहून उद्धव तृप्त झाला. गोपींच्या भाग्याचे, सौख्याचेही वर्णन उद्धवाने मनापासून केले गोपींच्या पायधुळीला त्याने वंदन केले. मग त्याने सर्वांचा निरोप घेतला व तो मथुरेस जाण्यासाठी निघाला. त्याने गोपींच्या मनांतील गाढ भक्ती कृष्णाला वर्णन करून सांगितली. वसुदेव, बलराम, उग्रसेन यांना गोकुळातून आणलेल्या वस्तू भेट म्हणून दिल्या.

## कुब्जेस वरदान, अक्रूर हस्तिनापुरात

कुब्जा दासीस दिलेले वचन श्रीकृष्णांस माहीत होते. तिच्या मनाची पीडा दूर करावी, म्हणून तो एकदा तिच्या घरी गेला. तिचे घर मूल्यवान सामग्रीने व कामोद्दीपक वस्तूंनी भरले होते. मोत्यांचे हार, पताका, छते, सुंदर शय्या, आसने, सुगंधी धूप, दीप, सुवासिक फुलांच्या माळा, यांनी तिचे घर नटलेले होते. कृष्ण घरी येत आहे असे पाहून कुब्जा आपल्या जागेवरून लगबगीने उठली. त्याला आसन देऊन तिने त्याचे मनापासून स्वागत केले. मूल्यवान अशा शय्येवर कृष्ण बसला होता. स्नान करून, अंगाला उटी लावून, भूषणे घालून, फुलांच्या माळा, सुगंधित पदार्थ, विड्याचे साहित्य, मद्य इत्यादींनी प्रसन्न असलेली कुब्जा लाजत, हसत कृष्णाजवळ आली. श्रीकृष्णाने तिला हाक मारून तिचा कंकणांनी शोभणारा हात आपल्या हातात धरला. तिला जवळ घेऊन कृष्णाने तिची मनकामना पूर्ण केली.

या कुब्जेने कृष्णाला पूर्वी एकदा उटी दिली होती. एवढेच तिचे पुण्य श्रीकृष्णाच्या पदस्पर्शाने तिने आपला ताप दूर केला. त्याचे पाय

हुंगून, त्याला आलिंगन देऊन तिनें आपल्या मनाचे दु:ख दूर केले ती कुब्जा कृष्णाला म्हणाली, 'प्रियतमा, आता आपण इथंच राहून मज-बरोबर क्रीडा करावी. तुझी संगत आता मी कशी सोडू रे?' तिचे म्हणणे ऐकून कृष्णानें तिला इष्ट असा वर दिला. तिचा योग्य तो मान राखून तो आपल्या घरी गेला.

त्यानंतर कृष्ण अक्रूराच्या घरी गेला. अक्रूराने त्याला प्रेमपूर्वक आलिंगन देऊन त्याचे अभिनंदन केले. त्याचा सन्मान केला. त्यानें कृष्णाला उत्तम वस्त्र, सुगंधी पदार्थ, माळा, अलंकार इत्यादी वस्तू अर्पण केल्या. कृष्णाचे पाय आपल्या मांडीवर घेऊन अक्रूराने मनापासून त्याची स्तुती केली. कृष्णही त्याला म्हणाला, 'अक्रूरा, तू आम्हांला पित्याच्या, चुलत्याच्या जागी आहेस. तूच आमचा हितकर्ता आहेस. तू सज्जन व सर्वांचा मित्र आहेस. म्हणून तू आता हस्तिनापुरात जाऊन पांडवांची स्थिती पाहून ये. पांडू मरण पावल्यानं त्याच्या अल्पवयीन पुत्रांना, त्यांच्या मातेला अतिशय दु:ख झालं असेल. तू तिथं जा व त्यांचा समाचार घे.'

त्याप्रमाणे अक्रूरानें हस्तिनापुरात जाऊन धृतराष्ट्र, भीष्म, विदुर, कुंती, बाल्हीक, सोमदत्त, द्रोणाचार्य, कृपाचार्य, कर्ण, दुर्योधन, अश्वत्थामा, पांडव इत्यादींची भेट घेतली. धृतराष्ट्राचे पुत्र दुष्टपणाने वागून पांडवांना त्रास देतात, हे त्याला तेथे समजले. कुंती व विदुर यांनी त्यांच्या घातपाताच्या कृत्यांची माहिती अक्रूरास दिली. कुंतीनेही अक्रूराजवळ आपल्या माता-पित्यांची, भावा-बहिणींची चौकशी केली. शरणागतांचे रक्षण करणारा आपला भाचा कृष्ण आपल्या आते-भावंडांची चौकशी करतो का? अशीही विचारणा तिने केली. ती म्हणाली, 'माझं व पितृहीन झालेल्या माझ्या पुत्रांचं सांत्वन तो कृष्ण कधी गोड शब्दांनी करील का? योगीश्वर कृष्णा, पुत्रांसह मी तुला शरण आले आहे. आमचं संरक्षण तू करावंस. तुझ्या पदकमलांशिवाय मला दुसरा आश्रय नाही.' कृष्णाची आठवण काढून कुंती बरीच रडली. अक्रूराने तिचे सांत्वन केले. त्याने धृतराष्ट्रालाही उपदेश केला व तो परत मथुरेस येण्यासाठी निघाला. धृतराष्ट्राचे वर्तन पांडवांशी कसे

आहे हे त्याने कृष्णास समजावून दिले.

## श्रीकृष्णांचे उत्तरचरित्र*

भागवताच्या दहाव्या स्कंधात प्रामुख्याने विस्तृत असे कृष्णचरित्र आले आहे. गोकुळ व वृंदावन यांतील कृष्णलीला संपत आल्यावर कृष्णाचे उत्तरायुष्य सुरू होते. मथुरेत त्याने कंसादिकांचा वध केला. त्यानंतर जरासंधाने मथुरेला वेढा दिला. राम-कृष्णांनी जरासंधाशी युद्ध केले. कालयवनानेंही मथुरेवर स्वारी केली. श्रीकृष्णानें समुद्रात बारा योजने विस्तीर्ण अशी व सर्व प्रकारांनी अद्‌भुत अशी नगरी निर्माण केली. विश्वकर्म्यानें त्या नगरीत लहान-मोठे रस्ते, चौक, बाजार यांची रचना केली होती. कल्पवृक्ष व कल्पलता यांची उद्यानें तेथे होती. स्फटिकांच्या माड्यांची घरे, वेशी, त्यांवर सुवर्णाचे कळस, असे द्वारकेचे वैभव होते. नगरात चांदीची, पितळेची कोठारे होती. देवदेवतांची मंदिरे, सज्जांची घरे, चारही वर्णांचे लोक, यादवांचे वाडे, यांनी नगर सुशोभित झाले होते. महेंद्राने सुधर्मा नावाचे एक सभागृह व पारिजातक वृक्ष नगरात पाठवून देऊन आणखी शोभा वाढविली. कुबेरानें आठ द्रव्यकोश श्रीकृष्णाला अर्पण केले.

यानंतर श्रीकृष्णाच्या चरित्रात आणखी महत्त्वाच्या घटना आल्या आहेत. कालयवनाचा मृत्यू, मुचुकुंदास वरदान, रुक्मिणीची स्वयंवर-कथा, रुक्मिणीची प्रेमपत्रिका, कृष्णाचे कुंडिनपुरास आगमन, रुक्मिणीचे देवालयात गमन, रुक्मिणीचे हरण, शिशुपालाशी युद्ध व त्याचा पराभव, जरासंधाचा शिशुपालास उपदेश, प्रद्युम्नाचा जन्म, रतीची भेट, शंबरासुराचा वध, स्यमंतकोपाख्यान, सत्राजिताला स्यमंतक मण्याची प्राप्ती, कृष्णावर आळ, मण्याचा शोध, जांबवानाशी युद्ध, सत्यभामेशी विवाह, सत्राजिताचा वध, शतधन्व्याचा वध, कृष्णाचे हस्तिनापुरास आगमन, अष्टनायिकांशी विवाह, भौमासुराचा वध, पारिजातकाची प्राप्ती,

* यापूर्वी ब्रह्मपुराणात, विशेषत: विष्णुपुराणात कृष्णांचे सविस्तर चरित्र आले असल्याने येथे फक्त प्रमुख प्रसंगांचा निर्देश केला आहे.

सोळाहजार एकशे वधूंशी विवाह, कृष्ण-रुक्मिणींचा प्रेमकलह, बाणासुराचे आख्यान, उषास्वप्न, चित्रलेखन, उषा व अनिरुद्ध यांची भेट, अनिरुद्धाचे बंधन, बाणासुराशी युद्ध, शंकरांनी केलेली कृष्णस्तुती, बलरामाची यमुनाक्रीडा, पौंड्रकाचा व काशीराजाचा वध, द्विविधासुराचा वध, सांबाचे बंधन, सांब-लक्ष्मणा यांचा विवाह, जरासंधाचा वध, धर्मराजाचा राजसूययज्ञ, श्रीकृष्णाची अग्रपूजा, शिशुपालाचा वध, मयसभेत दुर्योधनाचा मानभंग, शाल्वाचा वध, दंतवक्त्राचा वध, विदूरथाचा वध, बलरामाकडून रोमहर्षणाचा वध, बल्लवाचा वध, बलरामाची तीर्थयात्रा; अशा अनेक कथाप्रसंगांचे रसाळ व सविस्तर वर्णन भागवतकारांनी दहाव्या स्कंधात केले आहे. त्यांतील दोन-तीन प्रसंगांची ओळख करून घेऊ.

## श्रीकृष्णांचा संसार

श्रीकृष्णांची पहिली अत्यंत आवडती पत्नी रुक्मिणी. त्यांना प्रद्युम्न नावाचा एक मुलगा झाला. सत्यभामा व जांबवती या आणखी दोन कृष्णांच्या पत्नी. जांबवानाने कृष्णाला स्यमंतक मण्याबरोबर आपली कन्या जांबवती समर्पण केली. सत्यभामा ही सत्राजिताची कन्या. श्रीकृष्ण एकदा पांडवांची चौकशी करण्यासाठी इंद्रप्रस्थास गेले होते. यमुनेच्या तीरावर एक स्त्री तपश्चर्या करताना त्यांना आढळली. कृष्णांनी तिची इच्छा जाणून तिच्याशी विवाह केला. हिचे नाव कालिंदी. अर्जुनाकडून कृष्णांनी खांडववन जाळून तेथे नवीन वसती केली. मयासुर याच वेळी त्यांचा मित्र झाला. अवंती देशाची राजकन्या मित्रविंदा ही कृष्णांची आणखी एक पत्नी होय. कोसल देशाचा राजा नग्नजित. त्याची सत्या नावाची एक कन्या कृष्णांची पत्नी होती. भद्रा नावाची त्यांची एक आतेबहीण त्यांची पत्नी झाली. भद्रदेशाच्या राजकन्येला पळवून आणून कृष्णांनी आणखी एक लग्न केले. या पत्नीचे नाव लक्ष्मणा होय. यानंतर भौमासुराने पळवून बंदिखान्यात ठेविलेल्या सोळा हजार कन्यांनी श्रीकृष्णांना आपला पती मानले होते.

श्रीकृष्णांच्या प्रत्येक स्त्रीला दहा दहा पुत्र झाले. प्रद्युम्न,

चारुदेष्ण, सुदेष्ण, चारुदेह, सुचारू, चारुगुप्त, भद्रचारू, चारुचंद्र, विचारू आणि चारू असे दहा पुत्र रुक्मिणीस झाले. भानू, सुभानू, स्वर्भानू, प्रभानू, भानुमान, चंद्रभानू, बहद्भानू, अतिभानू, श्रीभानू व प्रतिभानू हे सत्यभामेचे दहा पुत्र. सांब, सुमित्र, पुरुजित, शतजित, सहस्रजित, विजय, चित्रकेतू, वसुमान, द्रविड व ऋतू हे जांबवतीचे पुत्र. वीर, चंद्र, अश्वसेन, चित्रगू, वेगवान, वृष, आम, शंकू, वसू आणि सुस्वरूप हे नाग्नजिताचे पुत्र होत. श्रुत, कवी, वृष, वीर, सुबाहू, भद्र, शांती, दर्श, पूर्णमास, सोमक हे कालिंदीचे पुत्र. प्रघोष, गात्रवान, सिंह, बल, प्रबल, ऊर्ध्वग, महाशक्ती, सह, ओज व अपराजित हे लक्ष्मणाचे पुत्र होत. वृक, हर्ष, अनिल, गृध्र, वर्धन, अन्नाद, महाश, पावन, वन्ही, क्षुधी हे मित्रविंदेचे पुत्र होत. संग्रामजित, बृहत्सेन, शूर, प्रहरण, अरिजित, जय, सुभद्र, वाम, आयू, सत्यक हे भद्रेचे पुत्र. रोहिणीच्या पुत्रांपैकी दीप्तिमान व ताम्रतप्त हे मुख्य होत. प्रद्युम्न व रुक्मवती यांना अनिरुद्ध नावाचा पुत्र झाला. हा श्रीकृष्णांचा नातू होय.

श्रीकृष्ण आपल्या योगसामर्थ्यानें सर्व राण्यांशी प्रेमानें संसार करीत. त्यांच्या पुत्रांचा व पौत्रांचा विस्तारही खूप मोठा होता. पहाटे कोंबडा आरवला की कृष्णांचा आता आपणांस वियोग होणार असे त्यांच्या पत्नींना वाटून त्या कोंबड्यास दूषणे देत असत. मंदारवृक्षाच्या बागेवरून वायू अंगावर येऊ लागला की, भुंग्यांचा गुंजारव सुरू होई. जागे झालेले पक्षी किलबिलाट करीत. श्रीकृष्ण ब्राह्ममुहूर्तावर शयनावरून उठत. उदकानें हात-पाय धुऊन शांतपणानें आत्मचिंतन करीत. त्यानंतर निर्मल पाण्यात बुडी मारून शास्त्रविधीनुसार ते स्नान करीत, संध्या-वंदनादी सर्व विधी करून ते अग्नीला आहुती देत. मौन राहून गायत्री-मंत्राचा जप करीत.

नंतर उगवत्या सूर्याला अर्घ्यं देऊन आपलेच अंश असे जे देव, ऋषी, पितर यांना तर्पण करीत. वृद्ध ब्राह्मणांची पूजा होई. ज्यांच्या शिंगांना सोन्याची टोपणे आहेत, गळ्यात मोत्यांच्या माळा आहेत, नुकत्याच व्यालेल्या आहेत, अशा सवत्स गायींचे वस्त्रालंकारांसहित ते दान करीत. त्या गायींच्या खुरांची टोके रुप्यानें मढवलेली असत. वस्त्रे

हरिणाजिनें, तीळ इत्यादींचेही दान होई. अशा प्रकारे रोज एक बद्ध (१३०८४) गायींचे ते दान करीत. ते स्वतःस पीतांबरादी वस्त्रे, कौस्तुभमणी, उत्तम माळा, उटचा यांनी भूषवीत. तुपात व आरशात स्वतःचे प्रतिबिंब पाहून बैल, ब्राह्मण, देव यांचे ते दर्शन घेत. सर्व वर्णांच्या लोकांना व प्रजेला ते भेटवस्तू देऊन संतुष्ट करीत.

एवढ्यात सारथी त्यांचा रथ उत्तमोत्तम घोड्यांना जुंपून जवळ आणून उभा करी. स्वतः त्यांच्यापुढे हात जोडून उभा राही. उद्धव, सात्यकी इत्यादी यादवांना बरोबर घेऊन ते रथावर चढत. अंतःपुरातील स्त्रिया त्यांना लाजून निरोप देत. मग ते यादवांसह सुधर्मा नावाच्या राजसभेत येत. त्यांच्या तेजाने दहाही दिशा प्रकाशून जात. काही नट, भाट, चारण, नृत्य करणाऱ्या वारांगना इत्यादी करमणूक करीत. मृदंग, वीणा, डमरू, मुरली, करताल, शंख इत्यादी वाद्यांच्या स्वरांत, पुराण, स्तुतिपाठ, गायन, नर्तन, पूर्वजांच्या कथांचे श्रवण, असे कार्यक्रम होत.

## श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा प्रीतिकलह

नरकासुराच्या बंदिखान्यात पडलेल्या सोळा हजार कुमारींची सुटका कृष्णांनी केली. भौमासुराचा वध झाल्यावर द्वारकेस येऊन श्रीकृष्णांनी त्या कन्यांशी निरनिराळ्या मंदिरांत विवाह केला. त्यांनी सोळा हजार रूपे धारण केली होती. त्यांची मंदिरे वेगवेगळ्या प्रकारची असून एक दुसऱ्यासारखे नव्हते. त्या मंदिरांत तो अविनाशी भगवान आत्मानंदात रमू लागला. गृहस्थाश्रमाची कामे पार पाडू लागला. श्रीकृष्णांना शेकडो दासी होत्या. त्या त्यांची मनोभावे सेवा करीत. त्यांना सामोरे जाऊन पाय धुवायला पाणी देत. त्यांना विडा करून देत. त्यांचे पाय चेपून त्यांचा श्रमपरिहार करीत. त्यांना पंख्याने वारा घालीत. गळ्यात सुगंधी फुलांच्या माळा घालीत. त्यांच्या केसांना तेले लावून सुंदर रचना करीत. त्यांची शय्या, त्यांचे स्नान, त्यांचे खाणेपिणे यांची व्यवस्था करीत.

एके दिवशी श्रीकृष्ण आपल्या शय्येवर स्वस्थपणानें बसले होते. रुक्मिणी त्यांच्या जवळच होती. दासी त्यांना पंख्यांनी वारा घालीत

होत्या. त्या मंदिराला तेजस्वी मोत्यांच्या झालरी होत्या. रत्नांचे दिवे प्रकाशत होते. मोगऱ्यांच्या माळा सर्वत्र लाविलेल्या असून खिडकीतून चंद्राचे शीतल किरण आत येत होते. जवळच्या उद्यानातील पारिजातकाच्या फुलांचा सुगंध येत होता. रुक्मिणीने दासीच्या हातातून रत्नांच्या दांड्याची एक चवरी स्वतःच्या हातात घेतली. ती स्वतः श्रीकृष्णांना वारा घालू लागली. तिच्या पायांतील रत्नजडित नूपुरांचा आवाज होत होता. अंगठ्या व कंकणे यांनी शोभणारा हात वारा घालीत होता. वस्त्रांखाली झाकलेल्या स्तनांवरील केशरांच्या उटीमुळे तिच्या गळ्यातील हारांना शोभा आली होती. कमरेत मूल्यवान रत्नांचा कमरपट्टा होता. अशा या सुंदर लक्ष्मीकडे पाहून श्रीकृष्णांना परम संतोष झाला. तिच्या डोक्यावरील कुरळे केस, कानांतील कुंडले, गळ्यातील सुवर्ण पदके यांनी तिचे मुख रमणीय दिसत होते. त्यावर मधुर हास्य चमकत होते.

अशा वेळी श्रीकृष्ण तिला हसून म्हणाले, ' रुक्मिणी, राजे हे इंद्रादी लोकपालांचे अंश. त्यांचा पराक्रम मोठा. संपत्ती, रूप, सौंदर्य, औदार्य, सामर्थ्य यांनी ते युक्त असल्यानं ते तुझीच इच्छा करीत होते. शिशुपालानं तर तुला मागणीच घातली होती. तुझ्या भावानं, पित्यानं तुला त्यालाच द्यायचं ठरविलं होतं, पण रुक्मिणी, त्या राजांच्या भीतीनं आम्ही हा असा समुद्राचा आश्रय घेतला. आमच्या सारख्यांच्या नादी लागलेल्या स्त्रियांना बहुधा दुःखच प्राप्त होतं. सुंदरी, आम्ही अगदी निष्कांचन आहोत. काहीच जवळ नसलेले लोकच आमच्यावर प्रेम करतात. श्रीमंत लोक माझ्या भजनी लागत नाहीत. रुक्मिणी, ही लोकरीत तुला माहीत नसावी. म्हणूनच तू मला वरलंस. आमच्याजवळ तसा एकही गुण नाही. म्हणून अजूनही एखाद्या तुला शोभेल अशा राजाच्या भजनी तू लाग. तुला ऐहिक व पारलौकिक भोगांचा लाभ होईल. शिशुपाल, शाल्व, जरासंध, दंतवक्त्र इत्यादी राजांचा गर्व नाहीसा करण्यासाठी मी तुला घेऊन आलो. तसे आम्ही सर्वदा उदासीन आहोत. स्त्री, संतती, वैभव यांची आम्हांस मुळीच इच्छा नाही. आम्ही आत्मसुखानं तृप्त आहोत. '

श्रीकृष्णांना आपणच प्रिय आहोत, असा रुक्मिणीस अभिमान होता. श्रीकृष्णांचे हे भाषण ऐकून रुक्मिणीचे हृदय भीतीनें थरथर कापू लागले. रडत रडत ती नखांच्या तेजानें लाल दिसणाऱ्या आपल्या पायाने जमिनीवर रेघा काढीत राहिली. काजळानें काळे झालेले अश्रुबिंदू तिच्या डोळ्यांतून झरू लागले. केशरानें रक्तवर्ण झालेले तिचे स्तन त्या अश्रूंनी भिजून गेले. दुःखाच्या अतिरेकाने तिच्या तोंडून बाहेर शब्दही फुटेना. तिच्या हातांतील कंकणे सैल झाली. पंखा हातातून गळून पडला. बुद्धीला भ्रम झाल्यामुळे तिला मूर्च्छा आली व केस विस्कळित होऊन ती जमिनीवर पडली.

रुक्मिणीची ही अशी अवस्था पाहून त्या भगवंतांनाही दया आली. त्यांनी पलंगावरून उतरून आपल्या चारही हातांनी तिला उचलले. तिचे केस सावरले. आपल्या कमलासारख्या हाताने त्यांनी तिचे तोंड पुसले. तिचे डोळे अश्रूंनी भरलेले होते. स्तन पाण्याने भिजलेले होते. ते पुसून कृष्णांनी तिला आलिंगन दिले. आपल्या थट्टेचा अर्थ तिला कळला नाही, असे समजून त्यांनी रुक्मिणीचे सांत्वन करताना म्हटले,

' रुक्मिणी, तू माझ्यावर रागावू नकोस. तुझी माझ्यावर भक्ती आहे, हे मी जाणतो. सुंदरी, मी हे सारं थट्टेनं बोललो. तुझे अधरोष्ठ थरथरत आहेत, वक्रदृष्टीनं तू पाहात आहेस, असं तुझं मुख पाहायला मिळावं म्हणून मी बोललो ग. सुंदरी, तू फारच भित्री आहेस. खरं पाहाता गृहस्थाश्रमी पुरुषांना प्रिय पत्नीशी थट्टेनं भाषणं करताना मोठाच सुखाचा काळ वाटतो. '

कृष्णांच्या या बोलण्यामुळे रुक्मिणीची भीती नष्ट झाली. ती लाजत लाजत, सुंदर प्रेमकटाक्ष टाकीत म्हणाली, ' कमलनेत्रा, आपल्याला मी अनुरूप नाही असं जे आपण म्हणालात ते खरंच आहे. आपला पराक्रम कुठं ? आणि अज्ञानाचा गड्डा मी कुठं ? आपण स्वतःला अकिंचन असं म्हणवून घेतलंत हेही खरं आहे. तुमच्याहून अधिक असं या विश्वात आहे तरी काय ? श्रीमंतीनं अंध झालेल्यांना तुमचं ज्ञान होत नाही. श्रीहरी, आपल्या प्राप्तीची आशा धरूनच अंग पृथू, भरत, ययाती, गय, इत्यादींनी सार्वभौम राज्य सोडून दिलं, आणि

वनाचा आश्रय केला. त्यांना या जगात दुःख कसं होईल ? तुम्ही मला अनुरूप आहात, म्हणूनच मी तुम्हांस वरलं. अच्युता, आपल्या कथांचं कीर्तन शंकर, ब्रह्मदेव इत्यादी करतात. त्या कथा जिच्या कानांवर पडल्या नाहीत अशाच स्त्रीला शिशुपालासारखा पती मिळेल. कारण हे राजे आपल्या घरच्या गाढव, बैल, घोडे, मांजरे, सेवक यांच्याशी जसं वागतात तसंच ते आपल्या स्त्रियांशी वागतात. त्यांना पती म्हणून वरणारी आपल्या चरणकमलांचा आस्वाद न घेणारी स्त्री खरोखरच मूर्ख होय. कमलनयना, आपल्या चरणांवर माझं नित्य प्रेम आहे. परमात्म्या, या विश्वाच्या कल्याणासाठी, वृद्धीसाठी आपण रजोगुणाचा आश्रय घेतला आहे. आपण नुसतं माझ्याकडं पाहिलंत तरी तीच मोठी कृपा होईल.'

'पतिव्रते, तू जे म्हटलंस ते तुझ्या तोंडून ऐकण्यासाठीच मी तुझी थट्टा केली. सुंदरी, माझ्या ठिकाणी असणारी तुझी एकनिष्ठ भक्ती हेच तुझं भाग्य आहे. तुझी ही आसक्ती या संसारबंधनापासून मुक्त करणारी आहे. रुक्मिणी, गृहस्थाश्रमी पुरुषांच्या घरात तुझ्यासारखी प्रेमळ गृहिणी मला कुठंच दिसत नाही. माझ्या मधुर कथा ऐकूनच तू माझ्यावर लुब्ध झालीस. विवाहाच्या वेळी इतर राजांचा तू धिक्कार केलास. माझ्याकडं गुप्तरूपानं एका ब्राह्मणास पाठविलंस. तुझ्या भावाला मी विरूप केलं. अनिरुद्धाच्या विवाहाच्या वेळी भर द्यूतसभेत मी त्याचा वधही केला. पण काहीही न बोलता तू हे सारं सहन केलंस. रुक्मिणी, या वर्तनानं तू मला जिंकलं आहेस.' इतके बोलून आत्मरूपी रमलेले श्रीकृष्ण रुक्मिणीशीही रममाण झाले.

## सोळा हजार स्त्रियांशी संसार !

श्रीकृष्णांनी नरकासुराच्या बंदिखान्यातील सोळा हजार कन्यांशी विवाह केल्याचे ऐकून नारदांना या प्रकाराचा भारी विस्मय वाटला. तो प्रकार आपण स्वतः पाहावा या हेतूने ते मनात म्हणाले, 'श्रीकृष्णांचं शरीर तर एकच. पण त्यांनी एकाच वेळी सोळा हजार स्त्रियांशी वेगवेगळ्या मंदिरांत एकट्यानं विवाह केला ? हे खरंच मोठं

आश्चर्य आहे !' याच उत्कंठेने नारद द्वारकेस आले. द्वारकानगरीत फुललेल्या झाडांची उद्याने त्यांनी पाहिली. पक्ष्यांचा व भुंग्यांचा मधुर असा स्वर त्यांनी ऐकला. सारी नगरीच नादमय झालेली त्यांना दिसली. सरोवरात निळी, पांढरी, तांबडी कमळे फुलली होती. त्यांत हंस, सारस इत्यादी पक्षी विहार करीत होते. पांढऱ्या स्फटिकांचे नऊ लक्ष वाडे व त्यांवर पाचूचे मणी आणि सोने, रत्ने यांचे जडावाचे काम होते. प्रत्येक घरापुढील अंगण सडासंमार्जन करून स्वच्छ केले होते. नगरीत पताका, ध्वज फडकत होते.

अशा या द्वारकेत श्रीकृष्णांचे अंतःपुर त्वष्टयाने मोठ्या कौशल्याने बांधले होते. त्यात श्रीकृष्णांच्या सोळा हजार स्त्रियांची सोळा हजार मंदिरे होती. नारदांनी त्यांतील एका मंदिरात प्रवेश केला. त्या मंदिराला पोवळ्यांचे खांब होते. कडीपाट वैडूर्यरत्नांच्या सुंदर फळ्यांचे होते. त्याच्या भिंती इंद्रनील मण्यांच्या होत्या. छताला मोत्यांच्या झालरी होत्या. त्या मंदिरात हस्तिदंताची आसने होती. सर्वत्र पलंग होते. गळ्यांत पुतळ्यांच्या माळा घातलेल्या, सुंदर वस्त्रे नेसलेल्या दासी, चिलखत, शिरस्त्राण, सुंदर वस्त्र, रत्नजडित कुंडले धारण केलेले सेवक यांनी त्या मंदिरास विशेष शोभा आली होती.

रत्नांच्या दिव्य प्रकाशाने त्या मंदिरातील अंधार संपला होता. नारदमुनींना पट्टराणी रुक्मिणी दिसली. सोन्याचा दांडा असलेल्या चवरीने ती श्रीकृष्णांना वारा घालीत होती. तिच्या शेजारी हजार दासी होत्या. नारदांना पाहाताच श्रीकृष्ण पलंगावरून उठले, आपले मस्तक लववून त्यांनी नारदांना नमस्कार केला. हात धरून त्यांना आपल्या आसनावर आणून बसविले. श्रीकृष्णांनी नारदांचे पाय धुतले, ते पाणी आपल्या मस्तकावर धारण केले. कृष्णांनी त्यांना प्रश्न केला,

'मुने, आपलं कोणतं काम आम्ही करावं ?'

'कृष्णा, तू सर्वांचा आश्रय आहेस. सर्वांशी स्नेह ठेवणं, दुष्टांना शिक्षा देणं, ही तुझी कामं. यासाठी तू स्वतःच अवतार घेतोस. तुझी पावलं सर्वांना मोक्ष देणारी आहेत. ब्रह्मादिक देवही त्यांना आपल्या

हृदयांत साठवितात. म्हणून त्यांचं स्मरण मलाही नित्य राहील असं तू करावंस.'

श्रीकृष्णांची योगमाया पाहाण्याच्या इच्छेने नारद दुसऱ्या एका स्त्रीच्या मंदिरात गेले. त्या मंदिरात श्रीकृष्ण आपल्या प्रिय पत्नीशी व उद्धवाशी फासे खेळताना नारदांना दिसले. तेथेही श्रीकृष्णांनी नारदांचा सत्कार केला. तेथेही श्रीकृष्ण नारदांना म्हणाले,

'नारदा, आपलं आगमन केव्हा झालं? मुने, काही करण्यासारखं कार्य असेल तर सांगावं.'

नारदांना यांचा विस्मय वाटला. ते आणखी एका मंदिरात नंतर गेले. तेथेही त्यांनी श्रीकृष्णांना पाहिले. या मंदिरात ते आपल्या लहान पुत्रांना खेळवीत होते. आणखी एका मंदिरात ते स्नानाच्या गडबडीत असलेले नारदांनी पाहिले. कोठे श्रीकृष्ण यज्ञात आहुती देत होते, कोठे त्यांचा पंचमहायज्ञ सुरू होता, कोठे ते ब्राह्मणांना भोजन घालीत होते. कोठे ते स्वतःच जेवायला बसले होते. कोठे ते संध्योपासना करीत होते. कोठे त्यांचा मौनव्रताने गायित्रीचा जप सुरू होता. कोठे ते पलंगावर आढळले. तर कोठे मंत्र्यांशी चर्चा करताना दिसले. कोठे ते वारांगनांच्या बरोबर जलक्रीडा करीत होते. कोठे उत्तम सजविलेल्या गायी ब्राह्मणांना दान देत होते. आणखी एका मंदिरात ते इतिहास व पुराणकथा ऐकत होते. कोठे प्रियेसह मौजेच्या गप्पा करीत होते. एके ठिकाणी ते ध्यान करीत होते, तर दुसऱ्या एका ठिकाणी ते गुरूंची पूजा करीत होते.

अशा प्रकारे नारदमुनींनी श्रीकृष्णांच्या महामायेचा हा सोहळा पाहिला. त्यांचे मन आश्चर्याने थक्क होऊन गेले. श्रीकृष्णांचे गुणगान करीत ते आपल्या मार्गाने निघून गेले.

## नृगराजाची शापातून मुक्तता

एके दिवशी सांब, प्रद्युम्न, चारू, भानू, गद इत्यादी यादवकुमार खेळण्यासाठी एका उपवनात गेले. बऱ्याच वेळानंतर त्यांना तहान लागली. पाण्याचा शोध करताना ते एका विहिरीपाशी आले. त्या

विहिरीत त्यांना पाण्याऐवजी एक चमत्कारिक प्राणी मात्र दिसला. तो म्हणजे एक पर्वताएवढा प्रचंड सरडा होता. त्या कुमारांना त्याच्या-बद्दल दया वाटली व त्यांनी त्याला वर काढण्याचा प्रयत्न केला. पण त्यांना काही तो वर काढता येईना. तेव्हा त्यांनी हा वृत्तान्त कृष्णांना कळविला. श्रीकृष्ण स्वतः त्या विहिरीपाशी आले. आपल्या डाव्या हाताने त्यांनी त्याला सहज उचलून वर काढले.

श्रीकृष्णांच्या हाताचा स्पर्श होताच त्या सरड्याचे रूप पालटले व तो तप्त सुवर्णाच्या कांतीचा, मूल्यवान अलंकार घातलेला, वस्त्रे व माळा ल्यालेला एक देव म्हणून प्रकट झाला. कृष्णांना सर्व माहीत असूनही इतरांना समजावे म्हणून त्याला त्यांनी विचारले, ' भाग्यवान पुरुषा, तुझं हे रूप फारच सुंदर आहे. तू कुणी देवरूप खचित वाटतोस. तुला हे असं सरड्याचं रूप कोणत्या कारणानं प्राप्त झालं रे ? तुला इष्ट वाटेल तर सांग आम्हांला. '

' प्रभो, मी इक्ष्वाकूचा पुत्र नृग होय. ' श्रीकृष्णांच्या चरणांना नमस्कार करून त्याने सांगायला सुरुवात केली. ' दानशूर राजांच्या यादीत कदाचित माझंही नाव आपणांस सापडेल. जगन्नाथा, सर्व प्राणि-मात्रांचे व्यवहार आपणांस माहीत आहेत. प्रभो, या पृथ्वीवर जितके वाळूचे कण असतील, आकाशात जितक्या चांदण्या असतील, पावसाच्या धारा जितक्या असतील, तितक्या गायी मी दान केल्या आहेत. त्या गायी दूध देणाऱ्या तरुण, सुस्वभावी, सुंदर, सद्गुणी, वर्णानं काळ्या, शिंगांवर सोन्याची आवरणं असलेल्या होत्या. त्या मी योग्य मार्गानंच मिळविल्या होत्या. त्यांची वासरंही त्यांच्याबरोबरच होती. त्यांच्या खुरांना रुप्याचे पत्रे लावले होते. दान करताना त्यांच्या अंगावर रेशमी वस्त्रं, माळा व अलंकार होते. कुलशीलवान पण दरिद्री अशा ब्राह्मणांना मी त्या गायी दान केल्या होत्या. ते ब्राह्मण सत्यव्रती, तपश्चर्या व वेदाध्ययन करणारे व उदार होते. गायींच्या प्रमाणंच मी भूमी, सोनं, घरं, घोडे, हत्ती, दासी, तीळ, रुपं, शय्या, वस्त्रं, रत्नं, रथ इत्यादींचीही दानं केली. मी अनेक प्रकारचे यज्ञ केले. विहिरी, तळी, सरोवरं, रस्त्यांच्या कडेनं झाडं इत्यादी लोकोपयोगी कामंही मी केली.

'पण एकदा असं झालं की, कुणा एका प्रतिग्रह न घेणाऱ्या एका ब्राह्मणाची गाय माझ्या गायींत मिसळली. न जाणता मी ती गाय दुसऱ्या एका ब्राह्मणाला दान दिली. हा ब्राह्मण ती गाय घेऊन चालला असताना ती तिच्या पहिल्या मालकास दिसली. 'ही गाय माझी आहे' असं त्यानं त्या ब्राह्मणाला म्हटलं. 'ही तुझी नाही, माझीच आहे.' असं त्यानं त्या मालकाला म्हटलं. दोघेही स्वार्थानं प्रेरित होऊन माझ्याजवळ आले. त्यांतील एक जण मला गाय देणारा दाता असं म्हणाला. दुसरा मला चोर समजू लागला. मी तर मोठ्या गोंधळातच पडलो. धर्मसंकट जाणून मी दोघांनाही विनंती केली. मी प्रत्येकास म्हटलं, 'मी दुसऱ्या एक लक्ष गायी देतो. मला ही गाय द्या. ब्राह्मण, मी तुमचा अज्ञानी सेवक आहे. मजवर दया करा. माझी या संकटातून मुक्तता करा. मी अपवित्र अशा नरकात पडत आहे.' पण माझी ही विनंती व्यर्थ गेली. तो मूळचा मालक म्हणाला, 'राजा, ही गाय देण्याची माझी इच्छा नाही.' असे म्हणून तो निघून गेला. दान घेणारा ब्राह्मण म्हणाला, 'मला हिच्याऐवजी दुसऱ्या लक्ष गायीही नकोत.' असे बोलून तोही निघून गेला.

'इतक्यात यमदूतांनी मला यमलोकी नेले. श्रीकृष्णा, तिथं यमानं मला प्रश्न विचारले. तो मला म्हणाला, 'राजा, तू प्रथम पापाचं फळ भोगणार की पुण्याचं?' तेव्हा मी यमाला म्हटलं, 'देवा, मी प्रथम पापाचं फळ भोगीन.' असे मी म्हणताच तो म्हणाला, 'ठीक आहे. तू नरकात जा.' लगेच मला असं हे सरडयाचं रूप प्राप्त झालं. अशा रीतीनं माझं हे असलं पतन झालं. पण माझ्या औदार्यामुळं मला आपलं दर्शन झालं. पूर्वजन्मीचं स्मरणही माझं कायम होतं. कृष्णा, प्रभू, आपण परमात्मा आहात, आपण मला प्रत्यक्ष दर्शन दिलंत. देवाधिदेवा, जगन्नाथा, पुरुषश्रेष्ठा, गोविंदा, इंद्रियांच्या नियंत्या नारायणा, अच्युता, सर्वसमर्थ श्रीकृष्णा, मी आता स्वर्गलोकी जातो. मला अनुज्ञा द्यावी. मी कुठंही असलो तरी माझं चित्त आपल्या चरणांपाशी असावं. तू या विश्वाचा उत्पत्तिकर्ता आहेस. ब्रह्मस्वरूप आहेस. अनंतशक्ती आहेस. तुला माझा नमस्कार असो.'

इतके म्हणून त्या नृगराजानें श्रीकृष्णांना प्रदक्षिणा घातली व त्यांची अनुज्ञा घेऊन तो उत्तम विमानात बसून यादवकुमारांच्या देखत स्वर्गलोकी गेला. त्यानंतर श्रीकृष्ण इतरांना म्हणाले, 'पाहा. ब्राह्मणाचं थोडं जरी धन भोगलं तरी कशी अवस्था होते. तेजस्वी ब्राह्मणालाही ते पचविता येत नाही. मग आपल्यासारख्या राजांना तर ते पचविणं अधिकच कठीण होतं. हालाहल हे माझ्या मतानं मोठं विष नाही. खरं विष म्हणजे ब्राह्मणाचं द्रव्य हे आहे. सर्व जगात त्याच्यावर काही उपाय नाही.

नाहं हालाहलं मन्ये विषं यस्य प्रतिक्रिया ।
ब्रह्मस्वं हि विषं प्रोक्तं नास्य प्रतिविधिर्भुवि ॥

'सामान्य विष केवळ खाणारासच मारतं. पण ब्राह्मणाचं धन साऱ्या कुळाला जाळतं. ब्राह्मणाचं धन भोगणाऱ्याच्या तीन पिढ्यांचा नाश करतं. ते बलात्कारानं भोगलं असेल तर दहा पिढ्यांचा नाश होतो. वृत्तिच्छेद झाल्यामुळे अशा ब्राह्मणाचे जितके अश्रूबिंदू धुळीस मिळतात, तितकी वर्षं त्याच्या द्रव्याचा अपहार करणारे व त्यांचे वंशज कुंभीपाक नावाच्या नरकात दुःखं भोगतात. जो कुणी अशा द्रव्याचं अपहरण करील तो साठ हजार वर्षांपर्यंत विष्ठेत किडा होऊन राहील. आपणांस ब्राह्मणाच्या द्रव्याचा संपर्क केव्हाच घडू नये. ते द्रव्य घेणारे पुरुष अल्पायुषी होतात. असं करणाऱ्या राजांचा पराभव होतो. दुसऱ्यांना भीती उत्पन्न करणारे ते सर्प होतात. म्हणून, ब्राह्मणानं जरी अपराध केला तरी तुम्ही त्याचा द्रोह नका करू. मी स्वतः ब्राह्मणांना शांत मनानं त्रिकाळ नमस्कार करतो. असं न करणारा माझ्या शिक्षेस पात्र होतो. या नृगानं केवळ एक गाय ब्राह्मणाची घेतली. पण त्या पापानं केवढा अधःपात झाला, पाहा.'

## सुदाम्याला कांचनपुरी

कोणी एक श्रीदामा वा सुदामा नावाचा एक ब्राह्मण श्रीकृष्णांचा

मित्र होता. इंद्रिये व त्यांचे विषय यांत तो विरक्त असून त्याचे अंतःकरण प्रसन्न होते. त्याची इंद्रिये त्याच्या ताब्यात होती. सहज प्राप्त झालेले तो घेई. त्याची वस्त्रे अगदी मलीन असत. तो नेहमी क्षुधेने व्याकुळ झालेला असे. त्याची स्त्रीही अशीच दारिद्र्याने पीडलेली, मलीन वस्त्र ल्यालेली होती. तिचे मुख म्लान असे. एके दिवशी थरथर कापत तिने आपल्या पतीस विचारले,

'महाराज, आपला एक मित्र धनवान आहे. प्रत्यक्ष लक्ष्मीचा पती आहे. तो श्रीकृष्ण ब्राह्मणांविषयी फार दयाळू व शरणागतांचं रक्षण करणारा आहे. तो साधूंना आश्रय देतो. आपण आता त्याच्याकडे जावं. त्याला आपले कष्ट सांगावेत. आपण कुटुंबवत्सल आहात, हे समजून तो बरंच द्रव्य आपणांस देईल. भोज, वृष्णी, अंधक यांचा तो अधिपती तूतं द्वारकेत राहतो. त्याच्या पदकमलांचं स्मरण केलं तर तो आत्मस्वरूपही देतो मग तो त्याचं स्मरण केलं तर अर्थ व काम देईल यात नवल काय!'

'भार्ये, कृष्णाकडं गेल्यानं दुसरा लाभ झाला नाही तरी त्याचं दर्शन तरी होईल. हा लाभही काही सामान्य नाही.' असे मनात आणून ब्राह्मणाने जायचे ठरविले. तो आपल्या पत्नीला पुन्हा म्हणाला, 'सुंदरी, त्या श्रीकृष्णाला भेट म्हणून नेण्यासारखं काही घरात असलं तर दे ना.' त्या साध्वीने दुसऱ्या एका ब्राह्मणाच्या घरून थोडे पोहे आणले. एका फडक्यात ते बांधले व कृष्णाला देण्यासाठी म्हणून तिने नवऱ्याच्या स्वाधीन केलेले ते पोहे घेऊन तो ब्राह्मण द्वारकेकडे निघाला. श्रीकृष्णांचे दर्शन होईल का? अशा विचारात असताना तो द्वारकेस पोचला. रक्षण करणारी सैन्ये, तीन चौक ओलांडून अंधक व वृष्णी यांच्या वाड्यांकडे तो गेला. श्रीकृष्णांच्या सोळा हजार स्त्रियांपैकी एकीच्या सुंदर घरात तो शिरला. तेथे पोचताच त्याला ब्रह्मानंद झाला. ब्राह्मण यत आहे असे पाहाताच आपल्या प्रिय पत्नीच्या पलंगावर बसलेले श्रीकृष्ण तेथून उठले व त्यांनी त्या ब्राह्मणाला प्रेमाने मिठी मारली. त्यांच्या डोळ्यांतून अश्रू ओघळले.

श्रीकृष्णांनी त्या आपल्या प्रेमळ मित्राला पलंगावर बसविले.

त्याची पूजा स्वत: कृष्णांनी त्याचे पाय धुऊन केली. ते पाणी सर्वांना पवित्र करणाऱ्या त्या भगवंताने स्वत:च्या मस्तकावर शिंपडले. त्यांनी त्या ब्राह्मणाच्या अंगाला उत्तम वासाची चंदन, अगरू, केशर यांची उटी लावली. सुगंधी धूप व दीप यांनी पूजा करून कृष्णांनी त्याला गाय व विडा देऊन म्हटले, 'मित्रा, तू आलास. फार चांगलं झालं.' त्या ब्राह्मणाच्या अंगावर फाटकी वस्त्रें होती. त्याचे अंग अगदी मळलेले होते. तो अगदीच कृश असून त्याच्या अंगावरील सुरकुत्या दिसत होत्या. पण कृष्णांच्या त्या पट्टराणीने त्याला चवरीने वारा घालून त्याची चांगली शुश्रूषा केली. निर्मळ मनाच्या कृष्णांनी अशा या दरिद्री ब्राह्मणाचा एवढा सत्कार केल्याचे पाहून अंत:पुरातील स्त्रियांना भारी नवल वाटले. त्या मनात म्हणाल्या, 'असं या निष्कांचन भिक्षुकानं काय पुण्य केलं ? हा तर निस्तेज आहे. हीन वृत्तीचा दिसतो· पण त्रैलोक्याच्या गुरूंनी, लक्ष्मीपतींनं याचा असा सत्कार केला. वडील भावाला जशी मिठी मारावी तशी त्यांनी याला पलंगावर बसवून मारली.'

श्रीकृष्ण त्या आपल्या मित्राला म्हणाले, 'मित्रा, गुरूंना आपण दक्षिणा दिली. तेव्हा तुझं ब्रह्मचर्यव्रत संपलं. घरी गेल्यावर तू अनुरूप अशा स्त्रीशी विवाह केला असशील. धर्मज्ञ असा तू. योग्य तेच करशील. तू ज्ञानी आहेस. द्रव्यावर तुझं काही प्रेम नाही, असं मला समजलं. तुझ्या-सारख्या ज्ञानी पुरुषाचं मन वासनांनी व्यापलेलं नसतं. मित्रा, आपण गुरुगृही राहात होतो. तेव्हाची आठवण आहे तुला ? मित्रा, गुरू तीन प्रकारचे असतात. ज्याच्यापासून जन्म प्राप्त होतो तो पिता आपला पहिला गुरू होय. उपनयनाच्या वेळी वेदांचा अध्यापक हा दुसरा गुरु व चारही आश्रमांतील पुरुषांना आत्मज्ञान देणारा हा माझ्यासारखा तिसरा गुरू होय. म्हणूनच सर्व प्राण्यांचा आत्मा असा मी गुरूची शुश्रूषा केल्यानं जसा संतुष्ट होतो, तसा ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यास या आश्रमांतील कर्मांनी होत नाही.

'मित्रा, आपण गुरुगृही असतानाची एक गोष्ट आठवते तुला ? एकदा आपल्या गुरुपत्नींनी आपणांस जळण आणण्यासाठी रानात

पाठविलं. तेव्हा आपण एका रानात शिरलो. त्या वेळी मोठा वारा सुटून मुसळधार पाऊस पडू लागला. एवढ्यात सूर्य मावळला. सर्वत्र अंधार दाटून आला. सर्व प्रदेशात पाणीच पाणी झालं. मोठं वादळ, तुफान पाऊस यांच्या माऱ्यात आपली वाट चुकली. मग आपण एकमेकांचे हात धरले. आपल्या डोक्यांवर सर्पणाच्या मोळ्या असतानाच आपण हिंडत होतो. दुसऱ्या दिवशी सूर्य उगवल्यावर आपले गुरू सांदीपनी आपल्या शोधासाठी बाहेर पडले. आपण दोघे अत्यंत कष्टमय स्थितीत असताना त्यांना आढळलो. ते आपल्याला म्हणाले, ' बाळांनो, तुम्हांला आमच्या-साठी फार कष्ट पडले. प्राण्यांना स्वतःचा जीव फार प्यारा असतो. पण त्याची चिंता न करता तुम्ही माझ्यावर निष्ठा ठेविलीत. बाळांनो, तुम्ही आता द्विज झालात. मी तुमच्यावर संतुष्ट आहे. तुमचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुमचं वेदाध्यायन तुम्हांस इहलोकी व परलोकी उपयोगी होईल.' अशा त्या वेळच्या मित्रा, कितीतरी गोष्टी.'

' देवाधिदेवा, जगन्नाथा, सत्यकाम अशा तुझ्यासह आम्ही गुरुगृही होतो. आता आमच्या हातून काय होण्यासारखं राहिलं आहे ? सर्व काही पूर्ण झालं आहे. पण कृष्णा, तुझं शरीर म्हणजे वेदस्वरूपी ब्रह्मच, कल्याणाचं माहेरघरच. पण तुलाही गुरुगृही राहावं लागलं, ही मोठी विचित्र गोष्ट वाटली.'

थोड्या वेळाने कृष्णांनी आपल्या ब्राह्मण मित्रास विचारले, 'अरे मित्रा, घरून निघताना मला एखादी भेट आणलीस की नाही ? अरे, माझ्या भक्तांनी मला जरी एक कण दिला तरी तो मला पुष्कळच वाटतो. भक्तिहीनानं खूप दिलं तरी माझा संतोष होत नाही. मित्रा, पान असो, फळ असो, किंवा नुसतं पाणी असो. जो कुणी मला भक्ति-पूर्वक समर्पण करतो, तो पदार्थ मी मोठ्या आवडीनं सेवन करतो.'

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥**

श्रीकृष्णांनी असे विचारताच सुदामा ब्राह्मणाने लाजेने मान खाली घातली भेटीसाठी आणलेले पोहे त्यांना द्यावेत असे त्याला

वाटेना. त्याचे मन कृष्णांनीच जाणले व त्या ब्राह्मणाच्या हातून चिंधीत बांधलेली वस्तू बाहेर काढून स्वतःच कृष्ण म्हणाले, ‘ अरे मित्रा, ही का भेट तू मला आणलीस ? ही तर मला फार आवडते. साऱ्या विश्वाची तृप्ती या तुझ्या पोह्यांनी होणार आहे.’ असे म्हणून कृष्णांनी त्यातील थोडे पोहे खाल्ले. तो दुसरी मूठ खाणार, एवढ्यात रुक्मिणीने त्यांचा हात धरून म्हटले,

‘ विश्वात्मन्, भगवंता, एवढीशी पोह्यांची मूठच त्याला भरपूर वैभव देण्यासाठी पुरी आहे.’ सुदाम्याने दिलेल्या भेटीचा स्वीकार मोठ्या मनाने कृष्णांनी केला. तो ब्राह्मण रात्रभर त्या मंदिरातच राहिला. त्याने यथेच्छ भोजन केले. आपण स्वर्गातच आहोत असे त्याला वाटले. त्यानंतर कृष्णांनी त्याचा निरोप घेतला. त्या ब्राह्मणास कृष्णांपासून काहीच द्रव्यप्राप्ती झाली नाही. त्याने आपण होऊन काही मागितले नाही. आपण रिक्त हस्ताने घरी जात आहोत हे समजून सुदाम्यास लाज वाटू लागली. पण श्रीकृष्णपरमात्म्यांचे दर्शन झाल्याने तो खरे पाहाता संतुष्ट होता. तो मनाशी म्हणाला, ‘ त्या कृष्णाचं केवढं प्रेम. केवढं वात्सल्य. मी हा असा दरिद्री, पण लक्ष्मीला उराशी धरणाऱ्या त्या कृष्णानं मलाही आलिंगन दिलं. कुठं मी हा असा पापी व क्षुद्र भिकारी ब्राह्मण, कुठं प्रत्यक्ष लक्ष्मीचं निवासस्थान तो श्रीकृष्ण पण मी त्याचा गुरुबंधू, म्हणून त्यानं मला एवढ्या प्रेमानं मिठी मारली. त्यानं मला स्वतःच्या वडील भावाप्रमाणं पत्नीच्या पलंगावर बसविलं. मी वाटेनं चालताना दमलो, म्हणून त्याच्या पट्टराणीनं मला चवरीनं वाराही घातला. मला देव समजून त्या देवाधिदेवानं माझे पाय चेपले. त्यानं माझी सेवा चांगली केली. माझा सत्कार केला. त्याच्या चरणांचं पूजन पुरुषांना स्वर्ग, मोक्ष, सर्व वैभव मिळण्याचं मूळ साधन आहे. त्यानं मला द्रव्य दिलं नाही, हे खरं, पण मला द्रव्य मिळालं तर मी उन्मत्त होईन, असं त्या दयाळू देवाला वाटलं असेल.’

एवढा विचार मनात करीत असतानाच तो दरिद्री ब्राह्मण आपल्या घराजवळ आला. त्याला घराशेजारचा प्रदेश सूर्य, अग्नी, चंद्र यांच्या तेजाने भरून गेलेला दिसला. त्याच्या भोवती अनेक क्रीडावने,

उद्यानें होती. त्यात पक्ष्यांचे गायन शुरू होते. सरोवरांतील पाण्यात कुमुदे, अंभोजे, कल्हारे, उत्पले अशी कमळे फुललेली होती. तेथे सुंदर अलंकार धारण केलेले सेवक व हरिणासारखे चंचल नेत्र असणाऱ्या दासी यांची वर्दळ होती. त्या ब्राह्मणाच्या मनात आले, 'अरे, हे स्थान कुणाचं ? हे माझंच तर दिसतं. मग त्याचं हे असं सुंदर रूप ?'

असे म्हणत तो घरात पाऊल टाकीत असताना तेजस्वी असे त्याचे सेवक, त्याच्या दास-दासी गीत व मंगल वाद्ये यांच्यासह त्याच्या समोर आल्या. त्यांनी त्या भाग्यशाली ब्राह्मणाचे स्वागत केले. आपला पती घरी आला हे पाहून त्याच्या पत्नीस खूपच आनंद झाला. तिची एकच धांदल उडाली. लक्ष्मीप्रमाणे नटून ती त्याच्या समोर आली. पतीस पाहाताच तिला संतोष वाटला. तिचा कंठ गहिवरून आला. तिचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. तिनें त्याला मनानेंच नमस्कार करून आलिंगन दिले. ती स्वर्गीय अप्सरांप्रमाणे चमकत होती. सुवर्णालंकारांनी मंडित अशा दासींच्यामध्ये शोभत होती. आपल्या पत्नीला पाहून त्या ब्राह्मणाला फारच नवल वाटले.

त्या आपल्या पत्नीसह तो ब्राह्मण आपल्या मंदिरात गेला. तेथे त्याला इंद्राच्या मंदिराप्रमाणे शंभर खांब दिसले. दुधाच्या फेसाप्रमाणे तेथे शुभ्र अशा शय्या होत्या. सुवर्णाच्या टोपणांचे हस्तिदंती पलंग होते. सोन्याच्या मुठीच्या चवऱ्या व पंखे होते. सुवर्णाच्या बैठकीवर मऊ आच्छादनें होती. वर चकचकीत छत्रे होती. त्यांना मोत्यांच्या झालरी होत्या. मंदिराच्या भिंती स्वच्छ स्फटिकाच्या असून त्यांवर मूल्यवान पाचूच्या खड्यांचे काम केले होते. त्या भिंतींत अत्यंत रमणीय अशा स्त्रियांच्या मूर्ती असून त्यांच्या हातांत रत्नांचे दिवे होते. असे हे ऐश्वर्य आपणांस एकाकी कसे मिळाले ? याचा विचार त्या ब्राह्मणानें केला. तो स्वतःशी म्हणाला,

'खरोखर मी असा दुर्दैवी व नित्य दरिद्री. पण मला हे असं वैभव प्राप्त झालं. कारण महावैभवशाली असा तो यदुनायक माझा मित्र असून त्याचं दर्शन मी घेतलं. तो प्रत्यक्ष देत नाही, पण तो खूप देतो. मित्रांनी त्याला थोडं दिलं तरी ते त्याला पुष्कळ वाटतं. मी

त्याच्यासाठी मूठभर पोहे नेले होते. त्या महात्म्यानं त्यांचा मोठ्या आनंदानं स्वीकार केला. त्या सत्य, महाप्रतापी, गुणांचं माहेर असणाऱ्या श्रीकृष्णावर माझी नित्य निष्ठा जडावी, त्याची संगत मला प्राप्त व्हावी.'

असे म्हणून सुदाम्यानें कृष्णाची भक्ती करण्याचा संकल्प केला त्यानें आसक्त न होता त्या ऐश्वर्याचा आपल्या स्त्रीसह उपभोग घेतला. त्या देवाधिदेव यज्ञभोक्त्या श्रीकृष्णांनाही ब्राह्मण देवासारखे वाटतात. सुदामा ब्राह्मणानें अशा त्या परमात्म्याला जाणले. त्याचे स्थान त्याला लौकरच मिळाले. श्रीकृष्णांचे हे ब्राह्मणवात्सल्य जो श्रवण करील त्याची निष्ठा भगवंतांवर जडून राहील. तो कर्माच्या बंधनातून मुक्त होईल.

## सूर्यग्रहणास श्रीकृष्ण कुरुक्षेत्री

बलराम, कृष्ण द्वारकेत राहात असताना एकदा सूर्यग्रहणाची पर्वणी आली. ग्रहण खग्रास असल्यानें व अशी संधी पुन्हा येणार नसल्यानें काही जनकल्याणाचे कृत्य करावे या हेतूनें मंडळी स्यमंतपंचक नावाच्या क्षेत्राला गेली. त्या क्षेत्रात परशुरामानें क्षत्रिय राजांच्या रक्तानें सात मोठे डोह भरून ठेविले होते. ग्रहणाच्या निमित्तानें सर्व भरतखंडातील लोक तेथे जमले होते. अक्रूर, वसुदेव, आहुक इत्यादी यादव आले होते. गद, प्रद्युम्न, सांब इत्यादी श्रीकृष्णपुत्र होते. द्वारकेचे रक्षण करण्यासाठी अनिरुद्ध, सेनापती कृतवर्मा, सुचंद्र, शुक, सारण द्वारकेतच राहिले. यादवप्रमुखांनी आपल्या स्त्रियांसह त्या क्षेत्रात स्नान केले. त्यानंतर त्यांनी उपवास केला. गायींना वस्त्रे, माळा, सुवर्णाचे अलंकार त्यांनी दिले, पुन्हा त्यांनी परशुरामडोहावर स्नाने केली. सुशील ब्राह्मणांना त्यांनीं उत्तम भोजन दिले. स्वतः भोजन करून ते दाट वृक्षांच्या खाली विश्रांती घेत बसले.

एवढ्यात आणखी काही राजे त्यांना दिसले. मत्स्य, उशीनर, कौसल, विदर्भ, कुरू, सृंजय, कांबोज, कैकय, मद्र, कुंती, आनर्त, केरल इत्यादी देशांचे राजे त्यांनी पाहिले. काही अनुकूल, काही प्रतिकूल असे राजेही यादवांनी तेथे पाहिले. नंदादी गोप, गोपस्त्रिया, यांनाही पाहून

सर्वांनाच आनंद झाला. स्त्रिया एकमेकींना भेटल्या. त्यांनी एकमेकींना आलिंगन दिले. केशराने माखलेल्या स्तनांचे भार दुसरीच्या स्तनांवर पडले. लहानांनी थोरांना वंदन केले. एकमेकांना कुशल प्रश्न विचारले गेले. कृष्णाबद्दलच्या कथा ते एकमेकांना सांगू लागले. कुंतीला आपल्या भावांची, बहिणींची, भाच्यांची, मातापित्यांची, भावजयांची, कृष्णांची भेट झाल्यामुळे तिने आपले दुःख दूर सारून ती कृष्णाला म्हणाली,

'कृष्णा, मी स्वतःच अशी हतभागी. आमचे मनोरथ सफल कसे होणार ? तुम्ही एवढे थोर. पण संकटकाळी आमची विचारपूस करण्याची आठवण नाही झाली तुम्हांला. ज्याचं दैवच प्रतिकूल त्याची आठवण कोण करणार ? मग ते मित्र असोत, बांधव असोत, मुलगे असोत. प्रत्यक्ष आई-बाप असोत.' त्यावर कृष्ण म्हणाले, 'ताई, तू अशी रागावू नकोस. कंसानं पीडा दिल्यानं आपण असे देशोधडीला लागलो. आता पुन्हा दैवाच्याच प्रेरणेनं आपण इथं एकत्र झालो.'

तेथे जमलेल्या प्रमुख राजांचा सत्कार वसुदेव, उग्रसेन यांनी केला. कृष्णांच्या दर्शनाने त्यांनाही आनंद झाला. भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, गांधारी, तिचे पुत्र, पांडव व त्यांच्या स्त्रिया, कुंती, सृंजय, विदुर, कृप, कुंतिभोज, विराट, भीष्मक, नग्नजित, पुरुजित, द्रुपद, शल्य, धृष्टकेतू, काशिराजा, दमघोष, विशालाक्ष, जनक, मद्र, कैकय, युधामन्यू, पुत्रांसह बाल्हिक इत्यादींना श्रीकृष्णांस त्यांच्या स्त्रियांसह पाहून नवल वाटले. बलराम-कृष्ण यांनी सर्वांचा चांगला सत्कार केला. त्या राजांनी श्रीकृष्णांची मनापासून स्तुती केली.

कृष्णादी यादव आले आहेत असे समजून नंदादीगोप गाड्यांवर सामग्री टाकून गोपांसह तेथे आले. त्यांना पाहून यादवांना अतिशय आनंद झाला. त्यांनी मोठ्या प्रेमाने एकमेकांना आलिंगने दिली. वसुदेवांनी नंदाला आलिंगन दिले व जुन्या गोष्टींचे स्मरण केले. कृष्ण व बलराम यांनी नंदास व यशोदेस आलिंगन दिले. प्रेमाने कंठ दाटून आल्याने कोणीच काही बोलले नाही. रोहिणी, देवकी यांनी यशोदेला आलिंगन दिले. त्या म्हणाल्या, 'यशोदे, तुम्ही दोघांनी आम्हांवर फार प्रेम केलंत. त्याचं विस्मरण कसं होईल ? त्या प्रेमाची फेड तरी कशी

होईल ? या दोन मुलांचे तुम्ही आई-बाप झालात. त्यांचं वर्धन, पोषण केलंत. यशोदे, डोळ्यांना पापण्या जपतात, तसं तुम्ही त्यांना जपलंत. तुमच्यामुळं त्यांना कसलंही भय नव्हतं.'

गोपीही कृष्ण आता कधी भेटेल ? अशा विवंचनेत होत्या. त्यांनी कृष्णांना आपल्या हृदयात साठविले. मनानेंच त्यांनी त्यांना आलिंगन दिले. योग्यांनाही दुर्मिळ अशी अवस्था गोपींना प्राप्त झाली व त्या श्रीकृष्णांशी एकरूप झाल्या. त्यांची अशी अवस्था पाहून श्रीकृष्ण त्यांना एकान्तात भेटले. त्यांना आलिंगन देऊन ते म्हणाले,

'गोपींनो, आमची आठवण तुम्हांस कधी होते का ? आम्ही शत्रूचा नाश करण्यासाठी गेलो. तिकडंच आम्हांस फार वेळ लागला. पण आम्ही कृतघ्न आहोत, असं मात्र समजू नका. खरं पाहिलं तर प्राणी एकत्र येतात, त्यांचे वियोग होतात, ही त्या परमेश्वराचीच योजना असते. तोच प्राणिमात्रांचा संयोग-वियोग घडवून आणतो. माझ्यावर भक्ती केल्यानं प्राण्यांना मोक्ष मिळतो. तुम्ही तर माझ्यावर उत्कट प्रेम केलंत. तुम्हांस माझी प्राप्ती होईल यात संशय काय ?' अशा प्रकारे कृष्णांनी त्या गोपींना आत्मज्ञानाचा उपदेश केला. त्या त्यांचेच नित्य स्मरण करीत असल्यानें त्यालाच मिळाल्या होत्या. त्या म्हणाल्या, 'कमलनयना, तुझे चरणकमल आम्ही गृहकृत्यांत असलो तरी मनांत वागवीत असतो. ते कायम राहावं, अशी आमची मागणी आहे.'

## द्रौपदी व कृष्णस्त्रिया

श्रीकृष्णांनी गोपींना उपदेश केल्यावर युधिष्ठिरादी अन्य जिव्हाळ्याच्या लोकांचीही चौकशी केली. त्यांचा सत्कार त्यांनी केला. त्यांनीही श्रीकृष्णाच्या चरणांना स्पर्श करून म्हटले, 'प्रभो, आपल्या चरणांचा लाभ झाल्यावर आता अकल्याण कसं होणार ? आपणांस नम्रतेनं आमचा नमस्कार असो.' अशी श्रीकृष्णांची स्तुती चालली असताना यादव व कौरव यांच्याही स्त्रिया तेथे आल्या. त्यांनी श्रीकृष्णांच्या गोड कथा एकमेकींना ऐकविल्या.

द्रौपदी म्हणाली, 'रुक्मिणी, भद्रे, जांबवती, कोसलकन्ये, सत्यभामे,

कालिंदी, शैब्ये, रोहिणी, लक्ष्मणे, त्या श्रीकृष्णांनी तुम्हांस कसं कसं वरलं ?'

हा प्रश्न ऐकून प्रथम रुक्मिणीनें आपल्या विवाहाचा वृत्तान्त तिला सांगितला. सत्यभामा, जांबवती, कालिंदी, भद्रा, सत्या, मित्रविंदा, लक्ष्मणा इत्यादींनी आपापल्या विवाहाचे वृत्तान्त द्रौपदीला सांगितले. लक्ष्मणा म्हणाली, ' द्रौपदी, माझा पिता बृहत्सेन यांचं माझ्यावर मोठं प्रेम होतं. त्यानं तुझ्या लग्नाप्रमाणंच एक पण लावला. एक मत्स्य त्यानें यंत्ररूप तयार केला. त्याचं केवळ प्रतिबिंबच पाण्यात दिसत होतं. सभामंडपात मत्स्यवेध करण्याचा प्रयत्न अनेकांनी केला. जरासंध, अंबष्ठ, शिशुपाल, भीम, दुर्योधन, कर्ण इत्यादी राजांनी पराक्रम केले. पण मत्स्याचा वेध त्यांना घेता आला नाही. अर्जुनाचा बाण मात्र मत्स्याला नुसता स्पर्श करून गेला. पण भगवान कृष्णांनी मात्र मत्स्याचा वेध घेऊन त्याला खाली पाडलं. आकाशात सर्वत्र कृष्णांचा जयजयकार झाला. मी मग एक उत्तम वस्त्र नेसलं. वेणीत फुलांचा गजरा घातला. तेजस्वी रत्नांची माळ हाती घेऊन मी सभामंडपात आले, तिथं लांब केसांनी युक्त, कानांतील कुंडलांचं तेज गालांवर चमकत असलेलं माझं मुख मी वर केलं. कृष्णांपाशी हळूहळू जाऊन ती माळ त्यांच्या गळचात घातली. तेव्हा मृदंग, पडघम, शंख, भेरी, आनक इत्यादी वाद्यांचे नाद सुरू झाले. नट व नर्तकी यांच्या नृत्यास व गायनास सुरुवात झाली. पण द्रौपदी, कृष्णांना मी वरलं, हे तेथील राजांना सहन झालं नाही. त्यांना त्या राजांशी युद्ध करावं लागलं. त्यांचा पराभव करून ते यदुनायक मला घेऊन द्वारकेस आले. त्यांच्या सन्मानासाठी सर्व नगरी शृंगारली होती. छत्रं, ध्वज, पताका यांनी सजलेल्या त्या द्वारकानगरीत कृष्णांनी प्रवेश केला. अशा रीतीनं आम्ही अष्टनायिकांनी त्या कृष्ण परमात्म्यांची प्राप्ती करून घेतली.'

लक्ष्मणाचे एवढे सांगून झाल्यावर इतर स्त्रिया द्रौपदीला म्हणाल्या, ' पतिव्रते, द्रौपदी, आता आम्हांस साम्राज्य आहे. स्वराज्य आहे. पण त्यांची वा भौज्याची, वैराज्याची, पारमेष्टयाची वा प्रत्यक्ष मोक्षाची तरी काय जरूरी आहे ? आता एवढीच इच्छा आहे की,

लक्ष्मीच्या स्तनांवरील केशराच्या सुवासानं गंधित झालेली त्या भगवंतांच्या चरणांवरील धूळ आम्हांस मस्तकांवर लावण्यासाठी नेहमी मिळावी. कारण गोपी, भिल्लिणी, गवत, वेली, गोप हेही गायी चारणाऱ्या त्या महात्म्याच्या पदस्पर्शाचीच इच्छा करतात.'

## वसुदेवाचा यज्ञसमारंभ

कृष्णस्त्रियांनी मनमोकळ्या वृत्तीनें आपल्या विवाहांचा वृत्तान्त सांगितल्यावर त्यांचे कृष्णांविषयीचे गाढ प्रेम पाहून, निष्ठा पाहून कुंती, गांधारी, द्रौपदी, सुभद्रा, इतर राजस्त्रिया, कृष्णभक्त गोप यांना सर्वांनाच नवल वाटले. त्यांचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. याच वेळी राम-कृष्णांच्या दर्शनासाठी तेथे अनेक ऋषिमुनी आले. व्यास, नारद, च्यवन, देवल, असित, विश्वामित्र, शतानंद, भरद्वाज, गौतम, परशुराम, वसिष्ठ, गालव, भृगू, पुलस्त्य, कश्यप, अत्री, मार्कंडेय, बृहस्पती, अंगिरा, अगस्त्य, याज्ञवल्क्य; इत्यादी ऋषींना पाहाताच युधिष्ठिरादी पांडव व श्रीकृष्ण आणि बलराम यांनी त्या ऋषींना वाकून नमस्कार केला. पाय धुऊन गंध, फुले, धूप, उटी इत्यादींनी त्यांचे पूजन केले. सर्व मुनी आसनांवर बसल्यावर श्रीकृष्ण त्यांना म्हणाले,

'मुनींनो, आपल्या दर्शनानं आमचा जन्म सफल झाला. आमच्या सर्व पातकांचा नाश झाला.' श्रीकृष्णांच्या या भाषणाचे त्या ऋषींनी मनापासून कौतुक केले. ते त्यांना म्हणाले, 'भगवंता, आपली लीला किती अद्‌भुत ! आपण एकच असून अनेक होता. या विश्वाची निर्मिती आपण करता. त्याचा लयही आपणच करता. पण या कर्मांनी आपण बद्ध होत नाही. भगवंता, आवश्यकता पाहून भक्तांच्या रक्षणासाठी, दुष्टांच्या नाशासाठी आपण अवतार घेता. वेद हे आपलं पवित्र अंतरंग आहे. तपश्चर्या, वेदाध्ययन, इंद्रियदमन यांनी आपलं श्रेष्ठ रूप समजून येतं कृष्णा, आपण वेदांचं अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांचा सत्कार करता. आज आमच्याही जन्माचं सार्थक झालं. आज आम्हांस आपल्या संगतीचा लाभ झाला. भगवान श्रीकृष्णा, आपणांस नमस्कार असो. सर्व पवित्र तीर्थांचं उगमस्थान आपले चरणकमल आहेत. ते आज

आमच्या हृदयात स्थिर झाले. भगवंता, अशीच कृपा आपण आमच्यावर करावी.'

मुनींचे असे भाषण झाल्यावर धृतराष्ट्र, युधिष्ठिर इत्यादींनी त्यांचा निरोप घेतला. तेव्हा वसुदेव त्या मुनींच्या जवळ गेला व त्यांना नमस्कार करून म्हणाला, 'ऋषींनो, सर्व देवदेवता यांचा निवास आपल्यांत असतो. आपण मला कर्माचं निराकरण कसं होईल ते सांगावं.' वसुदेवाचा प्रश्न ऐकून नारदमुनी त्या ऋषींना म्हणाले, 'ऋषींनो, श्रीकृष्णांसारखा निधी जवळ असून वसुदेवानं त्यांना आपलं मूल मानलं. आत्मकल्याणाच्या दृष्टीनं त्यानं हा प्रश्न उपस्थित केला आहे. गंगातीरावर राहाणारा मनुष्य पवित्र होण्यासाठी दुसऱ्या पाण्याकडं जातो, तसंच हे आहे.' नारदांचे भाषण ऐकून ऋषींनी वसुदेवाला हाक मारून म्हटले,

'वसुदेवा, कर्माच्या योगानं कर्माचा निरास करण्याचा एक उपाय साधुपुरुषांनी सांगून ठेवला आहे. सर्व यज्ञांचा स्वामी जो विष्णू त्याची यज्ञद्वारे श्रद्धेनं पूजा करावी. वसुदेवा, यज्ञात दान करून माणसानं धनाची इच्छा सोडून द्यावी. स्त्रीपुत्रांवरील आसक्ती सोडावी. स्वर्गादिक लोक कालांतराने नष्ट होतील असं मानावं, सर्व वासनांचा त्याग करून तपासाठी अरण्याचा मार्ग धरावा. वसुदेवा, तू ऋषी व पितर यांची ऋणं फेडली आहेस. आता यज्ञ करून देवांच्या ऋणातून मुक्त हो. तू मोठ्या भक्तीनं त्या विश्वनियंत्या श्रीहरींचं पूजन केलंस, म्हणूनच ते तुझ्या पोटी आले.'

या उपदेशाप्रमाणे वसुदेवानें यज्ञाची तयारी केली. त्या स्यमंतपंचक क्षेत्रात उत्तम अशी यज्ञाची सामग्री जमा झाली. स्त्रिया सुंदर वस्त्रे नेसून, गळ्यांत अलंकार घालून सिद्ध झाल्या. त्यांनी अंगांना उटया लावल्या होत्या. त्यांच्या हातांत पूजेचे साहित्य होते. मृदंग, पडघम, शंख, भेरी, आनक इत्यादी वाद्यांचा घोष चालू झाला. नट व नर्तकी यांचे नृत्य सुरू झाले. सूत व मागध स्तुती करू लागले. गंधर्वस्त्रियांनी गायन सुरू केले. वसुदेवाच्या डोळ्यांत काजळ घालण्यात आले. त्याच्या अंगाला लोणी लावून ऋषींनी त्याच्या अठरा स्त्रियांसह

त्याला विधीनुसार स्नान घातले. त्यानें यज्ञदीक्षा घेतली. मृगचर्म पांघरले. सुंदर वस्त्रे परिधान केलेल्या, हातांत सुवर्णकंकणे असलेल्या, गळ्यांत मोत्यांचे हार असलेल्या, पायांत पैंजणे व कानांत कुंडले धारण करणाऱ्या स्त्रियांत तो शोभू लागला.

त्या वेळी बलराम व कृष्ण, इतर बांधव, पुत्र, स्त्रिया यांचेही येणे झाले. वसुदेवानें प्राकृत व वैकृत यज्ञांचे अनुष्ठान केले. त्यानें पुरोहितांची पूजा केली. ऋषींना दक्षिणा दिली. ऋषींनी त्याच्याकरवी पत्नीसंजाय, अवभृथस्नान इत्यादी विधी केले. त्या सर्वांनी परशुराम-डोहात स्नानें केली. त्यानंतर विदर्भ, कोसल, कुरू, केकय, सृंजय इत्यादी देशांच्या राजांना अहेर केले. सभासद, पुरोहित, देवगण, मनुष्ये, भूते, पितर यांनाही भेटी दिल्या. यज्ञाची वाखाणणी करून श्रीकृष्ण निघून गेले. धृतराष्ट्र, विदुर, धर्म, भीम, अर्जुन, भीष्म, द्रोण, कुंती, नकुल, सहदेव, नारद, व्यास, इत्यादींना प्रेमपूर्वक निरोप देण्यात आले. वसुदेवानें नंदाची, कृष्णांची, बलरामाची, उग्रसेनाचीही पूजा केली. वसुदेवाच्या मनातील महायज्ञाची कल्पना अशी सिद्धीस गेल्यावर तो नंदास म्हणाला,

'नंदराजा, स्नेहाचा पाश तोडणं योग्यांना, शूर पुरुषांना फार कठीण असतं. आपल्या उपकाराची फेड करता येणार नाही. असं असूनही आम्हांस ते उपकार वाटत नाहीत. नंदराया, आता आमच्या हातून काही होणं शक्य नाही.' एवढे म्हणून वसुदेव नंदाच्या उपकाराची आठवण येऊन रडू लागला. नंदानें नंतर इतर गोपांसह, गुरांसह सर्वांचा निरोप घेतला व तो निघाला. यादवांनी त्याची चांगली पाठवणी केली. नंद व गोपगोपी तेथून निघाले तरी त्यांचे चित्त मात्र कृष्णांच्या चरणकमलांशी गुंतून राहिले. श्रीकृष्ण पुन्हा द्वारकेत राहायला आले. त्यांनी यज्ञाचा वृत्तान्त सर्व द्वारकानिवासी लोकांना सांगितला.

## वसुदेवाची कृष्णस्तुती, देवकीस मृतपुत्रांची भेट

एकदा बलराम व कृष्ण वसुदेवास नमस्कार करून उभे राहिले. आपल्या पुत्रांचे त्यानें अभिनंदन केले. ऋषींनी केलेली कृष्णांची स्तुती

ऐकून त्याच्या मनात मोठीच श्रद्धा उत्पन्न झाली होती. त्याने श्रीकृष्णांचे माहात्म्य वर्णन करून म्हटले, 'कृष्णा, तू दुःखितांचा कैवारी आहेस. मी तुझ्या चरणकमलांना शरण आलो आहे. कारण तुझे चरण संसाराचं भय नाहीसं करतात. तू अनेक शरीरं धारण करतोस, पण पुन्हा आकाशासारखा अलिप्त राहतोस. तुझ्या योगमायेचं ऐश्वर्य कुणास कळणार आहे ?'

'तात, आपण म्हणता ते सर्व मान्य आहे. मी, तुम्ही, हा बलराम, द्वारकेचे लोक, हे सर्व स्थावर-जंगमात्मक विश्व, यांना ब्रह्मरूपच मानलं पाहिजे. कारण आत्मा हा स्वयंप्रकाशित असून तो देहादिकांपासून वेगळा आहे.' कृष्णांच्या बोलण्यानें वसुदेवाची भेदबुद्धी नष्ट झाली. तो मौन धारण करून राहिला.

एकदा देवकीने ऐकले की, आपल्या कृष्णाने मृत गुरुपुत्राला आणून दिले. या गोष्टीचे तिला भारी नवल वाटले. तिने बलराम व कृष्ण यांना जवळ बोलाविले. कंसाने मारलेल्या मुलांची आठवण देऊन तिचे डोळे पाण्याने भरून आले. ती दीनपणाने त्यांना म्हणाली, 'बलरामा, कृष्णा, तुम्ही दोघे आदिपुरुष आहात, प्रजापतीचेही नियामक आहात, हे मी जाणते. तुम्ही इथं माझ्या घरी अवतीर्ण झालात ते दुष्टांच्या नाशासाठी हेही मला समजलं. पण परमात्म्या, आज मी तुला शरण आले आहे. सांदीपनी गुरूंना तू त्यांचा सागरानं नेलेला पुत्र आणून दिलास. मग माझीही एक कामना तुम्ही पूर्ण करावी. कंसानं पूर्वी माझ्या पुत्रांचा वध केला होता. त्यांना आता परत पाहावं, अशी माझी इच्छा आहे.'

मातेची इच्छा ऐकताच बलराम व कृष्ण यांनी योगमायेचा आश्रय केला व ते सुतल नावाच्या पातालात गेले. तेथे त्यांना दैत्यांचा राजा बली दृष्टीस पडला. त्याला कृष्ण-बलराम पाहाताच फार आनंद झाला. बलिराजाने त्यांचे आतिशय मनापासून स्वागत केले. त्यांची मोठ्या समारंभाने पूजा केली. त्यांना उंची वस्त्रे, अलंकार, उटी, विडा, दीप, सुग्रास अन्न; इत्यादी सामग्री अर्पण केली. त्याचे हृदय प्रेमाने भरून आले. त्याने कृष्णांच्या चरणांचे ध्यान केले. त्याच्या अंगावर

रोमांच दाटून आले. तो म्हणाला,

'बलरामा, तू सर्वव्यापक शेष आहेस. श्रीकृष्ण ब्रह्मस्वरूप आहे. तुम्हां दोघांना नमस्कार असो. आपलं दर्शन खरोखरच प्राण्यांना दुर्लभ आहे. पण अनेकांना ते सहजसुलभ असतं. आपण आताच मला दर्शन दिलंत. भगवंता, माझ्यावर तू कृपा कर. मला तुझ्या चरणकमलांपाशी आश्रय दे. म्हणजे मी या संसाररूपी अंधकूपातून बाहेर येईन. वृक्षांच्या तळांचा आश्रय घेऊन मी साधूंच्या संगतीत हिंडेन. आत्मचिंतन करीन. प्रभो, माझं पाप आपण नष्ट करावं.'

'बली, मरीची, प्रजापतीचे ऊर्णा नावाच्या पत्नीच्या पोटी आलेले सहा पुत्र देव होते. ब्रह्मदेव आपल्या वाक् नावाच्या कन्येशी रमण्यास उत्सुक असताना त्यांना हसू आले. त्यामुळं ते असुरयोनीत हिरण्य-कशिपूच्या पोटी जन्मास आले. तिथून योगमायेनं ते देवकीच्या उदरात आले, पण त्यांचा जन्म होताच कंसानं त्यांचा वध केला. त्या पुत्रांबद्दल त्यांची माता आता शोक करीत आहे. ते पुत्र तुझ्याजवळ आहेत. मातेचा शोक दूर करण्यासाठी आम्ही त्यांना नेण्यास आलो आहोत. तिथं ते ब्रह्मदेवांच्या शापातून मुक्त होतील व देवलोकास जातील. स्मर, उद्गीथ, परिष्वंग, पतंग, क्षुद्रभृत् व घृणी या सहा मरीचिपुत्रांना उत्तम लोकाची प्राप्ती होईल.'

असे बलीस म्हणून बलराम व कृष्ण यांनी त्या सहा पुत्रांना मातेच्या स्वाधीन केले. त्या पुत्रांना पाहून देवकीच्या स्तनांना पान्हा फुटला. त्यांना आपल्या मांडीवर घेऊन तिनें पोटाशी धरले. पुत्रांच्या भेटीने, स्पर्शाने तिच्या मनास अतिशय आनंद झाला. तिने त्यांना स्तनपान दिले. कृष्णांनी त्याचा स्वाद पूर्वी घेतला होताच. पण आता प्रत्यक्ष अंगस्पर्श होताच त्या पुत्रांना आपल्या देवस्वरूपाचा साक्षात्कार झाला. ते आपल्या देवलोकाच्या स्थानी निघून गेले.

## सुभद्राहरण

एकदा परीक्षितानें शुकाचार्यांना म्हटले, 'मुनिवर्य, बलराम व कृष्ण यांची बहीण सुभद्रा व अर्जुन यांचा विवाह कसा झाला ते मला

सांगा ना.' त्यानंतर शुकांनी सुभद्राहरणाची कथा राजास ऐकविली. महापराक्रमी अर्जुन एकदा तीर्थयात्रा करीत करीत प्रभासक्षेत्री आला. आपल्या मामाची म्हणजे वसुदेवाची कन्या सुभद्रा ही बलरामास दुर्योधनास द्यावी असे वाटत होते. सुभद्रा आपणांस मिळावी अशी अर्जुनाची इच्छा होती. अर्जुनानें त्रिदंडी संन्यास घेतला व तो प्रभासाहून द्वारकेस आला. द्वारकेच्या लोकांनी त्याचे चांगले स्वागत केले. त्याचा कपटसंन्यास कोणाच्या ध्यानात आला नाही. बलरामाची त्याच्यावर श्रद्धा जडली. लोकांची निष्ठा पाहून यतीनें पावसाळ्याचे चार महिने द्वारकेस राहायचा निश्चय केला.

एकदा बलरामानें यतिवरास आपल्या वाड्यातच भोजनासाठी बोलविले. सुभद्रा तेथे पाहाताच अर्जुनाची चित्तवृत्ती क्षुब्ध झाली. तो वरचेवर तिला पाहू लागला. त्याची नासाग्रावरची दृष्टी चळली. या अद्वितीय पुरुषास पाहाताच सुभद्रेचेही मन त्याच्याकडे वळले. आपणांस हा पती म्हणून लाभेल का ? असा भाव त्या मुग्धेच्या मुखावर प्रकट झाला. अर्जुनाच्या मनात आता केवळ सुभद्रेचेच विचार असत. त्याला द्वारकावासी लोकांची सेवा, त्यांनी पाठविलेल्या भेटी यांच्यांत आता गोडी वाटेना. अर्जुनाच्या मनातील सर्व भाव श्रीकृष्णांना माहीत होते. सुभद्रा अर्जुनास द्यावी असेही त्यांना वाटे.

वसुदेव-देवकींचे मन वळवून, त्यांचे अनुमोदन घेऊन सुभद्रेला पळवून न्यायचा बेत आखण्यात आला. अशात एक सुयोग आला. एका यात्रेच्या पर्वाच्या निमित्तानें अनेक यादव देवदर्शनास निघाले. सुभद्राही दासदासींना बरोबर घेऊन रथातून द्वारकेच्या बाहेर पडली. त्याच वेळी यतिवर अर्जुन सुभद्रेच्या रथावर चढला. यादवांनी प्रतिकार केला पण अर्जुनानें आपल्या गांडीव धनुष्याच्या साह्याने सर्वांना परतवून लावले. सर्वत्र हाहाकार माजला. यादवांचा आक्रोश सुरू झाला. अर्जुनानें सुभद्रेस पळवून नेले. या घटनेनें बलराम क्षुब्ध झाला. कृष्णांनी व इतर यादवांनी त्याचे पाय धरून त्याला नीट समजावून दिल्यावर त्याची बुद्धी पालटली. त्यानें बहुमोल अलंकार, वस्त्रे, दासदासी, हत्ती, रथ, घोडे इत्यादी वधूवरांकडे पाठवून दिले. पांडवांनाही या विवाहामुळे

आनंद झाला.

## श्रुतदेव, बहुलाश्व यांच्या घरी स्वागत

श्रुतदेव नावाचा एक ब्राह्मण कृष्णभक्त होता. त्याचे शुद्ध चित्त विषयांपासून निवृत्त झाले होते, तो विदेहदेशाच्या मिथिला नगरीत राहात असे. न मागता जे काय मिळेल त्यावर तो आपला गृहस्थाश्रम चालवी. या देशाचा राजा बहुलाश्व हाही महान भगवद्‌भक्त होता. या जनकवंशीय राजाच्या मनात अनासक्ती पूर्णपणाने भरलेली होती. एकदा श्रीकृष्ण रथात बसून श्रुतदेव ब्राह्मण व राजा बहुलाश्व यांना भेटण्यासाठी विदेहदेशात गेला. बरोबर सारथी दारुक, नारद, वामदेव, अत्री, व्यास, परशुराम, असित, अरुणी, बृहस्पती, कण्व, मैत्रेय, च्यवन, शुकाचार्य इत्यादी होते. वाटेने अनेक ठिकाणी श्रीकृष्णांची लोकांनी मनापासून पूजा केली. राजा आनर्त, धन्व, कुरू, जांगल, कंक, मत्स्य, पांचाल, कुंती, मधू, केकय, कोसल, अर्ण या देशांतील स्त्री-पुरुषांनी त्यांचे चांगले स्वागत केले.

श्रीकृष्ण येत आहेत असे समजून विदेहदेशाच्या लोकांना अतिशय आनंद झाला. राजा बहुलाश्व व श्रुतदेव ब्राह्मण यांनी श्रीकृष्णांचे पाय धरले. दोघांचेही घरी येण्याविषयी श्रीकृष्णांना आमंत्रण असल्यामुळे त्यांनी दोन रूपे धारण करून त्यांच्या घरी ते गेले. बहुलाश्वाने श्रीकृष्णांना व ऋषींना आसनांवर बसवून त्यांचे पाय धुतले. ते चरण-तीर्थ मस्तकावर धारण केले. सर्वांना गंध, पुष्पं, वस्त्रे, अलंकार, धूप, अर्घ्य, गायी, वृषभ इत्यादी वस्तू समर्पण केल्या राजा बहुलाश्व कृष्णांना नम्रतेने त्यांचे चरण दाबताना म्हणाला,

'भगवन्, सर्व जीवांच्या अंतर्यामी आपणच वास करता. स्त्रीपुत्र, भाऊ-वहीण, ब्रह्मदेवादी देव यांच्यापेक्षा भक्त मला प्रिय आहेत, हे आपले वचन सिद्ध करण्यासाठी आपण आज इथं आलात, हे मी समजतो, भगवंता, विषयपराङ्मुख व नित्य संतुष्ट अशा भक्तांना आपण आत्म-रूप देता. जगच्चालका, आपण या ऋषींसह माझ्या घरी काही दिवस

राहावं, अशी माझी इच्छा आहे. आपल्या चरणधूलीनं हे निमिकुल पवित्र व्हावं.' राजाच्या या विनंतीनुसार श्रीकृष्ण ऋषींसह मिथिला नगरीत राहिले.

इकडे श्रीकृष्ण व ऋषी आपल्या घरी आले हे पाहून श्रुतदेव आनंदानें नाचू लागला. त्यानें सर्वांना दर्भासनांवर बसविले. स्वतःच्या पत्नीस बरोबर घेऊन त्यानें कृष्णांचे व ऋषींचे पाय धुतले. गंधपुष्पादी पूजासाहित्याने, त्यानें त्यांची पूजा केली. श्रुतदेवाने श्रीकृष्णांना म्हटले, 'देवाधिदेवा, तू आजच आम्हांस प्राप्त झालास असं नव्हे. जेव्हा ही सृष्टी निर्माण झाली तेव्हाच तू विराटरूपानं सर्वत्र व्यापून आहेस. तुझं दर्शन मात्र आज झालं आहे. विश्वव्यापका, या अवाढव्य जगात तू नाना वस्तू निर्माण केल्यास. त्यांत तू नानाविध रूपांत दिसतोस. श्रवण, कीर्तन, मनन इत्यादी मार्गांनी जे तुझी उपासना करतात, त्यांच्या चित्तांत तू प्रतिबिंबित होतोस. पण मला तर तू आज प्रत्यक्ष भेटला आहेस. ईश्वरा, तुझ्या चित्स्वरूपाचं ज्ञान होण्यासाठी भक्ती हेच सबळ कारण आहे. ती माझ्याकडून होईल असं तू करावंस. परमेशा, आता माझे सर्व हेतू पूर्ण झाले आहेत. त्या संसारयात्रेची मला भीती नाही. भगवंता, तुझं दर्शन झाल्यावर भीती उरेल तरी कशी ?'

'ब्रह्मन्', श्रीकृष्ण श्रुतदेवास म्हणाले, 'हे ऋषी तुझ्यावर अनुग्रह करण्यासाठी आले आहेत. विप्रा, लोकांचं कल्याण करण्यासाठीच हे ऋषी पृथ्वीवर हिंडतात. देवता व तीर्थं यांनी शुद्ध होण्यास फार वेळ लागतो. पण सत्पुरुषांच्या दर्शनानं मन त्वरित शुद्ध होतं. श्रुतदेवा, ब्राह्मण हे जन्मतःच श्रेष्ठ आहेत. तप, विद्या, इंद्रियजय, ब्रह्मनिष्ठा इत्यादींनी त्यांचं महत्त्व वाढतं. माझं हे चतुर्भुज रूप ब्राह्मणांपेक्षा मला प्रिय वाटत नाही. हे सर्व ब्राह्मण असून तेही माझीच रूपं असून यांची पूजा मनापासून कर. यांची पूजा केली की ती माझीच केल्यासारखं होईल.'

श्रीकृष्णांच्या या उपदेशानंतर श्रुतदेवाने त्या भगवद्स्वरूपी ऋषिवर्यांची पूजा केली. पुढे काही दिवस श्रीकृष्ण मिथिला नगरीत राहून त्यांनी बहुलाश्व व श्रुतदेव यांना तत्त्वज्ञानाचा उपदेश केला.

नंतर श्रीकृष्ण द्वारकेस निघून गेले. श्रुतदेव व बहुलाश्वराजा हे उभयता ब्रह्मचिंतनाने सायुज्यतेस पावले.

## वृकासुराचा नाश

वृकासुर हा शकुनी दैत्याचा पुत्र होता. तो दुष्ट इकडेतिकडे हिंडत असता एकदा नारदऋषींना भेटला व त्याने त्यांना विचारले, 'नारदा, ब्रह्मदेव, विष्णू, शंकर यांच्यापैकी कोणता देव त्वरित प्रसन्न होतो ?' नारदांनी त्याला सांगितले, 'शंकर फार थोड्या वेळात प्रसन्न होतो, पण तो क्षुब्धही त्वरित होतो. क्षुब्ध झाला की शापही देतो. वृकासुरा, तुला लौकर फलप्राप्तीची आशा असेल तर तू त्या महादेवांची आराधना कर. शंकरानं रावणास व बाणासुरास असेच चांगले वर दिले.'

नारदांचे ऐकून वृकासुराने महादेवांची उपासना करण्याचा निश्चय केला. तो केदारक्षेत्रास गेला. तेथे आपल्या शरीराचे मांस काढून वर-प्राप्तीसाठी त्याचे अग्नीत हवन करू लागला. याप्रमाणे त्याने सहा दिवसपर्यंत अनुष्ठान केले. तरी महादेव प्रसन्न झाले नाहीत. सातव्या दिवशी केदारतीर्थात स्नान करून त्या दैत्याने आपले मस्तक शस्त्राने तोडण्याचा प्रयत्न करताच तेथे अग्निकुंडातून भगवान शंकर प्रकट झाले. त्यांनी दैत्याचा हात पकडला. महादेवांचा स्पर्श होताच त्याचा देह पूर्वीप्रमाणे झाला. महादेवांनी त्याला विचारले,

'असुरा, असं मस्तक तोडून टाकण्याचं प्रयोजन काय ? भक्ता-पासून उदकप्राप्ती झाली तरी मी संतुष्ट होतो. तू एवढा अट्टहास कशासाठी करतोस ? माग. एखादा चांगला वर माग.'

'प्रभो, मी ज्याच्या मस्तकावर हात ठेवीन त्याला मरण यावं, असा वर मला द्यावा.' या असुराची ही इच्छा पाहून शंकरांना खेद झाला. पण ते वचनबद्ध असल्याने त्या दैत्यास त्यांनी तो वर दिला. त्या चांडाळ असुराने पार्वतीचेच हरण करण्याचा प्रयत्न केला. आपला हात शंकरांच्या मस्तकावर ठेवण्याचा प्रयत्न त्याने केला. त्या असुराची ही भयानक इच्छा पाहून भगवान शंकर पळत सुटले. वृकासुर त्यांचा

पाठलाग करीत होता. ब्रह्मादिकांना शंकरांची करुणा आली. शंकर वैकुंठास गेले. भगवान विष्णूंनी योगमायेने एका ब्रह्मचाऱ्याचा वेष धारण केला. त्यांनी वृकासुरास म्हटले, 'वृका, तू आता थकला असशील. थोडी विश्रांती घे. तुझ्या मनात तरी काय आहे? मी तुला साह्य करीन. असुरा, तू शंकरांना उगाच महत्त्व दिलंस. दक्षाच्या शापापासून ते प्रेतांचे, पिशाचांचेच स्वामी झाले आहेत. त्यांचं देवत्व संपलेलं आहे. याची सत्यता अनुभवायची असेल तर तू स्वतःच्याच डोक्यावर हात ठेवून पाहा.'

शंकरांच्या सामर्थ्याबद्दल वृकाच्या मनात शंका आल्याने त्याने स्वतःच्याच डोक्यावर आपला हात ठेवला. तेव्हा शंकरांचा वर फलद्रूप होऊन वृकासुर पर्वताप्रमाणे जमिनीवर कोसळला. देवादिकांनी भगवंतांचा जयजयकार केला. भगवान विष्णू शंकरांना म्हणाले, 'हा पापी व कृतघ्न दैत्य स्वतःच्याच पातकानं मरण पावला आहे. अपराध्यास असंच शासन व्हायला हवंय.'

## कृष्णास व अर्जुनास भूमदर्शन

द्वारकेत एका ब्राह्मणाच्या स्त्रीला पुत्र झाला. तो भूमीवर ठेवताच मरण पावला. ब्राह्मण पुत्रशोकानें व्याकुळ झाला व त्यानें मुलाचे प्रेत राजद्वारात आणून ठेवले. तो मोठ्यानें आक्रोश करून म्हणू लागला, 'अहो, हा माझा पुत्र मरण पावला. हा माझ्या पातकानं नाही मेला. ब्रह्मद्वेषी, दुष्टबुद्धीच्या, विषयासक्त, धनलोभी अशा उग्रसेन राजाच्या अनाचारांनी हा प्रसंग माझ्यावर ओढविला आहे. राजाच्या पातकांमुळं प्रजेस दुःखं भोगावी लागतात.' त्या ब्राह्मणाचे असे आठ पुत्र एकामागून एक मरण पावले व त्यांची प्रेते राजवाड्यापुढे आणून ब्राह्मणानें उग्रसेनास शिव्याशाप दिले. ब्राह्मणाच्या नवव्या पुत्राचीही अशीच गत झाली.

ब्राह्मणाचा विलाप ऐकून श्रीकृष्णांच्या सान्निध्यात बसलेला अर्जुन त्या ब्राह्मणास म्हणाला, 'अरे, तू उगाच का रडतोस? हे सर्व यादव भित्रे, भोजनभाऊ आहेत. यांत ब्राह्मणांचा कैवारी असा एकही नाही.

राजे जिवंत असताना ब्राह्मणास शोकाचा प्रसंग येतो ? त्या क्षत्रियांचा उपयोग तरी काय ? ब्राह्मणा, मी आता तुझ्या संततीचं रक्षण करीन. माझ्या हातून असं घडलं नाही तर अग्निकाष्ठं भक्षण करून मी पातकां-पासून मुक्त होईन.'

'अर्जुना, जी गोष्ट बलराम, कृष्ण यांच्या हातून घडली नाही, ती करण्याची तू इच्छा करतोस ? तुझा भरवसा मला नाही वाटत.'

'ब्राह्मणा, मी गांडीव धनुष्य धारण करणारा वीर आहे हे ध्यानात ठेव. अरे, मी युद्धात शंकरांनाही संतुष्ट केलं आहे. मी प्रसंगी यमालाही जिंकीन. तुझे मुलगे परत आणीन.'

ब्राह्मण अर्जुनावर विश्वास ठेवून घरी निघून गेला. ब्राह्मणाची स्त्री गरोदर झाली, प्रसूतीचा समय येताच अर्जुनानें स्नान करून मृत्युंजयास नमस्कार केला, दिव्य अस्त्रांचा जप करून त्यानें गांडीव धनुष्य हाती घेतले, त्यानें बाळंतिणीच्या घराभोवती बाणांचा एक पिंजराच निर्माण केला, त्या विप्रस्त्रीस पुत्र झाला. पण ते बालक टाहो फोडून आपल्या देहासह आकाशमार्गे नाहीसे झाले, ब्राह्मणाचा आक्रोश पुन्हा सुरू झाला, कृष्णाकडे जाऊन त्यानें अर्जुनाची निंदा केली, आपली निंदा अर्जुनाने ऐकून घेतली, सर्वत्र संचार करण्याच्या एका शक्तीचा उपयोग करून अर्जुन यमाच्या संयमनीक नावाच्या नगरीत गेला, पण तेथे त्याला ब्राह्मणाचा पुत्र दिसला नाही, इंद्रपुरीतही त्याला तो दिसला नाही, अर्जुनाने अग्नी, निर्ऋती सोम, वायू, वरुण, यांची स्थाने शोधली. स्वर्ग व पाताळाचा शोध त्याने केला, पण तो मृत पुत्र त्याला कोठेच आढळला नाही.

शेवटी अर्जुनाने अग्नीत प्रवेश करण्याचे ठरविले, कृष्णांनी त्याला शेवटी म्हटले,

'अर्जुना, थांब, मी तुला ब्राह्मणपुत्र दाखवितो, तू कशासाठी प्राण त्याग करतोस ? निंदेला कशास भितोस ? अरे, जे कुणी आज निंदा करतात ते उद्या स्तुतीही करतील.' असे म्हणून श्रीकृष्ण अर्जुनास रथावर घेऊन पश्चिम दिशेस निघाले. सप्तपर्वत, सप्तसमुद्र, सप्तद्वीपे ओलांडून ते एका गाढ अंधाराच्या प्रदेशात आले. त्या भयाण अंधारात

शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प, व बलाहक हे चार अश्व पुढे पाऊल टाकीनात. तेव्हा कृष्णांनी आपले सुदर्शनचक्र पुढे सोडले. त्या चक्रामुळे अंधार संपला. अर्जुनास रथ जेथे थांबला तेथे एक अद्वितीय तेज दिसले. त्याने ते पाहाताच डोळे मिटून घेतले. नंतर त्या उभयतांनी एका अगाध जल-संचयात प्रवेश केला. तेथे एक दिव्य व रत्नखचित असे गृह त्यांना दिसले. तेथे त्यांनी एक महाप्रचंड सहस्र शीर्षांचा, दोन सहस्र नेत्रांचा काळ्या कंठाचा, श्यामवर्णाच्या जिभेचा, सहस्रमण्यांचा एक भयानक व आश्चर्यकारक शेष पाहिला. त्या शेषाच्या शरीरावर सुखाने पुरुषोत्तमही बसलेले त्यांनी पाहिले.

शेषशायी नारायणांची ती प्रसन्नमुख, घनश्यामसुंदर, आकर्णनेत्र श्रीवत्सांकित, पीतांबरधारी, किरीटकुंडलांनी देदीप्यमान, कुरळ्या केसांनी शोभणारी, कौस्तुभाने झळकणारी व आपादवनमालेने नटलेली अद्वितीय मूर्ती पाहून श्रीकृष्ण व अर्जुन यांना अतिशय आनंद झाला. त्या भूमा नावाच्या पुरुषोत्तमास पाहून अर्जुनास भय वाटले. श्रीकृष्णांनी व अर्जुनाने त्या भूमास वंदन केले. तो भूम त्यांना म्हणाला, 'कृष्णा, अर्जुना, तुम्ही मला भेटावं, म्हणून मी त्या द्वारकेच्या ब्राह्मणाचे पुत्र आणले. तुम्ही माझेच अंश आहात. धर्मरक्षणासाठी तुमचा अवतार झाला. दुष्टांचा नाश करून तुम्ही लौकर परत या.'

त्या शेषशायी भगवंतांपासून ब्राह्मणपुत्रांना कृष्णार्जुनांनी घेतले व ते परत द्वारकेस आले. त्यांनी त्या पुत्रांना ब्राह्मणाच्या स्वाधीन केले.

## कृष्णक्रीडा व यदुवंशविस्तार

श्रीकृष्णांची द्वारकानगरी अनेक प्रकारच्या विपुलतेने समृद्ध होती. यादवश्रेष्ठांच्या या नगरीत उत्तम वेषधारी स्त्रिया असून त्यांच्या शरीरांवर तेज झळके. आपल्या घरात कंदुकादी क्रीडा करताना त्या विजेप्रमाणे तळपत. नगरीतील रस्ते मदोन्मत्त हत्तींनी भरलेले असून अलंकार घातलेले घोडे व रथ रस्त्यांतून फिरत. नगरीत अनेक उद्याने, उपवने असून त्यांत वृक्षांच्या फांद्यांवर पक्ष्यांचे व भुंग्यांचे मंजुळ गायन सुरू असायचे. अशा या द्वारकेत सोळा हजार स्त्रियांचा पती कृष्ण त्यांच्या

मंदिरांत तितकी रूपे धारण करून रममाण व्हायचा.

त्या मंदिरांजवळील स्वच्छ पाण्याच्या तलावांत कल्हार, उत्पल, कुमुद, अंभोज इत्यादी कमळांचा सुवास दरवळे. पक्ष्यांचे थवे गायन करीत. त्या तलावांत श्रीकृष्ण क्रीडा करीत. त्यांच्या स्त्रिया जेव्हा त्यांना आलिंगन देत तेव्हा त्या स्त्रियांच्या स्तनांवरील केशराच्या उटीने त्यांचे अंग भरून जाई. त्यांच्या लीलांचे वर्णन करण्यासाठी गंधर्व येत. मृदंग, पणव, आनक, वीणा इत्यादी वाद्ये वाजत. सूत, मागध, बंदिजन स्तुती गात. त्या स्त्रिया हसत हसत श्रीकृष्णांवर पिचकाऱ्यांनी पाणी उडवीत. कृष्णही उलट त्यांच्या अंगावर पाणी उडवीत असत. त्या स्त्रियांची शरीरे पाण्याने भिजून चिंब झाली की त्यांचे स्थूल स्तन उघडे पडत. त्यांच्या विस्तीर्ण वेण्यांतील फुलं गळून पडत. अशा वेळी कृष्णांच्या अंगावर पाणी शिंपडण्याच्या मिषाने त्या त्यांना आलिंगन देत. त्या वेळी त्यांचा कामानंद जागृत होऊन त्यांच्या मुखावर तेज चढे. मग त्या फारच सुंदर दिसत.

श्रीकृष्ण अशा सुंदर स्त्रियांशी क्रीडा करीत. त्यांच्या गळ्यांतील माळा स्त्रियांच्या स्तनांवरील केशराने लिप्त होत. प्रणयक्रीडेच्या धांदलीत त्यांच्या केसांची गाठ सुटून ते मोकळे होत. या क्रीडेच्या प्रसंगी नट, नाचणाऱ्या स्त्रिया, त्यांच्या सोळा हजार स्त्रिया त्यांना अलंकार व वस्त्रे देत असत. त्यांचे चालणे, गाणे, कटाक्ष, हसणे, विनोद, आलिंगन इत्यादींनी स्त्रियांची अंतःकरणे वेधून जात त्यांचे सर्व लक्ष एकट्या श्रीकृष्णांवरच असे. त्यांच्या अशा दृढप्रेमामुळेच त्यांना मोक्षाची प्राप्ती झाली.

त्या सुंदर स्त्रियांत रुक्मिणी आदी आठ पट्टराण्या होत्या त्यांच्या पराक्रमी पुत्रांत अठरा महारथी असून त्यांनी मोठीच कीर्ती मिळविली. प्रद्युम्न, अनिरुद्ध, दीप्तिमान, भानू, सांब, मधू, बृहद्भानू, चित्रभानू, वृक, अरुण, पुष्कर, वेदबाहू, श्रुतदेव, सुनंदन, चित्रबाहू, विरूप, कवी व न्यग्रोध; अशी त्यांची नावे होती. त्यांच्या अठरा पुत्रांत रुक्मिणीचा प्रथम पुत्र प्रद्युम्न हा पित्यासारखाच श्रेष्ठ होता त्याने रुक्मीच्या कन्येशी विवाह केला. त्यांना दहा हजार हत्तींचे बल असणारा अनिरुद्ध

झाला. या अनिरुद्धानें रुक्मीच्या नातीशी लग्न केले. त्याला तिच्यापासून वज्र नावाचा पुत्र झाला. मुसळांच्या युद्धात यादव नष्ट झाले तरी हा एक वज्र मात्र वाचला.

या वज्राचा पुत्र प्रतिबाहू, प्रतिबाहूचा सुबाहू. सुबाहूस शांतसेन नावाचा पुत्र होता. शांतसेनाचा पुत्र शतसेन. कृष्णांच्या कुळात निर्धन, अल्प संततीचे, अल्पायुषी, अल्पपराक्रमी, ब्राह्मणद्वेषी कोणी झालेच नाहीत. यदुकुमारांना शिक्षण देण्यासाठीच तीन कोटी आठ हजार आठशे आचार्य होते. उग्रसेन हा नेहमी अनेक यादवांनी वेढलेला असे. यादवांची एकशे एक घराणी होती. सर्वांत समर्थ श्रीकृष्ण असल्याने त्यांच्याकडेच नायकत्व आले. निजणे, बसणे, उठणे, फिरणे, खेळणे, स्नान करणे इत्यादी कामांतही यादवांचे लक्ष श्रीकृष्णांकडे असायचे. या श्रीकृष्णांचाच जयजयकार सर्वत्र होई. तेच सर्वांच्या हृदयांत निवास करीत. मोठमोठे यादव त्यांचे अनुचर होते. त्यांनी आपल्या सामर्थ्यानें अधर्माचा मोड केला. स्थावर-जंगमात्मक पातकांना नष्ट केले. आपल्या रमणीय मुखानें गोकुळातील स्त्रियांची कामवासना जागृत करून त्यांनी ती नाहीशीच केली. अशा या यदुनायकांचे स्मरण प्रत्येकाने अगत्याने करावे. त्यांच्या मनोहर कथा ऐकाव्यात. त्यांच्या गुणकीर्तीचे गायन करावे. त्यांचे नित्य ध्यान करावे. त्यांच्या प्राप्तीसाठी केवळ अरण्याचा वास उपयोगी नाहीं. त्यांच्या गुणसंकीर्तनानेच ते प्राप्त होतात.

## यदुकुलाची अखेर

एकदा द्वारकेत यज्ञयागासाठी श्रीकृष्णांनी ऋषिमुनींना आमंत्रण केले. यज्ञ समाप्त झाल्यानंतर ते मुनी द्वारकेजवळच पिंडारक नावाच्या क्षेत्रात गेले. तेथे यादवांचे कुमार खेळत होते. त्यांनी जांबवतीच्या सांबास स्त्रीवेष दिला व त्याला ऋषींसमोर नेले. त्यांनी कपटबुद्धीनें त्या ऋषींना विचारले,

‘ब्राह्मणहो, या सुंदर गर्भिणी स्त्रीला काय होईल ? मुलगा होईल ?’

‘मूर्खांनो,’ त्या कपटाचे स्वरूप ओळखून मुनी म्हणाले, ‘हिच्या

उदरी एक लोखंडाचं मुसळ जन्मास येईल. ते तुमच्या घराण्याचा नाश करील.'

ब्राह्मणांचा शाप ऐकताच यादवकुमार घाबरून गेले. त्यांनी सांबाचे पोट सोडून पाहिले तो त्यात एक मुसळ निघाले. झाल्या प्रकाराने उग्रसेनादी यादवही भयभीत झाले. कृष्णांना न कळविता उग्रसेनाने त्या मुसळाचे चूर्ण करून त्याचा अवशिष्ट भाग समुद्रात फेकून दिला. त्यातून समुद्रात लव्हाळे निर्माण झाले. लोखंडाचा एक भाग माशाने गिळला. एका पारध्यास तो मासा सापडला. त्याच्या पोटातील तो लोखंडी भाग त्याने आपल्या बाणाच्या टोकास लावला. श्रीकृष्णांनी आपल्या अतीन्द्रियशक्तीने हा सर्व प्रकार जाणला. त्यांनी सर्व यादवांचा नाश करण्याचा विचार मनात केला. ब्राह्मणांचा शाप निवारण करण्याची शक्ती अंगात असतानाही त्यांनी झाले हे बरेच झाले असे समजून ते उदासीन राहिले.

त्यानंतर काही काळाने सनकादिक पुत्र, मरीच्यादी ऋषी, ब्रह्मदेव, शंकर हे श्रीकृष्णांच्या दर्शनासाठी द्वारकेत आले. ब्रह्मदेवांनी श्रीकृष्णांची मनापासून स्तुती केली. ते म्हणाले, 'आदिपुरुषा, पृथ्वीचा भार उतरविण्यासाठी आम्ही आपली प्रार्थना केली. त्याप्रमाणे आपण अवतार धारण करून तो भार उतरविला. साधूंचा योगक्षेम आपण चालविलात. भगवंता, यदुवंशात अवतार धारण करून आपण अद्भुत पराक्रम केलेत. आचारसंपन्न पुरुष आपल्या चरित्राचं गुणगान करतील. परमपावना, आपणांस या यदुवंशात अवतार धारण करून एकशे पंचवीस वर्षं झाली आहेत. आता देवांचं अमुक एक कार्य राहिलं आहे असं नाही. आता आपण वैकुंठास प्रयाण करावं अशी आमची प्रार्थना आहे.'

'ब्रह्मदेवा, आपण म्हणता ते सर्व खरं आहे. मी सर्व भूभार कमी केला, पण माझ्याच वास्तव्यामुळं हे यादव वीर्य, शौर्य, लक्ष्मी यांच्यामुळे मदांध झाले आहेत. ते पृथ्वीला पीडा देण्याच्या विचारात आहेत. म्हणून ब्रह्मदेवा, ब्राह्मणांच्या शापाच्या निमित्तानं मी त्यांच्या नाशाचा उपाय योजीत आहे. ब्रह्मशाप आता यादवांचा दर्प वाढू देणार नाही. मी इथं आहे तोपर्यंतच यादवांचा क्षय होणं इष्ट आहे. त्यांचा संहार

करून मी वैकुंठास येईन. ब्रह्मदेवा, विप्रांच्या शापानं त्यांचा नाश व्हायला प्रारंभ झालाच आहे. तो पूर्ण होताच मी स्वतः वैकुंठास येईन.'

ब्रह्मदेव निघून गेल्यावर द्वारकेत भयंकर उत्पात होऊ लागले. वयोवृद्ध यादव एकत्र जमून कृष्णांकडे आले. त्यांना कृष्ण म्हणाले, यादवांनो, आपल्या यादवकुलाला ब्राह्मणांचा शाप लागला आहे. आपणांस वाचायचं असेल तर आपण या द्वारकेत राहू नका. आपण प्रभासक्षेत्रास जावं. त्या क्षेत्राचं माहात्म्य फार मोठं आहे. आपण त्या पुण्यक्षेत्री जाऊन स्नान करू. देवांचं व पितरांचं ऋण फेडू. सत्पात्र ब्राह्मणांना भोजन देऊ. श्रद्धापूर्वक दानं करू. आपण हा दुःखसागर तरून जाऊ.'

श्रीहरींच्या आज्ञेनुसार यादवांनी प्रभासक्षेत्रास जाण्याची तयारी केली. अशी गडबड चालू असताना द्वारकेत भयंकर उत्पात होत असताना कृष्णांचा एक थोर भक्त उद्धवाने कृष्णांना विचारले, 'देवाधिदेवा, योगेश्वरा, तुझी लीला अगाध आहे. ब्राह्मणांच्या शापाचा प्रतिकार करायला समर्थ असूनही तू उदासीन आहेस. त्या अर्थी तू हा मृत्युलोक सोडून जाणार हे स्पष्ट दिसतं. परमात्म्या, तुझा वियोग मला क्षणभरही सहन होणार नाही. म्हणून तू मला तुझ्याबरोबर वैकुंठाला घेऊन जा. मला तुझा वियोग अगदी सहन व्हायचा नाही.'

उद्धवाची अशी प्रार्थना ऐकून भगवान कृष्णांनी त्याला भक्ति-तत्त्वाचा, आचारधर्माचा उपदेश विस्ताराने केला. राजा यदू व अवधूत यांच्या संवादांतून कृष्णांनी ज्ञानाचा उपदेश केला. जीवशिवस्वरूप, त्यांतील भेद, साधुसमाजाचे महत्त्व, वैराग्याची महती, कर्माचरण, संसारवृक्ष, गुणनिवृत्तीचे उपाय, भक्तिमार्ग व ध्यानयोग, अनेक सिद्धी, परमेश्वराच्या विभूती, ब्रह्मचाऱ्याचे व गृहस्थाचे आचार, चातुर्वर्ण्य-रचना, आश्रमांची व्यवस्था, शमदमादी लक्षणे, योगत्रयाचे निरूपण, नरदेहप्रशंसा, सांख्यतत्त्वज्ञान, भिक्षूस झालेली वैराग्यप्राप्ती, ऐल-राजाच्या कथेतून प्रकट होणारे तत्त्वज्ञान, विषयसुखांचे स्वरूप, विविध प्रकारची पूजा, ध्यानाचे प्रकार, ज्ञानयोग, भक्तियोग; इत्यादींचे अति-विस्ताराने कृष्णांनी उद्धवासाठी विवेचन केले.

श्रीकृष्णांचा उपदेश ऐकून उद्धवाचा कंठ दाटून आला. त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. त्याने कृष्णांच्या सांगण्यानुसार बदरिकाश्रमी प्रयाण केले व भागवतधर्माचे आचरण करून भगवद्-स्वरूप प्राप्त करून घेतले.

उद्धव द्वारकेतून निघून गेल्यावर द्वारकेत सूर्याला खळी पडू लागली. भूकंपाचे धक्के बसू लागले, सर्व दिशा पेटल्यासारख्या दिसू लागल्या. श्रीकृष्णांनी हे सर्व उत्पात पाहून यादवांना सांगितले, 'यादवांनो, द्वारकेत हे असे उत्पात होत आहेत. आता महान अनर्थ होणार आहे. स्त्रिया, मुलं, वृद्ध यांनी शंखोद्धारास जावं. आणि आपण प्रभासक्षेत्री जाऊ, पश्चिमवाहिनी सरस्वती नदीत आपण स्नान करू. निर्मळ चित्तानं उपवास करू. तिथं ब्राह्मणांना आपण धेनू, सुवर्ण, वस्त्रं, भूमी, गज, अश्व, रथ, गृह अर्पण करू. त्यामुळं आपणांस चांगली गती मिळेल.'

श्रीकृष्णांच्या सांगण्यावरून सर्व यादववीर प्रभासक्षेत्रास आले. ते जरी पुण्यक्षेत्रात आले तरी त्यांची बुद्धी विपरीत झाली होती. त्यांनी मैरेयक नावाचे अतिशय उन्मादक मद्य घेतले. मद्यपानाने ते धुंद झाले. त्यांच्यांत घनघोर कलह झाला. संतापून ते एकमेकांशी लढू लागले. धनुष्ये, खड्गे, भाले, तलवारी, गदा, तोमर, ऋष्टी यांच्या साह्याने त्यांनी एकमेकांवर हल्ले केले. शस्त्रांचे प्रहार होत राहिले. प्रद्युम्न व सांब, अक्रूर व भोज, अनिरुद्ध व सात्यकी, सुभद्र व संग्रामजित, सुमित्र व रथ यांच्यांत घनघोर संग्राम झाला. पितापुत्रांचे, भावाभावांचे, मामाभाच्यांचे, चुलत्यापुतण्यांचे, मित्रामित्रांचे वैर उफाळून आले. युद्धात शस्त्रे संपली. धनुष्ये मोडून गेली. शेवटी वीर समुद्रातील लव्हाळ्यांनीच एकमेकांशी लढू लागले. धुंद झालेल्या यादवांनी श्रीकृष्णावरही चाल केली. त्या उन्मत्त यादवांना बलराम हासुद्धा शत्रूच वाटला. तेव्हा बलराम व कृष्ण यांनी लव्हाळे हातात घेऊनच उरलेल्या सर्व यादवांचा संहार केला. श्रीकृष्ण व बलराम तेवढे वाचले. यादवांचा समूळ नाश झाला.

## बलराम व कृष्ण यांचे निर्याण

बलरामाने समुद्राच्या तीरावरच परमात्म्याचे चिंतन केले व परब्रह्मात विलीन होऊन धरणीवर देह ठेविला. बलराम निघून जाताच भगवान कृष्णांनी पिंपळाचा आश्रय करून ते भूतलावर स्वस्थ बसले. त्यांची अंगकांती झळकत होती. त्यांच्या चतुर्भुजरूपाचा प्रकाश चोहोंकडे पडला होता. त्यांच्या वक्ष:स्थानी श्रीवत्स शोभत होते. मुखावर मंद हास्य होते. मस्तकावर नील केस चमकत होते. त्यांचे नेत्र तेज:पुंज होते. कानांत मकराकार कुंडले होती. कमरपट्टा, यज्ञोपवीत, किरीट, बाहुभूषणे, कडी, हार, पदभूषणे, कौस्तुभ यांनी त्यांच्या देहास शोभा आली होती. त्यांच्या गळयातील वनमालेने व हातांतील आयुधांनी त्यांच्या शरीरावरील तेज वाढविले होते.

अशा स्थितीत कृष्णांनी आपल्या उजव्या मांडीवर डावा पाय ठेविला होता. त्या पायाचा कोमल भाग जरा नावाच्या एका पारध्याने पाहिला. तो त्यांनी मृगाचे मुख मानून त्यावर एक बाण सोडला. त्या बाणाचा अग्रभाग मुसळातील एका टोकाचा बनविला होता. व्याधाने जवळ येऊन पाहिले, तो प्रत्यक्ष श्रीकृष्ण परमात्म्यांना आपण बाण मारला हे त्याच्या ध्यानात आले. त्याने त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवून प्रार्थना केली. 'नारायणा, अशा वेळी आपण माझा वध करावा हे उत्तम. मी मृगांना फसवून त्यांचा वध करतो. हे माझं घोर पातक आहे. आता आपण मला एकदम मारून टाकावं. म्हणजे माझ्या हातून असं दुष्ट कृत्य पुन्हा होणार नाही. विश्वाधिपते, हा सर्व त्या विप्रशापाचा खेळ आहे, असं तू म्हणशील व माझी उपेक्षा करशील, पण तू माझा वध करूनच मला सद्‌गती दे.'

श्रीकृष्णांचा सारथी दारुक हा त्यांचा शोध घेत हिंडत होता. तुलसीचा सुवास वायूबरोबर ज्या दिशेने येत होता त्या दिशेस तो वळून श्रीकृष्णांपाशी आला. कृष्णांना पाहून त्याला गहिवरून आले. त्याने रथातून उतरून भगवंतांचे चरण धरले व म्हटले, 'प्रभो, आपल्या वियोगानं माझी दृष्टी अंध झाली. मला सर्व प्रकारचं दैन्य आलं.

दारुक एवढे म्हणत आहे तोच श्रीकृष्णांचा गरुडांकित रथ, अश्व व ध्वज यांच्यासह आकाशात उडून गेला. त्यामागोमाग त्यांची आयुधेही गेली. हा प्रकार पाहून दारुकास आश्चर्य वाटले. त्याला श्रीकृष्ण म्हणाले,

'दारुका, तू आता द्वारकेस जा. इकडची सर्व परिस्थिती आमच्या आप्तेष्टांना सांग. सर्व यादव परस्परांशी भांडून मरण पावले. बलराम गेला. माझी ही अशी स्थिती. तूही आता दारुका, या द्वारकेस राहू नकोस. मी आता इथं नाही. ही द्वारका समुद्रात बुडणार आहे. तू आमच्या माता-पित्यांना घेऊन इंद्रप्रस्थास जा. वाटेनं अर्जुन तुम्हांस सांभाळील. ज्ञानाची जोड कर. गृहपुत्रांबद्दल आसक्ती ठेवू नकोस.'

भगवंतांचे बोलणे ऐकून दारुकाच्या मनास खिन्नता वाटली. त्याने श्रीकृष्णांना प्रदक्षिणा घातली व द्वारकेस प्रयाण केले. त्यानंतर भगवान कृष्णांचे निर्याण पाहाण्यासाठी त्या पिंपळाच्या झाडाखाली ब्रह्मदेव आले. पार्वतीसह शंकर, इंद्रादी लोकपाल, मोठे मुनी, प्रजापती, पितर, सिद्ध, गंधर्व, विद्याधर, प्रमुख सर्प, चारण, यक्ष, राक्षस, किन्नर, अप्सरा, इत्यादी भगवंतांचे गायन करीत तेथे जमा झाले. अंतरिक्षातून पुष्पवृष्टी होऊ लागली. त्यांना पाहून भगवंतांनी डोळे मिटले. आपल्या देहाचा लय त्यांनी परमात्मतत्त्वात केला. या समाधीच्या मार्गाने श्रीकृष्ण सदेह परब्रह्मात विलीन झाले. श्रीकृष्ण निजधामास गेले तेव्हा पाठोपाठ सत्य, धर्म, धृती, कीर्ती, लक्ष्मी यांनीही भूतल सोडला. पृथ्वीस एक प्रकारची अवकळा प्राप्त झाली.

कृष्णांच्या आज्ञेप्रमाणे दारुक द्वारकेस आला. त्याने वसुदेव, उग्रसेन यांच्या चरणांवर मस्तक ठेविले. दुःखाश्रूंनी त्यांना न्हाऊ घातले. यादवांच्या अखेरीची हकीगत त्याने त्या वृद्धांना सांगितली. ती ऐकून त्यांना मूर्च्छा आली. सर्व यादवांचा संहार ऐकून सर्वांनाच शोक वाटला. देवकी, रोहिणी, वसुदेव यांनी त्वरित प्राण सोडले. यादवस्त्रिया आपापल्या पतींबरोबर सती गेल्या. वसुदेवाच्या पत्नी त्यांच्याबरोबर सती गेल्या. रुक्मिणी आदी कृष्णपत्नींनी पतिपदांवर चित्त ठेवून अग्नीत प्रवेश केला. अर्जुनासही कृष्णाच्या वियोगाने अतिशय दुःख झाले. पण त्याने आपल्या मनाची शांती ढळू न देता त्या सर्व मृतदेहांचे और्ध्वदेहिक

कार्य पार पाडले.

त्यानंतर समुद्राची एकदम वाढ झाली. द्वारका समुद्रात बुडून गेली. मधुसूदनाचे मंदिर तेवढे वाचले. पिंडदानादी विधी झाल्यावर उरलेल्या स्त्रियांना, बालांना, वृद्धांना बरोबर घेऊन अर्जुन इंद्रप्रस्थास गेला. तेथे त्याने वज्रास राज्याभिषेक केला. अर्जुनाकडून धर्मराजास यादवांच्या संहाराचे वृत्त समजले. त्याला अतिशय दुःख झाले.

## परीक्षितास मोक्षाची प्राप्ती

वरीलप्रमाणे सर्व कृष्णकथा शुकाचार्यांनी परीक्षिताला सांगितली. सदाचाराचा वा आत्मज्ञानाचा बोधही केला. हे सर्व ऐकून विष्णुरास म्हणजे विष्णूंनी रक्षिलेला परीक्षित राजा आपल्या आसनावरून उठला, व शुकाचार्यांना हात जोडून प्रार्थना करू लागला, 'मुनिवर्य, आपल्या ठिकाणी जी भूतमात्रांबद्दल अनुकंपा आहे तिचं वर्णन करावं तेवढं थोडंच आहे. भगवद्‌गुणांनी भरलेली ही पुराणसंहिता आपण माझ्या सुदैवानं निवेदन केलीत. आता मला तक्षकादिकांपासून थोडंही भय नाही. कारण आपण दाखविलेल्या कैवल्य मार्गानं मी मोक्षपदास पोचलो आहे. आता माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत. मला आता ऐकण्याची इच्छाच नाही. आता मला आपण अनुज्ञा द्यावी. मी माझी सर्व इंद्रियं परब्रह्मात विलीन करून उपाधिरहित बनतो. गुरुवर्या, आपणांमुळं माझी सायुज्यता सुलभ झाली आहे.'

एवढे म्हणून राजाने व्यासपुत्र शुकाचार्यांची पूजा केली. ते मुनी संन्याशांबरोबर इतरत्र निघून गेले. त्यानंतर परीक्षिताने आपल्या बद्धीचा लय परब्रह्मात करून ध्यानपरायण होऊन तो वृक्षाच्या एखाद्या खोडाप्रमाणे स्तब्ध झाला. गंगेच्या तीरावर तो असा निर्विकार समाधीत असताना, दर्भांच्या आसनावर ध्यानस्थ असताना क्रुद्ध झालेल्या ऋषि-पुत्राच्या प्रेरणेने तक्षकसर्प परीक्षिताला दंश करण्यासाठी निघाला. वाटेत त्याला कश्यप नावाचा एक ब्राह्मण भेटला. या ब्राह्मणास विष उतरविण्याची विद्या माहीत होती. पण तक्षकाने त्याला द्रव्य देऊन परत पाठवून दिले. तक्षकाने एका ब्राह्मणाचे रूप घेतले व त्याने परीक्षित

राजाजवळ येऊन त्याला दंश केला. ब्रह्मस्वरूप झालेल्या परीक्षिताचा देह सर्पविषाच्या आगीमुळे त्वरित भस्म झाला. हा प्रकार पाहून पृथ्वी, अंतरिक्ष, दिशा इत्यादी ठिकाणी हाहाकार उडाला. देव, दानव, मनुष्य आश्चर्याने चकित झाले.

## जन्मेजयाचे सर्पसत्र

परीक्षिताचा पुत्र जन्मेजय यास आपल्या पित्यास तक्षकसर्पानें दंश केल्याचे व तो भस्म झाल्याचे समजले. त्याला अतिशय राग आला. त्याने ब्राह्मणांकडून सर्पयज्ञ करून नागांचे हवन केले. या सर्पयज्ञाच्या भडकलेल्या अग्नीत मोठमोठे सर्प जळून गेले. तक्षक घाबरून इंद्राच्या आश्रयास गेला. सर्व सर्प अग्नीत पडतात, पण तक्षक सापडत नाही हे पाहून राजा ब्राह्मणांना म्हणाला,

'ब्राह्मणांनो, तो नीच तक्षक अजून कसा येत नाही ?'

'राजा, तो इंद्राला शरण गेला आहे. इंद्राच्या आश्रयानें तो सुरक्षित आहे.'

'ब्राह्मणहो, तर मग त्या इंद्रासह तक्षकाला आणून तुम्ही अग्नीत का नाही टाकीत ?'

राजा जन्मेजयाचे हे बोलणे ऐकून ब्राह्मणांनी इंद्रासकट तक्षकाचे अग्नीत हवन करण्याचे ठरविले. 'तक्षकाशु पतस्वेह सहेन्द्रेण मरुत्वता' 'तक्षका, मरुतांच्या अधिपतीसह, इंद्रासह तू त्वरित या अग्नीत येऊन पड' अशा अर्थाचा मंत्र ब्राह्मणांनी म्हटला. मंत्राच्या शक्तीमुळे इंद्र आपल्या स्थानापासून चळला. तक्षकासह त्याचे स्थान डळमळू लागले. इंद्राच्या विमानासह तक्षक खाली पडू लागला तेव्हा अंगिरसपुत्र बृहस्पती जन्मेजयास म्हणाले, 'राजा, या सर्पराज तक्षकाचा वध तुझ्या हातून होणं शक्य नाही. यानं अमृतपान केलं आहे. त्यामुळं तो अजरामर झाला आहे. म्हणून राजा, तू हे सर्पसत्र बंद कर. आतापर्यंत यात अनेक निरपराधी सर्प दग्ध झाले आहेत. दैवात असेल ते भोगावंच लागतं.'

महर्षींच्या वचनास मान देऊन जन्मेजयानें सर्पसत्र थांबवून

बृहस्पतींची पूजा केली.

## मार्कंडेयांना बालमुकुंदांचे दर्शन

मार्कंडेयांचे पिता मृकंड ऋषी होत. त्यांच्याकडून मार्कंडेयांना जातकोपनयनादी सर्व संस्कार प्राप्त झाले. मार्कंडेयांनी त्यांच्याजवळ वेदांचे अध्ययन केले. त्यांनी ब्रह्मचर्यव्रताची दीक्षा घेतली. इंद्रियनिग्रह करून, जटा वाढवून, वल्कले परिधान करून त्यांनी हातांत दंड व कमंडलू धारण करून सकाळ-संध्याकाळ भगवंतांचे पूजन सुरू केले. मौन धारण करून ते भिक्षा मागीत. गुरूंना आणून देत. त्यांच्या अनुज्ञेने एकदाच भोजन करीत, न मिळाल्यास उपवास करीत.

याप्रमाणे मार्कंडेयांनी लक्षावधी वर्षे तप करून परमेश्वराची आराधना केली. त्यांनी मृत्यूवरही विजय मिळविला. ब्रह्मदेव, भृगू, शंकर, दक्षप्रजापती, मनुष्ये, देव, पितर, भूते यांना त्यामुळे फार आश्चर्य वाटले. इंद्रियनिग्रह, वेदाध्ययन करून मार्कंडेयांनी ध्यान केल्यामुळे त्यांच्या अंत:करणाचे क्लेश दूर झाले. अशा साधनेत सहा मन्वन्तरांचा काळ गेला. सातव्या मन्वन्तरात हे इंद्राला समजले तेव्हा तो स्वत:च्या स्थानाबद्दल साशंक होऊन घाबरला व त्यानें त्यांच्या साधनेत विघ्न आणून त्यांच्या नाशाचा प्रयत्न केला. त्यांना तपोभ्रष्ट करण्यासाठी गंधर्व, अप्सरा, मदन, वसंत, मलयवायू, लोभ व मद यांची योजना केली.

या मार्कंडेयांचा आश्रम हिमालयाच्या उत्तरेस होता. त्या ठिकाणी पुष्पभद्रा नावाची नदी वाहात होती. चित्रा नावाची शिळाही तेथेच होती. इंद्रानें पाठविलेली गंधर्वादी मंडळी त्यांच्या आश्रमात गेली. ते स्थान अत्यंत पवित्र होते. वृक्ष व वेली यांनी शोभणारे होते. पक्ष्यांचे थवे तेथे नांदत. पाण्याच्या विहिरी होत्या. तळी होती. पुष्पांतील मध पिऊन मत्त झालेले भ्रमर गुंजारव करीत. कोकिळांचे गायन होई. मोरांचे नृत्य होई. सुगंधी पुष्पांबरोबर तेथें मदनाचा शिरकाव झाला. रात्री त्या वेळेस चंद्रोदय होत होता. वृक्षांना कोवळे अंकुर येत होते. फुलांचे ताटवे उमलत होते.

इतक्यात अप्सरांचा समुदाय तेथे आला. हातात धनुष्यबाण घेऊन मदनही तेथे आला. गायननृत्य करीत त्याच्या मागून गंधर्वही आले. इंद्राच्या या अनुयायांना अग्नीसारखे तेजस्वी मार्कंडेयमुनी आश्रमात दिसले. त्यांना जिंकण्यासाठी अप्सरा नाचू लागल्या. गंधर्वांचे गायन सुरू झाले. मृदंग, वीणा, ढोल इत्यादींचे वादन चालू झाले. मदनाने आपले पंचमुखी अस्त्र धनुष्यावर ठेवले. वसंत, लोभ, मद हे मदतीला होतेच. पुंजिकस्थली नावाची एक अप्सरा चेंडूशी खेळत असताना तिच्या स्तनांच्या जडपणामुळे तिची कमर अगदी वाकून गेली होती. तिच्या केसांतील फुलांच्या माळा सुटलेल्या होत्या. चेंडूमागून ती इकडून तिकडे फिरत असताना तिच्या कमरेचा पट्टा सुटला. तिचे तलम वस्त्र वायूनें दूर सारले. याच वेळी मदनानें आपला बाण मुनींच्यावर सोडला. पण या गोष्टींचा काहीही परिणाम मार्कंडेयमुनींवर झाला नाही. उलट इंद्राचे सेवक त्या मुनींच्या तेजानें जळू लागले. तेव्हा ते त्या आश्रमातून पळून गेले.

इंद्रालाही मार्कंडेयांचा प्रभाव पाहून नवल वाटले. मार्कंडेयांची तपश्चर्या पाहून संतुष्ट झालेले श्रीहरी नरनारायणांच्या रूपानें त्यांच्यापुढे प्रकट झाले. त्यांतील एक श्वेतवर्णाचा व दुसरा कृष्णवर्णाचा होता. त्यांचे नेत्र फुललेल्या कमळासारखे होते. त्या चतुर्भुजमूर्तींच्या अंगावर मृगचर्म, वल्कले असून बोटांत पवित्रके घातलेली होती तीनपदरी यज्ञोपवीत त्यांच्या गळ्यांत होते. त्यांनी वेळूचा दंड हातात धारण केला होता. दुसऱ्या हातात कमळ, रुद्राक्षमाळ, जीवजंतू झाडण्यासाठी दर्भांची चौरी, अशा रूपात त्या मूर्ती प्रत्यक्ष तपश्चर्येच्याच मूर्ती वाटत होत्या.

नरनारायण समोर येऊन उभे राहाताच मार्कंडेयांनी त्यांना साष्टांग नमस्कार केला. त्यांच्या दर्शनाने त्यांचे अंग पुलकित झाले. त्यांचे डोळे प्रेमाश्रूंनी भरून आले. त्यांनी त्यांना बसायला आसन दिले. त्यांचे पाय धुतले. पूजाद्रव्यांनी, सुगंधी उटीने, धूपानें, माळेनें त्यांची पूजा केली. ते नम्रत्वाने त्यांना म्हणाले, 'भगवान, मी आपल्या प्रभावाचं वर्णन काय करावं ? प्राण्यांच्या शरीरातील प्राण आपल्याच प्रेरणेनं

स्फुरतात. आपली भक्ती करतात. त्यांचे आपण आप्त होता. आपली ही सात्त्विक शुभ्रवर्णाची मूर्ती भक्तांना फार आवडते ज्ञानी पुरुषही तिचाच आश्रय घेतात. आपण पुरुषोत्तम आहात. मी आपणांला नमस्कार करतो. सर्वव्यापी व विश्वस्वरूपी असे मार्गदर्शक व श्रेष्ठ दैवत आपणच आहात. आपण वेदमार्गांचे प्रवर्तक आहात. आपल्या-सारख्या महापुरुषांना मी वंदन करतो.'

'मार्कंडेया, आपल्या योगसमाधीच्या सामर्थ्यानं व भक्तीच्या योगानं, तपश्चर्या, वेदांचं अध्ययन, इंद्रियदमन यांनी तू कृतकृत्य झाला आहेस. तुझ्या या व्रताचरणानं आम्ही संतुष्ट झालो आहोत. म्हणून तू तुला हवाय तो वर माग.'

'प्रभो, माझ्याबद्दल आपल्या मनात एवढी दया वसत असलेली पाहून मला धन्य वाटतं. आपल्या दर्शनानंच माझे मनोरथ पूर्ण झाले आहेत. आता मला कोणतीही वासना राहिलेली नाही. आपण मजला, या सेवकाला दर्शन दिलंत. तेव्हा आता आणखी कोणता वर मागावा? पण मला ज्या मायेनं हे जग सत्य भासतं ती माया दाखवावी.'

'तथास्तु' म्हणून नरनारायण परत बदरिकाश्रमात निघून गेले. त्यांना भगवंतांची माया पाहाण्याची मात्र तीव्र इच्छा होती. ते एकदा असेच पुष्पभद्रेच्या तीरावर वसले होते. अशात एकाएकी भयंकर वारा वाहू लागला. विजांचा कडकडाट सुरू झाला. मुसळधार पाऊस येऊ लागला. सर्व पृथ्वी जलमय बनली. चोहोंकडे समुद्रांचीच निर्मिती झाली. त्यांच्या भयंकर लाटा धडाधड एकमेकांवर आपटू लागल्या. त्यांत मोठे जलचर प्राणी धावू लागले. प्रचंड भोवरेही निर्माण झाले. सारी सृष्टीच पाण्यात बुडुन गेली. मार्कंडेयमुनी हा उत्पात पाहून घाबरून गेले. सर्व विश्व जलमय झाले. एकटे मार्कंडेयमुनी मात्र भ्रमण करीत होते. ते क्षुधेनें, तृषेने व्याकुळ झाले. लाटांच्या भोवऱ्यात सापडून ते दीन दीन झाले. जलचर प्राणी त्यांना खाण्यासाठी धडपड करू लागले.

अशा प्रसंगी पृथ्वीच्या एका उंचवटयावर पत्रफुलांनी भरून गेलेला एक लहानसा वटवृक्ष त्यांनी पाहिला. त्याच्या ईशान्येकडील शाखेवर एका द्रोणात त्यांनी एक तेजस्वी बालक पाहिले. त्याच्या

अद्वितीय प्रभेमुळे सभोवतीचा अंधार नष्ट झाला होता. त्याची कांती नीलवर्णाची असून मुखकमल अत्यंत सुंदर होते. ग्रीवा शंखाप्रमाणे व वक्षःस्थल विशाल होते. कर्णांत शंखाप्रमाणे वलये असून त्यांवर डाळिंबीची फुले खोवलेली होती. त्या बालकाचे हास्य अमृताप्रमाणे शुभ्र होते. त्याचे अधरोष्ठ किंचित तांबूस होते. डोळे चमकदार होते. उदरावरील त्रिवली हालत असल्यामुळे त्याचे नाभिकमल चलित झाल्यासारखे वाटत होते. ते बालक आपल्या हातांनी पायाचा अंगठा तोंडात घालून चोखीत होते.

अशा त्या विलक्षण मूर्तीस पाहून मार्कंडेयांचे सर्व क्लेश दूर झाले. त्यांचे शरीर रोमांचित झाले. त्या बालकाची थोडी विचारपूस करावी म्हणून ते जरा जवळ गेले. तेव्हा त्याच्या श्वासाबरोबर ते त्यांच्या एकदम उदरातच गेले. त्यांना त्या उदरात पृथ्वी, आकाश, स्वर्ग, नक्षत्रे, पर्वत, समुद्र, द्वीपे, खंडे, दिशा, वने, देश, नद्या, नगरे, गावे, खेडी, गौळीवाडे, खाणी, देव, असुर, मनुष्ये, आश्रम, वर्णे, इत्यादींचे दर्शन झाले. त्यांना तेथे हिमालय दिसला. पुष्पवहा (पुष्पभद्रा) नदीही दिसली. त्यांनी स्वतःचा आश्रम तेथे पाहिला. त्यातील ऋषीही पाहिले. त्यांचे दर्शन घेऊन पुन्हा ते उच्छ्वासाबरोबर बाहेर आले. प्रलयसमुद्रात आले. अशा स्थितीत त्यांच्याकडे बालकाने कृपाकटाक्षाने पाहिले. त्या बालकास आलिंगन देण्यासाठी ते पुढे गेले. एवढ्यात ते बालक अदृश्य झाले. तो वटवृक्ष दिसेनासा झाला. समुद्र वगैरे नाहीसा होऊन मार्कंडेयमुनी परत आपल्या आश्रमात आले.

याच मार्कंडेयांना भगवान शंकर प्रसन्न झाले. पार्वतीच्या अनुमोदनाने त्यांनी वर दिला. 'महर्षे, तुझी भगवंतांच्या चरणी असलेली अनन्य निष्ठा आहे. तू कल्पसमाप्तीपर्यंत अजरामर होशील. तुझं यश अविच्छिन्न राहील. तुला त्रिकाली ज्ञान प्राप्त होईल. तू श्रेष्ठ पौराणिक होशील.' या वराप्रमाणे मार्कंडेयमुनी भगवद्भक्तीत रममाण होऊन या पृथ्वीवर फिरत आहेत.

# 3 सृष्टिरचना

## सर्ग, विसर्ग, विराट पुरुषाची वाढ

पुराणकर्त्यांनी पुराणाचे स्वरूप वर्णन करताना सर्ग, विसर्ग, स्थान इत्यादी लक्षणे सांगितली आहेत. सर्ग, विसर्ग, स्थान यांना पारिभाषिक अर्थ आहेत. सर्ग म्हणजे तात्त्विक सृष्टी, विसर्ग म्हणजे स्थावरजंगमात्मक सृष्टी, स्थान म्हणजे स्थिती. ऊतय म्हणजे कर्मवासना. विरोध म्हणजे संहार. भागवतपुराणाच्या दुसऱ्या स्कंधाच्या दहाव्या अध्यायात प्रामुख्याने सामान्य सृष्टी, विशेष सृष्टी, संरक्षण, पोषण, कर्माची वासना- मन्वन्तरातील आचारधर्म, सृष्टिसंहार, परमेश्वराची लीला, मोक्ष व ईश्वरस्वरूप अशा दहा विषयांचे विवेचन आहे. असे पहिल्याच श्लोकात म्हटले आहे. तो श्लोक असा,

अत्र सर्गो विसर्गश्च स्थानं पोषणमूतयः ।
मन्वन्तरेशानुकथा निरोधो मुक्तिराश्रयः ॥

पुढे या सर्ग, विसर्ग, स्थान इत्यादींचे सविस्तर अर्थ दिले आहेत. सत्त्व, रज, तम या तीन गुणांचे कमी-अधिक मिश्रण होऊन ब्रह्मापासून पंचमहाभूते, त्या भूतांची सूक्ष्मरूपे, पंचज्ञानेंद्रिये, महत्, अहंकार इत्यादी तत्त्वांची, विराटरूपाची उत्पत्ती होते तिला ‘ सर्ग ’ असे म्हणतात. या विराट पुरुषापासून जी सृष्टी उत्पन्न झाली तिला ‘ विसर्ग ’ म्हणतात. उत्पन्न झालेल्या सृष्टीचे रक्षण करण्याच्या स्थितीला ‘ स्थिती ’ असे नाव आहे. आपल्या भक्तांवर कृपा करून परमेश्वर त्याचा उत्कर्ष करतो त्याला पोषण असे म्हणतात. सदाचारी पुरुषांनी घालून दिलेल्या आचरणाला ‘ मन्वन्तर ’ नाव आहे. व फलाची इच्छा धरून केलेल्या कर्माला ‘ ऊती ’ असे नाव आहे. श्रीहरी व त्यांचे भक्त यांच्या चरित्रांना ‘ ईशकथा ’ असे म्हणतात. भूते, इंद्रिये इत्यादी आपल्या शक्तींसह परमात्म्यात लीन झाल्या की तो ‘ निरोध ’ होतो. असे लीन होताना

सर्व प्रकारच्या मायिक रूपांचा त्याग करून शुद्ध आत्मरूपाची जी अवस्था तिला 'मुक्ती' म्हणतात.

आध्यात्मिक जीव, आधिदैविक देवता, आधिभौतिक शरीर यांच्यापैकी कोणीच नसते, तेव्हा या तिहींचे ज्ञान असलेला आत्मा सर्वांचा आश्रय असतो. सर्वांना आश्रय झालेला हा विराट पुरुष ब्रह्माण्ड फोडून बाहेर आला तेव्हा त्याने स्वत:साठी प्रथम उदक निर्माण केले. तो त्या उदकात सहस्र वर्षेपर्यंत राहिला. या विराट पुरुषापासून उदक झाले. म्हणून याला नारायण असेही म्हणतात. या नारायणाची कृपा होईल तर द्रव्य, कर्म, काळ, स्वभाव, जीव यांची अस्तित्वे राहून त्यांची कार्येही होतात.

असा हा अद्वितीय परमात्माच योगनिद्रेतून जागा झाला व त्याला आपण अनेक रूपे धारण करावीत, अशी इच्छा निर्माण झाली. तेव्हा त्याने आपल्या मायेने आपल्या तेजाचे तीन भाग केले. अध्यात्म, अधिदैव, अधिभूत; हे ते तीन भाग. तो पुरुष हालचाल करू लागला तेव्हा त्याच्या शरीरातून आकाशापासून इंद्रियशक्ती, मानसिक शक्ती, शारीरिक शक्ती या तीन शक्ती निर्माण झाल्या. या तीन शक्तींपासून प्राण निर्माण झाला. प्राण आहे तोपर्यंत इंद्रिये अनुकूल हालचाल करतात. प्राणाचे चलनवलन सुरू झाले की भूक व तहान निर्माण होते. मग त्याला मुख उत्पन्न होते. या मुखापासून विराट देहाला टाळू फुटते. टाळूतून जीभ व जिभेपासून अनेक प्रकारचे रस निर्माण होतात. त्यानंतर त्याला बोलण्याची इच्छा झाली की, मुखापासून वाणी आणि देवता अग्नी यांची निर्मिती होते. या दोघांचे कार्य म्हणजे वाणी.

हा विराट जीव बराच काळ पाण्यात होता. पण प्राणवायू जोराने संचार करू लागल्यावर त्याला गंध सेवन करण्याची इच्छा झाली. तेव्हा त्याला दोन नाकपुड्या फुटल्या. त्या विराट पुरुषाला पाहावे अशी इच्छा झाल्यावर त्याला दोन नेत्रगोल प्राप्त झाले. रूप या विषयाचे ग्रहण त्यामुळ शक्य झाले ऋषी विराट पुरुषाचे स्तवन करीत, ते ऐकण्याची इच्छा झाली तेव्हा त्याला कान उत्पन्न झाले शब्द या विषयाचे ग्रहण सुरू झाले. पदार्थांचा मऊपणा, कठीणपणा, लहानपणा,

मोठेपणा, उष्णता, थंडी इत्यादी गुणांच्या ज्ञानासाठी विराट पुरुषाला त्वचा फुटली. तीवर केसादी निर्माण झाले. स्पर्शाचे ज्ञान होत गेले. तसेच त्याला दोन हात, दोन पाय यांची प्राप्ती झाली. त्याची जाण्या-येण्याची क्रिया सुरू झाली. त्यानंतर विराट पुरुषास अपत्यप्राप्तीची व रतिसुखाची इच्छा झाली तेव्हा शिश्न, उपस्थ निर्माण झाले. खाल्लेले अन्न निरुपयोगी झाल्यास ते टाकून देण्यासाठी गुद निर्माण झाले. अशीच निर्मिती नाभिस्थानाची, अपान, मृत्यू, उदर, आतडी, नाड्या, हृदय, मनाची चंद्र ही देवता इत्यादींची उत्पत्ती झाली. पृथ्वी, उदक व तेज या तत्त्वांनी बनलेले त्वचा, चर्म, मांस, रक्त, मेद, मज्जा, अस्थी या सात धातू विराट पुरुषाच्या शरीरात निर्माण झाल्या.

असे हे भगवंतांचे विराट रूप. याहून आणखी एक सूक्ष्मरूप-इंद्रियांना न समजणारे आहे. वाणी व मन यांच्या बाहेर ते असते. परमेश्वर हा मायेच्या योगाने ब्रह्मदेवांचे रूप धारण करून सर्व कर्मे करतो. राम, शंकर अशी नावे तो धारण करतो. निरनिराळे प्रजापती, मनू, देव, ऋषी, पितृगण, सिद्ध, चारण, गंधर्व, विद्याधर, असुर, यक्ष, किन्नर, अप्सरा, नाग, साप, किंपुरुष, सरपटणारे प्राणी, मातृगण, राक्षस, पिशाच, प्रेत, भूत, विनायक, कूष्मांड, वेताळ, यातुधान, गृह, पक्षी, हरिण, पशू, वृक्ष, पर्वत, सरपटणारे किडे; अशा विविध रूपांनी तो कामें करतो. स्थावर व जंगमात्मक जरायुक्त, अंडज, स्वेदज, उद्भिज; असे चार प्रकारचे जीवही तोच धारण करतो.

## विराट पुरुषात चौदा लोक

दुसऱ्या स्कंधातील पाचव्या अध्यायात श्लोकक्रमांक २१ ते ३३ पर्यंत पुरुषाची पंचवीस तत्त्वांची पिंडरूप व ब्रह्माण्डरूप सृष्टी कशी व कोणत्या क्रमानें तयार होते हे स्पष्ट केले आहे. परमेश्वराला मायेच्या साह्यानें अनेक होण्याची इच्छा होते. त्यानंतर सत्त्व, रज, तम या तीन गुणांचे कमीअधिक मिश्रण तयार होऊन स्वभावापासून या गुणमिश्रणाचा विकास होतो. कर्मापासून महत्तत्त्वाचा उद्भव होतो. रजोगुण व तमोगुण यांनी वृद्धी पावलेल्या महत्तत्त्वापासून विकाररूपाने अहंकार होतो. महाभूते, ज्ञानरूप देवता, क्रियांची साधने, ही त्या अहंकाराची रूपे असून हा अहंकार पुढे सात्त्विक, राजस, तामस बनतो.

पंचमहाभूते उत्पन्न करणारा तामस अहंकार, त्यात विकार

झाल्याने आकाश तयार झाले. शब्द त्याचे सूक्ष्मरूप व गुण आणि द्रष्टा व दृश्य ही त्याची खूण होय. पुढे आकाशात वायू उत्पन्न झाला. वायूचा गुण स्पर्श. त्यात गुणही असतो. वायूत विकार उत्पन्न होऊन रूप-गुणांचे तेज निर्माण झाले. त्याचे शब्द, स्पर्श हे गुण होत. तेजात विकार होऊन रसगुणाने युक्त जल निर्माण झाले. शब्द, स्पर्श, रूप हे तीन गुण त्यात असतात. जलात विकार होऊन गंध नावाचा गुण उत्पन्न होऊन पृथ्वीतत्त्व तयार झाले. शब्द, स्पर्श, रूप, रस हे गुण त्यात असतात. तामस अहंकारापासून अशी ही पंचमहाभूतात्मक सृष्टी तयार झाली. सात्त्विक अहंकारापासून मन तयार झाले. दिशा, वायू, सूर्य, वरुण, अश्विनीकुमार, अग्नी, इंद्र, उपेन्द्र, मित्र, ब्रह्मदेव या देवता सात्त्विक अहंकारापासून झाल्या. राजस अहंकारापासून पांच ज्ञानेंद्रिये, पांच कर्मेंद्रिये यांची निर्मिती झाली. कान, त्वचा, नाक, डोळे, जिव्हा, वाणी, हात, शिश्न, पाय, गुद ही ती दहा इंद्रिये होत.

विश्वाचे अंडरूप शरीर उदकातच पडलेले होते, हजारो वर्षांनंतर काळ, कर्म व स्वभाव यांना अनुसरून जीवरूप परमात्म्याने हे निर्जीव अंडे सजीव केले. ते अंडे फोडून त्यातून तो पुरुष बाहेर आला. त्या पुरुषाला सहस्रावधी मांड्या, सहस्रावधी पाय, सहस्रावधी डोळे, सहस्रावधी तोंडे व मस्तके होती, या पुरुषाच्या शरीरात सर्व विश्वाची रचना होती. पुरुषाच्या खालील भागात अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल व पाताल ही सात व वरच्या भागात भू, भुवः स्वः, महः, जन, तप व सत्य हे सात, अशी चौदा भुवने असतात.

ब्राह्मण हे त्या पुरुषाचे मुख, क्षत्रिय हे त्याचे बाहू, वैश्य मांडी व शूद्र पाय होत त्याच्या पायांपासून पृथ्वीलोक, नाभीपासून भुवर्लोक म्हणजे अंतरिक्ष, हृदयापासून स्वर्गलोक व वक्षःस्थलापासून महर्लोक यांची निर्मिती झाली. त्याच्या कंठाच्या ठिकाणी जनलोक, दोन ओठांत तपोलोक, मस्तकात सत्यलोक असून ब्रह्मलोक हा निश्चय मानला गेला आहे त्याच्या कटिभागापासून अतल, मांड्यांपासून वितल, गुडघ्यांत सुतल, पोटऱ्यांत तलातल, घोट्यांत महातल पायांच्या चवड्यांत रसातल व तळव्यात पाताल असतो असा हा विराट पुरुष चौदा भुवनांनी व्यापलेला आहे भूलोक हे त्याचे पाय भुवर्लोक ही त्याची नाभी व स्वर्लोक हे त्याचे मस्तक. अशीही एक कल्पना केली गेली आहे विराट पुरुषाचा हा [illegible] असा मांडता येईल.

मूळ पुरुष १

प्रकृती २

महत्तत्त्व ३

सात्त्विक अहंकार (४)

१ दिशा
२ वायू
३ सूर्य
४ वरुण
५ अश्विनीकुमार
(ज्ञानेंद्रियांच्या पाच देवता)

६ अग्नी
७ इंद्र
८ विष्णू
९ मित्र
१० ब्रह्मदेव
(कर्मेंद्रियांच्या पाच देवता)

राजस अहंकार (४)

१ कान
२ त्वचा
३ डोळे
४ जीभ
५ नाक
(पाच ज्ञानेंद्रिये)

६ मुख ११ बुद्धी
७ हात
८ पाय
९ गुद
१० शिश्न
(पाच कर्मेंद्रिये)

तामस अहंकार (४)

शब्द – आकाश
(शब्द) – स्पर्श – वायू
शब्दस्पर्श – रूप – तेज
शब्दस्पर्शरूप – रस – आप
शब्दस्पर्शरूपरस – गंध – पृथ्वी

या सर्वांचे अंडरूप शरीर

## विराट पुरुषातील यज्ञसामग्री

या विराट पुरुषाचे मुख हे वाणी व तिची देवता अग्नी यांचे स्थान. सप्त धातू हे छंदांचे स्थान होय. रस, रक्त, मांस मेद, अस्थी, मज्जा, शुक्र हे सप्त धातू, गायत्री, उष्णिक्, अनुष्टुप्, बृहती, पंक्ती, त्रिष्टुप्, जगती हे सात छंद, जिव्हा हे हव्याचे (इंद्रादी देवांना हवनीय अन्न), कव्य (पितरांना दिलेले हवनीय अन्न,) अमृतान्न (यज्ञात उरलेले अन्न), व सर्व प्रकारचे रस यांचेही तेच स्थान आहे. या विराट पुरुषाच्या दोन नाकपुड्या म्हणजे सर्व प्राण्यांची, वायूंची उत्पत्तिस्थाने होत. घ्राणेंद्रिय हे अश्विनीकुमार, औषधी, सामान्य व विशेष गंध, यांचे हे स्थान, त्याचे चक्षुरिंद्रीय हे रूप व तेज यांचे स्थान, स्वर्ग व सूर्य हे त्याचे नेत्र-गोलक होत. त्याचे कर्ण हे दिशा व तीर्थे उद्‌गमस्थान होय. श्रोत्रेंद्रिय हे आकाश व शब्द त्याचे उत्पत्तिस्थान, त्याचे हे शरीर वस्तूंतील तत्त्वांचे, त्याच्या सौंदर्याचे स्थान असून त्वचा, स्पर्श, वायू, यज्ञयाग यांचे हे स्थान होय.

या विराट पुरुषाचे केस हे उद्‌भिज जातीचे, त्याचे केस, श्मश्रू, नखे म्हणजे मेघ, विद्युल्लता आणि लोखंड यांची उत्पत्तिस्थानें होत. त्याचे बाहू हे इंद्रादी आठ दिग्पाल होत. त्याच्या पावलांचे क्षेत्र हे पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्ग यांचे स्थान होय, त्या पुरुषाचे जननेंद्रिय मूळ हे उदक, रेत, उत्पत्ती, पर्जन्य व प्रजापती यांचे उत्पत्तिस्थान. या जननेंद्रिया-पासून प्रजेची उत्पत्ती व आनंद यांचा लाभ होतो, गुह्येंद्रिय हे यम व मित्र यांचे उत्पत्तिस्थान असून मलत्याग, हिंसा, दारिद्र्य, मृत्यू, नरक यांचे ते स्थान होय.

या विराट पुरुषाची पाठ म्हणजे पराजय, अधर्म, अज्ञान यांचे उत्पत्तिस्थान. त्याच्या नाड्यांपासून नद व नद्या, त्याच्या अस्थीपासून पर्वत, त्याचे पोट ही अव्यक्त माया वा प्रकृती, त्याचे हृदय म्हणजे सर्वांच्या मनाचे अधिष्ठान होय. धर्म, ब्रह्मदेव, नारद, सनत्कुमार, शंकर, विज्ञान, सत्त्वगुण या सर्वांचे स्थान म्हणजे त्या पुरुषाचे चित्त होय. ब्रह्मदेव, नारद, शंकर, ऋषी, देव, दानव, मनुष्य, हत्ती, गाढव, हरिण,

क्षुद्र, सर्प, गंधर्व, अप्सरा, यक्ष, राक्षस, पिशाच, मोठे सर्प, पशू, पितर, सिद्धदेव, देवांचे भाट, वृक्ष, जलचर, स्थलचर, आकाशचर जीव, शनी, गुरू इत्यादी ग्रह, नक्षत्रे, धूमकेतू, तारका, विजा, मेघ असे जे पूर्वी होते, आता आहे ते सर्व हा पुरुषच आहे. त्यानेच हे सर्व विश्व व्यापून टाकले आहे. त्याच्या बाहेर आणखी तो वीतभर उरला आहेच.

या महापुरुषाच्या नाभिकमळापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाले. तेव्हा दुसरी यज्ञसामग्रीच नव्हती. तेव्हा ती त्यांनीच सिद्ध केली. पशू, वृक्ष, दर्भ, यज्ञाची भूमी, वसंतादी काल, पात्रे, औषधी, घृतादी स्निग्ध पदार्थ, मधादी रस, लोखंड, मृत्तिका, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, होता, अध्वर्यू, उद्गाता, ब्रह्मा, कर्म, ज्योतिष्टोमादी नावे, मंत्र, दक्षिणेसाठी द्रव्य, यज्ञाची व्रते, देवतांचा क्रम, यज्ञकर्मांचे ग्रंथ, संकल्प, कर्मानुष्ठानांचे ज्ञान, सूर्याच्या गती, देवतांची ध्याने, दोषपरिमार्जनाचे प्रायश्चित्तविधी, कर्मसमर्पणबुद्धी, अशी सर्व यज्ञसामग्री ब्रह्मदेवांनीच उत्पन्न केली.

याच ब्रह्मदेवांनी या सामग्रीनें यज्ञपुरुषाची पूजाही केली. त्यानंतर स्वायंभुवप्रमुख चौदा मनू, ऋषी, पिता, देव, दैत्य, मनुष्य इत्यादींनी त्या यज्ञपुरुषाचें पूजन केले. त्या पुरुषाच्या आज्ञेनेच ब्रह्मदेवांनी ही सृष्टी निर्माण केली. त्याच्या आज्ञेने शंकर संहार करतो, विष्णू पालन करतो. या परमेश्वराचा पहिला अवतार म्हणजे हा आदिपुरुषच होय. काल, स्वभाव, प्रकृती, मन, पंचमहाभूते, अहंकार, सत्त्वादी गुण, दहा इंद्रिये, समष्टिरूप विराट देह, व्याष्टिरूप पिंडात्मक देह, सर्व अचल-व चल पदार्थ, हे सर्व त्याचेच कार्यरूप आहे.

स्वतः ब्रह्मदेव, शंकर, विष्णू, दक्षादी प्रजापती, नारदांसारखे देवर्षी. इंद्रादिक लोकपाल, पक्षिकुलाचे नायक गरुड, मनुष्यांतील राजे, पातालादी भुवनांचे स्वामी, मोठमोठे गंधर्व, विद्याधर, चारण, यक्ष, राक्षस, सर्प व नाग यांचे स्वामी, प्रमुख ऋषी, पितर, दैत्यांचे, सिद्धांचे, दानवांचे राजे, प्रेत, पिशाच, भूत, कूष्मांड, जलचर प्राणी, पशू, पक्षी यांचे अधिपती; आणि ऐश्वर्य, तेज, सामर्थ्य, सौंदर्य यांनी युक्त असे सर्व त्या ईश्वराचेच रूप आहे.

## सृष्टिनिर्मितीचे गुह्य

आदिदेव, सर्व विश्वाचे गुरू ब्रह्मदेव हे एकदा आपल्या कमलासनावर बसले होते. सृष्टी कशी निर्माण करावी याचे चिंतन ते करीत होते. त्यांना मग पाण्यातूनच 'तप' असा शब्द दोनदा ऐकू आला. ह्या 'तप' शब्द म्हणजे सर्व धनाचा त्याग करणाऱ्या वैराग्यशाली पुरुषांचा ठेवाच त्यांनी मानला. त्यांनी तप करण्याचा निश्चय केला. ते श्रेष्ठ तपस्वी बनले. त्यांनी वायूचा व मनाचा निरोध केला. इंद्रियांना स्वाधीन केले. ब्रह्मदेवांनी देवांची सहस्र वर्षेपर्यंत तप केले. त्यांच्या तपाने सर्व लोक प्रकाशित झाले. त्या तपामुळे भगवान श्रीहरी त्यांना प्रसन्न झाले. व त्यांनी त्याला स्वतःचा लोक दाखविला. त्या भगवंताच्या लोकात रज व तम या गुणांना स्थान नाही. सत्त्वगुणही नाही. तेथे कालाचा संबंध नाही. मायेचे अस्तित्व नाही. त्या भगवंतांचा वर्ण निळा असून ते तेजस्वी आहेत. रत्नखचित असे सुवर्णाचे अलंकार त्यांनी धारण केले आहेत. त्या लोकात साधुमहात्मे असतात. सुंदर तरुण स्त्रिया तेथे शोभत असतात. तेथे लक्ष्मी परमेश्वरांची सेवा करीत राहाते. झोपाळ्यावर बसून ती त्यांच्या चरित्राचे गायन करते.

भगवान श्रीहरींच्या सभोवती सुनंद, नंद, प्रबल, आर्हण इत्यादी सेवकगण ब्रह्मदेवांनी पाहिले. परमेश्वर अत्यंत उंच अशा सिंहासनावर बसला होता. त्याच्या भोवती प्रकृती, पुरुष, महत्तत्त्व, अहंकार, पांच ज्ञानेंद्रिये, पांच कर्मेंद्रिये, पांच ज्ञानविषय व मन; अशा सोळा कला; पृथ्वी, जल, तेज, वायू आकाश ही पंचमहाभूते; अशी पंचवीस तत्त्वे होती अशा या भगवंतांना पाहून ब्रह्मदेवांनी त्यांच्या चरणांना नमस्कार केला. तेव्हा तपानें उचित झालेल्या ब्रह्मदेवांना सृष्टी उत्पन्न करण्यासाठी उपदेश करण्याचे श्रीहरींनी ठरविले. त्यांनी ब्रह्मदेवांना आपल्या हाताचा स्पर्श करून हास्ययुक्त मंदवाणीनें म्हटले,

'ब्रह्मदेवा, तुझ्या उदरात सर्व वेद साठविले आहेत. तुझ्या तपानं मी संतुष्ट झालो आहे. तुला मी कोणता वर देऊ? तुला सृष्टी कशी निर्माण करावी हे समजेलासं झालं आहे. मीच तुला तप करण्याचा

उपदेश केला. तप हे माझं हृदयच. तपाच्या योगानंच मी हे सर्व विश्व माझ्या स्वरूपात विलीन करून घेतो. त्याचं पोषणही मी तपानंच करतो. माझं सर्व सामर्थ्य तप हेच आहे.'

'परमेश्वरा, आपण सर्व प्राणिमात्रांत वास करता. आपण मला पर व अपर म्हणजे सूक्ष्म व स्थूल अशी रूपं विश्वरचनेच्या दृष्टीनं महत्त्वाची आहेत ती समजून द्यावीत. त्यांचं ज्ञान मला द्यावं. आपल्या क्रीडेचं यथार्थ ज्ञान मला व्हावं.'

'ब्रह्मदेवा, मी माझं गुह्य ज्ञान तुला सांगतो. माझी रूपं, माझे गुण, माझी कर्मं इत्यादींबद्दलचं ज्ञान मी तुला देईन. सर्वांच्या आरंभी मीच होतो. अव्यक्त वा व्यक्त यांच्या पलीकडं माझ्याशिवाय काहीच नव्हतं. मी अनादी व अनंत आहे. पंच महाभूतं जरी प्राण्यांत दिसत असली तरी तशी प्रविष्ट झालेली नाहीत. मी सर्व प्राण्यांत ओतप्रोत असलो तरी मी मागाहून प्रवेश केला असं नाही. ब्रह्मदेवा, हा उपदेश तुम्ही एकाग्रतेनं ग्रहण करावा.'

ब्रह्मदेवांना असा उपदेश करून परमेश्वर गुप्त झाले. ब्रह्मदेवांनी त्यांना हात जोडले व पूर्वीच्या कल्पात केली तशी सृष्टीची रचना त्यांनी पुन्हा केली. आपली इच्छा पूर्ण व्हावी म्हणून त्यांनी यम व नियम यांचे अनुष्ठान केले नारद हा ब्रह्मदेवांचा आवडता पुत्र. त्यांनी सेवा करून आपल्या पित्यास संतुष्ट केले. तेव्हा ब्रह्मदेवांनी नारदांना दहा लक्षणांनी युक्त असे भागवतपुराण सांगितले. तेच नारदांनी व्यासांना सांगितले.

## हिरण्यगर्भाची शरीररचना

भागवताच्या तिसऱ्या स्कंधात मैत्रेयऋषींनी विदुरांना सृष्टीच्या रचनेसंबंधी काही माहिती पुरविली आहे. महापराक्रमी अशा परमात्म्यानें कालनामक शक्तिदेवीला धारण करून महत् आदी तेवीस तत्त्वांच्या समुदायात प्रवेश केला. त्याने कर्माला जागे करण्यासाठी एकमेकांपासून पृथक असलेल्या त्या तेवीस तत्त्वांच्या समुदायास क्रियारूप शक्तीनें एकत्र आणले. त्या तत्त्वांनी आपल्या अंशांनी विराट पुरुष निर्माण केला.

त्या तत्त्वसमूहांत परमेश्वर अंशमात्र रूपात प्रविष्ट झाल्यावर त्यांत क्षोभ निर्माण झाला व ती एकमेकांशी संयुक्त बनली व या विराट पुरुषाची निर्मिती झाली.

या विराट पुरुषाला हिरण्यगर्भ असे नाव आहे. तो अव्यक्त जीवांसह ब्रह्मांडाच्या मध्यभागी उदकात हजार वर्षे राहिला. त्या हिरण्यगर्भानें ज्ञानशक्ती, क्रियाशक्ती, भोक्तृशक्ती यांनी युक्त असे आपले एक, दहा आणि तीन विभाग केले. हा विराट पुरुष अध्यात्म, आधिदैव, आधिभूत असा तीन प्रकारचा; प्राण, अपान आदी भेदांनी दहा प्रकारचा व हृदयरूपानें एका प्रकारचा झाला. प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय; हे दहा प्राण होत.

ईश्वरानें त्या हिरण्यगर्भाच्या शरीररचनेंचा विचार केला. त्याला प्रथम मुख उत्पन्न झाले. त्या मुखात अग्निदेवतेने आपली अंशभूत वाणी प्रविष्ट केली. त्यामुळे पुरुषाला भाषण देता येऊ लागले. त्या हिरण्यगर्भाला तालू नावाचे एक इंद्रिय प्राप्त झाले. त्यामुळे जिभेस रसांचे ज्ञान झाले. दोन नाकपुडया तयार होऊन त्या घ्राणेन्द्रियानें गंधाचा अनुभव घेणे सुलभ झाले. त्या हिरण्यगर्भाला दोन डोळे उत्पन्न झाले. त्यामुळे रूपाचे ज्ञान झाले. चर्मामुळे स्पर्शाचा अनुभव आला. कानांमुळे शब्दांचे ज्ञान झाले. त्वचा, त्यावरील रोम यांचीही निर्मिती झाली. त्यानंतर त्या विराट पुरुषाला शिश्न उत्पन्न झाले. प्रजापती तेथे रेतशक्तीसह स्थिरावला. त्या शक्तीने अपत्यप्राप्तीचा आनंद झाला. गुदद्वाराच्या निर्मितीमुळे त्याला मलत्याग करणे सुलभ झाले. पुढे त्याला दोन हात, दोन पाय निर्माण होऊन त्याचे चलनवलन वाढले. त्यानंतर त्या पुरुषाला हृदय प्राप्त झाले. चंद्र मनोमय बनून तेथे संकल्पविकल्प करू लागला. त्यानंतर अहंकार हे रुद्राचे स्थान निर्माण झाले. अमुक एक कर्म करायचे आहे अशी जाणीव त्या हिरण्यगर्भाला वा विराट पुरुषाला झाली. शेवटी त्याला बुद्धी व चित्त यांची प्राप्ती झाली. या चेतनेमुळे त्याला ज्ञान प्राप्त झाले.

या हिरण्यगर्भाच्या मस्तकापासून स्वर्ग, पायांपासून पृथ्वी, नाभी-

पासून आकाश, यांची निर्मिती झाली. सत्त्व रज, तम या तीन गुणांपासून देव, मनुष्ये, भूते यांचा जन्म झाला. वेद व ब्राह्मण हे त्या विराट-पुरुषाच्या मुखापासून निर्माण झाले. बाहूंपासून क्षत्रिय, मांड्यांपासून वैश्य व पायांपासून शूद्र निर्माण झाले. ब्राह्मणादी चारही वर्ण आपापल्या उपजीविकेसह परमेश्वरापासून उत्पन्न झाले. त्या परमात्म्याची सर्व लोक आराधना करतात.

## ब्रह्मदेवकृत दहा सर्ग

परमात्म्याची कृपा झाल्यावर ब्रह्मदेवांनी देवाची शंभर वर्षे तपश्चर्या केली. तेव्हा ब्रह्मदेवांचे कमळ डळमळू लागले. म्हणून ब्रह्मदेवांनी त्या वायूला उदकासह पिऊन टाकले त्याने आपल्या कमळाचे भूर्लोक, भूवर्लोक व स्वर्लोक असे तीन विभाग केले. अनादी कालास निमित्त करून त्यांनी नऊ प्रकारची सृष्टी उत्पन्न केली. प्रकृतीपासून सहा प्रकारची, विकृतीपासून तीन प्रकारची व प्रकृती आणि विकृत यांची मिळून झालेली सृष्टी दहावी. काल, द्रव्ये, गुण यांच्या योगानें प्रलय होतो. प्रलय नित्य, नैमित्तिक व प्राकृतिक असा तीन प्रकारचा असतो. कालाच्या योगानें होणारा प्रलय नित्य. शेषाच्या मुखातील अग्नीपासून वा प्रलयकालाच्या मेघानें जो होतो तो नैमित्तिक व सत्त्वादी गुण कार्यात लीन होतात तो प्राकृतिक होय.

महत्तत्त्वाची उपपत्ती हा पहिला सर्ग. हे महत्तत्त्व म्हणजे सत्त्व, रज, तम या तीन गुणांचे कमी-अधिक परिणाम होय. अहंकार हा दुसरा सर्ग. या अहंकारापासून पंचमहाभूतांची सूक्ष्म रूपे, ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये उत्पन्न होतात. सूक्ष्मतन्मात्रांची उत्पत्ती हा तिसरा सर्ग होय. तो पंच-महाभूते उत्पन्न करू शकतो. पाच ज्ञानेंद्रिये व पाच कर्मेंद्रिये यांच्या उत्पत्तीचा चवथा सर्ग. इंद्रियांच्या अभिमानी देवतांची उत्पत्ती देवसर्गात होते. हा पाचवा सर्ग. तामिस्र, इत्यादी पाच प्रकारच्या अविद्यांची उत्पत्ती सहाव्या सर्गात होते. हीच अविद्या जीवाला मोह पाडते. असे हे सहा प्रकृतीचे सर्ग होत. भगवान रजोगुणाचा आश्रय घेऊन जी स्थावर पदार्थांची निर्मिती करतो ती सातवी सृष्टी होय. वनस्पती, औषध, लता, त्वक्सार,

बीरुध व द्रुम असे याचे सहा प्रकार आहेत. फुलांवाचून फळे येणारी वड, पिंपळ इत्यादी वृक्ष वनस्पती होत. एकदाच फले फुले येऊन नाश पावणाऱ्या केळी, धान्ये इत्यादी औषधी होत. वृक्षांच्या आधार घेणाऱ्या वेली लता होत, त्वचा कठीण असणारे वेळू इत्यादी त्वक्सार होत. आधाराशिवाय वाढणारे वीरुध होत. द्रुम म्हणजे फुले व फळे येणारे आंबा इत्यादी वृक्ष होत.

पशू इत्यादींची निर्मिती आठव्या सर्गात होते. यातील प्राण्यांना उद्याची चिंता नसते. आहार, निद्रा, मैथुन यांचे मात्र ज्ञान असते. यांचे भेद अठ्ठावीस आहेत. बैल, बकरा, रेडा, हरिण, डुकर, गवा, काळवीट, मेंढा, उंट; या दोन खुरांच्या नऊ जाती. गाढव, घोडा, खेचर, गौर, शरभ, चमरी नावाची वनगाय; अशा एक खुराच्या सहा जाती. कुत्रा, कोल्हा, लांडगा, वाघ, मांजर, ससा, साळू, सिंह, वानर, हत्ती, कासव, घोरपड, मगरासारखे प्राणी, कंक, गिधाड, वटवाघूळ, ससाणा, भास, अस्वल, मोर, हंस, सारस, चक्रवाक, कावळा, घुबड इत्यादी पाच नखांचे होत. मनुष्यांचा एक निराळा असा नववा सर्ग होय. पशू, पक्षी व मनुष्य हे तीन सर्व वैकृत, म्हणजे पहिल्या सहा सर्गांपासून झालेले होत. देवसर्ग सात्त्विक असतो. दहावा सनत्कुमारांचा सर्ग प्राकृत व वैकृत असा दोनही प्रकारांचा आहे. देव, पितर, असुर, गंधर्व व अप्सरा, सिद्ध, यक्ष व राक्षस, चारण, भूत, प्रेत व पिशाच, विद्याधर व किन्नर इत्यादी देवसर्गाचेच प्रकार होत. असे हे ब्रह्मदेवांचे दहा सर्ग.

## परमेश्वराची कालशक्ती

मैत्रेयांनी विदुराला परमेश्वराच्या कालशक्तीचा यथार्थ परिचय करून दिला आहे. सृष्टीतील व्यक्त पदार्थांचे विभाग करता करता जो शेवटचा विभाग होतो, ज्याचे आणखी विभाग होऊ शकत नाहीत, त्याला परमाणू असे नाव आहे. परमाणुसमुदायास ‘परम महान’ असे नाव आहे. काल ही परमेश्वराचीच शक्ती असून ती दिसत नसूनही सर्व पदार्थांना व्यापून असते. परमाणुस्वरूपाला व्यापायला जेवढा वेळ लागतो त्याला काळाचा परमाणू असे म्हणतात. दोन परमाणूंचा एक

अणू होतो. तीन परमाणूंचा त्रिसरेणू होतो. खिडकीतून आत येणाऱ्या सूर्यकिरणांत दिसणारे त्रिसरेणूच. तीन त्रिसरेणूंची एक त्रुटी. शंभर त्रुटींचा एक वेध, तीन वेध म्हणजे एक लव. तीन लवांचा एक निमेष. तीन निमेषांचा एक क्षण. पाच क्षणांची एक काष्ठा. पंधरा काष्ठांचा एक लघू होतो.

पंधरा लघूंची एक घटिका, दोन घटिकांचा एक मुहूर्त, सहा-सात घटिकांचा मनुष्यांचा एक प्रहर. हाच याम म्हणजे दिवसाचा वा रात्रीचा चौथा भाग होय. सहा पले वजनाचे आणि एक प्रस्थ वजनाचे पाणी मावणारे तांब्याचे पात्र घ्यावे. चार मासे सुवर्णाची चार अंगुलांची तार काढून ती शिरेल एवढे त्या पात्राला भोक पाडावे. म्हणजे घटिका तयार होते. चार चार प्रहरांनी मनुष्याचा दिवस होतो. रात्र होते. पंधरा दिवसांचा एक पक्ष. शुक्ल पक्ष व कृष्ण पक्ष अशा दोन पक्षांचा एक महिना होतो. दोन महिन्यांचा एक ऋतू, सहा महिन्यांचे एक अयन. उत्तरायण व दक्षिणायन, अशी दोन अयने आहेत. ही दोन अयने मिळून स्वर्गातील लोकांचे एक अहोरात्र म्हणजे वर्ष होते. बारा मासांचे एक वर्ष. शंभर वर्षे हे मनुष्याचे अधिकात अधिक आयुष्य होय.

कृत, त्रेता, द्वापर, कली, अशी चार युगे आहेत. चार युगांचे चक्र संध्या व अंश यांसह देवांच्या बारा हजार वर्षांनी पूर्ण होते. कृतयुगाची ४८००, त्रेतायुगाची ३६००, द्वापराची २४००, कलीची १२०० वर्षे होत. कृतयुगात चार चरणांनी युक्त धर्म मनुष्यांत होता. त्रेता, द्वापर, कलीत तो एकएक पायानें कमी झाला. एकएक पायानें अधर्म मात्र वाढतो.

महर्लोकापासून ब्रह्मलोकापर्यंत राहणाऱ्या लोकांचा एक दिवस म्हणजे चार युगांच्या चक्राचे हजार फेरे होत. तेवढीच त्यांची रात्र होय. या रात्री विश्वाची उत्पत्ती करणारा ब्रह्मदेव शयन करतो. ब्रह्मदेवांची रात्र संपली की सृष्टीच्या रचनेस प्रारंभ होतो. ब्रह्मदेवांचा दिवस संपेपर्यंत ती चालू असते. एवढ्या काळात चौदा मनू होऊन जातात. प्रत्येक मनुचा अधिकार काल ७१ युगचक्रांपेक्षा थोडा अधिक म्हणजे ७१$\frac{6}{14}$ युगे एवढा असतो. प्रत्येक मन्वन्तरात मनू, सप्तर्षी, देव,

इंद्र, गंधर्वादी अनुयायी, त्याच्या वंशातील राजे इत्यादींच्या नोंदी भागवतपुराणाने केल्या आहेत.

ब्रह्मदेवांच्या आयुष्याच्या अर्धाला 'परार्ध' असे नाव आहे. पहिला परार्ध संपून आता दुसरा परार्ध चालू आहे. पहिल्या परार्धाच्या प्रारंभी ब्राह्म नावाचा एक कल्प झाला. ब्राह्मकल्पानंतर याद्कल्प झाला. आता दुसऱ्या परार्धातील प्रारंभीचा कल्प चालू आहे. तो वाराह या नावाने प्रसिद्ध आहे. कारण या कल्पात श्रीहरींनी वराहरूपाने पृथ्वीचा उद्धार केला. दोन परार्धांचा काल म्हणजे अनादी, अनंत, उपाधिशून्य अशा परमेश्वरांचे केवळ एक निमिष होय. अकरा इंद्रिये, पंचमहाभूते यांनी विकसित झालेल्या प्रकृती, महत्तत्त्व, अहंकार, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या आठ प्रकृतींपासून ब्रह्मांडकोश तयार झाला. पृथ्वी आदींची सात आवरणांचे वेष्टण याला असून आतून त्याचा विस्तार पन्नास कोटी योजनांचा आहे.

असे हे परमेश्वरांचे कालतत्त्व थोडक्यात सांगता येईल.

दोन परमाणुकाल– एक अणुकाल.

तीन परमाणुकाल– एक त्रसरेणुकाल.

तीन त्रसरेणु– एक त्रुटी. शंभर त्रुटी– एक वेध

तीन वेध– एक लव, तीन लव– एक निमेष

तीन निमेष– एक क्षण, पांच क्षण– एक काष्ठा

पंधरा काष्ठा– एक लघू, पंधरा लघू– नाडिका (घटिका)

दोन नाडिका– मुहूर्त, सहा किंवा सात नाडिका– प्रहर

चार प्रहर– दिवस वा रात्र, आठ प्रहर– अहोरात्र

पंधरा अहोरात्र– पक्ष, दोन पक्ष– मास

दोन मास– ऋतू, सहा मास– अयन

बारा मास, दोन अयने– एक वर्ष.

१०० वर्षे– मनुष्याचे आयुष्यमान, १००० युगचक्र– ब्रह्मदेवांचा दिवस.

१ वर्ष– देवांचे एक अहोरात्र

१२००० देवांची वर्षे– चार युगांचे चक्र

७१ $\frac{६}{१४}$ युगचक्रे– एक मन्वन्तर

१४ मन्वन्तरे– ब्रह्मदेवांचा एक दिवस.

## ब्रह्मदेवांची सृष्टिनिर्मिती

आपल्या उदरात वेद धारण करणाऱ्या ब्रह्मदेवांनी जी सृष्टी निर्माण केली, तिचाही वृत्तान्त मैत्रेयऋषींनी विदुराला कथन केला. ब्रह्मदेवांनी प्रथम पांच अनात्तानाच्या वृत्ती उत्पन्न केल्या. तम, मोह, महामोह, तामिस्र व अंधतामिस्र या त्या वृत्ती होत. अशी पांच प्रकारची अविद्यारूपी पापी सृष्टी निर्माण करून ब्रह्मदेवांना समाधान झाले नाही. त्यांनी भगवंतांचे ध्यान करून आपले मन पवित्र केले. आपली एक मानससृष्टी निर्माण केली. सनक, सनन्द, सनातन, सनत्कुमार हे ते चार ऋषी होत. हे चारही निष्ठावान ब्रह्मचारी, निवृत्तिमार्गी असल्यामुळे धर्म, अर्थ, काम या पुरुषार्थांबद्दल त्यांच्या मनांत मुळीच आसक्ती नव्हती. मोक्षमार्गी असणाऱ्या या मुलांपासून प्रजा निर्माण होणे शक्य नव्हते.

ब्रह्मदेवांना यामुळे क्रोध आला. तो त्यांच्या दोनही भुवयांतून प्रकट झाला व त्यापासून एक काळसर तांबूस वर्णाचा नीललोहित पुत्र जन्मास आला. हा देवांचा आदिदेव महादेव शंकर होय. जन्मास आल्याबरोबर तो रडू लागला. या रडणाऱ्या मुलास रुद्र असे नाव मिळाले. हृदय, इंद्रिये, प्राण, आकाश, वायू, अग्नी, जल, पृथ्वी, सूर्य, चंद्र, तप, ही स्थाने त्याला राहण्यासाठी ब्रह्मदेवांनी दिली. मन्यू, मनू, महिनस, महान, शिव, ऋतुध्वज, उग्ररेता, भव, काळ, वामदेव, घृतवृत, ही त्याची अकरा नावे निश्चित झाली. धी, वृत्ती, उशना, उमा, नियुत्सर्पी, इला, अंबिका, इरावती, सुधा, दीक्षा, रुद्राणी या त्याच्या स्त्रिया ठरल्या. ब्रह्मदेवांच्या आज्ञेवरून शिवाने बल, रूप, शील यांत आपणांस शोभणारी अशी प्रजा निर्माण केली.

रुद्राची प्रजा सर्व जगात पसरू लागल्यावर ब्रह्मदेवांनाच थोडी भीती वाटू लागली. ते रुद्राला म्हणाले, 'आता तू प्रजानिर्मिती बंद कर तुझी प्रजा आपल्या उग्र तेजानं मला व दशदिशांना जाळून टाकीत

आहे. तुझं कल्याण असो. आता तू तपश्चर्या कर.' ब्रह्मदेवांचे ऐकून रुद्रानें त्यांना नमस्कार केला व ते तपश्चर्येसाठी निघून गेले. त्यानंतर ब्रह्मदेवांनी मरीची, अत्री, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतू, भृगू, वसिष्ठ, दक्ष, नारद अशा दहा पुत्रांची निर्मिती केली. ब्रह्मदेवांच्या मांडीपासून नारद झाले. अंगुष्ठापासून दक्ष, प्राणापासून वसिष्ठ, त्वचेपासून भृगू, हातापासून क्रतू, यांची निर्मिती झाली. नाभीपासून पुलह, कर्णापासून पुलस्त्य, मुखापासून अंगिरा, नेत्रांपासून अत्री आणि मनापासून मरीची, अशी ही प्रजा तयार झाली.

ब्रह्मदेवांच्या उजव्या स्तनापासून धर्म, पाठीपासून अधर्म निर्माण झाला. त्यांच्या हृदयातून काम, भुवयांपासून क्रोध, अधरोष्ठापासून लोभ यांची निर्मिती झाली. त्यांच्या मुखापासून वाणी, शिश्नापासून नद्या व गुदद्वारापासून निर्ऋती यांची निर्मिती झाली. हा निर्ऋती म्हणजे पापांचा साठाच होता, ब्रह्मदेवांच्या छायेपासून कर्दमऋषी झाले. हा देवहूतीचा पती. याप्रमाणे ब्रह्मदेवांच्या मनापासून व देहापासून अशी प्रजा निर्माण झाली.

ब्रह्मदेवांची कन्या सरस्वती रूपानें सुंदर व मनोहर होती. ती कामरहित असली तरी तिला पाहून ब्रह्मदेव काममोहित झाले. तिची त्यांना अभिलाषा वाटली. त्यांच्या पुत्रांनी त्यांना बोध करून त्यांचे मन वळविले. पुत्रांच्या उपदेशामुळे ब्रह्मदेवांना लाज वाटली व त्यांनी आपला देह टाकून दिला. त्याचे तमोरूप धुके झाले.

पुढे या ब्रह्मदेवांच्या मुखातून चार वेद उत्पन्न झाले. उपवेद, न्याय, होता, अध्वर्यू, उद्‌गाता, ब्रह्मा, यज्ञविस्तार, धर्माचे चार चरण, आश्रम व त्यांचे आचार; इत्यादींचीही निर्मिती झाली. कोणत्या मुखातून कोणते वेद प्रकट झाले हेही मैत्रेयांनी सांगितले. पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण या चार मुखांतून अनुक्रमे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद प्रकट झाले. शस्त्र (स्तुती), इज्या (हवन, पूजन इत्यादी), स्तुतिसोम (गायन करीत ऋचा म्हणणे), प्रायश्चित्त, यांचीही निर्मिती ब्रह्मदेवांच्या चार मुखांतून झाली. वैद्यकशास्त्र, शस्त्रविद्या, गानविद्या, कलाकौशल्य या चार उपवेदांनाही त्यांनी निर्माण केले. पांचवा वेद म्हणजे इतिहास व

पुराणे यांचीही निर्मिती त्यांनी केली. नानाप्रकारचे याग, अध्यात्मविद्या, दया, तपश्चर्या, सत्य, उपजीविकेची साधनें, चार आश्रम, सवित्र,[१] प्राजापत्य, ब्राह्म, बृहत् ही चार ब्रह्मचर्ये. वार्ता,[२] संचय[३] शालीन,[४] शिलाच्छ[५]ही गृहस्थाच्या उपजीविकेची साधने त्यांच्याच मुखांतून प्रकट झाली. वैखानस,[६] वालखिल्य,[७] औदुंबर,[८] फेनप असे वानप्रस्थांचे[९] चार प्रकार निर्माण झाले.

संन्यासाचेही कुटीचक,[१०] बव्होद,[११] हंस[१२] व निष्क्रिय[१३] असे चार भेद तयार झाले. अध्यात्मविद्या, तीन वेद, ऋषिकर्मादी, राजकारण; भू, भुवः स्वः, भूर्भवंस्वः या चार व्याहृती, ओंकार इत्यादी ब्रह्मदेवांपासून प्रकट झाले. त्यांच्या केसांपासून उष्णिक छंद, त्वचेपासून गायत्री छंद, मांसापासून त्रिष्टुप छंद, स्नायूपासून जगती छंद यांची निर्मिती झाली. अशी सृष्टीची रचना ब्रह्मदेवांनी केली. त्यांच्या शरीराचे जे दोन विभाग झाले त्यांपासून स्त्रीपुरुषांची एक जोडी तयार झाली. त्या दोहोंतील पुरुष म्हणजे स्वयंभू ब्रह्मदेवांचा पुत्र स्वायंभुव नावाचा मनू झाला. स्त्री होती ती शतरूपा या नावाची त्याची पट्टराणी झाली. मैथुनापासून प्रजा वाढू लागली. मनूनेही आपल्या स्त्रीपासून पाच अपत्ये निर्माण केली.

---

१ उपनयनाच्या दिवसापासून तीन दिवस गायत्रीचे अध्ययन ब्रह्मचर्य पाळून करणे.
२ निषिद्ध नसलेली कामे करून केलेली उपजीविका
३ दुसऱ्याकडून यज्ञादी करून मिळालेल्या धनावर केलेली उपजीविका.
४ न मागता मिळेल त्यावर निर्वाह करणे.
५ शेतात पडलेले धान्य वेचून त्यावर निर्वाह करणे.
६ जमिनीची मशागत न करता सहज उत्पन्न झालेल्या धान्यांवर निर्वाह.
७ नवे अन्न हाती आल्यावर जुन्या धान्याचा उपयोग करतात तो.
८ सकाळी ज्या दिशेस गेले त्याच दिशेकडून मिळालेल्या फळांवर निर्वाह.
९ आपोआप गळालेल्या फळांवरील निर्वाह.
१० आपल्या चारातील कर्मे आचरणारा.
११ आवश्यक ती कर्मे करून ज्ञानाचा अभ्यास करणारा.
१२ कर्म न करता केवळ ज्ञानाचा अभ्यास करणारा.
१३ ज्याला ब्रह्मज्ञान झाले आहे असा.

प्रियवृत व उत्तानपाद हे दोन पुत्र व आकूती, देवहूती, प्रसूती या तीन कन्या, ही ती पाच अपत्ये. स्वायंभुव मनूनें आपली आकुती रुची ऋषीला, देवहूती कर्दमाला, कनिष्ठ कन्या प्रसूती दक्ष प्रजापतीला दिली. त्यांच्या संततीनें सारे विश्व भरून गेले.

मैत्रेयांनी विदुराला अशीच आणखीही मनूच्या विस्ताराची हकीगत सांगितली. वराहा, हिरण्याक्ष, कश्यप, दिती व अदिती, जयविजय, देवहूती— कर्दम यांची कथा, अशा अनेक हकीगती मैत्रेयांनी सांगितल्या.

## स्वायंभुव मनूचा वंश

स्वायंभुव मनूस शतरूपाच्या पोटी आकती, देवहूती, प्रसूती या तीन कन्या व प्रियवृत व उत्तानपाद हे दोन पुत्र झाल्याचे वर आलेच आहे. आकूतीचा विवाह रुची नावाच्या ऋषींशी झाला. मनूने त्यांचा पुत्र यज्ञ आपला स्वतःचा समजून त्याचे पालनपोषण केले. त्या पुत्राची जुळी बहीण दक्षिणाशी विवाह यज्ञपती विष्णूंनी केला. यज्ञ व दक्षिणा यांना तोष, प्रतोष, संतोष, भद्र, शांती, इडस्पती, इध्म, कवी, विभू, स्वन्ह, सुदेव, रोचन, असे बारा पुत्र झाले. या सर्वांना तुषित असे नाव प्राप्त झाले. मनूची दुसरी कन्या कर्दम ऋषींची पत्नी झाली. कर्दम-ऋषींनी आपल्या नऊ कन्या ब्रह्मर्षींना दिल्या. कर्दम ऋषींच्या पत्नीस— कलेस— कश्यप व पूर्णिमा असे दोन पुत्र झाले. पूर्णिमास विरज व विश्वग हे दोन पुत्र व देवकुल्या नावाची कन्या, अशी अपत्ये झाली. देवकुल्या स्वर्गाची गंगानदी झाली. अत्री ऋषींची पत्नी अनसूयेस विष्णू, महेश्वर, ब्रह्मदेव यांची दत्त, दुर्वास व चंद्र ही रूपे झाली. अंगिरा ऋषींची पत्नी श्रद्धेस सिनीवाली, कुहू, राका, अनुमती अशा कन्या झाल्या. उतथ्य व बृहस्पती हे श्रद्धा व अंगिरा यांचे दोन पुत्र. पुलस्त्यांना हविर्भू नावाच्या स्त्रीपासून विश्रवा व अगस्त्य असे दोन पुत्र झाले. विश्रव्यास इडविडा नावाच्या स्त्रीपासून पुत्र झाला तो कुबेर होय. दुसऱ्या केशिनी नावाच्या स्त्रीपासून रावण, कुंभकर्ण, बिभीषण असे तीन पुत्र झाले. प्रलह ऋषींच्या गती नावाच्या भार्येस कर्मश्रेष्ठ, वरीयान व सहिष्णू असे तीन पुत्र झाले. ऋतू ऋषींची

भार्या क्रिया. त्यांना साठ हजार वालखिल्य ऋषी झाले.

वसिष्ठांना ऊर्जा नावाच्या पत्नीपासून चित्रकेतू, सुरुची, विरजा, मित्र, उल्वण, वसुभृद्यान, द्युमान हे सात पुत्र झाले. दुसऱ्या स्त्रीपासून शक्ती आदी पुत्र झाले. अथर्वऋषींना चित्ती नावाच्या स्त्रीपासून घोडयाच्या मस्तकाचा दधीच नावाचा पुत्र झाला भृगूंची पत्नी ख्याती. त्यांना धाता, विधाता असे दोन मुलगे व श्री नावाची एक कन्या; यांची प्राप्ती झाली. मेरूला आयती व नियती अशा दोन कन्या झाल्या. आयती धात्याला व नियती विधात्याला त्याने दिली. धात्यास मृकंड नावाचा पुत्र झाला. विधात्याला प्राण झाला. मृकंडऋषींना मार्कंडेय हा पुत्र व प्राणाला वेदशिरा नावाचा पुत्र झाला. भृगूंना कवी नावाचा आणखी एक पुत्र होता. या कवीचा पुत्र शुक्र होय. असा हा कर्दम-ऋषींचा वंशविस्तार.

ब्रह्मदेवांचा दक्ष नावाच्या पुत्राने मनूच्या प्रसूतीशी विवाह केला होता. त्याला प्रसूतीपासून सोळा सुंदर कन्या झाल्या. त्यांपैकी तेरा त्याने धर्माला दिल्या. एकीचा अग्नीशी, दुसरीचा पितरांशी, तिसरीचा शंकराशी विवाह केला. श्रद्धा, मैत्री, दया, शांती तुष्टी, पुष्टी, क्रिया, उन्नती, बुद्धी, मेधा, तितिक्षा, ऱ्ही, मूर्ती या तेरा दक्षकन्या धर्माच्या स्त्रिया झाल्या. श्रद्धेला शुभ, मैत्रीला प्रसाद, दयेला अभय असे पुत्र झाले. शांतीला सुख, तुष्टीला मद, क्रियेला योग, उन्नतीला दर्प, बुद्धीला अर्थ असे पुत्र झाले. मेधाला स्मृती, तितिक्षेला क्षेम, ऱ्हीला प्रश्रय असे पुत्र झाले. मूर्तीस नर व नारायण असे दोन ऋषी पुत्ररूपाने प्राप्त झाले. अग्नीची पत्नी स्वाहास पावक, पवनाम व शुची असे तीन पुत्र झाले. यांनाच अग्नीत हवन केलेले हविर्द्रव्य प्राप्त होते. त्यांच्या-पासून पंचेचाळीस अग्नी निर्माण झाले. हे त्यांचे तीन पितर, एक पितामह मिळून एकोणपन्नास अग्नी झाले. अग्निस्वात्त, बर्हिषद, सौम्य, आज्यप, साग्नी, अनग्नी हे पितर असून दक्षाने आपली कन्या स्वधा नावाची त्यांना दिली. तिला पितरांपासून वायुना, धारिणी अशा दोन कन्या झाल्या. दक्षाच्या सोळाव्या कन्येस, सतीस शंकर पती म्हणून लाभले.

यानंतर विदुराला मैत्रेयानें सर्व दक्षाख्यान ऐकविले. [दक्षाचा शिवद्वेष, नंदिकेश्वराचा दक्षास शाप, भृगू ऋषींचा शिवभक्तांना शाप, दक्षप्रजापतीचा यज्ञ, सतीचा यज्ञास जाण्याचा निर्धार, शंकरांनी तिचा केलेला निषेध, सतीचे दक्षाच्या घरी आगमन, तिथे झालेला तिचा अपमान, तिने पित्याची केलेली निर्भर्त्सना, तिचा देहत्याग, दक्षाच्या मंडपात हाहाकार, शिवगण व ऋभू यांचे युद्ध, शिवगणांचा पराभव, वीरभद्राचा अवतार, दक्षयज्ञविध्वंस, दक्षाचा वध, शंकरांचा संतोष, दक्षाचे संजीवन, सतीचा पुनर्जन्म, इत्यादी सर्व कथाभाग भागवताच्या चतुर्थस्कंधात आला आहे.

स्वायंभुव मनूचा वंश पुन्हा विस्ताराने सांगण्यात आला आहे. ब्रह्मदेवांचा एक पुत्र अधर्म. त्याची मृषा नावाची भार्या. त्यांना दंभ व माया ही दोन अपत्ये. ब्रह्मदेवांच्या निर्ऋती नावाच्या पुत्राला संतती नव्हती. दंभास व मायेस लोभ व निकृती अशी दोन अपत्ये झाली. त्यांच्यापासून क्रोध व हिंसा यांचा जन्म झाला. क्रोध व हिंसापासून कली, दुरुक्ती यांची निर्मिती झाली. कलीपासून दुरुक्तीला भय नावाचा पुत्र व मृत्यू नावाची कन्या अशी दोन अपत्ये झाली. दंभ व मृत्यूपासून यातना व नरक यांचा जन्म झाला.

स्वायंभुव मनू हा प्रत्यक्ष श्रीहरींचाच अंश. त्याचा दुसरा पुत्र उत्तानपाद. याला दोन राण्या एक सुनीती व दुसरी सुरुची. सुरुचीने ध्रुवाचा अपमान केला. ध्रुव विष्णूंच्या प्राप्तीसाठी वनात निघून गेला. तेथे त्यानें तपश्चर्या केली. ध्रुवास नारायणांचे दर्शन झाले. नंतर तो घरी आला. उत्तानपादाने वनवास पत्करला. ध्रुवाचे यक्षांशी युद्ध, यक्षांचा पराभव, ध्रुवाचे वैकुंठगमन इत्यादी प्रसंगांची सारी ध्रुवकथा भागवतातील चौथ्या स्कंधात आली आहे.

ध्रुवाचा उत्कल नावाचा एक पुत्र होता. तो शांतवृत्तीचा, वैराग्यशील, समदृष्टीचा होता. सर्वसामान्य लोकांना तो बहिरा, मुका, अंध, बुद्धिहीन वाटे. पण तो खरा ज्ञानी होता. म्हणून ध्रुवाच्या भ्रमी नावाच्या पत्नीचा धाकटा पुत्र वत्सर नावाचा होता, त्याने राज्य चालविले. या वत्सराची पत्नी स्वर्वीथी. तिला पुष्पार्ण, तिग्मकेतू, इषा, ऊर्ज, वसू, व

जय असे सहा पुत्र झाले. पुष्पार्णाला प्रभा व दोषा अशा दोन स्त्रिया असून प्रभेस प्रातर, मध्यंदिन व सायं असे तीन पुत्र झाले. दोषेस प्रदोष, निशिथ व युष्ट असे तीन पुत्र झाले. व्युष्टाला पुष्करणी नावाच्या स्त्रीपासून सर्वतेजस नावाचा मुलगा झाला. सर्वतेज व आकूती यांना चक्षू नावाचा एक मुलगा झाला. हा दुसरा मनू होय. मनूची नड्वला नावाची एक पट्टराणी होती. तिला पुरू, कुत्स, त्रित, द्युम्न, सत्यवान, ऋत, अग्निष्टोम, अतिरात्र, प्रद्युम्न, शिबी व उल्मुक असे पुत्र झाले.

उल्मुकाला पुष्करणीपासून अंग, सुमनस, ख्याती, ऋतू, अंगिरस व गय असे पुत्र झाले. अंगाची पत्नी सुनीथा. यांना वेन नावाचा पुत्र झाला. या वेनास राज्यत्याग करावा लागला. या वेनाच्या अंशापासून पृथू नावाचा पहिला राजा निर्माण झाला. या वेनाची, पृथूची सर्व कथा याच चौथ्या स्कंधात आली आहे. या पृथूचा पुत्र विजिताश्व. त्याचे भाऊ हर्यक्ष, धूम्रकेश, वृक व द्रविण. विजिताश्वास अंतर्धान असे नाव मिळाले होते. त्याला शिखंडीपासून पावक, पवमान, शुची असे तीन पुत्र झाले. विजिताश्वास नभस्वती नावाच्या स्त्रीपासून हविर्धान नावाचा एक पुत्र झाला. याचे पुत्र बर्हिषद, गय, शुक्ल, कृष्ण, सत्य, जितव्रत असे होते. बर्हिषदच प्राचीनबर्ही या नावानें ओळखला जाऊ लागला. त्याची पत्नी शतद्रुती. शतद्रुती व प्राचीनबर्ही यांना प्रचेतस नावाचे दहा पुत्र झाले. ते मोठे भगवद्भक्त होते. या प्रचेतांच्या आराधनेचे सर्व आख्यान मैत्रेयांनी विदुराला सांगितले आहे. या प्रचेतांच्या आख्यानातच नारदांनी पुरंजनाचे आख्यान सांगितले आहे.

असा हा ब्रह्मदेवांच्या मानसपुत्रांचा संसार. भागवतात चौदाही मनूंच्या विस्ताराचे वर्णन आले आहे. त्यातील स्वायंभुव मनूचा वंश थोडक्यात असा आहे,

## स्वायंभुव मनूचा वंश

भगवान विष्णू

नाभिकमलोद्भव ब्रह्मदेव

स्वायंभुव मनू व त्याची पत्नी शतरूपा




## प्रसूतीचा वंशविस्तार

प्रसूती– पती दक्ष प्रजापती




## देवहूतीचा वंशविस्तार

देवहूती, पती कर्दमऋषी. यांना नऊ कन्या

१) कला, पती मरीची– कश्यप, पूर्णिमा, पती देवकुली– विरज, विश्वग
२) अनसूया, पती अत्री– दत्त, दुर्वास, सोम
३) श्रद्धा, पती अंगिरस– उतथ्य, बृहस्पती, सिनीवाली, कुहू, राका, अनुमती

४) हविर्भू, पती पुलस्त्य– अगस्त्य, विश्रवा– कुबेर, रावण, कुंभकर्ण, बिभीषण

५) गती, पती पुलह– कर्मश्रेष्ठ, वरीयान, सहिष्णू

६) क्रिया, पती क्रतू– साठ हजार वालखिल्य ऋषी

७) ख्याती, पती भृगू– श्री, धाता, विधाता, कवी

धाता – मृकंड – मार्कंडेय

विधाता – प्राण – वेदशिरा

कवी – शुक्राचार्य

८) अरुंधती, पती वसिष्ठ– चित्रकेतू, सुरोची, विरजा, मित्र, उल्बण, वसुभृद्यान, द्युमान, शक्ती इ०

९) शांती, पती अथर्वा– दधीच.

## प्रसूतीचा वंशविस्तार

प्रसूती, पती प्रजापती दक्ष

धर्माला दिलेल्या तेरा कन्या व त्यांचे पुत्र.

१. श्रद्धा– शुभ, २. मैत्री– प्रसाद, ३. दया– अभय, ४. शांती– सुख, ५. तुष्टी– मुद, ६. पुष्टी– स्मय, ७. क्रिया– योग, ८. उन्नती– दर्प, ९. बुद्धी– अर्थ, १०. मेधा– स्मृती, ११. तितिक्षा– क्षेम, १२. ऱ्ही– प्रश्रय, १३. मूर्ती– नर व नारायण.

## अधर्माची संतती

ब्रह्मदेव

|

अधर्म, पत्नी मृषा

|

दंभ, पत्नी माया

|

लोभ पत्नी निकृती

|

क्रोध पत्नी हिंसा

|

कली पत्नी दुरुक्ती

भय पत्नी मृत्यू

(पुत्र) यातना | (कन्या) नरक


उत्तानपादाचा वंशविस्तार
उत्तानपाद
पत्नी सुनीती
पत्नी सुरुची
ध्रुव
उत्तम
पत्नी भ्रमी
पत्नी इला
उत्कल
कल्प
वत्सर, पत्नी स्वर्वीथी
पुष्पार्ण आदी सहा पुत्र
व्युष्ट आदी सहा पुत्र
सर्वतेजस
चक्षुस (मनू)
उल्मुक आदी अनेक पुत्र
सुमनस
अंग
ख्याती
ऋतू
अंगिरस
गय
वेन
निषाद
पृथू

### पृथुराजाचा वंश

पृथू




प्रचेतस नावाचे दहा पुत्र.

## चौदा मन्वन्तरांतील मनू, देव, सप्तर्षी इत्यादी

भागवताच्या आठव्या स्कंधात स्वयंभुव मनूखेरीज इतर अनेक मनूंचा विस्तार दिलेला आहे. कथा सर्वत्र सारख्याच असल्यानें केवळ त्रोटक आराखडा सर्व चौदा मनूंचा येथे दिलेला आहे.

१) स्वायंभुव मनू– पुत्र-प्रियव्रत व उत्तानपाद, यामादी देव, मरीचिप्रभृती सप्तर्षी यज्ञ, इंद्र; यज्ञच अवतार.

२) स्वारोचिष मनू– पुत्र– द्युमान, सुषेण, रोचिल्मात इत्यादी; तुषितादी देव, ऊर्जस्तंभादी सप्तर्षी, रोचन इंद्र, विभू अवतार.

३) उत्तम मनू– पुत्र– पवन, सृंजय, यज्ञहोत्र इत्यादी; सत्य, वेदश्रुत, भद्रदेव; प्रमदादी सप्तर्षी; सत्यजित इंद्र; सत्यसेन अवतार.

४) तामस मनू– पुत्र– पृथ, ख्याती, नर, केतू इत्यादी दहा पुत्र, सत्यक, हरी, वीर हे देव; ज्योतिर्धामादी सप्तर्षी, त्रिशिख इंद्र; हरी अवतार.

५) रैवत मनू– पुत्र– अर्जुन, बली. विंध्य इत्यादी; भूतरय इत्यादी देव; हिरण्यरोमा, वेदशिरा, ऊर्ध्वबाहू इत्यादी सप्तर्षी; विभू

इंद्र; वैकुंठ अवतार.

६) **चाक्षुष मनु**– पुत्र– पुरू, पुरुष, सुद्युम्न इत्यादी; आप्या इत्यादी देव; हविष्मन, वीरक इत्यादी सप्तर्षी; मंत्रद्रुम इंद्र; अजित अवतार.

७) **वैवस्वत मनू**– (श्राद्धदेव) पुत्र– इक्ष्वाकू, नभग, धृष्ट, शर्याती, नरिष्यंत, नाभाग, दिष्ट, तरूष, पृषध्र, वसुमान; देव– आदित्य, वसुद्रव, विश्वदेव, मरुद्गण, अश्विनीकुमार, ऋभू; सप्तर्षी– कश्यप, अग्नी, वसिष्ठ, विश्वामित्र, गौतम, जमदग्नी, भरद्वाज, पुरंदर इंद्र; वामन अवतार.

८) **सावर्णी मनू**– पुत्र– निर्मोक, निरमस्क इत्यादी, देव– सुतपस, विरज, अमृतप्रभ; सप्तर्षी– गालव, दीप्तिमान, परशुराम, अश्वत्थामा, कृप ऋष्यशृंग, व्यास; इंद्र बली; सार्वभौम अवतार.

९) **दक्षसावर्णी मनू**– पुत्र– भूतकेतू, दीप्तकेतू इत्यादी; देव– पार, मरीचिगर्भ इत्यादी; सप्तर्षी– व्यास, द्युतिमत इत्यादी; इंद्र अद्भुत, अवतार ऋषभ.

१०) **ब्रह्मसावर्णी मनू**– पुत्र– भूरिषेण इत्यादी; देव– सुवासन, विरुद्ध इत्यादी; सप्तर्षी– हविस्मत इत्यादी; इंद्र शंभू; विष्वक्सेन अवतार.

११) **धर्मसावर्णी मनू**– पुत्र– सत्यधर्म इत्यादी; देव– विहंगम, कामगम, निर्माणरुची; सप्तर्षी– अरुणादी; इंद्र वैधृत व धर्मसेतु अवतार.

१२) **रुद्रसावर्णी मनू**– पुत्र– देववान, उपदेव, देवश्रेष्ठ इत्यादी; हरितादी देव; तपोमूर्ती तपस्वी, आग्नीध्र इत्यादी सप्तर्षी; ऋतधामा-इंद्र; स्वधामा अवतार.

१३) **देवसावर्णी मनू**– पुत्र– चित्रसेन, विचित्र इत्यादी; देव– सुकर्म, सुत्राम इत्यादी, सप्तर्षी– निर्मोक, तस्यदर्श इत्यादी, दिवस्पती-इंद्र, योगेश्वर अवतार.

१४) **इंद्रसावर्णी मनू**– पुत्र– उरुबुद्धी, गंभीरबुद्धी इत्यादी; देव– पवित्र, चाक्षुष; सप्तर्षी– अग्नी, बाहु, शुची, शुद्ध, मागध इत्यादी; इंद्र शुची; बृहद्भानू अवतार.

## प्रियव्रताच्या वंशाचा विस्तार

स्वायंभुवमनूचा एक पुत्र प्रियव्रत. यानेही भूमंडळाचे राज्य केले. विश्वकर्म्याची कन्या बर्हिष्मतीशी त्याचा विवाह झाला. आग्नीध्र, इध्मजिव्ह, यज्ञबाहू, महावीर, हिरण्यरेता, धृतपृष्ठ, सवन, मेधातिथी, वीतिहोत्र, कवी अशी त्याच्या दहा पुत्रांची नावे. यांच्यापैकी कवी महावीर, सवन हे तीन ब्रह्मचारी होते. प्रियवृतास आणखी एक पत्नी होती. तिच्यापासून उत्तम, तामस, रैवत नावांचे तीन पुत्र झाले व ते मन्वन्तराचे अधिपती झाले. प्रियव्रत राजा अतिशय ज्ञानी होता. त्यानेच समुद्रांची, द्वीपांची व्यवस्था केली. जंबू, प्लक्ष, शाल्मली, कुश, क्रौंच, शाक, पुष्कर, ही त्याच्या द्वीपांची नावे होत. क्षारसमुद्र, इक्षुसमुद्र, मद्यसमुद्र, घृतसमुद्र, दुग्धसमुद्र, दधिसमुद्र, शुद्धोदकसमुद्र, असे सात समुद्र, प्रियव्रताने आपल्या आग्नीध्र, इध्मजिव्ह, यज्ञबाहू, हिरण्यरेता धृतपृष्ठ, मेधातिथी व वीतिहोत्र या प्रत्येक पुत्राला एकेका द्वीपाचा स्वामी बनविला. हे पुत्र त्याच्याप्रमाणेच कर्तबगार होते. प्रियव्रताची कन्या ऊर्जस्वती ही शुक्राचार्यांची पत्नी. यांचीच कन्या देवयानी होय.

प्रियव्रताचा पुत्र आग्नीध्रानेही जंबूद्वीपातील प्रजेचे पुत्राप्रमाणे पालन केले. पुत्रप्राप्तीसाठी त्याने तपश्चर्या केली. पूर्वचित्ती नावाच्या स्त्रीपासून आग्नीध्रास नऊ पुत्र झाले. नाभी, किंपुरुष, हरिवर्ष, इलावृत, रम्यक, हिरण्मय, कुरू, भद्राश्व, केतुमाल; ही त्यांची नावे होत. यांना जंबूद्वीपाच्या नऊ भागांचे राज्य मिळाले. प्रत्येक पुत्राचे नाव प्रत्येक भागाला मिळाले. या नऊ भावांनी मेरूच्या कन्यांशी विवाह केले. त्या कन्यांची नावे अशी– मेरुदेवी, प्रतिरूपा, उग्रदंष्ट्री, लता, रम्या, श्यामा, नारी, भद्रा, देववीती.

यांतील नाभी राजाने पुत्रप्राप्तीसाठी यज्ञ केला. भगवंतांनी त्याच्या पोटी ऋषभदेव नावाचा एक अवतार धारण केला. या ऋषभास इंद्राने दिलेल्या जयंती नावाच्या भार्येपासून शंभर पुत्र झाले. सर्वांत वडील पुत्र भरत नावाचा होता. या योगी व सद्गुणी पुरुषापासूनच त्याच्या देशाला 'भारत' असे नाव पडले. कुशावर्त, इलावर्त, ब्रह्मावर्त,

मलय, केतू, भद्रसेन, इंद्रस्पृक, विदर्भ, कीटक हे त्याचे श्रेष्ठ भाऊ होत. कवी, हरि, अंतरिक्ष, प्रबद्ध, पिप्पलायन, आविर्होत्र, दुर्मिळ, चमस, करभाजन हे नऊ बंधू श्रेष्ठ भगवद्भक्त होते. ऋषभानेंही आपल्या भरतादी पुत्रांना भागवतधर्माचा उपदेश केला. त्याचे मदोन्मत्त पिशाचासारखे भ्रमण होत असताना वणव्यात सापडून त्यानें देहत्याग केला.

भरताची पत्नी विश्वरूपकन्या पंचजनी होय. सुमती, राष्ट्रभृत, सुदर्शन, आवरण, धुम्रकेतू हे त्यांचे पाच पुत्र होत. भरताने आपल्या पुत्रांना राज्य देऊन पुलहाश्रमात तपश्चर्या केली. त्याचे एका हरिणबालकावर प्रेम जडले. त्यातून त्याला हरिणबालकाचा जन्म आला. शेवटी त्यानें सर्वसंगपरित्याग करून देहाचा त्याग केला. हाच एका ब्राह्मणाच्या पोटी जडभरत या नावानें जन्मास आला. हा जडोन्मत्त-पिशाच्याप्रमाणे भ्रमण करायचा. चोरांच्या एका राजाने त्याला एकदा भद्रकालीला बळी देण्यासाठी नेले. भद्रकालीने या जडभरताची मुक्तता केली. याच जडभरताला रहूगणराजाने आपल्या पालखीला भोई म्हणून जुंपले. जडभरताने या रहूगणराजाला भागवतधर्माचा उपदेश केला. या भरताचा पुत्र सुमती, हा अवधूतमार्गाने गेला व जीवन्मुक्त झाला. सुमतीस वृद्धसेना नावाच्या स्त्रीपासून देवताजित नावाचा पुत्र झाला. आसुरी नावाच्या स्त्रीपासून सुमतीस देवद्युम्न नावाचा पुत्र झाला.

देवद्युम्नाला धेनुमतीपासून परमेष्टी, परमेष्टीला सुवर्चलापासून प्रतीह झाला. याच प्रतीहापासून सुवर्चलास प्रतिहर्ता, प्रस्तोता, उद्गाता असे यज्ञकर्मात निपुण पुत्र झाले. प्रतिहर्त्यास स्तुतीपासून अज व भूमा हे दोन पुत्र झाले. भूम्यास ऋषिकुल्यापासून उद्गीथ, उद्गीथास देवकुल्यापासून प्रस्ताव व प्रस्तावास नियुत्सेच्या पोटी विभू अशी संतती झाली. विभूला रतीपासून पृथुषेण, पृथुषेणाला आकूतीपासून नक्त, नक्ताला द्रुतीपासून गय. अशी संतती वाढली. गय राजाला गयंतीपासून चित्ररथ, सुगती, अवरोधन हे तीन पुत्र झाले चित्ररथास ऊर्जेच्या पोटी सम्राट नावाचा पुत्र झाला. सम्राटास उत्कलेच्या पोटी मरीची झाली. मरीचीस बिंदुमतीपासून बिंदुमान नावाचा पुत्र झाला. बिंदुमानास रसघेपासून मधू, मधूस सुमनेपासून वीरव्रत व वीरव्रतास भोजेच्या पोटी मंथू व प्रमंथू असे दोन पुत्र, मंथूला सत्येपासून भौवन, भौवनाला दूषणेच्या पोटी त्वष्टा, त्वष्टचाला विरोचनेपासून विरज व विरजास विषुचीपासून शतजित्प्रमुख असे शंभर पुत्र व एक कन्या; अशी या प्रियव्रताच्या वंशाची वाढ झाली. असा हा प्रियव्रताचा वंश थोडक्यात–


विष्णू
ब्रह्मदेव
स्वायंभुव मनू
प्रियव्रत— प्रथमभार्या
कवी इध्मजिव्ह यज्ञबाहू महावीर हिरण्यरेत आग्नीध्र घृतपृष्ठ सवन मेधातिथी वीतिहोत्र ऊर्जस्वीती
केतुमाल किंपुरुष हरिवर्ष इलावृत नाभी रम्यक हिरण्मय कुरू भद्राश्व
ऋषभ
करभाजन, चमस, द्रुमिळ, आविर्होत्र, पिप्पलायन, कुशावर्त, इलावर्त,
ब्रह्मावर्त, भरत, मलय, केतू, भद्रसेन, इंद्रस्पृक, विदर्भ, कीटक, कली,
हरी, अंतरीक्ष, प्रबुद्ध.

## भरताचा वंशविस्तार

भरत
|
सुमती
|
देवताजित
|
देवद्युम्न
|
परमेष्ठी
|
प्रतीह
|
प्रस्तोता, प्रतिहर्ता, उद्गाता

(पुढे चालू)




(पुढे चालू)


चित्ररथ
सम्राट
मरीची
बिंदुमान
मधू
वीरव्रत
मंथू
प्रमंथू
भौवन
त्वष्टा
विरज
शताजित इत्यादी शंभर पुत्र.

## भरतखंडातील नद्या व पर्वत

शुकाचार्यांनी राजा परीक्षितास जंबूद्वीपाचे वर्णन करून मेरु-पर्वत, नऊ खंडे यांची माहिती करून दिली. नऊ खंडांतील पर्वत, नद्या, देव व मंत्र यांचीही माहिती त्यांनी दिली. भद्राश्वखंडातील हयशीर्षादी देवतांची उपासनाही त्यांनी वर्णन केली. त्यानंतर त्यांनी भरतखंडातील नद्या, पर्वत, नरनारायणांची मंत्रपूर्वक उपासना भरतखंडाच्या माहात्म्यासह वर्णन केली. त्यानंतर त्यांनी प्लक्षादी सहा द्वीपांचे; पांच समुद्रांसह वर्णन करून त्यांनी सूर्याच्या रथाचे वर्णन केलें. सूर्यमार्गाचे, कालचक्राचे, नक्षत्राचे, शिशुमारसंस्थेचे, राहुमंडलाचे, ग्रहणयोगाचे, सप्तपातालांचे, शेषाच्या मस्तकावरील चौदा भुवनांचे, अठ्ठावीस नरकांचे विस्तारानें वर्णन केले.

किंपुरुष नावाच्या खंडात भगवान आदिपुरुष सीतापती रामचंद्र, त्याचा भक्त हनुमान उपासना करीत असतो. अशा या भरतखंडात अनेक नद्या व पर्वत आहेत. मलय, मंगलप्रस्थ, मैनाक, त्रिकूट, ऋषभ, कूटक, कोल्लक, सह्य, देवगिरी, ऋष्यमूक, श्रीशैल, वेंकट, महेंद्र, वारिधार, विंध्य, शुक्तिमान, ऋक्षगिरी, पारियात्र, द्रोण, चित्रकूट, गोवर्धन, दैवतक, ककुभ, नील, गोकामुख, इंद्रकील, कामगिरी इत्यादी अनेक पर्वत येथे आहेत. चंद्रवशा, ताम्रपर्णी, अवटोदा, कृतमाला, वैहायसी, कावेरी, वेणी, पयस्विनी, शर्करावती, तुंगभद्रा, कृष्णा, वेण्णा, भीमरथी, गोदावरी, निर्विंध्या, पयोष्णी, तापी, रेवा, सुरसा, नर्मदा, चर्मण्वती, सिंधू, अंध व शोण नंद; महानदी, वेदस्मृती, ऋषिकुल्या, त्रिसामा, कौशिकी, मंदाकिनी, यमुना, सरस्वती, दृष्यवती, गोमती, सरयू, रोधस्वती, सप्तवती, सुषोमा, शतद्रू, चंद्रभागा, मरुद्वृधा, वितस्ता, असिक्नी, विश्वा या महानद्या भरतखंडात आहेत.

या खंडात जन्म घेणाऱ्या पुरुषांनी सात्त्विक, राजस, तामस कर्मे करून देवलोकाच्या, मनुष्यलोकीच्या, नरकातील अनेक गती मिळविल्या. या खंडात मनुष्यांनाही मोक्ष प्राप्त होतो. सर्व भूतांचा आत्मा रोगादी-दोषरहित, आधाररहित, सर्वव्यापी, वासुदेवांची कारणावाचून भक्ती

करणे हाच त्यांना मोक्ष वाटतो. भरतखंड हे मोक्षप्राप्तीचे साधन आहे. येथे प्राप्त झालेल्या मनुष्यजन्माचे देवही गायन करतात. देवादिकांनाही त्यांचा हेवा वाटतो. यज्ञ, तप, व्रत, दान करून तुच्छ असा स्वर्ग कशासाठी मिळवायचा ? तेथे नारायणांच्या चरणकमलांची स्मृती नाही. असलीच तर विषयभोगाने लोपून गेलेली असते. ब्रह्मलोकाच्या प्राप्तीपेक्षाही भरतखंडातील अल्पायुषी मनुष्यजन्मास फार महत्त्व आहे. कारण येथे सर्व कर्मे ईश्वराला अर्पण करून अभयस्थानास पोचता येते. या भरत-खंडातील लोकांचे भाग्य केवढे आहे ! येथे प्रत्यक्ष श्रीहरी येऊन देवाचा हविर्भाग आपलेपणाने स्वीकारतात. सकाम भक्तांना श्रीहरी फल देतात, पण परमार्थ नाही देत. दिलेल्या फळाचा भोग झाला की पुन्हा फळं मागण्याची इच्छा होते. पण कोणतीच इच्छा न करणाऱ्या भक्तांना सर्व इच्छांची निवृत्ती करणारे आपले चरणपल्लव ते भक्तांना आपण होऊन देतात. येथे श्रीहरी भक्तांना स्वानुभवाचे सुख देतात. म्हणून पुण्याच्या बदल्यात मोठमोठे लोक, ऋषी, राजे भरतखंडात जन्म मागतात.

# ४ सदाचारदर्शन

## धारणा कशी असावी ? ध्यान कसे असावे ?

राजा परीक्षिताने प्रश्न केल्यावरून भागवताच्या आरंभीच दुसऱ्या स्कंधात ध्यान व धारणा कशी असावी, यासंबंधी शुकाचार्य खुलासा करीत आहेत. आत्मतत्त्वाची ओळख नसलेल्यांनी व गृहस्थधर्माचे आचरण करणाऱ्यांनी दोषमुक्त होण्यासाठी श्रवण, मनन इत्यादी साधनांचा उपयोग करावा. आपला देह, आपली मुले, आपली स्त्री या सर्व वस्तू मिथ्या आहेत हे केव्हा समजणार ? आपल्या धर्मावर पूर्ण

निष्ठा ठेवावी, आत्मानात्मविचार करावा, अष्टांगयोगाचे साधन करावे. भगवान नारायणांचे स्मरण करावे. निर्गुण परब्रह्मात रमलेले मननशील ऋषीही श्रीहरींचे गुणगान करण्यात रमून जातात.

ईश्वराचे नामसंकीर्तन कामी पुरुषांच्या सर्व कामना पूर्ण करणारे आहे. ज्ञानेच्छूंना ज्ञानप्राप्ती व मोक्षेच्छूंना मोक्ष देणारे असे ते निर्भय साधन आहे. आपला अंतकाल जवळ आला आहे असे समजून पुरुषानें प्रथमतः मरणाचे भय सोडावे. वैराग्याने आपल्या देहाची व स्त्रीपुत्रादिकांची ममता सोडावी. मोठे धैर्य धरून वैराग्यपूर्वक घरादाराचा त्याग करावा. पवित्र तीर्थांत स्नान करावे. पवित्र अशा एकान्तस्थानी सिद्ध केलेल्या आसनावर बसावे. शुद्ध मनाने, संकल्प-विकल्परहित अशा मनाने सर्वोत्तम असा ॐकाराचा जप करावा. श्वासोच्छ्वासाचे नियमन करावे. भगवंतांच्या स्वरूपात चित्त अढळ करावे. पायांपासून मस्तकापर्यंत एकेका अवयवाचे ध्यान करावे. भगवंतांशिवाय दुसऱ्या कशाचेही स्मरण करू नये. जेथे मन प्रसन्न होते तेच श्रीविष्णूंचे श्रेष्ठ स्थान होय. (पदं तत्परमं विष्णोर्मन यत्र प्रसीदति) रजोगुणी व तमोगुणी विषयांपासून मन आवरून धरावे.

प्रथम साधकानें सर्वसंगपरित्याग करून आपल्या इंद्रियांना वश करून घ्यावे. नंतर दृढ ब्रह्मासन घालून श्वासोच्छ्वास नियमित करावेत. मन बुद्धीच्या साह्यानें भगवंतांशी निगडित करावे. त्या विराट पुरुषाचे पायांचे तळवे पाताळ समजावे. पायांचे मागील पुढील भाग रसातळ मानावे. पायांचे घोटे महातल व पोटऱ्या तलातल समजावे. दोनही जानू सुतल, दोनही मांड्या वितल, जघन भूर्लोक, वक्षःस्थल स्वर्ग, कंठ महर्लोक, मुख जनलोक, ललाट तपोलोक, मस्तक सत्यलोक, इंद्रादिक देव बाहू, दिशा त्यांचे कान, शब्द त्यांचे कर्ण, अश्विनीकुमार दोन नाकपुड्या, गंध हे नाक व अग्नी हे मुख समजावे. अंतरिक्ष हे त्याचे नेत्र, सूर्य हे डोळे, रात्र व दिवस डोळ्यांच्या पापण्या, ब्रह्मलोक भ्रुकुटीचा विस्तार, पाणी टाळू व सर्व प्रकारचा रस ही जीभ; अशा या विराट पुरुषाचे मनन करावे.

अशा या भगवंतांची पायांपासून मुखापर्यंत प्रेमलक्षणेने एकरूपता

साधावी. काल व देश यांचा विचार न करता मनाने प्राणाचा निरोध करावा. त्यानंतर दृष्टी संपूर्ण ज्ञानमय होईल, वासना समूळ नष्ट होतील आसन घालून पायाच्या टाचेने गुदद्वार दाबून धरावे. वायूची गती वर फिरवावी. तेथून क्रमाक्रमाने सहा चक्रांतून प्राण वर न्यावा. कान, डोळे, नाकपुड्या, मुख ही द्वारे बंद करून त्याला भुवयांच्या मध्यभागी न्यावे तेथे प्राण अर्धा मुहूर्त निश्चल राहिला तर ज्ञान प्राप्त होते.

योगी ब्रह्मपदास गेला की, त्याला कसलेही दुःख होत नाही. वृद्धत्व, मृत्यू, शरीरपीडा, उद्वेग, दुःख यांची कटकट उरत नाही. तेथे क्रमाक्रमाने तो पृथ्वी आदी पंच महाभूतांत आपल्या सूक्ष्म लिंग-शरीराने समरस होतो व क्रमाने पुढील भूतांत मिळतो प्रथम पृथ्वीत, मग जलात, मग अग्निरूपात, मग तेजात, मग वायूत व शेवटी परमात्मास्वरूपी आकाशास तो मिळतो. तो आपल्या लिंगदेहातील घ्राणें-द्रियानें गंधात मिसळतो. रसनेंद्रियाने रसात, डोळ्यांनी रूपात, स्पर्शें-द्रियानें स्पर्शात, कर्मेंद्रियांनी त्या त्या कर्मात समरस होतो त्यानंतर तो अहंकारतत्त्वात जातो. तेथे मन व देवता यांचाही लय होतो. नतर तो विज्ञानरूप महत्तत्त्वात, प्रकृतीत, भगवत्स्वरूपात विलीन होतो.

भगवान वासुदेवांच्या ठिकाणी ज्या मार्गाने भक्ती दृढ होईल त्याहून दुसरा श्रेयस्कर मार्ग नाही. परमेश्वराबद्दल भक्ती निर्माण होईल तोच खरा मार्ग. म्हणून सर्व काळी भगवंतांचे श्रवण करावे, कीर्तन करावे, स्मरण करावे हे उचित होय. (श्रोतव्यः कीर्तितव्यश्च स्मर्तव्यो भगवान्नृणाम्)

## सकाम उपासनेचे प्रकार

ज्यांना ब्रह्मतेजाची ओळख हवी असेल त्यांनी ब्रह्मणस्पतीची उपासना करावी. इंद्रियादिकांची पुष्टी हवी असेल त्यांनी इंद्राची उपासना करावी. संततीसाठी दक्षाची उपासना करावी ऐश्वर्यासाठी दुर्गेची, तेजासाठी अग्नीची, द्रव्यासाठी आठ वसूंची, वीर्यासाठी रुद्रांची, अन्नपानासाठी अदितीची, स्वर्गासाठी आदित्याची, राज्यासाठी विश्वेदेवांची, मान्यता व सत्ता मिळविण्यासाठी साध्यदेवांची आराधना

करावी. आयुष्यासाठी अश्विनीकुमारांची, शरीरपुष्टीसाठी पृथ्वीची, कीर्तीसाठी द्यावा– पृथ्वीची उपासना करावी.

सौंदर्याची प्राप्ती होण्यासाठी गंधर्वांची, स्त्रीप्राप्तीसाठी ऊर्वशी नावाच्या अप्सरेची, सर्वांवर स्वामित्वासाठी ब्रह्मदेवांची आराधना करावी. कीर्तीसाठी यज्ञरूपी परमेश्वराची, द्रव्यासाठी वरुणाची, विद्येसाठी शंकरांची, पति-पत्नींतील उत्कट प्रेमासाठी पार्वतीची उपासना करावी. धर्माचरणासाठी विष्णूंची, वंशविस्तारासाठी पितरांची, पिशाचबाधा दूर व्हावी म्हणून यक्षांची व सामर्थ्यासाठी मरुद्देवांची आराधना करावी. राज्यासाठी मनुदेवांची, शत्रुनाशासाठी निर्ऋतिनामक राक्षसीदेवीची, विषयभोगासाठी चंद्राची उपासना करावी. ज्याला कसलीच इच्छा नाही त्यानें श्रेष्ठ अशा ईश्वराची आराधना करावी.

मनुष्यानें भक्तीनेंच ईश्वराची आराधना करावी. त्यासाठी भगवद्भक्तांची संगत धरावी. हरिकथांचे श्रवण करावे. श्रीकृष्णांचे गुण सतत आठवावेत. त्यांच्या पायांवर मस्तक नमवावे. हरिनामाच्या गजरात तल्लीन व्हावे.

## सदाचार आणि आश्रमधर्म

पुरुषाला ज्ञान व भक्ती, वर्ण व आश्रम यांचे ज्ञान झाल्यावर त्याचे आचरण कसे असते ? या युधिष्ठिराच्या प्रश्नास उत्तर देताना नारदांनी सदाचाराचे व आश्रमधर्माचे निरूपण, स्कंध सातव्याच्या अकराव्या अध्यायात केले आहे. सर्व देवतारूप असा भगवान नारायण, श्रीहरी ज्याने संतुष्ट होतो ते सदाचरण. सत्य, दया, तप, शुद्धता, सहनशीलता, युक्तायुक्तविवेक, मनोनिग्रह, बाह्येंद्रियदमन, अहिंसा, ब्रह्मचर्य, दान, योग्य मंत्राचा जप, सरळपणा, संतोष, समदृष्टी, महात्म्यांची सेवा, निवृत्ती, निष्काम कर्म, आत्मविचार, सर्वांविषयी आत्मबुद्धी, श्रीकृष्णांचे कीर्तन, श्रवण, स्मरण, सेवन, अर्चन, मनन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन; अशा गुणांनी मानवांचा उत्कृष्ट धर्म सांगितला आहे.

गर्भधानादी संस्कार मंत्रयुक्त झाले आहेत, ब्रह्मदेवांनी ज्याला संस्कारयुक्त म्हटले तोच द्विज होय. अध्ययन, अध्यापन, यजन, याजन,

दान, प्रतिग्रह ही कर्मे ब्राह्मणाला योग्य आहेत. प्रजापालन करणाऱ्या राजाने ब्राह्मणांशिवाय इतरांकडून कर घेऊन उपजीविका करावी. वैश्याने ब्राह्मणास अनुकूल राहून कृषिकर्म, व्यापार, गोरक्षण, व्याज-बट्टा करून उपजीविका चालवावी. शूद्राने द्विजसेवा करावी. स्वामीची सेवा हेच त्याचे उपजीविकेचे साधन होय. कृषीसारखे धंदे, अयाचित दानांचा स्वीकार, प्रत्यक्ष धान्याची भिक्षा, शेते व बाजार येथे पडलेले दाणे वेचणे, ही वृत्ती ब्राह्मणाला विहित आहे. कनिष्ठ वर्णाच्या पुरुषाने केव्हाही आपत्कालाखेरीज श्रेष्ठ वर्णाच्या वृत्तीचा स्वीकार करू नये. आपत्काळी मात्र क्षत्रियांखेरीज सर्वांना सर्ववृत्ती विहित आहेत.

मनुष्याने ऋत, अमृत, मृत, प्रमृत, सत्यानृत यांतील कोणत्याही वृत्तीने उपजीविका करावी. पण कधीच श्ववृत्तीने निर्वाह करू नये. ऋत म्हणजे शेतातील, बाजारातील दाणे टिपणे, अमृत म्हणजे अयाचित दानांचा स्वीकार. मृत म्हणजे नित्य याचना, प्रमृत म्हणजे कृषिकर्म, सत्यानृत म्हणजे व्यापार व श्ववृत्ती म्हणजे नीचाची चाकरी होय. श्ववृत्ती निंद्य असल्यामुळे ब्राह्मण, क्षत्रिय यांना वर्ज्य आहे. ब्राह्मण हा वेदमय व राजा देवमय आहे. (सर्ववेदमयः विप्रः सर्वदेवमयो नृपः)

मनःसंयमन, बाह्येंद्रियदमन, तप, शुद्धत्व, संतोष, क्षमा, मनाची सरलता, विवेक, दया, भगवंतावर निष्ठा, सत्य, ही ब्राह्मणाची लक्षणे होत. शौर्य, प्रभाव, धैर्य, तेज, औदार्य, मनोनिग्रह, क्षमा, ब्राह्मणभक्ती, अनुग्रह, प्रजापालन, ही क्षत्रियाची लक्षणे होत. देव, गुरू, अच्युत यांच्या ठिकाणी भक्ती, धर्म, अर्थ, काम या पुरुषार्थांचे साधन, आस्तिक्य, नित्य उद्योग, चातुर्य, ही वैश्याची लक्षणे होत. नम्रता, स्नानादीकरून शुद्धत्व, निष्कपटता, स्वामीची सेवा, अमंत्रक यज्ञ, चौर्य न करणे, सत्य भाषण करणे, गोब्राह्मणांचे रक्षण करणे, ही शूद्राची लक्षणे होत.

पतिशुश्रूषा, बंधूंच्या हितात तत्पर, पतीच्या नियमानुसार वर्तन, हा पतिव्रतेचा धर्म आहे. प्रतिव्रतेने घराचे झाड-सारवण करावे, रांगोळ्या घालाव्यात, स्वतः सौभाग्यादी अलंकारांनी भूषित व्हावे, घरातील भांडीकुंडी स्वच्छ ठेवावीत, विनय, इंद्रियनिग्रह, सत्य व प्रिय भाषण, प्रेम, पतीची सेवा; यांत काळ कंठावा. दैवाने प्राप्त झालेल्या लाभाला

संतुष्ट असावे. विषयभोगांबद्दल अनासक्त असावे. संसारात दक्ष, धर्मप्रिय, सत्य बोलणारी, सर्वत्र सावध, शुद्ध, प्रेमळ, अशी स्त्री असावी. पती हेच दैवत तिने मानावे. त्याच्या सेवेत राहून आनंदाचा उपभोग घ्यावा.

## ब्रह्मचारीधर्म, वानप्रस्थधर्म

ब्रह्मचाऱ्याने गुरूच्या घरी वास करून, इंद्रियदमन करून, आपली योग्यता दासाप्रमाणे मानून गुरूंची सेवा करावी. त्यांच्यावर अत्यंत श्रद्धा असावी. सायंकाळी, प्रातःकाळी गुरू, अग्नी, सूर्य व देवश्रेष्ठ विष्णू यांचे पूजन करावे. मौन धारण करून एकाग्रचित्ताने दोनही संध्यांच्या वेळी गायत्रीचा जप करावा. गुरू बोलवतील त्या वेळी हजर राहावे व वेदांचे अध्ययन करावे. अध्ययनाच्या प्रारंभी व शेवटी गुरूंच्या चरणांवर मस्तक ठेवावे. हातात दर्भ, कटीस मेखला, कृष्णाजिन, वस्त्र, जटा, दंड, कमंडलू, यज्ञोपवीत, इत्यादी ग्रहण करावीत. सकाळीसंध्याकाळी भिक्षा मागून गुरूंना अर्पण करावी. त्यांनी आज्ञा दिली तरच भोजन करावे.

सुशील, मिताहारी, श्रद्धायुक्त, जितेंद्रिय असावे. स्त्रिया व स्त्रैण पुरुष यांच्याशी भिक्षेपुरताच संबंध ठेवावा. ब्रह्मचाऱ्याने स्त्रियांच्या कथा दूर कराव्यात. तरुण पुरुषाने आपले केस विंचरणे, शरीराचे मर्दन करणे, अभ्यंग स्नान करणे, यांत स्त्रियांची मदत घेऊ नये. कारण स्त्री ही अग्निरूप असून पुरुष घृताचा कुंभ आहे. एकान्तात प्रत्यक्ष कन्येशीही भाषण करू नये. इतर प्रसंगी कारणांपुरतेच स्त्रियांशी बोलावें. पुरुष व स्त्री ही बुद्धी जोपर्यंत आहे तोपर्यंत विषय चिंतन होते. त्यामुळे जीवास भोगाची प्रवृत्ती वाढते. ब्रह्मचर्याचे व्रत घेतले असेल त्यांनी मस्तकाला तेल लावणे, न्हाणे, शरीराचे मर्दन करणे, स्त्रीकडून सेवा घेणे, स्त्रियांची चित्रे काढणे, मांस व मद्य यांचे सेवन करणे. पुष्पांच्या माळा घालणे, चंदनाची उटी लावणे, शरीरावर अलंकार घालणे, या गोष्टी वर्ज्य कराव्यात. गुरूंनी अनुज्ञा दिल्यावर गृहस्थाश्रम स्वीकारावा.

वानप्रस्थी पुरुषाने नांगरलेल्या जमिनीपासून निर्माण झालेले धान्य

भक्षण करू नये. योग्य काळाशिवाय परिपक्व फळही खाऊ नये. अग्नीवर शिजविलेले, कच्चे, सूर्य किरणांनी परिपक्व झालेले फळांदिक पदार्थ खावेत. वनातील तांदुळांचाच पुरोडाश अग्नीला अर्पण करून घ्यावा. नवे अन्न प्राप्त झाले की जुने टाकून द्यावे. अग्नीच्या संरक्षणासाठीच पर्णकुटीचा, पर्वताच्या गुहेचा आश्रय करावा. थंडी, वारा, अग्नी, पर्जन्य, सूर्याचा ताप स्वतः सहन करावा. जटा, अंगावरचे केस, मळ, दाढी, मिशा वाढवून दंड, कमंडलू, कृष्णाजिन, वल्कले, अग्निसाहित्य इत्यादी धारण करणाऱ्या मुनीने बारा, आठ, चार, दोन, अथवा एक वर्षापर्यंत वानप्रस्थधर्माचे आचरण करावे. प्रथम त्याने देहाबद्दलची ममत्वबुद्धी सोडावी. पंचमहाभूतांत देहाचा लय करावा. आकाशात देहाच्या छिद्रांचा, वायूत प्राणांचा, तेजात उष्णतेचा, मलात रक्ताचा, पृथ्वीत अस्थिमांसाचा पुरुषाने लय करावा. पृथ्वीचा जलात, जलाचा तेजात, तेजाचा वायूत, वायूचा आकाशात, आकाशाचा अहंकारात, अहंकाराचा महत्तत्त्वात, महत्तत्त्वाचा मायेत व मायेचा परमात्वतत्त्वात लय करावा. असा सर्व उपाधींपासून लय झाल्यावर चिद्रूप आत्मा अविनाशी समजून, अद्वैतरूपी समजून उपाधीपासून विराम पावावे.

## संन्यासधर्म, अजगरमुनीचा बोध

जो समर्थ असेल त्याने संन्यास घेऊन, देहमात्र शिल्लक ठेवून इतर सर्वांचा विधिपूर्वक त्याग करावा. कशाचीही अपेक्षा न करता प्रत्येक गावी एकच रात्र राहून पृथ्वीवर भ्रमण करावे. केवळ लंगोटी धारण करावी. दंडादी संन्याशाची चिन्हे फक्त धारण करावीत. भिक्षूने सर्व प्राण्यांचे हित चिंतावे. स्वस्वरूपात रमून कोणाचाही आश्रय न घेता एकट्यानेच राहावे. यतीने आत्मवस्तूचे प्रतिपादन न करणारे शास्त्र पाहू नये. त्याच्यात आसक्त होऊ नये. खोट्या शास्त्रावर आसक्ती ठेवून त्यावर उपजीविका करू नये. लोभ दाखवून बळाने शिष्य करू नयेत. भारंभार ग्रंथांचा अभ्यास करू नये. ग्रंथावर टीका करू नये. प्रवचनांवर निर्वाह करू नये. कोणत्याही ठिकाणी मठादींची व्यवस्था करू नये.

यतीनें नेहमी आत्मस्वरूपात तल्लीन असावे. लोकदृष्टीनें त्यानें आपले वर्तन उन्मत्तासारखे, बालकासारखें, मुक्यासारखे ठेवावे. यासाठी प्रल्हाद व अजगरमुनी यांचा एक संवाद नारदांनी उपस्थित केला आहे. प्रल्हाद लोकतत्त्व जाणण्यासाठी संचार करीत असताना कावेरी नदीच्या तीरी, सह्याद्रीच्या शिखरावर त्याने एक धुळीनें मलीन झालेला, नेत्र झाकून गेलेला एक अजगरमुनी पाहिला. प्रल्हादानें त्याची षोडशोपचारांनी पूजा केली. त्या अजगरमुनीनें प्रल्हादाला उपदेश केला.

सुखाच्या प्राप्तीसाठी, दुःखाच्या निवृत्तीसाठी कर्मे करीत असताना जगात दुःखप्राप्तीचे विपरीत फळ मिळते. सुख हेच जीवाचे स्वरूप असले तरी सर्व कर्मनिवृत्ती झाली तरच ते आपोआप प्रकट होते. आत्मरूपातील पुरुषार्थ शोधण्याऐवजी मनुष्य विषयांकडे धाव घेतो. दैव प्रतिकूल असले की केलेली कर्मे निष्फळ होतात. दुःखावाचून द्रव्य मिळाले तरी द्रव्यामुळे दुःखच प्राप्त होते. धनाढ्य पुरुषांना भयादी दुःखे मिळतात. जगण्याची इच्छा करणाऱ्या, धनाची इच्छा करणाऱ्या पुरुषांना राजा, चोर, शत्रू, स्वजन, पशू, पक्षी, याचक व काल यांपासून व स्वतःपासूनही भय असते. शोक, मोह, भय, क्रोध, प्रीती, धैर्य, हानी, श्रम इत्यादी दुःखे देणाऱ्या प्राणाची व धनाची इच्छा विवेकी पुरुषानें कधी करू नये. मधमाशी व अजगर यांना गुरुस्थानी मानावे. त्यांच्या उपदेशाने वैराग्य व संतोष यांची प्राप्ती होते.

काही खटपट न करता दैवाने जे प्राप्त होईल त्यावर संतुष्ट असावे. काही प्राप्त झाले नाही तरी अजगराप्रमाणे स्वस्थ पडून राहावे. कधी थोडे, कधी पुष्कळ, कधी स्वादिष्ट की स्वादरहित, जसे मिळेल तसे अन्न ग्रहण करावे. तागाचे वस्त्र, रेशमी वस्त्र, हरणाचे कातडे, पटकूर, वल्कल जे काय मिळेल ते परिधान करावे. कधी भूमीवर, कधी तृणांवर, कधी पानांवर, कधी पाषाणांवर, कधी भस्मावर, कधी राजवाड्यातील पलंगावर तर कधी परांच्या गादीवर शयन करावे. दुसऱ्याच्या इच्छेने कधी स्नान करावे. कधी शरीराला उटी लावावी, कधी वस्त्रे परिधान करावीत, कधी माळा व अलंकार धारण करावेत, कधी रथ, गज, अश्व यांवर आरूढ होऊन संचार करावा, तर कधी नग्न होऊन पिशाचाप्रमाणे

हिंडत राहावे. अशाच वृत्तीने भगवानविष्णूंच्या ठिकाणी सायुज्यमुक्ती प्राप्त होते.

## गृहस्थधर्माचे महत्त्व

गृहस्थाश्रमी पुरुषानें साक्षात भगवान श्रीकृष्णांना अर्पण होतील अशा भावनेने कर्मे करावीत. भगवद्भक्तांचा सहवास त्यानें करावा. भगवंतांच्या गोड अवतार-कथांचे त्यानें मनापासून श्रवण करावे. पुत्रादिकांबद्दलची आसक्ती त्यानें सोडावी. विवेकी पुरुषाने देह व गृह यांच्याशी कारणापुरताच संबंध ठेवावा. लोकात मात्र व्यवहारी मनुष्या-सारखे वागावे. ज्ञातिबांधव, माता-पिता, पुत्र, भाऊ, इष्टमित्र यांच्या भाषणांस, इच्छांना उदासतेनें मान्यता द्यावी. दैवानें प्राप्त होईल अशाच धनाचा उपभोग घ्यावा. दैवयोगानें पुष्कळ धन मिळाले तर त्याचा अभिमान बाळगू नये, आपले पोट भरेल तेवढयाच धनावर पुरुषाचे स्वामित्व आहे. त्यापेक्षा जास्त आसक्ती ठेवणारा चोर असून तो दंडास पात्र होतो.

**यावाध्रियेत जठरं तावत्स्वत्वं हि देहिनाम् ।**
**अधिकं योऽभिमन्येत स स्तेनो दण्डमर्हति ।।**

हरिण, उंट, गाढव, वानर, उंदीर, सर्प, पक्षी, माशा इत्यादींना आपल्या पुत्राप्रमाणे मानावे. त्यांच्यांत व आपल्या पुत्रांत कितीसे अंतर आहे ? गृहस्थाश्रमी पुरुषानें धर्म, अर्थ, काम यांच्या प्राप्तीसाठी फार कष्ट करू नयेत. दैवानें जे प्राप्त होईल तेवढयावरच संतुष्ट असावे. देशकालानुसार धर्मार्थ कामांचे सेवन करावे. स्त्रीच्या ठिकाणचा आपलेपणा सोडला पाहिजे. कृमी, विष्ठा, भस्म यांतच ज्याचा शेवट व्हायचा त्या तुच्छ शरीराची किंमत ती काय ? या शरीराकरताच भार्येवर प्रेम करायचे ? देह, स्त्री यांचा अभिमान सोडून नेहमी माणसानें वागावे. आत्मप्राप्तीचा मार्ग स्वीकारावा. दैवाने मिळालेल्या, पंचमहायज्ञ करून राहिलेल्या अन्नावर जो राहातो तो ज्ञानी पुरुष सत्पुरुषांच्या गतीला पोचतो. यजनादी वृत्तीनें प्राप्त झालेल्या द्रव्यानें गृहस्थाश्रमी

पुरुषानें देव, ऋषी, मनुष्ये, भूते, पितर या पंचमहायज्ञांच्या देवांचे व अंतर्यामी असलेल्या परमेश्वराचे ध्यान करावे. अग्निहोत्रादिक करून यज्ञपुरुषाचे समाधान करावे.

पण यज्ञासाठी फार आग्रह धरू नये. ब्राह्मणांच्या मुखांत समर्पण केलेल्या अन्नादिकांनी जशी यज्ञभोक्त्या परमेश्वराची तृप्ती होते तशी अग्निरूप मुखात दिलेल्या होमद्रव्यानें होत नाही. द्रव्यवान मनुष्यानें स्ववृत्तीनुसार भाद्रपद महिन्यात मातापित्यांचे, त्यांच्या बंधूंचे, कृष्णपक्ष-संबंधी महालय नावाचे श्राद्ध करावे. अयन, विषुव, व्यतिपात, दिनक्षय, चंद्रग्रहण, सूर्यग्रहण, द्वादशी, श्रवणादी तीन नक्षत्रे, वैशाख शुक्ल तृतीया, कार्तिक शुक्ल नवमी, हेमंत ऋतू, शिशिर ऋतू यांतील चार घटका, माघ शुक्ल सप्तमी, इत्यादी योग आले की गृहस्थाश्रमी पुरुषानें पित्रा-दिकांचे श्राद्ध करावे. या पर्वकाळी अनुष्ठानें केली तर ती श्रेय वाढवि-णारी होतात. पर्वकाळी स्नानदानादिक पुण्यकर्मे केली तर आयुष्य सफल होते. पर्वसमयी स्नान, जप, होम, व्रत, देवब्राह्मणांचे पूजन करावे. म्हणजे पितर, देव, नर, भूते यांना काही अर्पण केल्याचे फल मिळते. भार्येचा पुंसवनादिक संस्कार, अपत्यांचा जातकादिक संस्कार, यज्ञा-दीक्षादिक संस्कार, दहनादी प्रेतक्रिया, सांवत्सरिक श्राद्ध, अभ्युदायासाठी केलेले कर्म, या प्रसंगी पुरुषानें ही कर्मे उत्तम प्रकारे करावीत व पुण्याचे संपादन करावे.

संपूर्ण चराचर विश्व ही त्या भगवंताची मूर्ती समजून सर्व देश पुण्यकारक मानावा. तप, विद्या, दया यांनी युक्त असा ब्राह्मणसमुदाय जेथे असेल तो देश पुण्यकारक समजावा. श्रीहरींचे आराधन जेथे होते तो देश पुण्यकारक समजावा. पुराणप्रसिद्ध गंगादी नद्या, पुष्करादी सरोवरे , कुरुक्षेत्र, गया, प्रयाग, पुलहाश्रम, नैमिषारण्य, फल्गुतीर्थ, सेतू प्रभास, द्वारका, वाराणसी, मथुरा, पंपासरोवर, बिंदुसरोवर, बदरिकाश्रम, नंदा, सीता व राम यांचे आश्रम, महेन्द्र व मलय इत्यादी कुलपर्वत. जेथे श्रीहरींच्या मूर्ती आहेत, ती सर्व स्थाने पुण्यकारक मानावीत. वारंवार त्या स्थानांचे सेवन करावे. तेथे केलेला धर्म सहस्रपटींनी अधिक आहे.

विद्वान पुरुष श्रीहरींनाच श्रेष्ठ मानतो. हे सर्व विश्वच हरिमय आहे. देव, ऋषी, सिद्ध, सनकादी ब्रह्मपुत्र हे विद्यमान असूनही राजसूययज्ञात श्रीकृष्णच सत्पात्र ठरले. जीवांनी व्याप्त असलेल्या या ब्रह्मांडरूपी वृक्षाचे मूळ कारण अच्युत आहे. त्यांची पूजा केल्याने सर्व जीवांची व आत्म्यांची तृप्ती होते. नर, पशू, पक्षी, ऋषी, देवता, शरीरे ही त्या परमेश्वराने निर्माण केली असून त्यांत तोच निवास करतो. म्हणून तो पुरुष या नावाने प्रसिद्ध आहे. त्रेतादियुगात मनुष्यांत एकमेकांचा अपमान करण्याची बुद्धी झाली म्हणून विद्वानांनी पूजेसाठी श्रीहरींची प्रतिमा कल्पिली. प्रतिमेवर श्रद्धा ठेवून उत्तम पूजासामग्रीने श्रीहरींची उपासना सुरू झाली. द्वेषभाव सोडून ही अर्चना केली पाहिजे. तप, विद्या, संतोष यांच्या योगानें श्रीहरी वेदरूप तनू धारण करतो. तो ब्राह्मणच सत्पात्र आहे. आपल्या चरणरजाने त्रैलोक्याला पावन करणारे ब्राह्मण श्रीकृष्णांचेही मोठे दैवत आहे.

## अवधूताचे चोवीस गुरू

तत्त्वज्ञान व आचारधर्म यांचे मोठे सुबोध व विस्ताराने वर्णन भागवताच्या अकराव्या स्कंधात आले आहे. श्रीकृष्णांनी उद्धवाला केलेल्या या उपदेशातील काही महत्त्वाचा भाग आपण येथे पाहू. सर्व जीवांना, विशेषतः मनुष्यांना उत्कृष्ट गुरू म्हणजे स्वतःचा आत्माच आहे. ( आत्मनो गुरुरात्मैव पुरुषस्य विशेषतः ) या संदर्भात यदू व अवधूत यांची कथा येथे आली आहे. यदुराजानें अवधूतास पाहिले. अवधूत तरुण होता. तरी तो ज्ञानसंपन्न व विरक्त होता. त्याच्या समाधानी वृत्तीसंबंधी यदुराजाने प्रश्न केला. तेव्हा अवधूताने आपल्या चोवीस गुरूंची माहिती यदूस दिली.

पृथ्वी, वायू, आकाश, जल, अग्नी, चंद्र, सूर्य, कपोत, अजगर, समुद्र, पतंग, मधमाशी, हत्ती, मध हरण करणारा, हरिण, मासा, पिंगला वेश्या, कुरर टिटवी, बाल, कुमारी, बाण करणारा, साप, कांतीण, भिंगुरटी (कुंभारीण माशी), हे ते चोवीस गुरू होत. यांतील प्रत्येकापासून अवधूताने एकएक गुण घेतला. पृथ्वीपासून क्षमा करण्याचा गुण अवधूताने घेतला.

देहनिर्वाहासाठी मनाची, वाणीची सुस्थिती राहावी, आहारादी पदार्थ ग्रहण करावेत हे प्राणवायूपासून शिकता येते. परब्रह्माचा सर्वत्र अन्वय व व्यतिरेक आहे हे आकाशापासून समजते. उदक हे स्वच्छ, मधुर असते. ते सर्वांची उपजीविका चालविते. सर्वांना पवित्र करते. तसे योग्याचे मन स्वच्छ व मधुर असावे. हे उदकाने शिकविले. तेजस्विता, दिव्य कांती, चित्तनिग्रह, उदासीनता, समदृष्टी, उपकारबुद्धी, निरुपाधित्व या गोष्टी अग्नीनें शिकविल्या. सूर्याच्या भ्रमणाने चंद्राच्या कलांची उत्पत्ती होते. त्यांचा नाश होतो. पण स्वतः चंद्राचे तसे काहीच होत नाही. दुर्बोध अशा कालाने देहाचे उत्पत्तिनाश होतात, पण जीवात्म्याचे काही होत नाही हे चंद्राने शिकविले.

आपण जे करतो त्याचा अभिमान धरू नये हे सूर्यापासून शिकावे. अतिशय प्रीती वा लालसा केल्यास सर्वस्वाचा नाश होतो हे कपोतपक्ष्याने शिकविले. सुख व दुःख यांचा स्वतंत्र बोध होऊ शकत नाही. भगवत्स्वरूपाच्या ज्ञानानें सुखदुःखविवेक ध्यानात येतो. कसलाही विषाद वा हर्ष न मानता अजगराप्रमाणे मिळेल त्यात समाधान मानावे. समुद्राचे पाणी शांत असते. तेव्हा त्याचा पृष्ठभाग रमणीय वाटतो, तशी मुनीची मुद्रा रमणीय असावी. समुद्राचा जसा अंत लागत नाही तसा मुनीच्या ज्ञानाचा अंदाज येत नाही. मुनीची चित्तवृत्ती नेहमी समुद्राप्रमाणे रागद्वेषरहित असावी. तो समुद्राप्रमाणे सर्व व्यापण, नित्य व चिद्रूप असावा. समुद्रास अनेक नद्या मिळाल्या तरी त्याचे पाणी वाढत नाही. त्याप्रमाणे यतीपाशी उपभोग्य वस्तू वाढल्या तरी त्याची वासना वाढत नाही. अग्नीवर झडप घालून पतंग नाश पावतो. तसा पुरुष स्त्रीच्या शृंगारचेष्टांना भुलून नष्ट होतो हे पतंगापासून शिकता येते. पुष्पांना पीडा न देता त्यांतील मध मधमाशी घेते, त्याप्रमाणे मुनीनें गृहस्थांना पीडा न देता त्यांच्यापासून माधुकरी स्वीकारून उपजीविका करावी. ब्रह्मचिंतन करणाऱ्या स्त्रियांच्या संसर्गापासून अलिप्त राहावे हे हत्तीपासून शिकता येते. दान व भोग न करता साचवून ठेवलेले द्रव्य दुसराच कोणी नेतो. संचय करणारास स्वार्थ व परमार्थ साधत नाही, हे मध हरण करणाऱ्या पुरुषापासून शिकावे. सर्व संगपरि-

त्याग करून वनाचा आश्रय करून यतीनें परमार्थचिंतन करावे हे हरिणाने शिकविले. जिव्हेचा निग्रह करणे हे मोठे अवघड काम आहे. तिच्या तृप्तीसाठी प्रयत्न करणाऱ्यांचा नाश होतो हे मत्स्यामुळे समजते.

आशा हेच मोठे दुःख व निराशा हेच मोठे सुख, हा सिद्धान्त पिंगला वेश्येमुळे ध्यानात येतो. प्रियकर वस्तूंचा संग्रह करणे हे दुःखाचे कारण आहे, हे कुरर (टिटवी) पक्ष्यावरून ध्यानात येते. मानपान न मानता स्वतःच रंगून खेळण्याची निरागस वृत्ती बालकापासून मिळते. दोन अथवा दोहोंहून अधिक मनुष्यांचा सहवास झाला की, कलह होतो. मुनीनें एकटयानेंच फिरावे हे कुमारीच्या उदाहरणावरून पटते. चित्ताची एकाग्रता, केली की समाधी सिद्ध होऊन अद्वैतभावना वाढते, हे बाण करणाऱ्या कारागिरावरून ध्यानात येते. सर्प लोकांच्या भीतीनें एकटा फिरतो. कधी एका स्थलास राहात नाही. नित्य सावध असतो. गुहेत शयन करतो. त्याच्या बाह्य स्थितीवरून त्याच्या विषाची कल्पना कोणासच येत नाही. त्याला कोणाचे साह्य नको असते. हे सर्व गुण सर्पापासून घेण्यासारखे आहेत. ऊर्णनाभी वा कोळ्याच्या वागणुकीनें परमेश्वरास जगाची उत्पत्ती वा त्याचा नाश करण्यासाठी साधनांची अपेक्षा नसते, हे पटते. एकाग्रतेने भगवंताचे ध्यान करून स्वरूपता मुक्ती कशी सुलभ करावी हे कुंभारीण माशी शिकविते.

## विषयासक्तीचे दुष्परिणाम; ऐल राजाची कथा

मन हे स्वभावतःच मोठे चंचल आहे. म्हणून प्रत्येक विचारी पुरुषाने अंतर्मुख बनून, विषयासक्त न होऊन सावध राहिले पाहिजे. विवेकसंपन्न पुरुषानें स्त्रैण व विषयासक्त पुरुषांच्या संगतीत राहू नये. श्रीकृष्णांनी या संदर्भात उद्धवास राजा ऐलाची एक कथा सांगितली. भरतखंडात फार पूर्वी ऐल म्हणजेच पुरूरवा नावाचा एक महाप्रसिद्ध चक्रवर्ती राजा होऊन गेला. उर्वशी नावाची एक अप्सरा त्याची पत्नी. तिच्या संगतीत त्याने खूप काळपर्यंत सुखभोग भोगले. नंतर एके दिवशी उर्वशी राजास शय्येवरच सोडून गेली. तिच्या वियोगाने राजा अतिशय

व्याकुळ झाला. राजा तिच्या मागे नग्नावस्थेतच धावत गेला.

राजा ऐल त्या विषयभोगात एवढा मग्न झाला होता की, कित्येक वर्षे गेली हे त्याला समजलेच नाही. किती सूर्योदय झाले, सूर्यास्त झाले, हे त्याच्या ध्यानीच आले नाही. तो राजा ऊर्वशीच्या वियोगाने अगदी वेडा होऊन गेला. नंतर एकदा कुरुक्षेत्रात त्याची व उर्वशीची भेट झाली. ऊर्वशीने त्याला गंधर्वांची उपासना करायला सांगितली. त्याप्रमाणे उपासना होताच त्याने ऊर्वशीची प्राप्ती करून घेतली. त्यांनी अनेक वर्षे सुखभोग घेतल्यावर शेवटी त्या राजाच्या मनात विषयसुखाची क्षुद्रता ध्यानात आली. तो वैराग्यवृत्ती धारण करून म्हणू लागला,

'अहो, मी किती मूर्ख व विषयासक्त आहे ! ऊर्वशीचा उपभोग घेताना माझ्या आयुष्याचा केवढा भाग नष्ट झाला, हे मला समजलंच नाही. मी सार्वभौम भूपती. सहस्रावधी भूपांचा स्वामी. पण स्वतः क्रीडामृगाप्रमाणे त्या अबलेच्या स्वाधीन झालो. अरे रे ! ही ऊर्वशी पाहा किती दुष्ट आहे. माझ्यासारख्या चक्रवर्ती व ऐश्वर्यवान राजाला एखाद्या तृणाप्रमाणं तुच्छ समजून तिनं सोडून द्यावं ? हिच्या बरोबर मीही एवढा विवेकशून्य झालो ! पुरुष एखाद्या गर्दभाप्रमाणे लाथा खात खास स्त्रीच्या पाठीमागे लागतो. ज्याचं मन स्त्रियांनी वश केलं, त्याची विद्या, दातृत्व, ज्ञान, ही सर्व व्यर्थच. अशा पुरुषानं कितीही एकान्त केला, मौन स्वीकारलं, तरी ते फुकटच. धिक्कार असो मला. मी वर्षानुवर्षं तिच्याबरोबर कामसुखाचा अनुभव घेतला. तरी माझी तृष्णा कमी न होता वाढतच गेली. म्हणून स्त्रीसुख भोगून कामवासना तृप्त करण्याची आशा व्यर्थच आहे. कामवासना तृप्त करण्यासाठी स्त्रीपराङ्मुखता हाच एक उपाय आहे.

'यासाठी वैराग्य निर्माण व्हावं म्हणून परमात्म्याची कृपा व्हायला हवी. यात त्या ऊर्वशीचा तरी काय दोष ? मीच इतका अंध झालो होतो. माझी अत्यंत विषयासक्ती पाहून तिलाही माझी कीव आली. तिनंच मला निवृत्तीचा उपदेश केला. पण मी तर इंद्रियांचा दास बनलो होतो. त्या उपदेशाचा माझ्या मनावर मुळीच परिणाम झाला नाही. माझ्या मनाचाच दोष ऊर्वशीचा मुळीच नाही. अरे रे,

मी किती वेडा मनुष्य. मी रज्जूसच सर्प मानलं. त्या ऊर्वशीचा देह किती मलीन. दुर्गंधीनं ओतप्रोत भरलेला. अत्यंत अपवित्र. पण मीच तो निर्मळ, सुगंधित, श्रेयस्कर मानला.

'अहो, या ऊर्वशीच्या देहाचा मी अभिमान धरला. तिच्यावर आसक्त झालो. पण हा देह म्हणजे शेवटी अग्नीचं खाद्यच नव्हे का ? कोल्ही, कुत्री, गिधाडं यांचंच ते भक्ष्य होत नाही का ? देह हा अमक्याचा मानणंच मुळात चूक आहे. त्याला सुंदर मानणं तर आणखीनच चुकीचं. हा देह म्हणजे त्वचा, मांस, रक्त, स्नायू, मेद, मज्जा, अस्थी यांची एक मोळीच नाही का ? विष्ठा, मूत्र, पू यांचं कोठारच नाही का ? अशा या नरकाच्या खाणीत पुरुष अनुरक्त होतात. मग कृमी व पुरुष यांच्यांत भेद तो कोणता ? हा अनर्थ टाळण्याचा एकच उपाय आहे. स्त्रियांपासून, स्त्रैण पुरुषांपासून अलिप्त राहाणं हा तो उपाय. चित्ताची स्थिरता राखावी.'

असा निश्चय पुरूरव्यानें केला व तो ब्रह्मचिंतनास लागला. त्यानें वैराग्याचा मार्ग धरून परमात्म्याचे पूर्ण ज्ञान संपादन केले. आमरणान्त जीवन्मुक्ताप्रमाणे त्यानें पृथ्वीचे पर्यटन करून मोक्ष मिळविला. विवेकी पुरुषानें विषयाचा संग सोडून सत्पुरुषांची संगत धरावी. साधुपुरुष निरिच्छ असतात. परमेश्वरावर त्यांची एकाग्र भक्ती असते. ते नित्य तृप्त असतात. त्यांची बुद्धी सर्वत्र सम असते. त्यांना देहादिकांचा अभिमान नसतो. त्याचे ममत्व त्यांना वाटत नाही. विषयांपासून ते अलिप्त असतात. साधूंच्या सहवासात एकदा अंतःकरण पवित्र झाले की, चित्ताची शुद्धी होते. आराधना केल्यावर भक्तियोग साधतो, अहर्निश सच्चिदानंदस्वरूपात रममाण होता येते.

## भगवंतांचा पूजाविधी

ऐल राजाचे आख्यान व त्याचे वैराग्य ऐकल्यावर उद्धवानें श्रीकृष्णांना विचारले, 'भगवंता, भगवद्भक्त तुमची पूजा कोणत्या विधींनी करतात ? नारद, वेदव्यास, सुरगुरू बृहस्पती, अनेक ऋषिमुनी यांनी मोक्षप्राप्तीसाठी तुमचं पूजन कसं केले ? नारायणा, तुमचा

पूजाविधी प्रथम तुमच्यापासून ब्रह्मदेवांना समजला. त्या आदिपुरुषानं तो भृगू आदी पुत्रांना निवेदन केला. भगवान शंकरांनी पुढं तो पार्वतीस सांगितला. सर्व वर्ण, सर्व आश्रम, स्त्रिया, शूद्र यांना पूजाविधीच मोक्षासाठी उपयुक्त आहे. परमात्म्या, सात्वत्संप्रदायातील, भागवत-धर्मातील तुमची पूजा कशी असते ?'

श्रीकृष्णांनी उद्धवास थोडक्यात पूजाविधी समजावून दिला. पूजाविधी म्हणजे एक मोठे कर्मकांडच. त्यावर ग्रंथही पुष्कळ. म्हणून त्यांनी थोडक्यात सांगोपांग पूजाविधी उद्धवास समजावून दिला. भगवंतांच्या पूजेचे तीन प्रकार आहेत. एक वैदिक, दुसरा तांत्रिक म्हणजे धर्मशास्त्र व पुराणे यांना अनुसरून असलेला व तिसरा मिश्र. यात मंत्र व अंगे वेदोक्त आणि तंत्रोक्त असतात. यांपैकी साधकानें आपल्या इच्छे-नुसार पूजाविधी करावा. प्रतिमा, स्थंडिल, अग्नी, सूर्य, उदक, हृदय, ब्राह्मण व गुरू ही पूजेची आठ अधिष्ठाने होत. साधकाने यांपैकी कोणत्याही अधिष्ठानावर परमात्म्याची स्थापना करून, निर्मळ मनानें उपचारपूर्वक पूजा करावी.

साधकाने पूजा करण्यापूर्वी मुखप्रक्षालन करावे. शरीरशुद्धीसाठी वैदिक व तांत्रिक मंत्र म्हणावेत. मृत्तिका व गोमय यांनी शरीरावर अनुले-पन करावे समंत्रक स्नान करून संध्या, ब्रह्मयज्ञ वगैरे नित्यकर्मे करावीत. बाह्य विषयांवरून चित्त आवरून धरावे. चित्ताचा लय परमात्म्यावरच करावा. पूजनासाठी प्रतिमा आठ प्रकारची असते. १) दगडाची २) काष्ठाची ३) धातूची ४) मृत्तिकेची ५) चित्ररूप ६) वालुकामय ७) मनोमय ८) रत्नमय. ही सर्व भगवंतांची मंदिरे होत. चल व अचल असेही प्रतिमांचे भेद आहेत.

अचल प्रतिमेची पूजा करताना आवाहन व विसर्जन ही करू नयेत. पण चल प्रतिमा असेल तर ती करण्याचा विकल्प आहे. शालिग्रामावर आवाहन, विसर्जन करू नये. वालुकामय प्रतिमेवर नेहमी करावे. स्थंडिल प्रतिमेत तर अगत्याने आवाहन-विसर्जन करावे.प्रतिमा मातीची, गंधाची, चित्ररूप असेल तर तिच्यावर केवळ मार्जनच करावे. इतर प्रतिमांवर स्नान घालावे. प्रतिमेच्या पूजनासाठी उत्तम सामग्री आणावी. स्नान

घालणे, अलंकार घालणे, इत्यादी उपचार प्रतिमेला करावेत. स्थंडिलाची पूजा करताना त्यावर मंत्रांनी देवतांची स्थापना करावी. अग्नीची पूजा आज्ययुक्त हविर्भागांचा होम करून करावी. सूर्याच्या पूजेत उपस्थान व अर्घ्यप्रदान यांना महत्त्व असावे. उदकाच्या पूजेस उदकाचेच उपचार असावेत.

श्रद्धेने केवळ उदक जरी अर्पण केले तरी परमात्मा तृप्त होतो. पण अश्रद्धेने गंध, पुष्पे, धूप, दीप, अन्न इत्यादी अनेक पदार्थ समर्पण केले तरी उपयोग होत नाही. देहादिकांची शुद्धी झाल्यावर पूर्वेकडे अग्रे असलेले दर्भासन मांडावे. त्यावर पूर्वेकडे वा उत्तरेकडे तोंड करून बसावे. प्रतिमा अचल असेल तर प्रतिमेकडे तोंड करून पूजा सुरू करावी प्रथम-वडील माणसांना, आचार्यांना नमस्कार करावा. नंतर शरीरावर यथा, शास्त्री न्यास करावेत. प्रतिमेवर मूलमंत्रांचे न्यास करावेत. निर्माल्य, गंधलेप काढून प्रतिमा स्वच्छ करावी. त्यानंतर कलश व प्रोक्षणपात्र यांची गंधपुष्पांनी पूजा करावी. कलशातील उदकाने देवपूजेचे स्थल, पूजा-सामग्री, स्वतःचे शरीर यांवर प्रोक्षण करावे. कलशातील उदकाने अर्घ्य, पाद्य, आचमन यांसाठी तीन पात्रे भरून ठेवावीत. अर्घ्योदकात गंध, पुष्प, अक्षता, यव, दर्भाग्र, तिल, सर्षप (मोहरी) व दूर्वा ही आठ द्रव्ये टाकावीत. पाद्योदकात सावे, कमल व विष्णुक्रांत ही घालावीत. आवळकाठी, लवंग, कंकोळ यांनी आचमनीय सिद्ध करावे.

अर्घ्य, पाद्य व आचमनीय यांवर गायत्रीमंत्राच्या एक एक पदानें अनुक्रमे हृदय, शीर्ष, शिखा नावांच्या चरणांनी प्रोक्षण करून पुन्हा गायत्रीमंत्रानें त्यांचे अभिमंत्रण करावे. त्यानंतर भगवंतांचे ध्यान करावे. प्रथम प्राणायामादींनी देहातील प्राणवायूचा व जठरातील अग्नीचा निरोध करावा. नंतर नादब्रह्माच्या शेवटी सिद्धपुरुष जिचे ध्यान करतात त्या सूक्ष्म व श्रेष्ठ भगवंतांच्या मूर्तीचे अंतःकरणात ध्यान करावे. अशा ध्यानानें शरीरगत परमात्मा सर्व शरीर व्यापून टाकतो. साधकाची वृत्ती तदाकार होते.

त्यानंतर मानसोपचारांनी शरीरगत भगवंतांची पूजा करावी. अधिष्ठानावर ती मूर्ती बसवून आवाहन, न्यास करून पूजेस आरंभ

करावा. प्रथम आसनाची सिद्धता करावी. धर्म, ज्ञान, निवृत्ती, ऐश्वर्य हे भगवंतांच्या आसनाचे आग्नेय, नैर्ऋत्य, वायव्य व ईशान्य या दिशांचे चार पाय कल्पावेत. अधर्म, अज्ञान, प्रवृत्ती व दैन्य ही त्या आसनाची चार दिशांची चार गाते मानावीत. सत्त्व, रज, तम या त्या आसनाच्या तीन पट्ट्या मानाव्यात. त्या आसनावर एक अष्टदलीय कमल कल्पावे. त्या कमलाच्या आठ पाकळ्यांत व गर्भात विमला, उत्कर्षिणी, ज्ञाना, क्रिया, योगा, प्रव्ही, सत्या, ईशाना व अनुग्रहा या नऊ शक्तींची स्थापना करावी. त्या कमलाची कर्णिका व केसर ही चंद्र, सूर्य व अग्नी होत, अशी धारणा असावी. त्या कमलावर भगवंतांची मूर्ती अधिष्ठित आहे असे मानून तिला वैदिक व तांत्रिक मंत्रांनी पाद्य, आचमन, अर्घ्य समर्पण करावेत.

त्यानंतर सुदर्शन चक्र, पांचजन्य शंख, कौमोदकी गदा, नंदक खड्ग, बाण, शार्ङ्ग धनुष्य, नांगर व मुसळ या आठ आयुधांचे पूजन आठ दिशांना करावे. कौस्तुभमणी, वैजयंतीमाला, वत्सलांच्छन यांचे पूजन भगवंतांच्या वक्षःस्थळी करावे. नंद, सुनंद, प्रचंड, चंड, कुमुद, कुमुदेक्षण, महाबल, बल या पार्षदांची अष्ट दिशांना पूजा करावी. अग्रभागी गरुडाची पूजा करावी. चार कोनांत दुर्गा, विनायक, व्यास व विष्वक्सेन, वामभागी गुरू, परमगुरू, परमेष्ठिगुरू व परात्परगुरू आणि अष्ट दिशांना इंद्रादी लोकपाल, हे परमेश्वराकडे मुख करून बसले आहेत, अशी कल्पना करून त्यांची अर्घ्यादींनी पूजा करावी.

द्रव्याची अनुकूलता असेल त्याप्रमाणे पूजा करणाऱ्याने चंदन, वाळा, कापूर, केशर, कृष्णागरू इत्यादींनी पाणी सुगंधित करून भगवंतांच्या प्रतिमेस स्नान घालावे. स्नान घालताना 'सुवर्णं घर्मं परिवेदवेनं' हा मंत्र म्हणावा. 'जितं ते पुंडरीकाक्ष' हे स्तोत्र म्हणावे, 'ॐ सहस्रशीर्षा' या मंत्राचा जप करावा. 'इंद्र नरो नेमधिताहवंते' इत्यादी साममंत्रांचे गायन करावे. वस्त्र, उपवस्त्र, अलंकार अर्पण करून मग गालांवर, वक्षभागी, हातांवर गंधादिकांच्या वेली काढाव्यात. गंध, विलेपन, माला यांनी भगवंतांना सुशोभित करावे. त्यानंतर पाद्य, आचमनीय, गंध, पुष्प, अक्षता, धूप, दीप, नैवेद्य समर्पण करावीत.

सामर्थ्यानुसार गुळ, दूध, घृत, करंज्या, मांडे, अनरसे, मोदक, शिरा, दही, चटण्या, कोशिंबिरी यांचा नैवेद्य दाखवावा.

अभ्यंगस्नान, सुगंधी द्रव्यांचे अनुलेपन, आदर्श दर्शन, दंतधावन, पंचामृताभिषेक, विविध भोक्ष्य-भोज्य पदार्थांचे अर्पण, गायन, नर्तन इत्यादी उपचार भगवंतांना समर्पण करावेत. गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणे अग्नीच्या स्थापनेसाठी मेखला, गर्त, वेदिका तयार करून त्यात प्रज्वलित अग्नीची स्थापना करावी. हाताने परिसमूहन करावे. दर्भाची परिस्तरणे घालून पर्युक्षण करावे. व्याहृती म्हणून यथाविधी समिधाहुती द्यावी. अग्नीच्या उत्तरभागी होमद्रव्ये मांडून प्रोक्षणीवर उदकानें त्यांवर प्रोक्षण करावे. अग्नीच्या ठिकाणी भगवंतांच्या मूर्तीचे ध्यान करावे. या ध्यानात भगवंतांच्या देहाचे रूप असे कल्पावे-- देह तापलेल्या सुवर्णासारखा चमकदार, हातांत शंख, चक्र, गदा, पद्म ही आयुधे, रूप शांत, अंगावर कमलकेसरांप्रमाणे आरक्त वस्त्र, शरीरावर किरीट, कडी, कटिसूत्र, बाहुभूषणे यांची प्रभा, वक्षःस्थलावर वत्सचिन्ह, कौस्तुभमणी, देहावर कंठातील वनमालेची रुचिर कांती, असे भगवंतांचे रूप कल्पावे. गंध-पुष्पांनी त्याची पूजा करावी.

त्यानंतर वाळलेल्या समिधांवर तूप ओतून त्या अग्नीला समर्पण कराव्यात. 'प्रजापतये स्वाहा। इंद्राय स्वाहा' अशा दोन मंत्रांनी कुंडाच्या वायव्य कोणापासून आग्नेय कोणापर्यंत एक घृतधारा, नैर्ऋत्यकोणापासून ईशान्यकोणापर्यंत दुसरी घृतधारा अग्नीत टाकून होम करावा. 'अग्ने स्वाहा। सोमाय स्वाहा' म्हणून दोन आज्याहुती द्याव्यात. त्यानंतर घृतासिक्त हविर्द्रव्यानें मूलमंत्र व पुरुषसूक्त यांच्या प्रत्येक ऋचेबरोबर अग्नीस आहुत्या द्याव्यात. धर्म, ज्ञान, निवृत्ती, ऐश्वर्य इत्यादी देवतांना नामोच्चारपूर्वक आहुती देऊन शेवटी 'अग्नये स्विष्टकृते स्वाहा' म्हणून आहुती द्यावी व होम पूर्ण करावा.

अग्निनारायणाची नमस्कारपूर्वक पूजा करावी. अष्ट दिशांना नंदादी पार्षदांना बळी अर्पण करावेत. नंतर अग्नीसमोर बसून परब्रह्माचे चिंतन करून मूलमंत्राचा यथाशक्ती जप करावा. भगवंतांना आचमनीय अर्पण करावे. अग्नी व नारायण यांचे भोजन झाले असे मानून बळी

दिल्यावर उरलेला भाग विष्वक्सेनास अर्पण करावा. अखेरीस मुखवासार्थ सुगंधित तांबुलादी देऊन मंत्रपुष्प देऊन समर्पण करावे.

पूजा समाप्त झाल्यावर पूजकाने परमात्म्यांच्या चरित्राचे श्रवण, गायन, कीर्तन करावे. त्यांच्या लीलांचे अनुकरण करावे. पुराणांतील स्तोत्रे म्हणावीत. प्राकृत पदांनी त्यांचे वर्णन करावे. 'देवा, मला प्रसन्न व्हावं.' अशी प्रार्थना करून साष्टांग नमस्कार घालावा. उजव्या हाताने परमेश्वराचा उजवा पाय, डाव्या हाताने डावा पाय धरून 'समुद्राप्रमाणं दुस्तर अशा या मृत्यु-पिशाचापासून माझं रक्षण कर' अशी प्रार्थना करावी. प्रसाद भक्षण करून निर्माल्य मस्तकी धारण करावा.

प्रतिमा, स्थंडिल, अग्नी वगैरेत परमात्म्याची व्याप्ती सारखीच असते. कोणत्याही अधिष्ठानाची पूजा केली तरी समान फळच मिळते. हा पूजासंप्रदाय वाढविण्यासाठी परमात्म्याच्या सुंदर मूर्ती तयार कराव्यात. चांगली मंदिरे बांधावीत. रमणीय पुष्पवाटिका तयार कराव्यात. नित्य पूजेची व्यवस्था करावी. पर्वकाळी यात्रा भरवाव्यात. उत्सवादी चालवावेत. पूजाविधी चालू राहाण्यासाठी शेते, बाजार, नगरे, गावे इत्यादींची उत्पन्ने लावून द्यावीत. प्रतिमांची स्थापना केल्यास सार्वभौमपद प्राप्त होते. मंदिरे बांधल्याने त्रिभुवनांचे राज्य मिळते. पूजामार्ग अखंड चालण्याची व्यवस्था केल्याने ब्रह्मलोकाची प्राप्ती होते. या तीनही गोष्टी करणाऱ्यास सायुज्याची प्राप्ती होते.

हा पूजाविधी सापेक्ष भक्तांसाठी आहे. पण याच विधीनें शेवटी निरपेक्षता उत्पन्न व्हावी. निरपेक्ष पूजेनेंच ब्रह्मपदाची प्राप्ती होते. जो पुरुष देवाच्या वा ब्राह्मणाच्या वृत्तीचा अपहार करतो तो कृमिकीटकांच्या जन्मास जातो व कोटयवधी वर्षांपर्यंत नरकात विष्ठा भक्षण करतो. वृत्तीचा अपहार करणाऱ्या पुरुषास मदत करणाऱ्यासही तसेच फल न्यूनाधिक प्रमाणात मिळते.

## कलियुगातील लोकस्थिती

श्रीकृष्णांच्या निजधाम गमनानंतर पृथ्वीवर म्लेंच्छप्राय राजे अवतीर्ण होऊन कलीचा प्रभाव वाढला. शुकाचार्यांनी पुरंजयानंतरच्या

राजांचे वर्णन असे केले आहे. मगध देशात बृहद्रथाच्या वंशात शेवटचा राजा पुरंजय नावाचा होईल. त्यानंतर शुनक प्रधान आपल्या धन्याचा वध करून त्या राज्यावर प्रद्योत नावाचा आपला पुत्र बसवील. त्यानंतर त्याचा पुत्र पालक हा राज्य करील. त्याचा पुत्र विशाखयूप नंतर राज्य करील. राजक व त्याचा पुत्र नंदिवर्धन इत्यादी प्रद्योत राजे १३८ वर्षे राज्य करतील. याच प्रमाणे शिशुनाग, नंदवंश, मौर्यवंश, शुंगवंश, कण्ववंश, आंध्रवंश इत्यादी राजवंशांतील प्रमुख राजांचा निर्देश शुकाचार्यांनी केला आहे. कार्कवर्ण, क्षेमधर्मा, क्षेत्रज्ञ, अजातशत्रू दर्भक, अजय, नंदिवर्धन, महानंदी, नंद, चंद्रगुप्त, वारिसार, अशोकवर्धन, सुयशा, संगत, शालिशूक, पुष्पमित्र, अग्निमित्र, पुलिंद, वसुदेव, भूमित्र, सुशर्मा; इत्यादी राजांचे वर्णन करून शुकाचार्यांनी भावी अपकर्षाची सूचना केली आहे.

सौराष्ट्र, अवंती, आभीर, शूर, अर्बूद, मालव या देशांतील द्विज उपनयनादी संस्कार करणार नाहीत. ते शूद्रांचे आचरण करतील. सिंधू, चंद्रभागा यांच्या काठांवरचे प्रदेश, कौंतीदेश, काश्मीर इत्यादी देशांत शूद्रप्राय द्विज राज्य करतील. हे सर्व राजे अधर्मी, सत्यासत्याचा विवेक न करणारे, दानधर्म न करणारे, शीघ्रकोपी असतील. स्त्रिया, गायी, बालक, ब्राह्मण यांची ते हत्या करतील. परधन व परस्त्री यांवर त्यांची दृष्टी असेल. त्यांची आयुर्मर्यादा घटेल. त्यांचे शौर्य लयास जाईल. ते राजे नावाने क्षत्रिय असले तरी म्लेंच्छांप्रमाणे आचरण करतील. त्यांच्यांत राजस व तामस गुणांचे प्राबल्य वाढेल. ते प्रजेस पिळून काढतील. राजांप्रमाणे त्यांची प्रजाही भ्रष्ट होईल. आपापसांत कलह होईल.

भागवताच्या बाराव्या स्कंधातील दुसऱ्या अध्यायात शुकाचार्यांनी कलीच्या प्रभावाचे वर्णन केले आहे. धर्म, सत्य, पवित्र आचरण, क्षमा, दया, आयुष्य, बल, स्मरणशक्ती यांचा नाश होईल. कलियुगात द्रव्य हेच मनुष्यांचे बल होईल. त्यांचे कुल, शील, सद्गुण यांचे माप द्रव्याने होईल. धर्म व न्याय यांचा निवाडा बळानेच होईल. स्त्रीपुरुषांचे विवाह एकमेकांच्या आवडीवर होतील. देवघेवीच्या व्यवहारात कपटास

प्राधान्य मिळेल. स्त्री व पुरुष यांचा चांगुलपणा, वाईटपणा त्यांच्या रतिकौशल्यावर मापला जाईल. द्रव्य नसेल त्याला न्याय मिळणे कठीण होईल. पांडित्यात फटकळ बोलण्यास प्राधान्य मिळेल. द्रव्यहीनता हे दुर्जनात्वाचे लक्षण होईल. दांभिकपणा म्हणजे सुधारणा ठरेल. प्रत्यक्ष स्वीकार हाच विवाहविधी होईल. शरीरास अलंकृत करणे हेच स्नान होईल. दूरच्या अंतरावरील जलसंचयास तीर्थत्व प्राप्त होईल. केस ठेवणे हे सौंदर्याचे गमक होईल. स्वतःचे पोट भरणे हाच पुरुषार्थ व धिटाईचे बोलणे हेच सत्य मानले जाईल. कुटुंबपोषण हे दक्षतेचे लक्षण होईल. द्रव्यासाठी धर्माचरण होईल बलिष्ठाला राज्य प्राप्त होईल. लोभी व दरोडेखोरांप्रमाणे राजे स्त्रिया व द्रव्य यांच्यावर घाले घालतील. लोक त्रस्त होऊन गिरिकंदरांकडे धाव घेऊन झाडाचा पाला, कंदमुळे, मांस, मध, फुले, बिया खाऊन उदरनिर्वाह करू लागतील.

पाऊस पडेनासा होईल. दुष्काळ पडतील. करांच्या भाराखाली प्रजा चिरडून जाईल. थंडी, वारा, ऊन, पाऊस, दंव यांचा फार त्रास वाढून शेवटी प्रजा नष्ट होईल. भूक, तहान, रोगराई, काळजी यांनी लोक गांजन जातील व प्रजेचे आयुष्य वीस किंवा तीस वर्षांचे होईल. लोकांची शरीरे लहान होतील. वर्णाश्रमधर्म, वेदविहित धर्ममार्ग यांचा लोप होईल. नास्तिकपणाचे प्राबल्य वाढेल. राजे दरोडेखोरांसारखे होतील. सर्व वर्णांचे लोक शूद्रांसारखे वागतील. सारे आश्रम गृहस्थाश्रमासारखे होतील. मोठे वृक्ष शमीप्रमाणे छायाहीन होतील. मेघांत फक्त कडकडाट होईल. घरे-दारे ओस पडतील. मग सर्व विश्वाचा गुरू सर्वसत्ताधारी परमात्मा अवतार धारण करून धर्माचे रक्षण करील.

शंभल नावाच्या गावाचा एक मुख्याधिकारी विष्णुयश या नावाचा असेल. त्या थोर ब्राह्मणाच्या घरी भगवान विष्णू कल्कीच्या रूपाने प्रकट होतील. तो देवदत्त नावाच्या घोड्यावर बसून आठ प्रकारच्या ऐश्वर्यांनी व उत्तम गुणांनी युक्त असेल. तो राजाची चिन्हे धारण करणाऱ्या दरोडेखोरांचा नाश करील. असा नाश झाला की, सर्व लोकांच्या अंगांना कृष्णांच्या अंगावरील उटीच्या सुगंधी वायूचा स्पर्श होईल.

त्यांची अंत:करणे निर्मल होतील. भगवान वासुदेवांचे ध्यान करू लागतील. या कृतयुगात चंद्र, सूर्य, पुष्यनक्षत्र, बृहस्पती यांचा एकत्र संयोग होईल.

## भागवतश्रवणविधी

सनत्कुमारादी ऋषींनी नारदांना भागवतमाहात्म्य सांगताना त्याच्या पारायणाचा व श्रवणाचा विधीही समजावून दिला आहे. प्रथम ज्योतिष्याला बोलावून मुहूर्त नक्की करावा. जितके द्रव्य आपण विवाहासाठी खर्च करतो तेवढे सप्ताहासाठी खर्च करावे. भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष, आषाढ, श्रावण हे मोक्षदायक महिने सप्ताहाच्या कथेला योग्य आहेत. भागवतसप्ताहाची बातमी सर्वत्र प्रसृत करावी. वैराग्यशील वैष्णवांना बोलवावे. त्यांच्या राहाण्याची व्यवस्था करावी. भागवतकथाश्रवणाची व्यवस्था तीर्थाच्या ठिकाणी, अरण्यात वा घरातही करावी.

कथाश्रवणासाठी ठरलेली जागा केरकचरा काढून स्वच्छ केलेली असावी. शेणाने सारवून बिळे, खड्डे बुजवून टाकलेली असावी. कथाश्रवणासाठी अगोदरच बैठकी वगैरे आणून ठेवाव्यात. मोठा मांडव घालावा. उंच उंच केळीची झाडे लावावीत. तोरणांनी मांडवास शोभा आणावी. शोभेसाठी आंब्याचे डहाळे, फुले, फळेही लावावीत. ब्राह्मणांना बोलावून त्यांना आसने द्यावीत. वक्त्याला एक उंच आसन असावे. कथा वाचणारा वक्ता विरक्त, विष्णुभक्त, ब्राह्मण, वेद व शास्त्रे जाणणारा, पंडित, बोलण्यात प्रवीण व नि:स्पृह असावा. स्त्रीलंपट, नास्तिक, पाखंडी मताचे विद्वान असले तरी अशा वक्त्यांना बोलावू नये. वक्त्याच्या शेजारीच एक ज्ञानोपदेशक असावा.

सप्ताहाला प्रारंभ करण्यापूर्वी वक्त्याने क्षौर करावे. स्नान वगैरे उरकून, संध्यादी कृत्ये करून गणपतीची पूजा करावी, पितरांना तर्पण करावे. शरीरशुद्धीसाठी प्रायश्चित्त घ्यावे. मंडलाकार भूमी करून तीवर ब्रह्मादी मंडलदेवतांसह श्रीकृष्णांची स्थापना करावी. त्यांची समंत्रक पूजा करून त्यांना प्रदक्षिणा घालाव्यात. नमस्कार करावा. त्यांची प्रार्थना करावी. मोठ्या समारंभाने भागवतग्रंथाची पूजा करावी. मंत्र, धूप दीप इत्यादी उपचारांनी पूजा केल्यावर हातांत नारळ घेऊन, नमस्कार करून

प्रार्थना करावी. म्हणावे, 'श्रीमद्भागवत नावाचा ग्रंथ खरोखर प्रत्यक्ष श्रीकृष्णच आहे. कृष्णा, संसारसागरातून सुटका व्हावी म्हणून मी तुझा स्वीकार करीत आहे.'

श्रीमद्भागवताख्योऽयं प्रत्यक्षः कृष्ण एव हि ।
स्वीकृतोऽसि मया नाथ मुक्त्यर्थं भवसागरे ॥

अशी प्रार्थना केल्यावर वक्त्याचे पूजन करावे. व्रताच्या सांगतेसाठी सात दिवस यथाशक्ती मौनादी, ब्रह्मचर्यादी नियम पाळावेत. कथेचा भंग होऊ नये म्हणून दुसरे पांच ब्राह्मण योजावेत व त्यांनी 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' असा बारा अक्षरांचा मंत्र जपावा. ब्राह्मण कीर्तनकार यांना वंदन करून त्यांची आज्ञा घेऊन आसनावर बसावे. लोक, इतर पदार्थ, द्रव्य, गृह, पुत्र इत्यादींची काळजी सोडून सर्व लक्ष कथेकडे असावे. वक्त्याने सूर्योदयापूर्वी गंभीरपणाने कथेला प्रारंभ करून साडेतीन प्रहरपर्यंत कथा सांगावी. दुपारी दोन घटकापर्यंत विश्रांती घ्यावी. मधल्या वेळात वैष्णवांचे कीर्तन, भजन व्हावे. शौचविधी, लघुशंका इत्यादीसाठी उठण्याचा प्रसंग न यावा म्हणून आहार हलका असावा. एक वेळ हविष्याचे सेवन करावे. सामर्थ्य असेल तर सात दिवस उपवास करावा.

ज्यांनी वैष्णवी दीक्षेचा स्वीकार केला नाही त्यांना भागवतश्रवणाचा अधिकार नाही. सात दिवस ब्रह्मचर्य पाळावे. जमिनीवर निजावे. कथा ऐकल्यावर पत्रावळीवर जेवावे. द्विदल धान्य खाऊ नये. मधुर, तेलकट, जड, शिळे अन्न खाऊ नये. काम, क्रोध, मद, गर्व, मत्सर, लोभ, दंभ, मोह इत्यादींचा त्याग करावा. वेद, वैष्णव, ब्राह्मण, गुरू, गोरक्षक, स्त्रिया, राजे, महात्मे यांची निंदा करू नये. कांदा, गाजर, मद्य; असे निषिद्ध अन्न खाऊ नये. ऋतुस्नात स्त्री, अस्पृश्य, चांडाळादी लोक, धर्मभ्रष्ट, संस्कारहीन, ब्रह्मद्वेष्टे, वेदबाह्य, यांच्यांशी भाषण करू नये. खरे बोलावे. आचरण शुद्ध ठेवावे. दयाळूपणाने वागावे. नम्र असावे. चित्त उदार असावे.

दरिद्री, क्षयरोगी, दुर्दैवी, पापी, निपुत्रिक, मुमुक्षू यांनी कथा

अगत्यानें ऐकावी. त्यांना अविनाशी फलाची प्राप्ती होईल. कृष्णजन्माचे व्रत जसे आपण करतो, त्याचे जसे उद्यापन करतो, तसेच भागवतकथा-श्रवणाचे करावे. सप्ताह संपल्यावर श्रोत्यांनी भागवतग्रंथाची, वक्त्याची भक्तियुक्त अंतःकरणानें पूजा करावी. श्रोत्यांना प्रसाद म्हणून तुळशीच्या माळा वाटाव्यात. मृदंग वाजवून तालसुरांवर भजन करावे श्रोता गृहस्थाश्रमी असेल तर सांगतेच्या दिवशी होम करावा. असे हे भागवत-पुराण कल्याणकारी श्रेष्ठ, फल देणारे आहे. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारही पुरुषार्थांचा लाभ करून देणारे आहे.

फलदं स्यात् पुराणं तु श्रीमद्भागवतं शुभम् ।
धर्मकामार्थमोक्षाणां साधनं स्यान्न संशयः ॥

## महापुराणांची श्लोकसंख्या

पुराणांच्या श्लोकसंख्या कशा आहेत, भागवतपुराणाची उत्पत्ती कशी झाली, त्याचे दान कसे करावे, त्याच्या दानाचे, पठनाचे माहात्म्य कसे आहे; हेही सूतांनी ऋषींना समजावून दिले. भागवतपुराणाच्या मतानें अठरा महापुराणांची ग्रंथसंख्या खालीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| १) ब्रह्मपुराण १०००० श्लोक | २) पद्मपुराण ५५००० श्लोक |
| ३) विष्णुपुराण २३००० श्लोक | ४) शिवपुराण २४००० श्लोक |
| ५) भागवतपुराण १८००० श्लोक | ६) नारदपुराण २५००० श्लोक |
| ७) मार्कंडेयपुराण ९००० श्लोक | ८) अग्निपुराण १५००० श्लोक |
| ९) भविष्यपुराण १४००० श्लोक | १०) ब्रह्मवैवर्तपुराण १८००० श्लोक |
| ११) लिंगपुराण ११००० श्लोक | १२) वराहपुराण २४००० श्लोक |
| १३) स्कंदपुराण ८१००० श्लोक | १४) वामनपुराण १०००० श्लोक |
| १५) कूर्मपुराण १७००० श्लोक | १६) मत्स्यपुराण १४००० श्लोक |
| १७) गरुडपुराण १९००० श्लोक | १८) ब्रह्मांडपुराण १२००० श्लोक |

या प्रमाणे पुराणांची श्लोकसंख्या एकूण चार लक्ष श्लोकांइतकी आहे. आपल्या नाभिकमळावर बसलेल्या ब्रह्मदेवांना संसाराची भीती वाटून तो घाबरला असताना भगवंतांनी कृपाळू होऊन हे भागवतपुराण

सांगितले. त्यात आरंभी, मध्ये, अंती सर्वत्र वैराग्यजन आख्याने असून भगवंतांच्या अनेक लीलाकथा अमृतासारख्या आहेत. त्या ऐकून, वाचून सज्जन व देव यांना फार आनंद होतो. वेदान्तशास्त्राचे रहस्य जे ब्रह्म व आत्मा यांचे ऐक्य तोच या पुराणाचा विषय आहे. मोक्षप्राप्ती हा त्याचा हेतू आहे. जोपर्यंत भागवतपुराण पुढे येत नाही तोपर्यंत इतर पुराणांची शोभा सभेत असते. त्याच्या एकदा अमृतपानाने जो तृप्त झाला त्याला दुसऱ्या कशानेही आनंद वाटत नाही. सर्व पुराणांत भागवत श्रेष्ठ आहे. ते पापहारक, विष्णुभक्तांना आवडणारे, निर्मळ ज्ञान सांगणारे, वैराग्य व भक्ती यांनी युक्त असा कर्मसंन्यास वर्णन करणारे आहे.

# ५. तत्त्वज्ञानदर्शन

## चतुःश्लोकी भागवत

श्रीमद्भागवत हा पुराणग्रंथ जसा थोर सत्पुरुषांच्या चरित्र-कथांचा, रसाळ कृष्ण-कथांचा सागर आहे, जसा आचारधर्मांचा आदर्श आहे, तसाच तो सर्वोत्तम तत्त्वबोधाची चर्चा करणारा पण आहे.वेदरूपी कल्पतरूचेच फळ म्हणजे भागवतपुराण आहे. वेद व वेदान्तशास्त्रास अनुसरून असणारी तत्त्वचर्चा त्यात आहे. द्वितीय स्कंधातच हा विषय परीक्षिताच्या प्रश्नावरून उपस्थित झाला आहे. धारणा कशी असावी, सकाम उपासनेचे प्रकार किती, मोक्षार्थी पुरुषाला भक्तियोगच कसा उपयुक्त आहे, परमेश्वर म्हणजे सारे विश्व कसे आहे,ब्रह्मदेव व ब्रह्मांड यांची उत्पत्ती कशी झाली, अवतारांचे रहस्य काय, भगवंतांची स्थूल व सूक्ष्म अशी दोन स्वरूपे कशी असतात ? अशा अनेक प्रश्नांच्या संदर्भात या स्कंधात तत्त्वचर्चा आली आहे. अष्टांगयोगाचा सर्व विधी

याच स्कंधात आला आहे. 'मनुष्याचा अंतिम धर्म म्हणजे परमेश्वराच्या ठिकाणी भक्ती दृढ होणे' (स वै पुंसां परो धर्मो यतो भक्तिरधोक्षजे) हाच श्रेष्ठ मार्ग असला तरी भागवतकार निरनिराळ्या प्रश्नांची तात्त्विक चर्चा मनापासून करताना दिसतात.

प्रथम भागवत हे भगवंतांनी ब्रह्मदेवांना सांगितले. ते चार श्लोकांत निवेदन केले. सर्व भागवताचे सार असे हे 'चतुःश्लोकी भागवत' (स्कंध २.९.३२–३५) या नावाने प्रसिद्ध आहे. भगवंत ब्रह्मदेवांना सांगतात, 'सर्वांच्या आरंभी केवळ मीच होतो. अव्यक्त व व्यक्त यांच्या पलीकडे माझ्याशिवाय दुसरं काहीच नव्हतं. सृष्टी उत्पन्न झाल्यावर मी पाहिलं ते सर्व काही मीच आहे. तसंच सृष्टी लय झाल्यावर जे उरले तेही मीच आहे. अशा रीतीनं मीच अनादी, अनंत असून माझ्याशिवाय दुसरं कोठेही व केव्हाही काही नाही. वस्तुस्थिती असेल त्याहून निराळी भासणं असा प्रकार भ्रमात ध्यानात येतो. राहू आकाशात असूनही त्याचं दर्शन होत नाही. त्याप्रमाणं आत्मस्वरूपाच्या ठिकाणी नसलेल्या गोष्टींचा प्रत्यय येतो. असलेल्या गोष्टींचा प्रत्यय येत नाही. म्हणूनच या प्रकाराला आत्म्याची माया म्हणतात.

'पृथ्वी आदीकरून महाभूतं लहान-मोठ्या प्राण्यांच्या ठिकाणी दिसली तरी वस्तुतः ती तशी तिथं नसतात. मी सर्व प्राण्यांत असलो तरी मी मागाहून तिथं प्रवेश केला असं होत नाही. मीच सर्व विश्वाचं कारण आहे. ज्याचं अस्तित्व सर्व काळी, सर्व ठिकाणी निश्चित ठरेल तेच आत्मस्वरूपाचं वास्तविक ज्ञान आहे. परमात्मस्वरूपच नित्य ठरतं. म्हणून त्याच्याशिवाय दुसरं कसलंच ज्ञान प्राप्त करून घेण्याची आवश्यकता नाही.'

## देवहूतीला कपिलांचा उपदेश

मनुकन्या देवहूती ही कर्दम ऋषींची पत्नी. त्यांचा अवतारी पुत्र म्हणजे कपिलमहामुनी होय. प्रकृती आदी करून चोवीस तत्त्वांची गणना करणारा सांख्यशास्त्राचा प्रवर्तक हाच कपिलमुनी. पिता वनात निघून गेल्यावर आपल्या मातेच्या समाधानासाठी ते त्या बिंदुसरोवराच्या

काठीच राहिले. ते कर्मशून्य अशा अवस्थेत असताना एकदा देवहूती त्यांना म्हणाली, 'तू सर्व जगाला व्यापून राहाणारा आहेस. मी तर संसाररूपी या गाढ अंधारात सापडले आहे. तेव्हा या अज्ञानातून तूच मला पार कर. मी तुला नमस्कार करते.' मातेची विनंती ऐकून कपिलांनी तिला उपदेश केला.

अत्यंत महत्त्वाचा असा एक उपाय कल्याणाचा म्हणून सांगता येईल. तो म्हणजे परमात्म्याची प्राप्ती करून देणारा भक्तियोग. कारण यात दुःखाचा, सुखाचा अंतर्भाव होत नाही. आत्म्याला बंध अथवा मुक्ती प्राप्त होण्याला एक अंतःकरणच कारण असते. (चेतः खल्वस्य बन्धाय मुक्तये चात्मनो मतम्) ते अंतःकरण विषयावर आसक्त झाले की बंधाला कारण होते. श्रीहरींच्या ठिकाणी रमले की, मोक्षाची प्राप्ती होते. मी व माझे असा भाव उत्पन्न झाला की, मनात कामलोभादी सहा शत्रू निर्माण होतात. पण मन शुद्ध व विकाररहित झाले की ज्ञान वैराग्य, भक्ती यांची निर्मिती होते. ब्रह्मप्राप्तीचा उत्तम मार्ग म्हणजे भक्ती हाच होय. सत्पुरुष अनन्यभावाने भक्ती करून सर्व कर्मे भगवंतांनाच अर्पण करतात. भगवंतांसाठी ते इष्टमित्रांना व बांधवांनाही सोडून देतात. नित्य परमात्म्याच्या कथा ऐकणे, लोकांना सांगणे, आपले चित्त भगवंताकडे लावणे, यांमुळे त्यांना तापांची बाधा होत नाही. त्या साधुपुरुषांना, विषयांची आसक्ती मुळीच नसते. साधूंच्या समागमातच परमात्म्याच्या कथांचा व लीलांचा यथार्थ बोध होतो. म्हणून परमेश्वराची भक्तीच करावी.

मनुष्याने इंद्रियांचा उपयोग वेदांत सांगितलेल्या कर्मांचे अनुष्ठान करण्यासाठी करावा. अंतःकरण शुद्ध व सत्त्वगुणी असावे. श्रीहरींच्या ठिकाणी यत्नावाचून इंद्रियांची निष्काम वृत्ती जडणे यालाच भगवद्भक्ती म्हणतात. ही भक्ती अणिमादी सिद्धींपेक्षा फार मोठ्या योग्यतेची आहे. भक्ती लिंगदेहाचा नाश करून मोक्षाच्या अवस्थेस नेते. थोर भक्तांना सायुज्यमुक्ती नकोशी वाटते. परमेश्वरांच्या सुंदर रूपावर व गुणांवर भक्तांचे मन जडते. व मग त्यांची इच्छा नसतानाही त्यांना बळेच मोक्षपदी जावे लागते. मायादी ऐश्वर्यांची आवड भक्तांना नसते.

भक्ती निर्माण झाली की, आपोआप अणिमा, महिमा, आदी अष्टसिद्धी पाठीस लागतात. पण त्यांच्या उपभोगाबद्दल भक्त अगदी निरिच्छ असतात. विष्णूंचे ऐश्वर्यंही त्यांना नको असते. तरी वैकुंठातील सुखे त्यांना प्राप्त होतातच. भक्तांचा आवडता असा आत्मा, पुत्र, मित्र, गुरू आप्त, इष्ट, उपास्य देवता, सर्व काही श्रीहरीच असतात. भक्तांचा नाश कधी होत नाही. सर्व विषयांवरील आसक्ती सोडून जे अनन्यत्वानें भगवंतांची आराधना करतात त्यांना ते जन्ममरणाच्या पलीकडे नेऊन ठेवतात. योगीही आपल्या कल्याणासाठी ज्ञान व वैराग्य यांनी युक्त होऊन परमेश्वरांची भक्तीच करतात. त्यांच्या चरणांजवळ आश्रय घेतात. तेथे त्यांना भीतीचा लेशही वाटत नाही. म्हणून तीव्र भक्तीनें मन स्थिर करणे हाच एक जगात अंतिम कल्याणाचा उत्कर्ष आहे.

## कपिलमुनींचे सांख्य तत्त्वज्ञान

भागवताच्या तिसऱ्या स्कंधातील अध्याय क्र. २५ ते ३३ पर्यंत कपिलमुनी आपल्या मातेस, देवहूतीस विविध प्रकारचा उपदेश करीत आहेत. भक्तितत्त्वाचे महत्त्व विशद केल्यानंतर त्यांनी तिला सांख्य-शास्त्राची ओळख करून दिली आहे. प्रकृती आदी तत्त्वांची ओळख झाली की, मनुष्य प्रकृतीच्या गुणांपासून मुक्त होतो. गुणांपासून अलिप्त व प्रकृतीच्याही पलीकडे असा अंतर्ज्ञानरूपी, स्वयंप्रकाशी आत्मा, तोच पुरुष आहे. त्यानेच हे सारे विश्व व्यापिले आहे. त्या पुरुषानें अव्यक्त व त्रिगुणात्मक अशी विष्णूची माया नावाची शक्ती स्वीकारली आहे. ही प्रकृती सत्त्व, रज, तम या आपल्या तीन गुणांनी नाना प्रकारच्या प्रजा निर्माण करते.

तो पुरुष काहीच करीत नाही. प्रकृतीचा खेळ मात्र दुरून पाहातो. पांच महाभूते, पांच तन्मात्रा, चार अंतःकरणाच्या वृत्ती, दहा इंद्रिये; मिळून चोवीस तत्त्वांचा समुदाय हा प्रधान अथवा कार्यरूपी ब्रह्म म्हणून प्रसिद्ध आहे. पृथ्वी, उदक, तेज, वायू, आकाश ही पांच महाभूते होत. त्यांची तन्मात्रात्मक रूपे म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध ही होत.

कर्ण, त्वचा, दृष्टी, जिव्हा, नाक, वाणी, हात, पाय, शिश्न व गुद ही दहा इंद्रिये होत. मन बुद्धी, अहंकार व चित्त असे अंतःकरणाचे चार भेद आहेत. एवढाच समुदाय महत्त्वाचा असून काळ या नावाचे एक तत्त्व पंचविसावे आहे.

प्रकृती म्हणते तीन गुणांची साम्यावस्था. तिच्या सत्त्वादी गुणांत क्षोभ झाला की परमेश्वराची चैतन्यशक्ती आकारास येते व तिच्यापासून महत्तत्त्व निर्माण होते. हे महत्तत्त्व म्हणजे जगाच्या उत्पत्तीचा अंकुरच होय. हेच महत्तत्त्व सर्व विश्वास भरून राहिलेले आहे. त्या सत्त्वगुणी, निर्मल, रागद्वेषरहित अशा परमेश्वराचे वासुदेवरूप म्हणजे हेच महत्तत्त्व होय. याच्यापासून तीन प्रकारचा अहंकार निर्माण होतो. सात्त्विक, राजस, तामस हे त्या अहंकाराचे तीन प्रकार. या तीन प्रकारच्या अहंकारांपासून मन, इंद्रिये व महाभूते निर्माण होतात. सात्त्विक अहंकारापासून मनोरूपी तत्त्व निर्माण होते. हे मन सर्व इंद्रियांचे स्वामी असून त्याचा रंग नीलरंगाच्या कमलाप्रमाणे आहे. अनिरुद्ध म्हणूनही याची प्रसिद्धी आहे. राजस अहंकारापासून बुद्धितत्त्व उत्पन्न होते. कर्मेंद्रिये व ज्ञानेंद्रिये ही या राजस अहंकाराची कार्ये होत. तामस अहंकार विकार पावला की त्यापासून शब्द हे सूक्ष्म भूत निर्माण होते. त्यापासून आकाश हे महाभूत, शब्दाचा अनुभव देणारे कर्णेंद्रिय निर्माण होते.

प्राचीन ऋषींनी तत्त्वांची संख्या नेमकी किती ? या प्रश्नाचीही चर्चा केली आहे. भागवताच्या अकराव्या स्कंधातील बाविसावा अध्याय या संख्यांचा विचार करणारा आहे.

उद्धवाने या तत्त्वसंख्यांचा प्रश्न उपस्थित केल्यावर भगवान श्रीकृष्ण त्याला सांगतात, 'प्रतिपाद्य विषयाच्या भिन्नत्वानुसार अशी भिन्न भिन्न संख्या येणारच. तत्त्वगणनेच्या मुख्य विषयाकडं मात्र लक्ष असावं भिन्न संख्यांची एकवाक्यता कशी साधता येईल, यासंबंधीही येथे विचार झालेला आहे. सव्वीस, पंचवीस, नऊ, सात, सहा, चार, सतरा, सोळा. तेरा, अकरा, अशी तत्त्वसंख्या भिन्न असली तरी प्रकृती व पुरुष यांचे यथार्थ ज्ञान व्हावे हीच त्यांची भूमिका आहे. प्रकृति-पुरुष-विवेक, प्रकृतीची सविकारता, विकारांचे सामान्य स्वरूप, त्रिपुटीतील

घटकांची पदाधीनता, पुरुषाचे निर्विकारत्व, भेदबुद्धीचे बीज, भेदबुद्धीमुळे जीवास संसारप्राप्ती, जन्ममरणविचार, शरीराचे संसारचक्रभ्रमण, पूर्वजन्माची विस्मृती, पुनर्जन्माचे स्वरूप, मृत्यू म्हणजे काय ? जीवाच्या भासमान अवस्था, देहाला क्षणोक्षणी येणारा जन्ममृत्यू, पुरुषाचे, जीवाचे अमरत्व, जड देहाच्या नऊ अवस्था, जीवाची मुक्ती, मुमुक्षूचे कर्तव्य, विषयासक्ती व पुनर्जन्म, दृष्टयावर दृश्याचे संस्कार, विषयानुभवाचे मिथ्यात्व, संसार-निवृत्तीचा उपाय; अशा अनेक विषयांचे मूलगामी विवेचन कृष्णांनी उद्धवासाठी या अध्यायात केले आहे.

## भिक्षूचा सुखदु:खविवेक

सहनशीलता अंगी कशी बाणवावी ? या उद्धवाच्या प्रश्नाला तात्त्विक उत्तर देताना कृष्णांनी त्याला एका भिक्षूचा इतिहास सांगितला. मालवदेशात एक धनाढ्य ब्राह्मण होता. शेती, व्यापार करणारा हा ब्राह्मण कमालीचा लोभी होता. कृपण होता. स्वभावानें रागीटही होता. तो केवळ ओसाड घरात राहायचा. स्वत:च्या शरीराची जपणूक नीट करायचा नाही. त्याचा हा चमत्कारिक स्वभाव पाहून त्याची पत्नी, त्याचे मुलगे, मुली, भाऊबंद, नोकरचाकर त्याचा द्वेष करू लागले. त्या ब्राह्मणाने धनाचा उपयोग स्वत:साठी केला नाही, की पंचमहायज्ञ करून परोपकारही केला नाही. तेव्हा त्याच्यावर यज्ञदेवतेचा कोप झाला व त्याचे सर्व धनवैभव नष्ट झाले.

त्या ब्राह्मणास नंतर वैराग्य निर्माण झाले. त्याला स्वत:च्या धनाचा खेद झाला. द्रव्य हे अनर्थांचे मूळ कसे हे त्याने जाणले. द्रव्यानें घडलेले अनर्थ त्यानें ओळखले. स्वर्ग वा मोक्ष यांची इच्छा न धरता केवळ धनाच्या मागे लागणारांची फसगत होते. म्हणून द्रव्य हे अनर्थांचे घर समजावे. देहाला मृत्यूनें ग्रासले असल्याने त्याच्या तृप्तीचा प्रयत्न कशासाठी करावा ? कितीही सुख भोगले तरी मरणरूपी दु:खाचा प्रतिकार कसा करता येईल ?

आता आपण आपल्या देहाचे साफल्य कसे करावे ? या विचारात

तो गढून गेला. उरलेल्या आयुष्याचे काय करावे ? अशा विचाराने त्याची वृत्ती बदलली. अनुतापानें त्याचे चित्त शुद्ध झाले. पूर्वीचा तो अधम ब्राह्मण श्रेष्ठ झाला. अहंकारादी विकार त्यानें चित्तातील संपविले. विषयवासना सोडून त्याने चतुर्थाश्रम स्वीकारला. आपले मन, इंद्रिय, प्राण यांच्यावर नियंत्रण ठेवून तो भ्रमण करीत राहिला. ऐहिक वस्तूवर त्याची आसक्तीच उरली नव्हती. आपले वैराग्य कोणास न दाखविता तो गावोगाव फिरू लागला.

त्या वृद्ध व मलिन भिक्षूला पाहून नीच लोक त्याला नाना प्रकारचा उपद्रव देऊ लागले. कित्येकांनी त्याचा दंड हिसकावून घेतला. कित्येकांनी त्यांचा कमंडलू घेतला. कित्येकांनी त्याचे आसन पळविले. काहींनी त्याची रुद्राक्षाची माळ नेली. कित्येकांनी त्याच्या छाटया लपवून ठेविल्या. या भिक्षूस लोकांनी असा फारच त्रास दिला. ते त्याच्या अन्नावर मूत्र विसर्जन करीत, त्याच्या मस्तकावर थुंकीत. कधी कधी मारहाणही करीत. पण तो मात्र या प्रसंगी एखाद्या पर्वताप्रमाणे राहून सर्व सहन करी. दुर्जनांनी त्याला अशा प्रकारे भौतिक, दैहिक, दैविक दुःखे दिली. ती त्याने शांतपणानें सहन केली.

त्या वृद्ध भिक्षूनें सुखदुःखाची मीमांसा करताना म्हटले, ' मला जीवात्म्याला हे लोक सुखदुःख काय देणार ? गृह, कर्म, काल यांचं सुखदुःख मला होत नाही. दानधर्म, नित्यनैमित्तिक कर्मं, यमनियम, वेदांचं अध्ययन, व्रतवैकल्यं, इत्यादी केल्यानं मनाचा निग्रह होतो. मन शांत झालं की परमार्थसिद्धी दूर नाही. वासनाबद्ध मन शुद्ध करून एकदा परमात्म्याकडं लाविलं की, मग दानधर्मादी साधनांचीही जरूरी नाही. जो पुरुष मनास समजावून घेतो तो देवांचाही देव आहे. मनाच्या रागद्वेषादी वृत्ती मोठ्या वाईट असतात. उपेक्षा केल्यास त्या अंत पाहातील. म्हणून विचारी पुरुषानें त्या दुष्ट वृत्तींचा नाश करावा. देहादिक प्रपंचात सत्य काहीच नसतं.

' लोकांनी मला दुःख दिलं. मला त्यापासून व्यथा का व्हावी ? दुःख देणारा देह व भोगणारा देह हे दोनही भौतिकच. माझ्या ज्ञानरूपी आत्म्याशी त्याचा काय संबंध ? लोकांचा आत्मा मला दुःख देत असेल

तर माझाच आत्मा माझ्या आत्म्याला दुःख देत आहे हे स्पष्टच नव्हे काय ? पण आत्मा स्वभावतःच अविकारी आहे. हे लोक मला दुःख देतात, याचं कारण माझं कर्मच नव्हे काय ? पण हेही बोलणं मिथ्याच. कारण कर्माचा आत्म्याशी संबंध कसा असणार ? आत्मा अकर्ता, तो कर्म कसं करणार ? सुखदुःखांचं मूळ बीज अहंकारात आहे. जीवानं अहंकार सोडावा. आपलं शुद्ध चैतन्याचं रूप जाणावं. अहंकार सोडून केवळ भगवच्चिंतनात राहावं. तरच संसारातून पार पडता येईल.'

अशा विचारांनी त्या ब्राह्मणाची सर्व संपत्ती नष्ट झाली आणि त्यास प्रखर वैराग्य निर्माण झाले. त्याचे चित्त एकदम शांत झाले. तो संन्यास घेऊन स्वधर्म आचरणारा झाला. त्याचे विचार मोक्षमार्ग दाखविणारे झाले. सुखदुःख देणारे मनच आहे. म्हणून आपल्या मनाचे नियमन करून भगवंतांच्या चिंतनात मग्न व्हावे. म्हणजे त्याची प्राप्ती होईल, हा या भिक्षुगीताचा भावार्थ आहे. जो पुरुष याचे श्रवण करील, ऐकून दुसऱ्यास ऐकवील, तो या सुखदुःखात्मक द्वंद्वांपासून मुक्त होईल.

## आणखी थोडे सांख्यशास्त्र

सुखदुःखादी श्रम नाहीसे होण्यासाठी कपिलादी ऋषींनी सांगितलेल्या सांख्यशास्त्राची आणखी थोडी फोड अकराव्या स्कंधातील चोविसाव्या व पंचविसाव्या अध्यायात आलेली आहे. या शास्त्राने सृष्टीचा उपक्रम व संहार कसा होतो, हे समजून येते. परब्रह्माशिवाय सर्व काही मिथ्या आहे, याचे ज्ञान होते. सृष्टीचा उपक्रम व सहार कसा होता हे सांगून झाल्यावर श्रीकृष्णांनी सत्त्वादिकांच्या भिन्न भिन्न वृत्ती वर्णन केल्या आहेत.

१) सत्त्वाच्या पृथक् वृत्ती– १) शम-ज्ञानेंद्रियांचे आकलन, २) दम– कर्मेंद्रियांचे आकलन, ३) तितिक्षा– सहनशीलता, ४) ईक्षा– विचार, ५) तपश्चर्या– धार्मिक वर्तन, ६) सत्य, ७) दया, ८) स्मृती– पर्वापर अनुसंधान, ९) संतोष, १०) दातृत्व, ११) निःस्पृहता, १२) श्रद्धा म्हणजे गुरू, देव यांच्यावर विश्वास १३) अनुचित कर्मांबद्दल लज्जा, १४) दान, १५) सरलता, १६) नम्रता, आणि १७) ब्रह्मचिंतनाची आवड.

२) रजोगुणाच्या पृथक् वृत्ती– १) अभिलाष, २) क्रिया (ईहा) म्हणजे व्यवसाय, ३) उन्माद म्हणजे विद्येचा ताठा, ४) तृष्णा म्हणजे लाभ होऊनही असंतोष, ५) अति गर्व, ६) धनादिकांसाठी देवतांची उपासना, ७) अहंपणा, ८) सुखासक्ती, ९) उन्मत्तपणाने शत्रूवर चाल, १०) आत्मस्तुतीची इच्छा, ११) परनिंदेची आवड, १२) पराक्रमाचा डौल, १३) स्वतःच्या बलिष्ठपणाने दुसऱ्यास पीडा देणे.

३) तमोगुणाच्या पृथक् वृत्ती– १) क्रोध, २) लोभ, ३) असत्य भाषण, ४) परपीडा, ५) याचना, ६) ढोंग, ७) कष्ट करणे, ८) कलह, ९) शोक व मोह, १०) खेद, ११) दीनपणा, १२) आळस, १३) आशा, १४) भय, १५) निरुद्योग.

सत्त्वादिक तीन गुणांमुळे स्त्रीपुत्रगृहादिकांबद्दल अहंपणा निर्माण होतो. व्यवसायबुद्धी वाढते. मन, शब्दादी पंचविषय, इंद्रियसमुदाय, पंचप्राण यांनी प्रवृत्तिव्यवहार सिद्ध होतात. मन हे सात्त्विक आहे. शब्दादी विषय तामस व इंद्रियगण व प्राण हे राजस आहेत. धर्म सात्त्विक, अर्थ तामस व काम हा राजस आहे. धर्मापासून श्रद्धा निर्माण होते. अर्थापासून धर्म व कामापासून रतिसुख यांची प्राप्ती होते. म्हणून श्रद्धा ही सात्त्विक, धनलाभ तामस व रतिसुख राजस होय. यानंतर श्रीकृष्णांनी पुरुषलक्षणे, परमेश्वराची निर्गुणता, सत्त्वादिक गुणांच्या आधिक्याची कार्ये, गुणाधिक्याची लक्षणे, गुणवृद्धीचे परिणाम, गुणकर्मानुसार गती, गुणानुरूप कार्ये, गुणानुरूप ज्ञान, गुणानुरूप वास्तव्य, गुणानुरूप श्रद्धा, आहार, सुखे, इत्यादी विषयांचा ऊहापोह केला आहे. विवेकी पुरुषाने नैर्गुण्य कसे संपादन करावे, याचेही तेथे मार्गदर्शन केले आहे.

## भागवतधर्माचे अंतरंग

ईश्वराच्या प्राप्तीसाठी भक्तिमार्गाचे तत्त्वदर्शन व आचरणाचा मुख्य धर्म आहे, हे भागवतकारांनी अनेक ठिकाणी उदाहरणांनी, आख्यानांनी पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे. पाचव्या स्कंधातील पाचव्या अध्यायात ऋषभाने आपल्या पुत्रांना केलेला उपदेश अत्यंत महत्त्वाचा आहे. प्रारंभी सुखदायक वाटणारे विषयसुख अंती दुःख-

दायकच असते. म्हणून तपाचरण करून अंतःकरण शुद्ध करावे. साधंची सेवा हे मोक्षाचे द्वार आहे. स्त्रैण पुरुषांचा सहवास हे नरकाचे साधन होय. दृष्टी सम असावी. अंतःकरणवृत्ती शांत, सम व पवित्र असावी. शरीरनिर्वाहापुरतेच घरादारावर प्रेम करावे, पण ईश्वराशी अनुसंधान कायमचे असावे. हा मी, ही माझी इंद्रिये, हा अभिमान नष्ट व्हावा.

अहंकाराच्या बंधनापासून मुक्त होण्याची पंचवीस साधने ऋषभाने सांगितली आहेत. १) हंसरूपी गुरू जो परमात्मा, त्याच्यावर भक्ती ठेवणे. २) त्याच्या सेवेत राहाणे, ३) भोगांची इच्छा सोडणे. ४) शीतोष्ण, मानापमान ही द्वंद्वे सोडणे. ५) दुःख आहे असेच समजणे. ६) ज्ञानाची इच्छा धरणे. ७) तपश्चर्या करून आत्मसंयमन करणे. ८) काम्यकर्मे सोडून देणे. ९) कर्मे ईश्वरासाठी करणे. १०) निरंतर परमेश्वराचे गुण गाणे. ११) ईश्वररूप झालेल्यांची संगत धरणे. १२) त्याचे गुण वर्णन करणे. १३) निर्वैर असणे. १४) समदृष्टी ठेवणे. १५) शांती धारण करणे. १६) घरादारावरील व देहावरील ममत्व सोडणे. १७) अध्यात्मशास्त्राचा अभ्यास करणे. १८) एकान्ताची आवड धरणे. १९) प्राण, इंद्रिये, मन यांना स्वाधीन ठेवणे. २०) सत्यावर निष्ठा ठेवणे. २१) ब्रह्मचर्य पाळणे. २२) कर्तव्यकर्मास न चुकणे. २३) इंद्रियदमन करणे. २४) सर्वत्र ईशतत्त्व आहे. ज्ञान व विज्ञान संपादन करणे. २५) योगाभ्यास करणे.

त्यानंतर याच स्कंधातील अकराव्या अध्यायात रहूगणाला जडभरताने उपदेश केला आहे. तोही भागवतधर्माचे अंतरंग स्पष्ट करणारा आहे. केवळ वैदिक कर्मव्यवहार सत्य नाही. यज्ञांचा विस्तार करणे, वेदवचनांचा घोष करणे यांत शुद्ध व निष्काम असे तत्त्वज्ञान आढळत नाही. जोपर्यंत मनुष्याचे मन सत्त्व, रज, तम यांनी व्याप्त असते, तोपर्यंत ते मन कोणालाही न जुमानता पुरुषाकडून चांगली वा वाईट कर्मे करवून घेते. अंतःकरण जीवात्म्यास चिकटून मग सुखदुःखात्मक फळे भोगते. निर्गुण झालेले मनच मोक्षाला कारणीभूत होते. पांच कर्मेंद्रिये, पांच ज्ञानेंद्रिये, एक अभिमान, या मनाच्या अकरा वृत्ती होत. पांच सूक्ष्म मते, पांच कर्मे, एक शरीर हे या वृत्तींचे आधारभूत अकरा

विषय आहेत. गंध, रूप, स्पर्श, रस व शब्द हे ज्ञानेंद्रियाचे, मलत्याग, संभोग, गमन, भाषण, कुशलता हे पांच कर्मेंद्रियांचे विषय होत. मनाच्या या अकरा वृत्ती, विषय, स्वभाव, संस्कार, कर्म, काळ यांच्यामुळे हजारो, लाखो प्रकारच्या होऊन त्यांना क्षेत्रज्ञ आत्म्याच्या अस्तित्वामुळे अस्तित्व प्राप्त होते. तो क्षेत्रज्ञ म्हणजेच व्यापक, जगत्कारणभूत, पूर्ण, प्रत्यक्ष, स्वप्रकाश, जन्मरहित, ब्रह्मादिकांचा नियंता नारायण वासुदेव होय. हाच परमात्मा सर्व जगाचे नियमन करतो. म्हणून गुरुरूपी श्रीहरींची चरणसेवा करून आत्मस्वरूपाची प्राप्ती करून घ्यावी.

श्रीकृष्णांनी उद्धवास योगप्रक्रिया समजावून सांगितली. पण ती साधारण पुरुषाला फार कठीण वाटल्यामुळे त्याने कृष्णप्राप्तीचा सोपा व सहजसुलभ उपाय विचारला. तेव्हा अकराव्या स्कंधाच्या एकोणतिसाव्या अध्यायात भगवंतांनी स्वतःच्या प्राप्तीचा धर्म समजावून सांगितला. हाच भगवतधर्म होय. मुमुक्षू पुरुषाने नित्य भगवंताचे स्मरण करावे. त्यांची प्राप्ती हेच ध्येय मानून सर्व कर्मे करावीत. ज्ञानी पुरुषांच्या पुण्य नगरीत राहावे. यात्रेच्या वेळी वा उत्सवप्रसंगी सर्व गायन नृत्यादी ऐश्वर्ये भगवंतांना अर्पण करावीत. मन निरिच्छ असावे. स्तुति-निंदेची चिंता करू नये. कुत्रे, बैल, गर्दभ, चांडाल ही सर्व परब्रह्मरूप मानावीत. त्यांना साष्टांग नमस्कार घालावा. चराचर सृष्टीतील पदार्थांबद्दल समभाव ठेवावा.

भागवतधर्मात सर्व कर्मे भगवंतांना अर्पण करायची असतात. आणि ती सुद्धा निष्कामबुद्धीने. ब्रह्मविद्या ही सर्वांत श्रेष्ठ मानावी. हिच्यामुळे संसार दूर राहातो व मोक्षाची प्राप्ती होते. एकदा ब्रह्मज्ञान प्राप्त झाले की, साधकाची जिज्ञासा संपते. त्याला मग अन्य गोष्टींची रुचीच वाटत नाही. अमृतप्राशनामुळे इतर सर्व पदार्थ नीरसच वाटतात. ज्ञान, कर्म, योग, कृषिकर्मादी उद्योग, न्यायादिक व्यवहार इत्यादींच्या साह्याने जे पुरुषार्थ मिळवायचे ते भगवद्‌भक्ताला केवळ ईश्वरप्राप्तीने मिळतात. कारण सर्व कर्मे भगवंतांना अर्पण केली की, त्या भक्ताचे कल्याण करणे ही भगवंतांची जबाबदारी राहाते.

मर्त्यो यदा त्यक्तसमस्त कर्मा निवेदितात्मा विचिकीर्षितो मे।
तदाऽमृतत्वं प्रतिपद्यमानो मयाऽऽत्मभूताय च कल्पते वै ।।

## वेदस्तुती आणि अकरावा स्कंध

श्रीमद्भागवतपुराणातील तत्त्वचर्चा अशी विविध प्रकारची आहे. वैराग्याचे स्वरूप, त्याची धारणा, योगप्रक्रियेचा अभ्यास, उपासनेचे प्रकार, भक्तिमार्गाची महती, ब्रह्मदेवांचे सृष्टिकर्म, सांख्यशास्त्रातील तत्त्वांचे स्वरूप व त्यांची मीमांसा; इत्यादी अनेक विषयांचा ऊहापोह भागवतकारांनी निरनिराळ्या कथांच्या, संवादांच्या माध्यमातून केला आहे. भागवताच्या दहाव्या स्कंधातील सत्याऐंशिव्या अध्यायात राजा परीक्षितास एक महत्त्वाची शंका आली. परब्रह्म हे जर निर्गुण, तर मग त्याचे वर्णन शब्दमय श्रुतीने कसे करता येईल ? ही ती शंका. या शंकेच्या निरसनार्थ श्रुतींनी, वेदांनी केलेली परब्रह्माची स्तुती येथे वर्णन केली आहे. त्याला सर्व प्रकारचे ज्ञान आहे (यः सर्वज्ञः सर्ववित्), ज्याची व्याप्ती सर्वत्र आहे (सर्वस्य वशी सर्वस्येशानः), ज्याची तपश्चर्या ज्ञानमय आहे (यस्य ज्ञानमयं तपः); अशा शब्दांत श्रुतींनें परब्रह्माचे वर्णन केले आहे. श्रुतींनी वा वेदांनी केलेली ही निर्गुणस्तुती हा या स्कंधातील महत्त्वाचा तात्त्विक विषय आहे*

या वेदस्तुतीत नारद व नारायणऋषी यांचा संवाद आहे. परमात्म्याच्या सामर्थ्याचे वर्णन, सर्वान्तर्यामित्वस्थापन, ईशभक्ति-समर्थन, योग्यांचे भेद, परमात्म्याचे अनियंत्रित प्रभुत्व, नैष्कर्म्यसिद्धीची आवश्यकता, भक्तीचे फल, काम्यकर्माचे अनिष्ट फल, एकाग्रभक्तीचे फल, मीमांसावादींचे खंडन, विश्वाची मिथ्यात्वसिद्धी, परमात्म्याचे प्रभुत्व, जीवांची उत्पत्ती व मोक्ष, जीवस्थितिनिश्चय, जीवांच्या उपाधींचे भेद, ईश्वरी अनुग्रहाचे फल, मनोनिग्रहाचा उपाय, सत्समागमाची आवश्यकता, विश्वाची वास्तव स्थिती, जीवेश्वरांतील भेदक गुण, परमेश्वराचे अनंतत्व; इत्यादी अनेक मुद्द्यांचा तात्त्विक ऊहापोह करण्यात आला आहे.

---

* म्हणूनच ही वेदस्तुती संक्षेपाने अनुवादासह शेवटी दिलेली आहे.

श्रीभागवतपुराणाचा एकादशस्कंध तर केवळ तत्त्वनिरूपणाचा असून तो एकनाथांच्या भागवतग्रंथामुळे महाराष्ट्रात घरोघरी पोचला आहे. भगवंतांच्या अवतारकथा, परब्रह्माचे स्वरूप, माया तरून जाण्याचे उपाय, भगवत्सेवेचे भिन्न भिन्न मार्ग, अवधूतांचे चोवीस गुरू, बंधमोक्ष-स्वरूप, विद्या-अविद्यास्वरूप, जीव-ईश्वरस्वरूप, तीन गुण, अठरा सिद्धी, अठरा धारणा, भीष्मांनी सांगितलेला मोक्षधर्म, शमदमादिकांची लक्षणे, मन वश करण्याचा उपाय, तत्त्वांची संख्या व सांख्यशास्त्र, भिक्षूंचे वैराग्य, ऐलगीता, क्रियायोग म्हणजे पूजेचा विधी, भागवतधर्माचे महत्त्व; इत्यादी अनेक विषयांचे अत्यंत सखोल विवरण या स्कंधात आले आहे. त्यांतील काही विषयांची ओळख आपण या पूर्वीच करून घेतलेली आहे. उरलेल्यांचा फक्त निर्देश येथे केला आहे.

# ८. उपसंहार व ग्रंथमाहिमा

## हे वेदरूपी कल्पतरूचे फळ

या भागवतपुराणात निर्मत्सर असा सत्पुरुषांचा उत्कृष्ट धर्म सांगितला आहे. त्यात थोडीही आशा नाही, की कपट नाही. तो शुद्ध निष्काम आहे. या धर्मामुळे कल्याणकारक व तापत्रयांचे निर्मूलन करणारी सत्यवस्तू कोणती याचे ज्ञान होते. इतर कोणत्याही साधनाने परमात्मा तत्काळ अंतःकरणात प्रतीत होत नाही. पण या भागवत-धर्माच्या सेवनाने, श्रवणाने, कित्येक पुण्यवान पुरुषांनी आपल्या अंतःकरणात या परमात्म्यास तत्काळ स्थिर करून घेतला आहे. हे भागवत काही सामान्य नाही. हे वेदरूपी कल्पतरूचे फळच मानवजातीच्या उद्धारासाठी पृथ्वीवर गळून पडले आहे. आणि ते शुकाचार्यांच्या मुखात चटकन पडले. या भागवतरूपी फळात अमृतासारखा रस भरला आहे.

त्याचे तुम्ही मोठ्या आवडीनें सेवन करा. अशी विनंती श्रोत्यांना, वाचकांना भागवतकारांनी प्रथमच केली आहे.

शुकाचार्यांनी अत्यंत तळमळीने सर्व वेदांचे सार, आत्मविद्येचा प्रकाशदीप, ज्याचा प्रभाव केवळ अद्भुत असे जे पुराणांतील गूढ तत्त्व, ते सांगितले आहे. पुरुषानें एकाग्रचित्ताने भक्तसंरक्षक प्रभूचे गुण श्रवण करावेत, त्याचे कीर्तन करावे, त्याचे भजन करावे, त्याचे ध्यान करावे, त्याचे पूजन करावे, म्हणूनही या भागवतपुराणाची निर्मिती झाली आहे. वेदांतील प्रतिपाद्य वासुदेव, यज्ञप्रतिपादक वासुदेवच. ज्ञान वासुदेवपर, आचरण वासुदेवपर, धर्म वासुदेवपर, स्वर्गादी गती वासुदेवपर, अशी सर्व कर्मे ईश्वररूप, आणि या ईश्वराच्या विविध अवतारांना भजावे. पण सर्व अवतारांत प्रमुख म्हणजे पूर्णावतार श्रीकृष्ण यांचा. जो पुरुष या भगवंतांच्या चरित्राचे अंत:करण शुद्ध ठेवून नित्य सायंकाळी व सकाळी भक्तिपूर्वक पठण करतो, तो सर्व दुःखांतून मुक्त होतो.

स्वत: व्यासांनी सर्व प्राणिमात्रांच्या कल्याणासाठी, सर्व लोकांना कृतार्थ करण्यासाठी भगवंतांच्या चरित्राने ओथंबलेले व ब्रह्मज्ञानाने ओतप्रोत असे हे भागवतपुराण सांगितले. सर्व वेद व इतिहास यांचे साररूप असे हे भागवतपुराण सार्वभौम अशा परीक्षित राजाला शुकाचार्यांनी ऐकविले. धर्म व ज्ञान या दोहोंशी सहवर्तमान श्रीकृष्ण स्वत:च्या धामाला गेले. तेव्हा कलियुगात जिकडे तिकडे अधर्म व अज्ञान यांचा अंधार पसरत गेला, असे पाहून हा भागवतपुराणसूर्य उदयास आला.

भागवताच्या शेवटच्या म्हणजे बाराव्या स्कंधात स्वत: ग्रंथकारानेंच भागवताची महती गाऊन भागवतपुराणाचा स्कंधवार आढावा घेतला आहे. सर्व भागवतकथा सांगून पूर्ण झाल्यावर भगवंतांचे व भागवताचे माहात्म्य स्वत: शुकाचार्यांनीच सांगितले आहे. विहिरीत अथवा खळग्यात पडलेला, जिन्यावरून पाय निसटलेला, दुःखाने गांजलेला, शिंक येऊन पराधीन झालेला जो कोणी मोठ्याने 'हरये नम: ' असे म्हणून श्रीहरींना स्मरण करील तो सर्व पातकांपासून मुक्त होईल, असे भागवतकारांचे वचन आहे.

पतितः स्खलितश्चार्तः क्षुत्त्वा वा विवशो ब्रुवन् ।
हरये नम इत्युच्चैर्मुच्यते सर्वपातकात् ॥

### भागवतपुराणाचे माहात्म्य

भगवान सूर्य जसा अंधार नष्ट करतो, झंजावात जसे मेघ उडवून टाकतो, त्याचप्रमाणे सर्वसमर्थ परमेश्वराचा प्रभाव ऐकल्यावर, त्याचे गुणगान करणाऱ्याच्या अंतःकरणात प्रवेश करतो व सर्व संकटांचा नाश करतो. ज्यात भगवंतांचा गुणानुवाद आहे तेच वर्णन पवित्र, पुण्यकारक आहे, तेच वर्णन रमणीय, नित्य नवीनासारखे मनोहर, मनाला आनंद देणारे व मनुष्याचा दुःखसागर आटवून टाकणारे असते.

वासुदेवांचे हे माहात्म्य ऐकल्यावर सर्व पातकांचा नाश होईल. जो कोणी एकनिष्ठ होऊन हे माहात्म्य दिवस प्रहरभर, निदान थोडा-वेळ तरी ऐकेल, ऐकवील, तो स्वतःच पवित्र होऊन जाईल. हे माहात्म्य द्वादशीला किंवा एकादशीला ऐकणारा दीर्घायुषी होईल. उपवास करून जो याचे पठण करील तो सर्व पातकांपासून मुक्त होईल. पुष्कर-तीर्थावर, मथुरेत, द्वारकेत इंद्रियनिग्रहपूर्वक उपवास करून या संहितेचे पठण करील त्याची भयापासून मुक्तता होईल. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद यांचे अध्ययन केल्याने ब्राह्मणाला मध, तूप व दूध यांचे प्रवाह प्राप्त होतात. पण हे तर पवित्र फल असून याचा पाठ केल्यास भगवंतांनी सांगितलेल्या परमश्रेष्ठ ज्ञानाची त्याला प्राप्ती होते. कलीच्या अनेक दोषांचा नाश करणारे विश्वाचे नियंते श्रीहरी यांचे इतर पुराणांत असे गुणवर्णन आलेले नाही. या भागवतसंहितेत मात्र नाना प्रकारच्या कथा सांगण्याच्या निमित्ताने भगवान परमात्म्यांच्या गुणांचे गायन पदोपदी केले आहे. आत्मसुखाच्या प्राप्तीमुळे ज्यांचे मन शांत झाले आहे व ज्यांची द्वैतकल्पना सर्वस्वी नष्ट झाली आहे, तरी परमात्म्याच्या मनोहर लीलांनी ज्यांचे अंतःकरण वेधून गेले आहे, अशा शुकाचार्यांनी परमा-त्म्याच्या स्वरूपाचे केलेले हे आविष्करण कृपादृष्टीने निर्मिले आहे.

या भागवतपुराणाची श्लोकसंख्या अठरा हजार आहे. आपल्या नाभिकमलावर बसलेल्या ब्रह्मदेवांना संसाराची भीती वाटून ते घाबरले

तेव्हा भगवंतांनी अत्यंत कृपाळू होऊन हे भागवतपुराण सांगितले. यात आरंभी, मध्ये व अंती सर्वत्र वैराग्यजनक आख्याने गुंफली असून त्यांतील भगवंताच्या कथा अमृतासारख्या मधुर असल्यामुळे सज्जन व देव यांना त्यापासून अतिशय आनंद होतो. सर्व वेदान्तशास्त्राचे सार जे ब्रह्म व आत्मा यांचे ऐक्य, त्याचे प्रतिपादन हाच या पुराणाचा विषय असून मोक्षप्राप्ती हा त्याचा हेतू आहे. भाद्रपदी पौर्णिमेला सोन्याच्या चौरंगासह भागवताची पोथी जो दान देतो, त्याला उत्तम गती प्राप्त होते. या भागवतपुराणाच्या अमृतासारख्या रसाने जो तृप्त झाला, त्याला दुसऱ्या कशातच आनंद वाटत नाही. नद्यांत जशी गंगा, देवांत जसे भगवान विष्णू, विष्णुभक्तांत शंकर, तसे सर्व पुराणांत भागवतपुराण श्रेष्ठ होय. असे हे भागवत पापहारक असून विष्णुभक्तांना अत्यंत आवडणारे आहे. त्यात शुकाचार्यांसारख्या परमहंसांना प्राप्त होणारे निर्मळ ज्ञान सांगितले असून ज्ञान, विज्ञान, वैराग्य, भक्ती यांनी युक्त असा कर्मसंन्यास वर्णिला आहे. हे विवेचन भक्तिपूर्वक ऐकणारा, वाचणारा, त्याचे मनन करणारा पुरुष मुक्त होतो.

**श्रीमद्भागवतं पुराणममलं यद्वैष्णवानां प्रियं ।**
**यस्मिन् पारमहंस्यमेकममलं ज्ञानं परं गीयते ॥**
**तत्र ज्ञानविरागभक्तिसहितं नैष्कर्म्यमाविष्कृतं ।**
**तच्छृण्वन्विपठन्विचारणपरो भक्त्या विमुच्येन्नरः ॥**

## भागवतकथारूपी अमृत

भागवतपुराणाचे माहात्म्य आणखी सोदाहरण सांगण्यासाठी 'श्रीमद्भागवत-माहात्म्य' या नावाचे सहा अध्याय भागवतपुराणाला जोडलेले असतात. भक्ती व नारद, सनत्कुमार व नारद यांच्या संवादांतून हे माहात्म्य साकार झाले असून याच्या श्रवणाने आत्मदेव नावाच्या ब्राह्मणाला मोक्षप्राप्ती कशी झाली याची एक सुंदर कथा सांगितली आहे. श्रीमद्भागवत नावाचे शास्त्र हे कालरूपी अजगराने गिळलेल्या प्राण्यांना त्यातून मुक्त करून त्यांचे सांसारिक दुःख नाहीसे करण्यास

कारणीभूत असे आहे. अंतःकरण शुद्ध होण्यास याच्याखेरीज दुसरे कोणतेही साधन नाही. पूर्वजन्मी आपल्या हातून काही पुण्य घडले असेल तरच भागवतश्रवणाचा लाभ आपणांस होईल. कुशल असे देव अमृताचा कलश घेऊन शुकाचार्यांपाशी येऊन म्हणाले, 'हा अमृताचा कलश घ्या. पण त्याच्या मोबदल्यात कथारूपी अमृत आम्हांला द्या. आम्हांला भागवतकथारूपी अमृत पिण्याला संधी द्या.' अशी ही भागवतकथा देवांनाही दुर्लभ आहे. भागवतकथा ही इतर मोक्षदायक साधनांपेक्षा श्रेष्ठ आहे. कलियुगात भागवतशास्त्र म्हणजे साक्षात भगवंतांचे स्वरूप आहे. याच्या पठणामुळे, श्रवणामुळे तत्काळ विष्णुलोकाची प्राप्ती होते. सात दिवसांत याचे वाचन झाल्यास मोक्षाची प्राप्ती होते.

कलियुगातील अधर्माने, अनाचाराने, भयानक वृत्तीने ग्रासलेले लोक पाहून भक्ती दीनवाणी होऊन नारदांना म्हणाली, 'नारदा, मी भक्ती आहे. आणि हे कालाच्या तावडीत सापडलेले माझे ज्ञान व वैराग्य या नावांचे दोन पुत्र आहेत. माझी सेवा करणाऱ्या या स्त्रिया गंगादी नद्या आहेत. नारदा, माझं नाव भक्ती, मी द्रविड देशात उत्पन्न झाले व कर्नाटकात वाढले. महाराष्ट्रातही माझी थोडी वाढ झाली. परंतु गुजराथमध्ये मात्र मला ज़ीर्णावस्था प्राप्त झाली. त्या गुजराथ प्रांतात भयंकर कलियुग सुरू झाल्यानं पाखंडी व नास्तिक लोकांनी माझ्या शरीराचे तुकडे उडवून दिले. मी या माझ्या पुत्रांसह पुष्कळ काळ निर्बळ झाले.

**उत्पन्ना द्राविडे साहं वृद्धिं कर्णाटके गता ।**
**क्वचित्क्वचिन्महाराष्ट्रे गुर्जरे जीर्णतां गता ।।**

'नारदा, मी पुन्हा वृंदावनात गेले. तिथं मात्र मला लावण्य प्राप्त झालं. हल्ली मी तरुण, सुंदर व सुस्वरूप झाले आहे. पण माझे हे दोन मुलगे मात्र श्रमानं अगदी थकून भागून निजूनच राहिले आहेत. यांचं वार्धक्य पाहून मला फार वाईट वाटतं.' नारदांनी कलियुगाचे वर्णन करून तिला श्रीकृष्णचरणकमलांचे चिंतन करायला सांगितले. कलि-

युगात भक्तीच मोक्ष देणारी आहे, असे त्यांनी तिला पटवून दिले. या कलियुगात भक्तीचाच प्रसार होईल. व्रताचरणे, तीर्थयात्रा, योगसाधने, यांपेक्षा भक्तीच श्रेष्ठ आहे. 'कलौ भक्तिः कलौ भक्तिर्भक्त्या कृष्णः पुरः स्थितः' श्रीकृष्ण भक्तीच्याच पुढे येऊन उभे राहातात, असे तिचे माहात्म्य नारदांनी तिला पटवून दिले.

## नारदांचे भागवतमाहात्म्यश्रवण

शुकाचार्यांनी सांगितलेल्या भागवतकथाज्ञानयज्ञाचे अनुष्ठान करण्याचे एकदा नारदांनी ठरविले. सनत्कुमारादी ऋषींनी त्यांना अशा एकान्तस्थानाचे वर्णन केले. गंगाद्वाराजवळ आनंद नावाच्या एका गंगातीरावर हे अनुष्ठान ठरले. तेथे देव, ऋषी, सिद्ध, वृद्ध, वेली आणि सभोवार मऊ वाळू असल्यानें हे स्थान रमणीय होते. येथे ज्ञानयज्ञ सुरू झाल्यावर ज्ञान व वैराग्य या दोन्ही जीर्ण व जराजर्जर झालेल्या आपल्या पुत्रांना घेऊन भक्ती येईल असेही मुनींनी नारदांना सांगितले.

नारद आणि सनत्कुमारादी मुनी भगवत्कथाप्राशनासाठी गंगातटाकी आले. सर्व वैष्णव हा अमृतसोहळा पाहाण्यासाठी तेथे आले. भृगू, वसिष्ठ, च्यवन, गौतम, मेधातिथी, देवल, देवराज, परशुराम, विश्वामित्र, शाकल, मार्कंडेय, दत्तात्रेय, पिप्पलाद इत्यादी मुनी, व्यास, पराशर, शुकाचार्य, जाजली, इतर ऋषी हे सर्व आपापल्या स्त्रियांसह उपस्थित झाले. वेदान्तशास्त्रे, वेद, मंत्रशास्त्रे, महापुराणे, सहा शास्त्रे इत्यादींनी मानवी शरीरे धारण करून तेथे उपस्थित राहाण्याचे ठरविले. गंगादी नद्या, पुष्करादी सरोवरे, सर्व दिशा, दण्डकादी अरण्ये, वासुकिप्रमुख नाग, देव, गंधर्व दैत्य इत्यादी सर्व आले.

एका बाजूस ऋषिसंघ, दुसऱ्या बाजूस देवसमुदाय, तिसऱ्या बाजूस वेद व उपनिषदे, चौथ्या बाजूस तीर्थे व स्त्रिया यांच्या उपस्थितीत 'जय जय, नमः नमः' अशा शब्दांनी वातावरण भारावून गेले. सनत्कुमारांनी नारदांना भागवतमाहात्म्य सांगायला प्रारंभ केला. या माहात्म्याच्या श्रवणाने त्वरित मुक्ती प्राप्त होते.

ज्यांच्या घरी नेहमी भागवतकथा चालू आहे ते घर तीर्थासारखे पुण्यकारक असते. त्या घरी राहाणाराची सर्व पापे दूर होतील. हजार अश्वमेध व शंभर वाजपेय यांचे पुण्य भागवतकथेच्या सोळाव्या हिश्श्या-

एवढेही नसते. भागवतकथेचे जोपर्यंत उत्तम श्रवण होणार नाही, तोपर्यंत देहात पातकांचा निवास राहील. गंगा, गया, काशी, पुष्कर, प्रयाग; ही पुण्यक्षेत्रे फळाच्या दृष्टीने भागवतकथेची बरोबरी कधीच करू शकत नाहीत. भागवतातील अर्धा, पाव श्लोक तरी नित्य म्हणत जावा. 'ॐ' हा प्रणवमंत्र, 'तत्सवितुर्वरेण्य' हा गायत्रीमंत्र व 'सहस्रशीर्षा' हे पुरुषसूक्त यांनी हा भागवतग्रंथ तयार झाला आहे. 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या द्वादशाक्षरी मंत्राची महती फार मोठी आहे. भगवच्चिंतन, तुळशीचे रक्षण व गायींची सेवा या तीन कृत्यांच्या पुण्याएवढी भागवताची सेवा असते.

मृत्युकाळी भागवताचे श्रवण केल्यास भगवान श्रीकृष्णांचे वैकुंठधाम प्राप्त होते. माणसाने प्रयत्नपूर्वक भागवतग्रंथाचे श्रवण करावे. ही भागवतकथा सात दिवसांत पुरी करावी. मन जिंकणे कठीण असल्याने, रोगामुळे, आयुष्य कमी असल्यामुळे, कलीच्या अंगी दोष असल्याने भागवताचे पारायण सात दिवसांत करावे. तपश्चर्या, योग, समाधी यांनी जे फळ मिळणार नाही ते भागवतकथाश्रवणाने प्राप्त होईल. सर्व यज्ञ, सर्व व्रते, सर्व तपश्चर्या यांच्याहून भागवताची महती विशेष आहे. म्हणून श्रीकृष्ण भूलोक सोडून जेव्हा वैकुंठास निघाले, तेव्हा त्यांनी उद्धवास या भागवतकथेचे माहात्म्य निवेदन केले.

स्वतः श्रीकृष्णांनी आपले तेज भागवतपुराणात ठेविले आहे. श्रीकृष्णांचे वाणीरूप म्हणजे प्रत्यक्ष हा भागवतग्रंथ होय. कलियुगात सर्व साधनें बाजूला पडून भागवतश्रवण हाच एक श्रेष्ठ धर्म आहे. दुःख, दरिद्र्य, दुर्भाग्य, पातके यांच्या नाशासाठी व कामक्रोधांना जिंकण्यासाठी भागवतश्रवण हा एक सर्वोत्कृष्ट मार्ग आहे. भागवतसप्ताहपारायण हाच एक सर्वोत्तम धर्म आहे.

कलियुगातील संसाररोगाचा नाश करणारे एकटे भागवतपुराणच आहे. (कलौ भागवती वार्ता भवरोगविनाशिनी) हे भागवतपुराण श्रीकृष्णांना अत्यंत प्रिय असून संपूर्ण पातकांचा नाश करणारे आहे. मुक्तीचे हे सर्वश्रेष्ठ साधन असून भक्ताला क्रीडा करायला लावणारे आहे.

कृष्णप्रियं सकलकल्मषनाशनं च ।
मुक्त्यैकहेतुमिह भक्तिविलासकारि ।।

० ० ०

# ७ स्तोत्रमंजूषा

## १ कुंतिकृत श्रीकृष्णस्तुती

नमस्ये पुरुषं त्वाद्यमीश्वरं प्रकृतेः परम् ।
अलक्ष्यं सर्वभूतानामन्तर्बहिरवस्थितम् ॥१॥
मायाजवनिकाच्छन्नमज्ञाधोक्षजमव्ययम् ।
न लक्ष्यसे मूढदृशा नटो नाट्यधरो यथा ॥२॥
तथा परमहंसानां मुनीनाममलात्मनाम् ।
भक्तियोगविधानार्थं कथं पश्येमहि स्त्रियः ॥३॥
कृष्णाय वासुदेवाय देवकीनन्दनाय च ।
नन्दगोपकुमाराय गोविन्दाय नमो नमः ॥४॥
नमः पङ्कजनाभाय नमः पङ्कजमालिने ।
नमः पङ्कजनेत्राय नमस्ते पङ्कजाङ्घ्रये ॥५॥
यथा हृषीकेश खलेन देवकी कंसेन रुद्धातिचिरं शुचार्पिता ।
विमोचिताहं च सहात्मजा विभो त्वयैव नाथेन मुहुर्विपद्गणात्
॥६॥

विषान्महाग्नेः पुरुषाददर्शनादसत्सभाया वनवासकृच्छ्रतः ।
मृधेमृधेऽनेकमहारथास्त्रतो द्रौण्यस्त्रतश्चास्म हरेऽभिरक्षिताः ॥७॥

विपदः सन्तु नः शश्वत्तत्र तत्र जगद्गुरो ।
भवतो दर्शनं यत्स्यादपुनर्भवदर्शनम् ॥८॥

जन्मैश्वर्यश्रुतश्रीभिरेधमानमदः पुमान् ।
नैवार्हत्यभिधातुं वै त्वामकिञ्चनगोचरम् ॥९॥

नमोऽकिञ्चनवित्ताय निवृत्तगुणवृत्तये ।
आत्मारामाय शान्ताय कैवल्यपतये नमः ॥१०॥

मन्ये त्वां कालमीशानमनादिनिधनं विभुम् ।
समं चरन्तं सर्वत्र भूतानां यन्मिथः कलिः ॥११॥

न वेद कश्चिद्भगवंश्चिकीर्षितं
तवेहमानस्य नृणां विडम्बनम् ।
न यस्य कश्चिद्दयितोऽस्ति कर्हिचिद्-
द्वेष्यश्च यस्मिन्विषमा मतिर्नृणाम् ॥१२॥

जन्म कर्म च विश्वात्मन्नजस्याकर्त्तुरात्मनः ।
तिर्यङ्नृषिषु यादस्तु तदत्यन्तविडम्बनम् ॥१३॥

गोप्याददे त्वयि कृतागसि दाम ताव-
द्या ते दशाऽश्रुकलिलाञ्जनसम्भ्रमाक्षम् ।
वक्त्रं निनीय भयभावनया स्थितस्य
सा मां विमोहयति भीरपि यद्बिभेति ॥१४॥

केचिदाहुरजं जातं पुण्यश्लोकस्य कीर्तये ।
यदोः प्रियस्यान्ववाये मलयस्येव चन्दनम् ॥१५॥

अपरे वसुदेवस्य देवक्यां याचितोऽभ्यगात् ।
अजस्त्वमस्य क्षेमाय वधाय च सुरद्विषाम् ॥१६॥

भारावतारणायान्ये भुवो नाव इवोदधौ ।
सीदन्त्या भूरिभारेण जातो ह्यात्मभुवार्थितः ॥१७॥

भवेऽस्मिन्क्लिश्यमानानामविद्याकामकर्मभिः ।
श्रवणस्मरणार्हाणि करिष्यन्निति केचन ॥१८॥

शृण्वन्ति गायन्ति गृणन्त्यभीक्ष्णशः
स्मरन्ति नन्दन्ति तवेहितं जनाः ।
त एव पश्यन्त्यचिरेण तावकं
भवप्रवाहोपरमं पदाम्बुजम् ॥१९॥

अप्यद्य नस्त्वं स्वकृतेहित प्रभो
जिहाससि स्वित्सुहृदोऽनुजीविनः ।
येषां न चान्यद्भवतः पदाम्बुजा-
त्परायणं राजसु योजितांहसाम् ॥२०॥

के वयं नामरूपाभ्यां यदुभिः सह पाण्डवाः ।
भवतोऽदर्शनं यर्हि हृषीकाणामिवेशितुः ॥२१॥

नेयं शोभिष्यते तत्र तथेदानीं गदाधर ।
त्वत्पदैरङ्किता भाति स्वलक्षणविलक्षितैः ॥२२॥

इमे जनपदाः स्वृद्धाः सुपक्वौषधिवीरुधः ।
वनाद्रिनद्युदन्वन्तो ह्येधन्ते तव वीक्षितैः ॥२३॥

अथ विश्वेश विश्वात्मन्विश्वमूर्ते स्वकेषु मे ।
स्नेहपाशमिमं छिन्धि दृढं पाण्डुषु वृष्णिषु ॥२४॥

त्वयि मेऽनन्यविषया मतिर्मधुपतेऽसकृत् ।
रतिमुद्वहतादद्धा गङ्गेवौघमुदन्वति ॥२५॥

श्रीकृष्ण कृष्णसख वृष्ण्यृषभावनिध्रु-
ग्राजन्यवंशदहनानपवर्गवीर्य ।
गोविन्द गोद्विजसुरार्तिहरावतार
योगेश्वराखिलगुरो भगवन्नमस्ते ॥२६॥
(१.८.१८-४३)

श्रीकृष्णा, तू आत्मरूपानें प्रत्येक प्राण्याच्या हृदयात वास करतोस तू सर्वांचा आदी आहेस. तुला मात्र आदी, अंत नाही. तू मायेहून भिन्न व सर्व ऐश्वर्याने संपन्न आहेस. तू निराकार असल्यामुळे कोणाला दिसत नाहीस. पण सर्व प्राण्यांच्या आत व बाहेर असतोस. अशा तुला मी नमस्कार करते. मी अज्ञानी आहे. मायारूपी पडद्यानें झाकलेल्या व इंद्रियांना अगोचर अशा तुला मी नमस्कार करते. सोंग घेणाऱ्या नाटकी पुरुषाला अज्ञानी ओळखत नाहीत. तसेच श्रीकृष्णा, तुझे स्वरूप अज्ञानी लोकांना समजू शकत नाही.

श्रीकृष्णा, वैष्णधर्म स्वीकारलेल्या निर्मळ अंत:करणाच्या मुनीनांही तू दिसत नाहीस. मग आम्ही तर बोलून चालून स्त्रियाच. भक्तियोगाच्या आचरणाने तू आम्हांसारख्या स्त्रियांना कसा समजणार ? कृष्णा, तू प्रकाशरूपानें सर्वत्र राहाणारा आहेस. तू वसुदेवाच्या कुळात पुत्ररूपानें आहेस. नंद गवळ्याच्या घरी तू वाढतो आहेत. तू सर्वज्ञ व वेदवाणी जाणणारा आहेस. सर्व भक्तांची अंत:करणे तू स्वत:कडे ओढून घेतोस. तुला मी वारंवार नमस्कार करते.

श्रीकृष्णा, बेंबीच्या देठापासून तुझ्यात कमल निर्माण झाल आहे. तुला नमस्कार असो. तू गळ्यात कमलपुष्पांची माळ घातली आहेस. तुला नमस्कार असो. तुझे डोळे कमलांप्रमाणे आहेत. तुला नमस्कार असो. तुझे पाय कमलांप्रमाणे आहेत. तुला नमस्कार असो. जितेन्द्रिया, श्रीकृष्णा, तू पूर्वी दुष्ट कंसापासून देवकीला दु:खमुक्त केलेस, तशीच पुत्रांसहवर्तमान अशी जी मी, तिची तू वारंवार संकटांतून मुक्तता केलीस.

श्रीकृष्णा, विषापासून, मोठ्या अग्नीपासून, राक्षसांपासून, दुष्ट दुर्योधनाच्या सभेतून, वनवासातील दु:खांपासून, मोठ्या वीरांच्या शस्त्रां-

पासून, अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रांपासून तू आमचे रक्षण केलेस. जगद्‌गुरो, कृष्णा, आम्हांस प्रत्येक ठिकाणी आपत्तीच येवो. त्यामुळे प्रत्येक संकटप्रसंगी तुझे दर्शन घडते व पुनर्जन्माची यातायात होत नाही.

कृष्णा, जो उत्तम व श्रीमंत कुळात जन्मूनही ज्ञान व संपत्ती यांच्या मदानें धुंद होतो, ऐषारामात लोळतो, त्याला तुझ्या नामस्मरणाची आठवणही होत नाही. तू श्रीमंतांना न भेटता दरिद्री लोकांनाच दिसतोस. तुझे नाम उच्चारण्यास चैनी व अभिमानी लोक लायकच नसतात दरिद्री हेच देवा, तुझे ऐश्वर्य आहे. तू निर्गुण असल्यामुळे सत्त्वादी गुणांचे लोभादी धर्म तुझ्यात नाहीत. तुला माझा नमस्कार असो. तू आत्म्यात रमतोस व त्यात आनंद मानतोस. तू शांत आहेस. मोक्ष देणारा आहेस. तुला माझा नमस्कार असो.

कृष्णा, तू काल आहेस. शंकर आहेस. तुला जन्म-मरणांच्या उपाधी नाहीत. तू सर्वव्यापी आहेस. सर्वत्र तुझी समबुद्धी आहे. सर्व प्राण्यांत निर्माण होणाऱ्या कलहांनाही तूच निमित्तमात्र होतोस, असे मी मानते. कोणताही पुरुष मनुष्य असून मनुष्ययोनीतील तुझ्या मनातील अभिप्राय जाणीत नाही. परमेश्वराला कोणी मित्र नाहीत, की शत्रू नाहीत. परमेश्वराबद्दल मात्र लोकांची मने कलुषित असतात. कृष्णा, तू या जगात आत्मरूपानें राहातोस. तुला जन्माचा, कर्तृत्वाचा अहंकार नाही. तू सर्वव्यापी परमेश्वर असूनही पशुयोनीत वराहादी, मनुष्य योनीवर रामादी, ऋषियोनीत व्यासादी व जलचरयोनीत मत्स्यादी अवतार घेतोस, व त्या त्या योनीला अनुरूप कर्मे करतोस.

कृष्णा, बालपणी तू मोठे अपराध केल्यामुळे तुझ्या मातेनें हातात गुरांचे दावे घेऊन तुला बांधण्याचा प्रयत्न केला. तेव्हा तू 'मी भ्यालो आहे' असा आविर्भाव केलास. डोळयांत पाणी आणून तू रडू लागलास. तुझे तोंड अश्रूंनी भिजलेल्या काळजानें बरबटून गेले. पण त्यामुळे तुझी शोभा वाढली. ती तुझी अवस्था माझ्या मनास मोह उत्पन्न करते. खरोखर भीतीही तुझ्या त्या अवस्थेला भिते कित्येक असे म्हणतात की, मलयपर्वताची कीर्ती वाढावी म्हणून चंदनादी वृक्षांची

निर्मिती झाली. पुण्यवान धर्मराजाचा लौकिक वाढावा म्हणून तू जन्म-रहित असताना यादवकुळात जन्म घेतलास.

दुसरे कोणी असे म्हणतात की, तू जन्मरहित असूनही भक्तांच्या प्रार्थनेवरून जगाच्या कल्याणासाठी व दैत्यांच्या नाशाकरिता तू वसुदेव-पत्नी देवकीच्या ठिकाणी अवतीर्ण झालास. आणखी कोणी असे म्हणतात की, समुद्रात सापडलेली नौका ओझ्याने दबून जाते, तशी दुष्टांच्या भाराने पृथ्वी दबून दुःखी झाली. तिचा भार दूर करा, अशी ब्रह्मदेवांनी प्रार्थना केली, तेव्हा तू यदुकुळात अवतार घेतलास. काही असे म्हणतात की, अज्ञानामुळे लोक काम्य कर्मे करून दुःखे भोगतात. त्या लोकांना संसारसागर तरून जाण्यास मदत व्हावी. श्रवण व स्मरण करण्यास योग्य अशी पराक्रमाची कृत्ये करण्यासाठी तू अवतरलास.

जे लोक तुझ्या चरित्राचे श्रवण करतात, वर्णन, स्मरण करतात, आनंदित होतात, त्यांनाच संसारसागरातून तरून जाण्यासाठी प्रतिबंध जाण्यासाठी प्रतिबंध करणारे तुझे दर्शन घडते. भक्तांच्या इच्छा पूर्ण करणाऱ्या श्रीकृष्णा, आम्ही युद्धात अनेक राजांना मारल्यामुळे मोठेच पाप घडले. आता तुझ्या चरणांशिवाय दुसरा आधार नाही. तुला मित्र मानणाऱ्या व तुझ्यावर जीव ठेवून राहणाऱ्या आम्हांला तू सोडून जातोस ? कृष्णा, आमच्या इंद्रियांचा चालक तूच आहेस. तुझे दर्शन जर घडणार नाही तर यादव व पांडव अशा आमच्या नावांना, रूपांना कोण ओळखतो ?

श्रीकृष्णा, आज शखचक्रादी चिन्हांनी युक्त अशा तुझ्या पायांच्या चिन्हांनी ही भूमी शोभत आहे. पण तू द्वारकेला गेल्यावर ही तशी शोभणार नाही कृष्णा, तुझ्या कृपेने पक्व औषधी, वेली यांनी हा देश समृद्ध झाला आहे अरण्ये, नद्या, पर्वत, समुद्र वाढत आहेत. जग-च्चालका कृष्णा. तू स्वतः अनेक प्रकारची रूपे घेऊन जगात वावरतोस. तुझ्या चरणांना प्रार्थना अशी की, माझे पांडव, माझे यादव यांच्या-बद्दलचा माझा बळकट प्रेमपाश तू तोडून टाक.

कृष्णा, गंगा आपला प्रवाह समुद्रात मोठ्या प्रेमाने नेते. त्याच-प्रमाणे तुझे भजन करणाऱ्या माझ्या बुद्धीला तुझ्याच ठिकाणी निरंतर

रमू दे. कृष्णा, तू अर्जुनाचा मित्र आहेस. यादवांत श्रेष्ठ आहेस. पृथ्वीला भार होणाऱ्या दुष्टांना तू अग्नीप्रमाणे जाळतोस. तुझे सामर्थ्य कधी नाश पावत नाही. तू पृथ्वीचे रक्षण करून गायी व द्विज यांची संकटे दूर करण्यासाठी अवतार घेतोस. तू योगांचा अधिपती आहेस. त्र्यैलोक्याचा गुरू आहेस. षड्गुणैश्वर्य-संपन्न श्रीकृष्णा, तुला माझा नमस्कार असो.

## २. देवहूतिकृत भगवंतस्तुती

अथाप्यजोऽन्तःसलिले शयानं भूतेन्द्रियार्थात्ममयं वपुस्ते ।
गुणप्रवाहं सदशेषबीजं दध्यौ स्वयं यज्जठराब्जजातः ॥१॥
स एव विश्वस्य भवान्विधत्ते गुणप्रवाहेण विभक्तवीर्यः ।
सर्गाद्यनीहोऽवितथाभिसंधिरात्मेश्वरोऽतर्क्यसहस्रशक्तिः ॥२॥
स त्वं भृतो मे जठरेण नाथ कथं नु यस्योदर एतदासीत् ।
विश्वं युगान्ते वटपत्र एकः शेते स्म मायाशिशुरङ्घ्रिपानः ॥३॥
त्वं देहतन्त्रः प्रशमाय पाप्मनां निदेशभाजां च विभो विभूतये
यथाऽवतारास्तव सूकरादयस्तथाऽयमप्यात्मपथोपलब्धये ॥४॥
यन्नामधेयश्रवणानुकीर्तनाद्यत्प्रह्वणाद्यत्स्मरणादपि क्वचित् ।
श्वादोऽपि सद्यः सवनाय कल्पते कुतः पुनस्ते भगवन्नु दर्शनात्
॥५॥
अहो बत श्वपचोऽतो गरीयान्यज्जिह्वाग्रे वर्तते नाम तुभ्यम् ।
तेपुस्तपस्ते जुहुवुः सस्नुरार्या ब्रह्मानूचुर्नाम गृणन्ति ये ते ॥६॥
तं त्वामहं ब्रह्मपरं पुमांसं प्रत्यक्स्रोतस्यात्मनि संविभाव्यम् ।
स्वतेजसा ध्वस्तगुणप्रवाहं वन्दे विष्णुं कपिलं वेदगर्भम् ॥७॥
(३.३३.२-८)

भगवान कपिलमुने, साक्षात तुझ्या उदरातून निघालेल्या कमळात निर्माण झालेल्या ब्रह्मदेवांनाही उदकात शयन करणारे, महाभूते, इंद्रिय-विषय, मन यांनी व्यापलेले, सत्त्वादी गुणांच्या प्रवाहाने युक्त, सर्व विश्वाचे बीज, अशा तुझ्या व्यक्तरूपाचे मनानें ध्यानच केले. त्यांच्या डोळ्यांना काही ते दिसले नाही. परमेश्वरा, असा तू आपल्या सत्त्वादी गुणांच्या प्रभावाने आपल्या शक्तीचे विभाग करतोस. तू वास्तविक कोणत्याही क्रिया करीत नाहीस. तुझा संकल्प कधी व्यर्थ जात नाही. तू सर्व जीवांचा नियामक आहेस. तुझ्या शक्ती अगणित आहेत. त्यांचा तर्कही कोणास करता येणार नाही. या जगाची उत्पत्ती, स्थिती व लय तू त्यांच्या साह्यानें करतोस.

प्रभो, प्रलयकाली हे सर्व जग तुझ्या उदरात राहिले होते. त्या वेळी तू मायेच्या साहृयानें लहान बालकाचे रूप घेतलेस. तू पायाचा अंगठा तोंडात घालून चोखीत वटवृक्षाच्या पानावर शयन केले होतेस. अशा तुला मी आपल्या उदरात कसे धारण केले ? शरीर धारण करण्याचा तुझा उद्देश एवढाच असतो की, दुष्टांचा संहार व्हावा. आज्ञा पाळणारांचा उत्कर्ष व्हावा. पूर्वी तू वराह इत्यादी अवतार धारण केलेस. त्याचप्रमाणे हाही तुझा अवतार लोकांना आत्मज्ञान देण्यासाठी आहे.

भगवन्, तुझ्या नामश्रवणाने, कीर्तनाने, नमस्कार केल्याने, केवळ तुझे स्मरण केल्याने प्रत्यक्ष चांडाळसही सोमयाग करण्याची योग्यता प्राप्त होते. मग तुझे प्रत्यक्ष दर्शन घडेल त्याची योग्यता काय सांगावी ? ज्याच्या जिभेवर तुझे नाव वास करते, असा मनुष्य चांडाळ असला तरी तुझ्या नामाच्या योगाने त्याची योग्यता वाढते. मग तुझे नाम ग्रहण करणारे श्रेष्ठ आर्य यांना तर तुझ्या नामाने तपश्चर्येचे, अनेक होमांचे, अनेक यज्ञांचे, अनेक अवभृथस्नानांचे, वेदांच्या यथासांग अध्ययनाचे श्रेय प्राप्त होते. कपिलमुने, तू श्रेष्ठ पुरुषरूपी परब्रह्म आहेस. अंतः-करण अंतर्मुख करून मनुष्याला तुझे ध्यान करता येते. तू आपल्या ज्ञानतेजाने मायेचा ओघ नाहीसा केला आहेस. आपल्या उदरात वेद धारण करणारा विष्णू तूच आहेस. मी तुला नमस्कार करते.

## ३. प्रल्हादकृत नृसिंहस्तुती

मा मां प्रलोभयोत्पत्त्याऽऽसक्तं कामेषु तैर्वरैः ।
तत्सङ्गभीतो निर्विण्णो मुमुक्षुस्त्वामुपाश्रितः ॥१॥

भृत्यलक्षणजिज्ञासुर्भक्तं कामेष्वचोदयत् ।
भवान्संसारबीजेषु हृदयग्रन्थिषु प्रभो ॥२॥

नान्यथा तेऽखिलगुरो घटेत करुणात्मनः ।
यस्त आशिष आशास्ते न स भृत्यः स वै वणिक् ॥३॥

आशासानो न वै भृत्यः स्वामिन्याशिष आत्मनः ।
न स्वामी भृत्यतः स्वाम्यमिच्छन्यो राति चाशिषः ॥४॥

अहं त्वकामस्त्वद्भक्तस्त्वं च स्वाम्यनपाश्रयः ।
नान्यथेहावयोरर्थो राजसेवकयोरिव ॥५॥

यदि रासीश मे कामान्वरांस्त्वं वरदर्षभ ।
कामानां हृद्यसंरोहं भवतस्तु वृणे वरम् ॥६॥

इन्द्रियाणि मनः प्राण आत्मा धर्मो धृतिर्मतिः ।
ह्रीः श्रीस्तेजः स्मृतिः सत्यं यस्य नश्यन्ति जन्मना ॥७॥

विमुञ्चति यदा कामान्मानवो मनसि स्थितान्।
तर्ह्येव पुण्डरीकाक्ष भगवत्त्वाय कल्पते ॥८॥

नमो भगवते तुभ्यं पुरुषाय महात्मने ।
हरयेऽद्भुतसिंहाय ब्रह्मणे परमात्मने ॥९॥

(७.१०.२–१०)

जो सेवक स्वामीपासून आपले मनोरथ पूर्ण करण्याची इच्छा करतो, तो सेवक नव्हे. जो स्वामी सेवकाकडून स्वकार्य साधण्यासाठी त्याला पैसे देतो, तो स्वामीही नव्हे. ते दोघेही व्यापारी समजले

पाहिजेत. तुझ्यात असलेला स्वामी व सेवक यांचा भाव मात्र वास्तविक आहे. मी तुझा निष्काम भक्त आहे. तूही माझा निरपेक्ष स्वामी आहेस. म्हणून राजा व त्याचा सेवक यांच्यांतील स्वामी व भृत्य असा भाव आपल्यांत नाही.

वरदश्रेष्ठा, परमेश्वरा, तू जर मला इष्ट तो वर देत असशील तर माझ्या हृदयात वासनांचा अंकुर निर्माण होऊ देऊ नकोस. कमलनयना, कामांकुरांच्या निर्मितीमुळे इंद्रिये, मन, प्राण, देह, धर्म, धैर्य, सारासार विवेक, लज्जा, ऐश्वर्य, प्रताप, स्मृती, सत्य, यांचा नाश होतो. पुंडरीकाक्षा, पुरुषाच्या मनातील कामवासनांचा त्याग होतो तेव्हाच त्याला तुझ्यासारखे ऐश्वर्य प्राप्त होते. भगवंता, पुराणपुरुषा, श्रीहरी, अद्‌भुत असे नृसिंहरूप धारण करणाऱ्या ब्रह्मरूप परमेश्वरा, तुला नमस्कार असो.

परमेश्वरा, मी स्वभावतःच विषयांच्या ठिकाणी आसक्त आहे. आपल्या वरांनी मला लोभवू नकोस. कारण मी विषयांच्या संगापासून विरक्त झालो आहे. मोक्षप्राप्तीसाठी मी तुला शरण आलो आहे. प्रभो, हृदयाच्या गाठीप्रमाणे बंधास कारण असणारे, संसाराला बीजभूत असे विषय माझी कसोटी पाहाण्यासाठीच तू निर्माण केले आहेस. जगद्‌गुरो, तू कृपाळू आहेस. अशा अनर्थसाधनात तू आपल्या भक्ताला प्रवृत्त करणार नाहीस. ईश्वरा, तुझ्यापासून विषयाची प्राप्ती इच्छिणारा भक्त नव्हेच. तो केवळ व्यापारी होय.

## ४. देवकीकृत कृष्णस्तुती

रूपं यत्तत्प्राहुरव्यक्तमाद्यं ब्रह्म ज्योतिर्निर्गुणं निर्विकारम् ।
सत्तामात्रं निर्विशेषं निरीहं स त्वं साक्षाद्विष्णुरध्यात्मदीपः ॥१॥
नष्टे लोके द्विपरार्धावसाने महाभूतेष्वादिभूतं गतेषु ।
व्यक्तेऽव्यक्तं कालवेगेन याते भवानेकः शिष्यतेऽशेषसंज्ञः ॥२॥
योऽयं कालस्तस्य तेऽव्यक्तबन्धो चेष्टामाहुश्चेष्टते येन विश्वम् ।
निमेषादिर्वत्सरान्तो महीयांस्तं त्वेशानं क्षेमधाम प्रपद्ये ॥३॥

मर्त्यो मृत्युव्यालभीतः पलायँल्लोकान्सर्वान्निर्भयं नाध्यगच्छत् ।
त्वत्पादाब्जं प्राप्य यदृच्छयाद्य स्वस्थः शेते मृत्युरस्मादपैति ॥४॥
स त्वं घोरादुग्रसेनात्मजान्नस्त्राहि त्रस्तान्भृत्यवित्रासहाऽसि ।
रूपं चेदं पौरुषं ध्यानधिष्ण्यं मा प्रत्यक्षं मांसदृशां कृषीष्ठाः ॥५॥

जन्म ते मय्यसौ पापो मा विद्यान्मधुसूदन ।
समुद्विजे भवद्धेतोः कंसादहमधीरधीः ॥६॥
उपसंहर विश्वात्मन्नदो रूपमलौकिकम् ।
शङ्खचक्रगदापद्मश्रिया जुष्टं चतुर्भुजम् ॥७॥

विश्वं यदेतत्स्वतनौ निशान्ते यथावकाशं पुरुषः परो भवान् ।
बिभर्ति सोऽयं मम गर्भगोऽभूदहो नृलोकस्य विडम्बनं हि तत् ॥८॥

(१०.३.२४–३१)

भगवान, अव्यक्त, आद्य, ब्रह्मस्वरूप, ज्योतिर्मय, निर्गुण, निराकार, भेदरहित, इच्छारहित, केवळ सत्तामात्र असे ज्याचे स्वरूप वेदांत सांगितले आहे तो अध्यात्मशास्त्राचा प्रत्यक्ष दीप श्रीविष्णू, तूच आहेस. दोन परार्ध वर्षांपूर्वी सृष्टीचा नाश झाला. पृथ्वी आदी पंचमहाभूते सूक्ष्मात विलीन झाली. सूक्ष्म महाभूतेही मायेत विलीन झाली असताना तू एकटाच शिल्लक राहिलास.

मायाचालका, निमेषापासून वर्षपर्यंतचा जो मोठा काळ आहे, त्याच्या योगानेच हे विश्व चालले आहे. ही तुझीच लीला आहे. सर्वशक्तिसंपन्न, सर्व कल्याणांचे माहेर घर अशा तुला मी शरण आले आहे. मृत्युरूपी सर्पाला भिऊन दूर पळणाऱ्या मनुष्याला या त्रैलोक्यात कोठेही निर्भय स्थान नाही. पण आदिपुरुषा, जर तो दैवयोगाने तुझ्या चरणांशी प्राप्त झाला, मग स्वस्थपणाने तो झोप घेईल. मृत्यूच त्याला भिऊन दूर पळतो.

भगवंता, तू आपल्या भक्तांचे संकट नाहीसे करतोस. या भयंकर उग्रसेनापुत्रापासून भ्यालेल्यांचे, आमचे रक्षण तू कर. तुझे स्वरूप केवळ ध्यानानेच समजून येते. ते तू चर्मचक्षूंनी पाहाणाऱ्या लोकांपुढे प्रकट करू नकोस. मधुसूदना, माझ्या पोटी तुझा जन्म झाला, हे त्या दुष्टाला कळता

कामा नये. तो तुला छळेल, अशी भीती मला वाटते. म्हणून विश्वात्म्या, शंख, चक्र, गदा, पद्म, यांनी शोभणारे हे तुझे रूप तू आता आवरून धर. तू प्रलयकाली आपल्या शरीरात हे अखिल विश्व जसेच्या तसे धारण करतोस, तोच तू माझ्या उदरी आलास हे लोकांना थट्टेचे होईल.

## ५. इंद्रकृत कृष्णस्तुती

विशुद्धसत्त्वं तव धाम शान्तं तपोमयं ध्वस्तरजस्तमस्कम् ।
मायामयोऽयं गुणसंप्रवाहो न विद्यते तेऽग्रहणानुबन्धः ॥१॥
कुतो नु तद्धेतव ईश तत्कृता लोभादयो येऽबुधलिङ्गभावाः ।
तथापि दण्डं भगवान् बिभर्ति धर्मस्य गुप्त्यै खलनिग्रहाय ॥२॥
पिता गुरुस्त्वं जगतामधीशो दुरत्ययः काल उपात्तदण्डः ।
हिताय स्वेच्छातनुभिः समीहसे मानं विधुन्वञ्जगदीशमानिनाम् ॥३॥
ये मद्विधाज्ञा जगदीशमानिनस्त्वां वीक्ष्य कालेऽभयमाशु तन्मदम् ।
हित्वार्यमार्गं प्रभजन्त्यपस्मया ईहा खलानामपि तेऽनुशासनम् ॥४॥
स त्वं ममैश्वर्यमदप्लुतस्य कृतागसस्तेऽविदुषः प्रभावम् ।
क्षन्तुं प्रभोऽथार्हसि मूढचेतसो मैवं पुनर्भून्मतिरीश मेऽसती ॥५॥
तवावतारोऽयमधोक्षजेह स्वयंभराणामुरुभारजन्मनाम् ।
चमूपपतीनामभवाय देव भवाय युष्मच्चरणानुवर्तिनाम् ॥६॥
नमस्तुभ्यं भगवते पुरुषाय महात्मने ।
वासुदेवाय कृष्णाय सात्वतां पतये नमः ॥७॥
स्वच्छन्दोपात्तदेहाय विशुद्धज्ञानमूर्तये ।
सर्वस्मै सर्वबीजाय सर्वभूतात्मने नमः ॥८॥
मयेदं भगवन् गोष्ठनाशायासारवायुभिः ।
चेष्टितं विहते यज्ञे मानिना तीव्रमन्युना ॥९॥

त्वयेशानुगृहीतोऽस्मि ध्वस्तस्तम्भो वृथोद्यमः
ईश्वरं गुरुमात्मानं त्वामहं शरणं गतः ॥१०॥

(१०.२७.४–१३)

भगवन्, तू केवळ शुद्ध, सत्त्व, तपोमय व शांत आहेस. तुझ्या ठिकाणी रजोगुण व तमोगुण यांचा लवलेशही नाही. मायेनें व अज्ञानाने राहाणारा संसार तुझ्या ठिकाणी नाही. प्रभो, मायने उत्पन्न केलेले व मायेलाच कारण असे हे अज्ञानी कामक्रोधादी विकार तुझ्या ठिकाणी कोठून असणार ? पण देवा, सद्धर्माच्या रक्षणासाठी, दुष्टांना शासन करण्यासाठी तू हा राजदंड धारण करतोस.

जगदीश्वरा, तू सर्व जगाचा पिता, गुरू व अधिराजा आहेस. दुष्टांना शासन करण्यासाठी हातात दंड धारण करणारा तू साक्षात काळ आहेस. स्वतःस जगाचे अधिपती मानणाऱ्या अभिमानी राजांचा अभिमान तू नष्ट करून जगाच्या हितासाठी तू अनेक अवतार धारण करतोस. माझ्यासारखे स्वतःस जगाचा राजा मानणारेसुद्धा संकटप्रसंगी तू निर्भय आहेस, हे पाहून स्वतःची तुच्छता त्यांच्या अनुभवास येते. ते आपला गर्व सोडून सन्मार्गाचा अवलंब करतात. तुझ्या भक्तीत रमून जातात.

श्रीकृष्णा, ऐश्वर्याच्या धुंदीनें अंध झाल्यामुळे मला तुझ्या सामर्थ्याची कल्पना आली नाही. केवळ मूर्खत्वामुळे घडलेल्या माझ्या अपराधांची तू क्षमा कर. भगवंता, फिरून अशी बुद्धी तू मला देऊ नकोस. अधोक्षजा, सैन्याच्या जोरावर बलवान झालेल्या व स्वच्छंदानें वागणाऱ्या व भूमीला भारभूत झालेल्या लोकांच्या नाशासाठी व भक्तीनें तुझ्या चरणांची सेवा करणाऱ्या साधूंच्या उत्कर्षासाठीच तुझा अवतार आहे.

यदुपती, वासुदेवा, तू स्वच्छेने अनेक अवतार धारण करतोस. तुझे स्वरूप शुद्ध ज्ञानमय आहे. तू अनादी, अनंत असून सर्व प्राण्यांचा तूच आत्मा आहेस. तुला माझा नमस्कार असो.

## ६. गोपीकृत कृष्णस्तुती

जयति तेऽधिकं जन्मना व्रजः श्रयत इन्दिरा शश्वदत्र हि ।
दयित दृश्यतां दिक्षु तावकास्त्वयि धृतासवस्त्वां विचिन्वते ॥१॥
शरदुदाशये साधुजातसत्सरसिजोदरश्रीमुषा दृशा ।
सुरतनाथ तेऽशुल्कदासिका वरद निघ्नतो नेह किं वधः ॥२॥
विषजलाप्ययाद्व्यालराक्षसाद्वर्षमारुताद्वैद्युतानलात् ।
वृषमयात्मजाद्विश्वतोभयादृषभ ते वयं रक्षिता मुहुः ॥३॥
न खलु गोपिकानन्दनो भवानखिलदेहिनामन्तरात्मदृक् ।
विखनसार्थितो विश्वगुप्तये सख उदेयिवान् सात्वतां कुले ॥४॥
विरचिताभयं वृष्णिधुर्य ते चरणमीयुषां संसृतेर्भयात् ।
करसरोरुहं कान्त कामदं शिरसि धेहि नः श्रीकरग्रहम् ॥५॥
व्रजजनार्तिहन्वीर योषितां निजजनस्मयध्वंसनस्मित ।
भज सखे भवत्किङ्करीः स्म नो जलरुहाननं चारु दर्शय ॥६॥
प्रणतदेहिनां पापकर्शनं तृणचरानुगं श्रीनिकेतनम् ।
फणिफणार्पितं ते पदाम्बुजं कृणु कुचेषु नः कृन्धि हृच्छयम् ॥७॥
मधुरया गिरा वल्गुवाक्यया बुधमनोज्ञया पुष्करेक्षण ।
विधिकरीरिमा वीर मुह्यतीरधरसीधुनाप्याययस्व नः ॥८॥
तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहम् ।
श्रवणमङ्गलं श्रीमदाततं भुवि गृणन्ति ते भूरिदा जनाः ॥९॥
प्रहसितं प्रिय प्रेमवीक्षणं विहरणं च ते ध्यानमङ्गलम् ।
रहसि संविदो या हृदिस्पृशः कुहक नो मनः क्षोभयन्ति हि ॥१०॥
चलसि यद्व्रजाच्चारयन्पशून्नलिनसुन्दरं नाथ ते पदम् ।
शिलतृणाङ्कुरैः सीदतीति नः कलिलतां मनः कान्त गच्छति ॥११॥
दिनपरिक्षये नीलकुन्तलैर्वनरुहाननं बिभ्रदावृतम् ।
घनरजस्वलं दर्शयन्मुहुर्मनसि नः स्मरं वीर यच्छसि ॥१२॥
प्रणतकामदं पद्मजार्चितं धरणिमण्डनं ध्येयमापदि ।
चरणपङ्कजं शन्तमं च ते रमण नः स्तनेष्वर्पयाधिहन् ॥१३॥

सुरतवर्धनं शोकनाशनं स्वरितवेणुना सुष्ठु चुम्बितम् ।
इतररागविस्मारणं नृणां वितर वीर नस्तेऽधरामृतम् ॥१४॥
अटति यद्भवानह्नि काननं त्रुटिर्युगायते त्वामपश्यताम् ।
कुटिलकुन्तलं श्रीमुखं च ते जड उदीक्षतां पक्ष्मकृद्दृशाम् ॥१५॥
पतिसुतान्वयभ्रातृबान्धवानतिविलङ्घ्य तेऽन्त्यच्युतागताः ।
गतिविदस्तवोद्गीतमोहिताः कितव योषितः कस्त्यजेन्निशि॥१६॥
रहसि संविदं हृच्छयोदयं प्रहसिताननं प्रेमवीक्षणम् ।
बृहदुरः श्रियो वीक्ष्य धाम ते मुहुरतिस्पृहा मुह्यते मनः ॥१७॥
व्रजवनौकसां व्यक्तिरङ्ग ते वृजिनहन्त्र्यलं विश्वमङ्गलम् ।
त्यज मनाक्च नस्त्वत्स्पृहात्मनां स्वजनहृद्रुजां यन्निषूदनम् ॥१८॥

यत्ते सुजात चरणाम्बुरुहं स्तनेषु
भीताः शनैः प्रिय दधीमहि कर्कशेषु ।
तेनाटवीमटसि तद्व्यथते न किंस्वि-
त्कूर्पादिभिर्भ्रमति धीर्भवदायुषां नः ॥१९॥
(१०.३१.१–१९)

वामनपंडितांनी केलेले शुद्धकामदावृत्तांतील गोपीगीत मुद्दाम येथे दिलेले आहे.

(शुद्ध कामदावृत्त.)

प्रकटलासि तूं नंदगोकुळीं, ह्मणुनि इंदिरावास ये स्थळीं ॥
सकळही सुखी या व्रजीं हरी ! विरहदुःखिता गोपसुंदरी ॥ १ ॥
प्रकट होइं तूं विश्वभूषणा ! प्रियतमा ! त्वरें दावि आपणां ॥
हुडकितों तुतें गोपकामिनी, तुजवरी हरी ! प्राण ठेवुनी. ॥ २ ॥
कमलगर्भिचें श्रीस जे हरी, करिं कृपा तये दृष्टिनें हरी ! ॥
सुरतनाथ ! तूं शुल्कदासिका, बटकि गोपिका त्या तुझ्या फुका. ॥ ३ ॥
वरहि देउनि आस लावुनी, विरहकूपिं या माजि घालुनी ॥
तदुपरी हरी ! दोर कापणें, तरि मृतासही काय मारणें ? ॥ ४ ॥

विगतदर्प तो सर्प कालिया, करुनि रक्षिलें गोकुळास या ॥
विषजलाचिया नाशुनी भया, विरहसागरीं, घातलें प्रिया. ॥ ५ ॥
वज्र गिळूं ह्मणे त्या अघासुरा, अजगरासि, कारुण्यसागरा ! ॥
वधुनि रक्षिलें, त्या तुला हरी ! व्रजवधूंवरी कोप कां तरी ? ॥ ६ ॥
प्रळयमेघही वर्षतां वरी, गिरि धरूनियां रक्षिल्या, हरी ! ॥
प्रळय तो स्वयें त्यांवरी करी, कठीण चित्त हें आजि कां परी ? ॥ ७ ॥
पिउनि अग्नि तूं त्यांस रक्षिसी, विरहअग्निनें आजि जाळिसी ॥
हरुनि सर्वंही आमुचीं भयें, विरहसंकटीं घालिशी स्वयें. ॥ ८ ॥
नव्हसि गोपिकापुत्र निश्चयें, सकळअंतरीं साक्षि तूं स्वयें ॥
यदुकुळीं विधिप्रार्थनामिषें, भूवन तारिशी या कथारसें. ॥ ९ ॥
म्हणुनियां तुतें प्रार्थितों हरी ! सफळ आमुची प्रार्थना करी ॥
प्रकट शीघ्र तूं होऊनि प्रिया, अभय देउनी छेदिजे भया. ॥ १० ॥
भवभयासही दूरि जो करी, निवति लागतां गोपसुंदरी ॥
अभयहस्त तो आमुच्या शिरीं, करुनियां कृपा ठेविं गा ! हरी ! ! ॥ ११ ॥
प्रकटतां रमा क्षीरसागरीं, धरिशि तूं तिचा हात ज्या करीं ॥
अभयहस्त तो मस्तकावरी, निर्वावि ठेवुनी गोपसुंदरी. ॥ १२ ॥
व्रजजनाचिया दुःखनाशका ! मदनदावि कां गोपनायिका ! ॥
बटकि आपुल्या ज्या तयांवरी, हृदयिं एवढा कोप कां, हरी ! ? ॥ १३ ॥
सहज दावुनि भाव हांससी, तरि तुं आमुचे गर्व नाशिसी ॥
नख न लावितां छेदणें जया, हरि ! कुऱ्हाडि कां ह्याणणें तया ? ॥ १४ ॥
अशुभ शीघ्र जो वंदनें हरी, कमलजा वसे ज्यांत सुंदरी ॥
तृणचरांसवें हिंडतो वनीं, चरण ठेवि तो आमुचे स्तनीं. ॥ १५ ॥
निजसुखामृता लुब्ध होऊनी, भ्रमरि ज्यामध्यें सिंधुनंदिनी ॥
पदसरोज तें या कुचांवरी, करुनियां दया ठेविं, गा ! हरी ! ॥ १६ ॥
रगडुनी फणां कालिया फणी, दवडिला खळांचा शिरोमणी ॥
मदन दुष्ट हा आमुचे उरीं, पदतळें तसा मर्दि गा ! हरी ! ॥ १७ ॥
हरुनि दर्प कंदर्प हा हरी, दवडि कालियाचेपरी अरी ॥
रवि सुता-ऱ्हदीं कालिया जसा, हृदयिं आमुच्या कामही तसा. ॥ १८ ॥

मधुर वैखरी बोल आमुशीं, निगमरूप जें संतमानसीं ॥
विरहमूर्छिता या स्वकिंकरी, स्वाधरामृतें जीववीं, हरी ! ॥ १९ ॥
तुझि कथासुधा तापल्या जना, निववि अंतरीं, विश्वजीवना ! ॥
अमृत निंदिती स्वर्गिचें मुनी, तव कथामृता वंदिती जनीं. ॥ २० ॥
अमृत मातवी स्वर्गिचे हरी ! तुझि कथासुधा बंध संहरी ॥
अमृत जे पिती त्यांचिया शिरीं, चरण देउनी नें कथा वरी ॥ २१ ॥
अमृत गोड हें जों जिभेवरी, तुझि कथासुधा गोड हे हरी ! ॥
श्रवणिं आननीं बाह्य अंतरीं, मधुर सर्वथा जे परोपरी ॥ २२ ॥
कनक आणि ते गुंज जोखणें, तुझि कथासुधा तुल्य लेखणें ॥
सुलभ जे सदा सर्वही स्थळीं, अमृत तुच्छ तें देवताकुळीं ॥ २३ ॥
त्रिभुवनेश ! तूं त्या तुला जशी, करिति तुल्यता ऊर्णनाभिशीं ॥
अमृतसाम्यही श्रीकथामृता, वदति तेथ हा भाव तत्त्वतां ॥ २४ ॥
सवत लक्षुमी ती तुझ्या उरीं, तसिच मुक्ति ते श्रीकथेवरी ।
बहु उदार जे जे अशी कथा, श्रवण याचकां देति सर्वथा ॥ २५ ॥
सुजन याचकां अर्पिती धनें, परि मदासि तीं होति साधनें ।
हरि ! कथा तुझी विश्वपावनी, बहु उदार जे वर्णिती जनीं. ॥ २६ ॥
विरहहें जरी प्राण टाकिती, तरि कथामृतें गोपिका जिती ।
परि हरी ! तुझे संगतीविणें, मरण तें बरें, काय हें जिणें ? ॥२७॥
सरस हास्य सप्रेम पाहणें, विहरणें चिदानंदलक्षणें ॥
करिति अंतरीं ध्यान जे मुनी, विसरती कशा गोपकामिनी ? ॥२८॥
स्मरविलास एकांतिचे वनीं, बहु रुतोनि जे राहिले मनीं ॥
करिति आमुच्या क्षोभ मानसीं, कपटिया ! कसा गुप्त आमुशीं ! ॥२९॥
फिरसि गोधनें चारितां वनीं, पद तुझें व्रजीं आठवूं मनीं ।
दुखवतील कीं ते तृणांकुरीं, ह्मणुनि बूडतों दुःखसागरीं ॥३०॥
दिवस मावळे, येसि तूं व्रजा, नयनिं दाविशी श्रीमुखांबुजा ।
कुरळ केश जे भृंग ते जसे, वरि पराग ते धूलिही दिसे ॥३१॥
परतसी वनीं दैत्य मारुनी, दिससि थोर तूं वीर लोचनीं ।
वदनचंद्र सांजेस दावुनी, मदनसोडिसी आमुचे मनीं ॥३२॥

पुरवि वंदनें सर्व कामना, चरण तो तुझा नंदनंदना ! ।
त्वरित ठेवुनि आमुचे कुचीं, पुरवि ईतुकी आस आमुची ॥३३॥
सतत पूजिला जो चतुर्मुखें, वसति ज्यामध्यें सर्वही सुखें ।
धरणिला अलंकार या वनीं, चरण ठेवि तो आमुचे स्तनीं ॥३४॥
सकळ संकटीं ध्येय अंतरीं, स्मरति त्यांचिया आपदा हरी ।
त्वरित गोपिकांच्या पयोधरीं, चरण आपुला ठेवि तूं, हरी ! ॥३५॥
सुरत वाढवी, शोक जो हरी, स्वरित वेणुनें चुंबिलाधरीं ।
विसरवी जनां सर्व रक्तता, त्वरित पाजि त्यां स्वाधरामृता ॥३६॥
सुरततृप्ति ही झालियावरी, अधर जो तुझा चुंबितां, हरी ? ।
सुरतवासना होय मागुती, अमृत तेथिचें दे रमापती ! ॥३७॥
ढकलुनी युगासारिख्या त्रुटी, दिवस कंठुनी थोर संकटीं ।
नयनिं पाहतां श्रीमुखाप्रती, लवति पापण्या त्या न सोसती ॥३८॥
नयनिं पाहतां तूज माधवा ! करिति पापण्या विघ्न जेधवां ।
करुनि अंगुलीभंग तेधवां, बहुत निंदिती पद्मसंभवा ॥३९॥
न पुरती मुखा पाहतां धणी, करिति पापण्या विघ्न पापिणी ।
कपटि या अशा ज्या विलासिनी, त्यजिल कोण त्यां तूजवांचुनी ? ॥४०॥
कुलपतीसुतभ्रातृबंधुंतें, त्यजुनियां शठा ! पावलों तुतें ।
स्वरित मोहिल्या गोपसुंदरी, त्यजिल कोण रात्रीं वनांतरी ? ॥४१॥
पूर्व सूचना कळति आमुतें, तरि न धांवतों काननीं तुतें ॥
कशि निराश विश्वासघातका ! करुनि मारिल्या दासि गोपिका ?॥४२॥
वदन लोचनीं पाहतां, हरी ! अजि विशाळता देखतां उरीं ॥
उपजती मनीं कामकामना, घडि घडि स्पृहा वाढते मना ॥४३॥
विविध शब्द एकांतिचे तुझे, श्रवणिं ऐकतां काम ऊपजे ॥
तुजविणें हरी ! प्राण जातसे, करिं कृपाळु ! बा ! वांचती असे ॥४४॥
भुवनमंगळें मूर्ति जे करि, व्रजजनास ते पावली, हरी ! ॥
त्यजुनी कोप, या गोपसुंदरी, निवविं दावुनी काम कूसरी ॥४५॥
चरण ठेवितां कर्कश स्तनीं, बहु भितों मनीं गोपकामिनी ॥
फिरसि त्या पदीं तूं चहूंकडे, झणि तयासिही रूतती खडे ॥४६॥

सकळही अशा गोपसंदरी, करिती गायनें त्या परोपरी ।।
रडति सुस्वरें अश्रु लोचनीं, धरुनी लालसा कृष्णदर्शनीं ।।४७।।
रडति तों तयांमाजि ये हरी, प्रकट आपुलें रूप तो करी ।।
मदनमोहन श्रीपति स्वयें, पुसतसे तयांलागी विस्मयें ।।४८।।
वसन पीवळें, हार कंधरीं, नयनिं देखुनी गोपसुंदरी ।।
उठलिया जशा प्राण आलिया, सकल शक्ति त्या येति इंद्रियां ।।४९।।
धरिति धांवुनी एकि त्या करीं, धरिति एकि त्या पीत अंबरीं ।।
भुज धरीति त्या एकि अंगदीं, किर्तिकिनीं मिठचा घातल्या पदीं ।।५०।।
हरिपदीं तया नित्य वामनें, त्रिभुवनी मिठी घातली मनें ।।
अमन या मनें वृत्ति गोपिका, सकळ झालिया चित्सुखात्मिका ।।५१।।

## ७. नारदकृत कष्णस्तुती

कृष्ण कृष्णाप्रमेयात्मन्योगेश जगदीश्वर ।
वासुदेवाखिलावास सात्वतां प्रवर प्रभो ।।१।।
त्वमात्मा सर्वभूतानामेको ज्योतिरिवैधसाम् ।
गूढो गुहाशयः साक्षी महापुरुष ईश्वरः ।।२।।
आत्मनात्माश्रयः पूर्वं मायया ससृजे गुणान् ।
तैरिदं सत्यसंकल्पः सृजस्यत्स्यवसीश्वरः ।।३।।
स त्वं भूधरभूतानां दैत्यप्रमथरक्षसाम् ।
अवतीर्णो विनाशाय सेतूनां रक्षणाय च ।।४।।
दिष्टचा ते निहतो दैत्यो लीलयायं हयाकृतिः ।
यस्य हेषितसन्त्रस्तास्त्यजन्त्यनिमिषा दिवम् ।।५।।
चाणूरं मुष्टिकं चैव मल्लानन्यांश्च हस्तिनम् ।
कंसं च निहतं द्रक्ष्ये परश्वोऽहनि ते विभो ।।६।।
तस्यानु शङ्खयवनमुराणां नरकस्य च ।
पारिजातापहरणमिन्द्रस्य च पराजयम् ।।७।।

उद्वाहं वीरकन्यानां वीर्यशुल्कादिलक्षणम् ।
नृगस्य मोक्षणं पापाद् द्वारकायां जगत्पते ॥८॥
स्यमन्तकस्य च मणेरादानं सह भार्यया ।
मृतपुत्रप्रदानं च ब्राह्मणस्य स्वधामतः ॥९॥
पौण्ड्रकस्य वधं पश्चात्काशिपुर्याश्च दीपनम् ।
दन्तवक्त्रस्य निधनं चैद्यस्य च महाक्रतौ ॥१०॥
यानि चान्यानि वीर्याणि द्वारकामावसन्भवान् ।
कर्ता द्रक्ष्याम्यहं तानि गेयानि कविभिर्भुवि ॥११॥
अथ ते कालरूपस्य क्षपयिष्णोरमुष्य वै ।
अक्षौहिणीनां निधनं द्रक्ष्याम्यर्जुनसारथेः ॥१२॥
विशुद्धविज्ञानघनं स्वसंस्थया समाप्तसर्वार्थममोघवाञ्छितम् ।
स्वतेजसा नित्यनिवृत्तमायागुणप्रवाहं भगवन्तमीमहि ॥१३॥
(१०. ३७. १०–२२)

श्रीकृष्णा, सर्वव्यापी योगेश्वरा, तुझे सामर्थ्य अपार आहे. यदुकुलभूषणा, वासुदेवा, अग्नी जसा सर्व काष्ठांत गुप्त असतो, त्याप्रमाणे तू सर्व प्राण्यांच्या ठिकाणी आहेस. महापुरुषा, तू सर्वसाक्षी आहेस. सत्य संकल्पा, आत्म्याचे अधिष्ठान तू आहेस. सत्त्व, रज, तम हे तीन गुण तूच आपल्या मायाशक्तीने निर्माण केलेस. त्यांच्या योगाने तू या जगाची उत्पत्ती, स्थिती व लय करतोस. दुष्ट राजे, दैत्य, प्रमथ, राक्षस यांच्या नाशासाठी व धर्मरक्षणार्थ तू सांप्रत या यदुकुलात अवतार धारण केला आहेस आताच तू हा जो अश्वरूपी दैत्याचा लीलेने वध केलास, त्यामुळे सर्वांचे कल्याण झाले आहे. याच्या भयंकर ओरडण्यामुळे देवांनी भयभीत होऊन स्वर्गात राहाणे सोडून दिले होते.

भगवंता, परवा तुझ्याकडून कुवलयपीड हत्ती, चाणूर, मुष्टिक व इतर मल्ल आणि कंस यांचा वध झालेला मी पाहीन. त्यानंतर लौकरच शंखासुर, कालयवन, मुर, दानव, नरकासुर यांचाही वध झालेला मी

पाहीन. त्याचप्रमाणे पारिजात वृक्षहरण, इंद्राचा पराजय, पराक्रमाने आणलेल्या राजकन्यांशी विवाह, द्वारकेत नृगराजाची शापमुक्तता, स्यमंतक मण्यासाठी केलेले जांबवानाशी युद्ध, जांबवती नावाच्या कन्येचे केलेले पाणी ग्रहण, एका ब्राह्मणाच्या मृत मुलाचे संजीवनही मी पाहीन.

तुझ्याकडून झालेला पौंड्रकाचा वध, काशिपुरीचे दहन, दतवक्राचा वध, शिशुपालाचा धर्मराजाच्या राजसूययज्ञात वध, इत्यादी गोष्टी मला दिसतील. द्वारकेत राहून तू पुढे करणार असलेली, कवानी काव्यात वर्णन करण्यास योग्य असलेली कृत्ये मला दिसतील. नंतर कालस्वरूपी तू भारतीययुद्धात अर्जुनाचा सारथी होशील. अनेक अक्षौहिणींचा तू संहार करशील, तोही मी पाहीन.

भगवंता, तुझे स्वरूप शुद्ध ज्ञानमय आहे. तुझा संकल्प कधी व्यर्थ होत नाही. तू निरंतर स्वरूपानंदात निमग्न असतोस. तू पूर्णकाम आहेस. ज्ञानशक्तीच्या योगाने तू या संसारापासून अलिप्त आहेस. मी तुला शरण आलो आहे. परमेश्वरा, तू स्वतंत्र असून मायेच्या योगाने महत्त्वादी सर्व विषयांचा द्रष्टा आहेस. केवळ लीलेनें तू हे मनुष्यरूप धारण केले आहेस. तुला, यादवश्रेष्ठाला नमस्कार असो.

## ८ संक्षिप्त वेदस्तुती

जय जय जह्यजामजित दोषगृभीतगुणां
त्वमसि यदात्मना समवरुद्धसमस्तभगः ।
अगजगदोकसामखिलशक्त्यवबोधक ते
क्वचिदजयाऽऽत्मना च चरतोऽनुचरेन्निगमः ॥१॥
बृहदुपलब्धमेतदवयन्त्यवशेषतया
यत उदयास्तमयौ विकृतेर्मृदि वाऽविकृतात् ।
अत ऋषयो दधुस्त्वयि मनोवचनाचरितं
कथमयथा भवन्ति भुवि दत्तपदानि नृणाम् ॥२॥

इति तव सूरयस्त्र्यधिपतेऽखिललोकमल-
क्षपणकथामृताब्धिमवगाह्य तपांसि जहुः ।
किमुत पुनः स्वधामविधुताशयकालगुणाः
परम भजन्ति ये पदमजस्रसुखानुभवम् ॥३॥

दृतय इव श्वसन्त्यसुभृतो यदि तेऽनुविधा
महदहमादयोऽण्डमसृजन्यदनुग्रहतः ।
पुरुषविधोऽन्वयोऽत्र चरमोऽन्नमयादिषु यः
सदसतः परं त्वमथ यदेष्ववशेषमृतम् ॥४॥

उदरमुपासते य ऋषिवर्त्मसु कूर्पदृशः
परिसरपद्धतिं हृदयमारुणयो दहरम् ।
तत उदगादनन्त तव धाम शिरः परमं
पुनरिह यत्समेत्य न पतन्ति कृतान्तमुखे ॥५॥

स्वकृतविचित्रयोनिषु विशन्निव हेतुतया
तरतमतश्चकास्स्यनलवत्स्वकृतानुकृतिः ।
अथ वितथास्वमूष्ववितथं तव धाम समं
विरजधियोऽन्वयन्त्यभिविपण्यव एकरसम् ॥६॥

स्वकृतपुरेष्वमीष्वबहिरन्तरसंवरणं
तव पुरुषं वदन्त्यखिलशक्तिधृतोंऽशकृतम् ।
इति नृगतिं विविच्य कवयो निगमावपनं
भवत उपासतेऽङ्घ्रिमभवं भुवि विश्वसिताः ॥७॥

दुरवगमात्मतत्त्वनिगमाय तवात्ततनो-
श्चरितमहामृताब्धिपरिवर्तपरिश्रमणाः ।
न परिलषन्ति केचिदपवर्गमपीश्वर ते
चरणसरोजहंसकुलसङ्गविसृष्टगृहाः ॥८॥

त्वदनुपथं कुलायमिदमात्मसुहृत्प्रियव-
चच्चरति तथोन्मुखे त्वयि हिते प्रिय आत्मनि च ।
न बत रमन्त्यहो असदुपासनयाऽऽत्महनो
यदनुशया भ्रमन्त्युरुभये कुशरीरभृतः ॥९॥

निभृतमरुन्मनोऽक्षदृढयोगयुजो हृदि य-
न्मुनय उपासते तदरयोऽपि ययुः स्मरणात् ।
स्त्रिय उरगेन्द्रभोगभुजदण्डविषक्तधियो
वयमपि ते समाः समदृशोऽङ्घ्रिसरोजसुधाः ॥१०॥

क इह नु वेद बतावरजन्मलयोऽग्रसरं
यत उदगादृषिर्यमनु देवगणा उभये ।
तर्हि न सन्न चासदुभयं न च कालजवः
किमपि न तत्र शास्त्रमवकृष्य शयीत यदा ॥११॥

जनिमसतः सतो मृतिमुतात्मनि ये च भिदां
विपणमृतं स्मरन्त्युपदिशन्ति त आरुपितैः ।
त्रिगुणमयः पुमानिति भिदा यदबोधकृता
त्वयि न ततः परत्र स भवेदवबोधरसे ॥१२॥

सदिव मनस्त्रिवृत्त्वयि विभात्यसदामनुजात्
सदभिमृशन्त्यशेषमिदमात्मतयात्मऽऽविदः ।
न हि विकृतिं त्यजन्ति कनकस्य तदात्मतया
स्वकृतमनुप्रविष्टमिदमात्मतयाऽवसितम् ॥१३॥

तव परि ये चरन्त्यखिलसत्त्वनिकेततया
त उत पदाऽऽक्रमन्त्यविगणय्य शिरो निर्ऋतेः ।
परिवयसे पशूनिव गिरा विबुधानपि तां-
स्त्वयि कृतसौहृदाः खलु पुनन्ति न ये विमुखाः ॥१४॥

त्वमकरणः स्वराडखिलकारकशक्तिधर-
स्तव बलिमुद्वहन्ति समदन्त्यजयाऽनिमिषाः ।
वर्षभुजोऽखिलक्षितिपतेरिव विश्वसृजो
विदधति यत्र ये त्वधिकृता भवतश्चकिताः ॥१५॥

स्थिरचरजातयः स्युरजयोत्थनिमित्तयुजो
विहर उदीक्षया यदि परस्य विमुक्त ततः ।
न हि परमस्य कश्चिदपरो न परश्च भवे-
द्वियत इवापदस्य तव शून्यतुलां दधतः ॥१६॥

अपरिमिता ध्रुवास्तनुभृतो यदि सर्वगता-
स्तर्हि न शास्यतेति नियमो ध्रुव नेतरथा ।
अजनि च यन्मयं तदविमुच्य नियन्तृ भवेत्
सममनुजानतां यदमतं मतदुष्टतया ॥१७॥

न घटत उद्भवः प्रकृतिपूरुषयोरजयो-
रुभययुजा भवन्त्यसुभृतो जलबुद्बुदवत् ।
त्वयि त इमे ततो विविधनामगुणैः परमे
सरित इवार्णवे मधुनि लिल्युरशेषरसाः ॥१८॥

नृषु तव मायया भ्रमममीष्ववगत्य भृशं
त्वयि सुधियोऽभवे दधति भावमनुप्रभवम् ।
कथमनुवर्ततां भवभयं तव यद्भ्रुकुटिः
सृजति मुहुस्त्रिणेमिरभवच्छरणेषु भयम् ॥१९॥

विजितहृषीकवायुभिरदान्तमनस्तुरगं
य इह यतन्ति यन्तुमतिलोलमुपायखिदः ।
व्यसनशतान्विताः समवहाय गुरोश्चरणं
वणिज इवाज सन्त्यकृतकर्णधरा जलधौ ॥२०॥

स्वजनसुतात्मदारधनधामधरासुरथै-
स्त्वयि सति किं नृणां श्रयत आत्मनि सर्वरसे ।
इति सदजानतां मिथुनतो रतये चरतां
सुखयति को न्विह स्वविहते स्वनिरस्तभगे ॥२१॥

भुवि पुरुपुण्यतीर्थसदनान्यृषयो विमदा-
स्त उत भवत्पदाम्बुजहृदोऽघभिदङ्घ्रिजलाः ।
दधति सकृन्मनस्त्वयि य आत्मनि नित्यसुखे
न पुनरुपासते पुरुषसारहरावसथान् ॥२२॥

सत इदमुत्थितं सदिति चेन्ननु तर्कहतं
व्यभिचरति क्व च क्व च मृषा न तथोभययुक् ।
व्यवहृतये विकल्प इषितोऽन्धपरम्परया
भ्रमयति भारती त उरुवृत्तिभिरुक्थजडान् ॥२३॥

न यदिदमग्र आस न भविष्यदतो निधना-
दनुमितमन्तरा त्वयि विभाति मृषैकरसे ।
अत उपमीयते द्रविणजातिविकल्पपथैः
वितथमनोविलासमृतमित्यवयन्त्यबुधाः ॥२४॥

स यदजया त्वजामनुशयीत गुणांश्च जुषन्
भजति सरूपतां तदनु मृत्युमपेतभगः ।
त्वमुत जहासि तामहिरिव त्वचमात्तभगो
महसि महीयसेऽष्टगुणितेऽपरिमेयभगः ॥२५॥

यदि न समुद्धरन्ति यतयो हृदि कामजटा
दुरधिगमोऽसतां हृदि गतोऽस्मृतकण्ठमणिः ।
असुतृपयोगिनामुभयतोऽप्यसुखं भगवन्न-
नपगतान्तकादनधिरूढपदाद्भवतः ॥२६॥

त्वदवगमी न वेत्ति भवदुत्थशुभाशुभयो-
गुर्णविगुणान्वयांस्तर्हि देवभृतां च गिरः ।
अनुयुगमन्वहं सगुण गीतपरम्परया
श्रवणभृतो यतस्त्वमपवर्गगतिर्मनुजैः ॥२७॥
द्युपतय एव ते न ययुरन्तमनन्ततया
त्वमपि यदन्ताऽण्डनिचया ननु सावरणाः ।
ख इव रजांसि वान्ति वयसा सह यच्छ्रुतय-
स्त्वयि हि फलन्त्यतन्निरसनेन भवन्निधनाः ॥२८॥

(१०.८७. १४–४१)

एकदा नारायणऋषींनी नारदांना श्रुती या ब्रह्माचेच प्रतिपादन कसे करतात हे समजावून दिले. पूर्वी हे सनंदनानें ऋषींना पटवून दिले होतेच. एकदा श्रुतींनी परमेश्वरास जागे करण्याचा प्रयत्न करून म्हटले,

'अजिक्य परमेश्वरा, तू आपला विजय प्रकट कर. तू आपल्या सामर्थ्यानें सर्व वैभवे स्वाधीन करून ठेविली आहेस. म्हणून स्थावर व जंगम अशा शरीरधारी भूतांची माया तू नष्ट कर. त्या मायेनें आपल्या दोषांवर पांघरूण घालण्यासाठी गुणांचा स्वीकार केला आहे. प्राण्यांचे सामर्थ्य जागे करणारा देवा, तूच आहेस. तू निरुपाधिक असलास तरी कधी मायेसह संचार करतोस व म्हणूनच वेदांना तुझें वर्णन करता येते.१

दृष्टिगोचर होणारे हे जे विश्व आहे ते प्रलयकालीही कोणत्या-तरी रूपानें शिल्लक राहात असल्याने ज्ञानी पुरुष तत्त्वतः त्याला ब्रह्मरूप मानतात. कारण त्या ब्रह्मापासूनच विश्वाची निर्मिती व लय होतात. पण त्यामुळे त्या ब्रह्मस्वरूपात काही विकार होत नाही. माती-पासून घटादी पदार्थ होतात. पण मातीत काही फरक पडत नाही. तसाच हा प्रकार आहे. म्हणून वेदांचे द्रष्टे ऋषी, त्यांना दिसलेले वेदमंत्र यांना जे समजले, त्यांनी जे वाणीनें उच्चारले ते तुझ्या संबंधानें आहे असे ते ठरवितात. माणसे पृथ्वीवर राहात असल्यानें त्यांनी कोठेही पाय ठेविला तरी तो पृथ्वीवरचाच होतो. कारण तो लाकडावर, वस्त्रावर

असला तरी ते लाकूड वा वस्त्र पृथ्वीवर असल्यामुळे तो पायही शेवटी पृथ्वीवरच आहे असे म्हणावे लागते.[२]

म्हणून त्रिगुणात्मक प्रकृतीच्या नियंत्या परमात्म्या, सर्व जगाचे पाप नाहीसे करणाऱ्या अशा तुझ्या मधुर कथारूपी समुद्रात बुड्या मारून ज्ञानी पुरुष आपली दुःखे नाहीशी करतात. म्हणून परमेश्वरा, जे आत्मस्वरूप स्वीकारून अंतःकरणाच्या वृत्तींचा लय करतात, काळाचे भेदही नाहीसे करून अखंड सुखाचा अनुभव देणाऱ्या तुझ्या चरणांची सेवा करतात, त्यांची सर्व दुःखे नाहीशी होतात.[३]

प्राणी तुझी भक्ती करतील तरच त्यांच्या जीवनाचे साफल्य होईल. नाही तर त्यांचा श्वासोच्छ्वास म्हणजे भात्यासारखा आत बाहेर सोडला जाणारा वाराच होईल. असल्या श्वासोच्छ्वासानें परम सुखाचा लाभ होणार कसा ? अहंकार इत्यादी भूते ब्रह्मांडाची निर्मिती करतात ती काय स्वतःच्या सामर्थ्यानें ? तुझ्या कृपेनें ही निर्मिती होते. स्वतंत्र सुख देण्याचे सामर्थ्य तुझ्यावाचून इतर कोणातच नाही. या शरीरातील पंचकोशांत तू सर्वत्र सुतानें ओवल्यासारखा असतोस. त्या कोशाच्या आकारासारखा असतोस. पण त्यात तू गुरफटून जात नाहीस. नष्ट होत नाहीस. सर्वांच्या शेवटीही शिल्लक राहातोस. कार्य व कारण यांच्या पलीकडचा तू आहेस.[४]

परमेश्वरा, मंत्रद्रष्टचा ज्ञानी ऋषींच्या मार्गात डोळ्यांत खडे गेल्याप्रमाणे ज्यांची दृष्टी अंध झाली आहे असे उदरातील ब्रह्माची उपासना करतात. ज्याच्या अनेक नाड्या पसरल्या आहेत अशा सूक्ष्म हृदयातील आकाशात अरुणाचे अनुयायी ब्रह्माचे ध्यान करतात. पण तुझे स्थान वर मस्तकात उंच ठिकाणी आहे. ते प्राप्त झाले तर पुरुष संसारचक्रात पुन्हा सापडत नाही.[५]

परमेश्वरा, तू ज्या प्रकारच्या योनी निर्माण केल्यास त्यांत तू उपादानकारण रूपानें शिरलास. अग्नी जसा लहान-मोठ्या काष्ठात लहानमोठा दिसतो, पण तो अविकृतच असतो. त्याप्रमाणे तूही या लहान-मोठ्या योनींत राहिलास तरी त्या सर्व योनी मिथ्या असल्यानें त्यांत समत्वाने अनुस्यूत असलेले तुझे चैतन्यतत्त्व मात्र सत्य आहे, असे व्यवहार

सोडलेले सर्व निर्मल वृत्तीचे पुरुष जाणतात.[६]

आपल्या कर्मानुसार प्राप्त झालेल्या शरीरात भोक्ता असणारा जीव कार्यकारणांच्या आवरणापासून अलिप्त असतो. म्हणून परमेशा, सर्वशक्तिमान असा तू, त्या तुझ्या अंशापासून तो केला आहे असे म्हणतात. जगाच्या या वास्तविक स्थितीचे ज्ञान ज्ञानी पुरुष श्रद्धेनें करून घेतात. या जगात वैदिक कर्मे अर्पण करण्याचे असे ठिकाण म्हणजे तुझे चरण, त्यांची ते उपासना करतात.[७]

ईश्वरा, अत्यंत कठीण अशा आत्मस्वरूपाचे ज्ञान लोकांना व्हावे म्हणून तू अवतार घेतोस. तुझे हे अवतारचरित्र मोठ्या सागरासारखें असून त्यात अवगाहन करणाऱ्या पुरुषांचे श्रम दूर होतात. असे पुरुष तुझ्या चरणकमली हंसाप्रमाणे आसक्त होतात. या भक्तांच्या संगतीनें गृहादी सौख्यांचा त्याग करतात. मग त्यांना प्रत्यक्ष मोक्षाचीही इच्छा होत नाही.[८]

तुझ्या सेवेत लावण्यास योग्य असे हे शरीर आत्मा, मित्र, एखादा प्रेमातला मनुष्य यांप्रमाणे आपल्या स्वाधीन असताही आत्मघातकी लोक त्याचा उपयोग तुझ्या सेवेसाठी करीत नाहीत. तू हितकर, प्रिय व अंतर्यामी अनुकूल असूनही मिथ्याभूत अशा देहाच्या मागे लागून तुझ्यावर ते प्रेम करीत नाहीत, त्यांचे लक्ष देहावरच असते. असे शरीर धारण करणारे जीव भयानें भरलेल्या या संसारचक्रातच फिरतात.[९]

मोठमोठे योगी प्राण, मन, इंद्रिये यांचा विरोध करून आपल्या हृदयात ज्या ईशपदाची उपासना करतात. ते पद तुझा द्वेष करणाऱ्यांनाही स्मरणामुळे प्राप्त होते. कारण तुझ्या दृष्टीत सर्व सारखेच आहेत. तुझ्या बाहूंवर ज्यांचे मन विषयबुद्धीने आसक्त झाले आहे अशा त्या गोपी, आम्ही श्रुती तुझ्या चरणकमलांच्या मकरंदाचा आस्वाद घेणाऱ्या आहोत. तरी दोघींवर तुझी कृपा सारखीच आहे.[१०]

परमेश्वरा, तू सर्वांचा आदी आहेस. ज्यांचा जन्म अलीकडे होऊन लयही झाला आहे अशांना तुझ्या स्वरूपाचे ज्ञान होणार तरी कसे ? ब्रह्मदेवांची निर्मिती तुझ्यापासून झाली. आध्यात्मिक व आधिदैविक असे दोनही प्रकारचे देव त्या ब्रह्मदेवांपासून उत्पन्न झाले. पण तेव्हा

तू या सर्व सृष्टीस आवरून निद्रा करतोस त्यावेळी काहीच उरत नाही, जीवांच्या व्यवहारासाठी केलेले विधिनिषेधांचे शास्त्रही त्या वेळी नसतेच.[११]

परमेश्वरा, जग मिथ्या असताना त्याची उत्पत्ती झाली आहे असे मानणारे वैशेषिक, एकवीस प्रकारची दुःखे सत्य असून त्यांचा नाश मानणारे नैयायिक, सर्व आत्मे पृथक मानणारे सांख्य, स्वर्गादी भोग सत्य मानणारे मीमांसक; यांच्या सिद्धान्तांची उभारणी केवळ भ्रमावर आहे. पुरुषास त्रिगुणात्मक मानून तुझ्या ठिकाणी सर्व भेदांची उपपत्ती बसविण्याचा प्रयत्न अज्ञानजन्य आहे. तू तर भेदांच्या पलीकडचा आहेस. तू ज्ञानाचा गाभा असून तुझ्या ठिकाणी अज्ञानाचा अंशही नाही.[१२]

तुझ्या शक्तीसह हा त्रिगुणात्मक प्रपंच म्हणजे केवळ मिथ्यारूपाचा आहे. तुझे सत्याचे अधिष्ठान त्याला असल्यानें तो सत्य आहेसा भासतो. आत्मज्ञानी पुरुष हे सर्व विश्व सत्य मानतात ते त्या विश्वामुळे नसून तुझ्या आत्मस्वरूपामुळे. सोने घेणारा सोन्याचे दागिने काही सोडून देत नाही.[१३]

सर्व प्राण्यांचे अस्तित्व तुझ्यावर अवलंबून आहे असे समजून कोणी तुझी उपासना करतात. ते मृत्यूच्या मस्तकावर पाय देऊन संसारातून मुक्त होतात. पण केवळ शब्दज्ञानी तुझ्या भक्तीपासून वंचित होतात. त्यांना तू वेदवचनांनी बांधून ठेवतोस. तुझ्याशी ज्यांनी मैत्री केली ते स्वतः पवित्र होतात. जगाला पवित्र करतात. इतरांना हे शक्य नाही.[१४]

परमेश्वरा, तू इंद्रियरहित आहेस. तरी स्वयंप्रकाशी असून इतरांच्या इंद्रियशक्तींची सूत्रे तुझ्या हातात आहेत. म्हणून देव व त्यांचे अधिपती असे प्रजापती, मायेसह पूजा तुलाच अर्पण करतात. इतरांनी अर्पण केलेल्या पूजेचा उपभोग तुझ्याच सामर्थ्याने घेतात. मांडलीक राजे सार्वभौम राजाला कर देऊन त्याच्याच आधारावर इतर लोकांवर करभाग घेतात, तसेच हे आहे. देव आपल्या नेमलेल्या स्थानी राहून कर्तव्ये करतात ती तुझ्या भीतीमुळेच होय.[१५]

परमात्म्या, तू मुक्त असून मायेच्या पलीकडचा आहेस, पण लांबून

पाहाण्याच्या निमित्तानें तू त्या मायेशी खेळ करतोस, तेव्हा स्थावर जंगमात्मक देहधारी जीव निर्माण होतात. विविध कर्मांनी त्यांचा व्यवहार सुरू होतो. वस्तुतः तू सर्वांच्या पलीकडचा आहेस. तुला स्वतःचे व इतरांचे, असा भेद नाही. तू आकाशाप्रमाणे सर्वांपासून अलिप्त आहेस. शून्याशी तुझें सादृश्य आहे. म्हणून वाणी व मन यांना तू समजत नाहीस.[१६]

सत्यस्वरूप परमात्म्या, जीव जर असंख्य, नित्य व सर्वव्यापी असतील तर त्याचे नियमन शक्य नाही. ते तू करणारही नाहीस. पण ते जर तसे नसतील तर मात्र तू त्यांचा नियंता होशील. हा जीव ज्या उपादानरूप सर्वव्यापी वस्तूपासून निर्माण झाला ती वस्तू त्या जीवाचे नियमन करील. पण ती त्याचे कारण म्हणूनही राहील. ही सर्वव्यापी वस्तू आपणांला समजली असे म्हणतात त्यांना ती मुळीच समजलेली नसते. कारण जे समजते ते दोषयुक्त व संकुचित स्वरूपाचे असते. असा मात्र नियम सर्वत्र दिसतो.[१७]

प्रकृती व पुरुष ही दोनही जन्मरहित आहेत. म्हणून जीवांची उत्पत्ती या दोहोंपासून वा कोणाही एकापासून झाली असे म्हणता येत नाही. मग जीवाची उत्पत्ती होते तरी कशी ? पाणी व वायू यांच्या-पासून बुडबुडा तयार होतो, त्याप्रमाणे प्रकृती हे उपादानकारण व पुरुष हें निमित्तकारण; यांच्या संयोगानें ती होते. म्हणून नद्या जशा समुद्रास मिळतात त्याप्रमाणे सर्व नावे व गुण धारण करणारे जीव नामगुणांसह तुझ्या निर्गुण स्वरूपात लीन होतात.[१८]

परमात्म्या, या जीवांच्या मागे पुनःपुन्हा जन्मास येण्याचे लागले आहे. ते केवळ तुझ्या मायेमुळेच होय. म्हणून ज्ञानी पुरुष त्या मायेला सोडून तुझ्या ठिकाणी निष्ठा ठेवतात. कारण तू त्यांना जन्म-मरणाच्या चक्रात घालणारा नाहीस. त्यांना त्यातून मुक्त करणारा आहेस. तुझी उपासना करणाऱ्यांना जन्ममृत्यूचे भय कसले ? तीनही काळांच्या रूपानें तुझी भुवई ज्यांनी तुझा आश्रय घेतला नाही, अशा जीवांनाच भय उत्पन्न करील.[१९]

अत्यंत चंचल अशा मनरूपी घोड्याचे दमन करणे अतिशय

कठीण आहे. सद्गुरूंच्या पायांचा आश्रय सोडून जे कोणी त्या मनरूपी घोड्यास आवरण्यासाठी इंद्रिय व प्राण यांचे नियमन करतात त्यांना इष्टाची प्राप्ती होत नाही. दुःखच होते. संकटांनी ते ग्रस्त होतात. जन्मरहित अशा परमेश्वरा, नावाड्याचे साह्य न घेता समुद्रात नाव घेऊन जाणाऱ्या व्यापाऱ्यांप्रमाणे अडाणी असे हे जीव आहेत.[२०]

परमात्म्या, सर्व सुखांचा गाभा म्हणजे आत्मस्वरूपी तू आहेस. तुझी प्राप्ती उपासना करून होण्यासारखी आहे. मग आप्त, इष्ट, पुत्र, देह, स्त्री, धन, घर, भूमी, प्राण, रथ इत्यादी क्षुद्र वस्तूंवर माणसांची आसक्ती का जडते ? तुझ्या प्राप्तीसाठी यांचा काहीच उपयोग नाही. याचे ज्ञान नसल्यामुळे मनुष्ये पति-पत्नींच्या जोडीनें सुखाचा प्रयत्न करतात. पण हा संसार नष्ट होणारा असल्याने त्यांना सुख मिळणार तरी कसे ?[२१]

परमात्म्या, तुझ्या चरणकमलांना हृदयात धारण केल्यामुळे ज्यांच्या पायांचे तीर्थं पापनाशक होते असे निरहंकारी ऋषी पृथ्वीवरील पवित्र तीर्थांचें सेवन करतात. घरदारादी विषयांचे सेवन करीत नाहीत. शाश्वत सुख तुझ्यातच असल्यानें ते घरदाराच्या मागे लागत नाहीत कारण हे भोग पुरुषार्थं हरण करणारे आहेत.[२२]

हे जग जरी सत्य ब्रह्मापासून निर्माण झाले असले तरी ते सत्यच मानता येत नाही. जे ज्यापासून उत्पन्न होते ते त्याच्यासारखे असते, हा सिद्धान्त खरा नाही. कित्येक ठिकाणी उत्पन्न झालेली वस्तू अज्ञान-जन्य असल्यामुळे खोटीच असते. तसे हे जगही सत्य नव्हे. सत्य ब्रह्मावर जगाचा हा भास निर्माण झाला आहे. तो व्यवहारात इष्ट असला तरी त्याला मूळ आधार नाही. परमात्म्या, तुझी वेदवाणी कर्माच्या योगानें ज्यांची बुद्धी जड झाली आहे, अशांना नाना वृत्तींनी मोह पाडते.[२३]

हे जग सृष्टीपूर्वी नव्हते. प्रलयानंतरही नसते. पण या दोनही स्थितींच्या काळांत जे भासते ते तुझ्या निर्गुण स्वरूपाच्या आभासावर भासते. म्हणून मृत्तिकादी द्रव्यांपासून निर्माण होणाऱ्या घटादी भिन्न भिन्न पदार्थांची त्याला उपमा देतात. पण ते सर्वथा असत्य अशा मनोराज्यासारखे आहे. त्याला सत्य म्हणणारे अडाणी आहेत.[२४]

